मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीची पुस्तकमाला.

पुस्तक ६० वें.

# बोधपर व्याख्यानें.

हें पुस्तक

एका इंग्रजी पुस्तकाच्या आधारें

श्रीयुत महादेव रामचंद्र प्रधान,

(ब्रह्मचर्य व गृहस्थाश्रम, सुलभवेदान्तगुच्छ भाग १, ते ३, इत्यादि पुस्तकाचे कर्ते,)

नागपुर,

यांनी लिहिलें.

[प्रथमावृत्ति]

मनोरंजक ग्रंथप्र

गिरग

[त १-०-०.]

# समर्पण.



ही सुविचारपरिपूर्ण कुसुममाला अखिल महाराष्ट्र बंधुभगिनींना अत्यंत प्रेमादराने अर्पण करीत आहे. ती त्यांना कल्याणप्रद व सन्मार्गदर्शक होवो.

**महादेव रामचंद्र प्रधान.**

# विषयानुक्रमणिका.

# प्रस्तावना.

प्रस्तुत व्याख्यानें काठेवाडातील राजकुमार कॉलेजाचे पहिले प्रिन्सिपाल मि. चेस्टर् मॅकनॉटन् यानी तेथील विद्यार्थ्यांना प्रत्येक रविवारी दिलेल्या व्याख्यानाचे रूपांतर होत. मूळ व्याख्यानें 'Common Thoughts on Serious Subjects being plain words for boys' या नावानें ग्रंथरूपानें प्रसिद्ध होऊन त्याची गुजराती व हिंदी अशा दोन एतद्देशीय भाषांत रूपांतरेंहि झालेली आहेत या पुस्तकाला मि रॉबर्ट् व्हाइटलॉ यानी प्रस्तावना लिहिलेली असून त्यांत मि. चेस्टर् मॅकनॉटन् याचें अल्प चरित्रहि दिलें आहे. या व्याख्यानांतून व्याख्यात्याच्या मनाचें व शीलाचें तेज, त्याचें विलक्षण मानसिक व स्वाभाविक सौंदर्य इतक्या प्रशंसनीय रीतीनें प्रतिबिंबित झालेलें आहे, कीं, ती व्याख्यानें फिरून प्रसिद्ध करणें हेंच त्याचें योग्य स्मारक, असें त्याच्या स्नेह्यांना वाटलें राजकुमारांना व सरदार घराण्यांतील मुलांना शिक्षण देण्याचें महत्त्वाचें कार्य अंगावर घेऊन, तो कार्यभार सतत पंचवीस वर्षें मि. चेस्टर् मॅकनॉटन् यानी ज्या जोमानें व नेटानें वाहिला, त्याची, हीं व्याख्यानें चांगल्या रीतीनें साक्ष पटवीत आहेत हीं व्याख्यानें इतकी सरळ, गंभीर व निर्भीड वाणीनें आणि स्पष्ट हेतूनें दिलेली आहेत, कीं, तीं ज्यांना प्रत्यक्ष ऐकावयास मिळालीं त्यांना जशी तीं उपकारक झालीं, तशींच तीं ज्यांच्या अवलोकनांत येतील त्यांनाहि सदाचाराचा मार्ग दाखविण्याच्या कामीं कल्याणप्रद झाल्यावांचून खात्रीनें राहणार नाहींत. अशीं हीं व्याख्यानें देण्याचें प्रयोजन कोणतें, तीं कोणाला उद्देशून दिलीं, व व्याख्यात्याची योग्यता काय, तो कोणत्या तऱ्हेचा मनुष्य होता, याची महाराष्ट्रवाचकांना थोडीतरी कल्पना व्हावी, म्हणून व्याख्यात्याची थोडीशी माहिती येथें देणें इष्ट वाटतें.

चेस्टर् मॅकनॉटन् याचा जन्म इ. स. १८४३ त झाला. याचे आजे सर फ्रॅन्सिस् मॅकनॉटन् हे कलकत्ता येथें न्यायाधीश होते. याचे वडील

मि इलिअट् मॅकनॉटन् हे कलकत्ता येथील कोर्टात वरिष्ठ कामगार होते हिंदुस्थानातून ते १८३८ साली परत गेले पुढे १८४१ त त्याना ईस्ट इंडिया कम्पनीचे डायरेक्टर निवडले पुढे इ स १८५९ साली हिंदुस्थानचा राज्यकारभार कंपनीकडून निघून राणीसरकारच्या हाती गेला, तेव्हा ते स्टेट सेक्रेटरीच्या कौन्सिलचे सभासद झाले ते बुद्धीने तीव्र आणि करारी स्वभावाचे असून, त्याचे शीलसामर्थ्यहि विलक्षण होते हेच गुण आनुवंशिक संस्काराने चेस्टर् मॅकनॉटन् याच्या अंगी आले, व त्यातच मातेच्या प्रेमळ सौजन्याची व शुद्ध निरहंकारवृत्तीची भर पडली मातेचे हे गुण याच्याठायीं किती तंतोतंत उतरले होते, हे याच्या 'सौजन्या'वरील व्याख्यानावरून चागले कळून येते यानी ज्यावेळी तें व्याख्यान लिहिले, त्यावेळी याच्या विचारात हे गुण मूर्तिमंत जागृत असल्याचे नि संशय दिसून येते कौमार्यावस्थेत व तारुण्यात याचें मन प्रफुल्लित व तरतरीत होते खरे, पण शरीरप्रकृति मात्र असावी तशी नव्हती दम्याच्या आजाराने याचा सतत पिच्छा पुरविल्यामुळे याना वारवार बराच त्रास भोगावा लागला त्यामुळेच याना ह्यारोला जाता आलें नाहीं, व केंब्रिजला जाण्याच्या अगोदर याचा बहुतेक काळ मि एडमंड् व्हेनेबल्स् याच्या सहवासात गेला. हे इ स १८६२ साली केंब्रिज येथील ट्रिनिटी कॉलेजात गेले, व तेथे क्लॅसिकल् ऑनर्ससाठी अभ्यास करू लागले, पण आजारीपणामुळे याच्या अभ्यासात बराच व्यत्यय आला. अखेरीस इ स १८६४ सालीं जलपर्यटणासाठीं म्हणून हे हिंदुस्थानात येण्यास निघाले व सहा महिनेपर्यंत हे फिरत होते या सर्व अडचणींना तोंड देऊन इ स. १८६६ साली क्लॅसिकल ट्रिपॉसच्या परीक्षेत दुसऱ्या वर्गात हे १२ वे आले लॅटिन भाषेत यानी चागले प्रावीण्य संपादन केले होते, व विशेषेकरून याच्या त्या भाषेतील कविता इंग्रजीइतक्याच शुद्ध, भारदस्त व सरळ असत. ग्रीक व लॅटिन ग्रंथकारात याना व्हर्जिल् अतिशय आवडत असे इतर गोष्टींप्रमाणेच वाङ्मयाविषयी याची अभिरुचि प्रशंसनीय होती. हे इ स १८६६ च्या मे महिन्यात हिंदुस्थानांत आले, व जून महिन्यात दर्भंग्याच्या अल्पवयी महाराजाच्या शिक्षकाच्या जागीं याची नेमणूक झाली. महाराजाचे त्यावेळीं वय अवघे ९ वर्षांचें होते इ स. १८७० साली डिसेंबर महिन्यात ते काठेवाडातील राजकोट येथील राजकुमार कॉलेजाचे पहिले प्रिन्सिपाल झाले, व त्या जागेवरच हे अखेरपर्यंत होते. याना करावें लागणारें काम

त्रासाचे, चिंतेचे व एकसारखे तेंच ते होतें. तरीपण याचें त्या का ावर प्रेम ह.ते, व त्या कर्तव्यप्रीतीमुळेच याना सामर्थ्य प्राप्त झाले होते. याच्या शारीरिक दौर्बल्याचा विचार करू लागलों, म्हणजे वयाने, सवयीने आणि स्वभावाने भिन्नभिन्न मुलाना शारीरिक व मानसिक शिक्षण इतकी वर्षे अढळ उत्कंठेने व उत्साहभंग न होता याना कसें देता आले, याचे आश्चर्य वाटते हे मुलाबरोबर खेळ खेळत; त्याना क्रिकेट व फूटबॉल खेळ खेळण्यास स्वत शिकवीत, व दररोज घोड्यावर त्याच्याबरोबर फिरावयास जात असत. इग्लडात क्रिकेट खेळण्यात ज्यानी एवढी कीर्ति सपादन केली, ते रणजितसिगजी प्रथमत क्रिकेट खेळण्यास याच्याचजवळ शिकले. हिदी व इंग्रजी वाङ्मयातील काही अप्रतिम गोष्टीचा यानी त्याना परिचय करून दिला, याची साक्ष याची व्याख्यानेच देत आहेत. सर्वात विशेष हे, कीं, यानी रणजितसिगजी याना उन्नत विचाराची व थोर हेतूंची दिशा दाखवून तदनुरूप आचरण करण्याची सवय लावून दिली, व लोककल्याणार्थ देह झिजविणे हाच सर्वोत्कृष्ट मार्ग आहे, असें मानण्यास त्याना शिकविले. हे विद्यार्थ्यांची योग्यता ओळखून असत व त्याच्याशीं मित्रत्वाच्या नात्याने वागून त्याची काळजी घेत आणि विद्यार्थीहि तितक्याच प्रेमाने याच्याशी वागत. इ स १८९२ च्या अखेरीस हे स्वदेशीं परत गेले, त्यावेळीं याची प्रकृति काहींशी ढासळलेली होती, व जाताना पेन्शन घेण्याच्या उद्देशानेच हे परत गेले. पण बरेच दिवस विश्राति मिळाल्यामुळे याना पुन हुरूप येऊन नोकरीची राहिलेली मुदत पुरी करण्यासाठी म्हणून फिरून हे १८९४ साली परत हिदुस्थानात आले इकडे परत आल्यावर याचा काळ फार आनंदात गेला व शरीरप्रकृतिहि चागली सुधारली होती. मि वाडिगटन हे याचे साहाय्यक असून त्याच्या पश्चात् प्रिन्सिपालच्या जागेचे काम पहात होते. त्याच्याविषयी यानी कृतज्ञतापूर्वक पुढील आशयाचे उद्गार काढिले होते.–

"मि वाडिगटन् हे हल्ली रजेवर असून ते पुढच्या आठवड्यात कामावर हजर होतील. ते आले म्हणजे या दगदगीतून मी कायमचा मोकळा होईन. अखेरपर्यंत नोकरी करण्याची आता आम्हाला चागली उमेद वाटत असून आम्ही कामावर परत आल्याबद्दल आम्हा उभयतानाहि आनंद वाटत आहे. आणि हाती घेतलेले कार्य अखेरपर्यंत शेवटास नेणे हेच रास्त असें पूर्वीपेक्षा आज आह्माला अधिक स्पष्टपणे कळून आले. जेव्हा थांबल्यावाचून इलाजच

नसतो, तोंपर्यंत हातीं घेतलेल्या कामाची चिकाटी न सोडणें यासारखें अन्य महत्कार्य नाहीं !"

याचा अतसमय फार दूर होता असें नाहीं. आजारी पडले तेहि फार थोडे दिवस. गुरुवारी कॉलेजमध्ये यानी शिकविण्याचे काम केलें, व त्याच्या पुढच्या सोमवारीं, इ स. १८९६साली फेब्रुवारी महिन्याच्या १०व्या तारखेस हे इहलोक सोडून गेले याचे लग्न दोनदा झाले होते पहिले लग्न इ स १८७२ साली झाले, पण ८ वर्षांनीच पहिलें कुटुब निवर्तले. इ स १८८२ साली यानी दुसरे लग्न केले व याच्या पाठीमागे ते कुटुंब अद्याप हयात आहे. यानी हिंदुस्थानात जी कामगिरी बजाविली त्या सबधाची इत्थंभूत आणि अत्यत वाचनीय हकीगत ता ११ माहे मे, स.१८९६ इ च्या 'टाइम्स्' पत्राच्या अकात प्रसिद्ध झालेली आहे.

मॅकनॉटन् याचे वनस्पतिशास्त्रावर फार प्रेम होतें. तो त्याच्या अत्यत आवडीचा विषय होता व याचा प्रत्यय त्याचे 'वनपुष्पे' हे व्याख्यान वाचले असता चागला येतो.

इडरचे महाराज राजकुमार कॉलेजातच शिकत होते त्यानी आपल्या सस्थानात इडर येथे जे नवीन हायस्कूल काढले, त्याला 'मॅक्नॉटन् हायस्कूल्' हे नाव दिलें असून त्याच्या इमारतीच्या पायाचा दगड मॅकनॉटन् साहेबाच्या हस्तें बसविण्यासाठीं त्याना मुद्दाम निमंत्रण केले होते त्या प्रसगी त्यानी केलेले भाषण त्याच्या थोर मनाची चागली साक्ष देत आहे. त्यावेळी मुलाना उद्देशून त्यानी जे पुढील उपदेशपर चार शब्द सागितले, ते विद्यार्थ्यांनीच काय पण सर्वांनी सारखेच मनन करण्याजोगे आहेत:-

" I would like to give these few words of advice to the boys here before us. Do not be satisfied with the education which has begun in this school, nor even with passing the matriculation, nor with a university degree, but go on and on, teaching yourself and being taught, growing each day wiser and humbler till your life shall end. Education may be said to begin at school, but it should end only with life. It is a common saying that every thing comes

to him who waits. But more things come to him who works. So let us work, and despair not !"

त्यानी महाराजाना व इतर राजकुमाराना वेळोवेळी जीं पत्रे लिहिली आहेत, ती इतकीं सुंदर, बोधप्रद व उदात्त विचारानी परिप्लुत आहेत, कीं, ती वारवार वाचावीशी वाटल्यावाचून राहत नाहींत. ते उत्तम शिक्षक होऊन गेले त्याना मुलाशीं सहानुभूतीने व प्रेमाने वागण्याची खुबी फार चागली साधलेली होती जेणेंकरून चित्ताची खळबळ उडते व राष्ट्रीयत्वाची ओळख विसरून मनुष्य नीतिभ्रष्ट होतो, असले परकी व नकली शिक्षण किती धोक्याचें असते, हे ते पूर्णपणे जाणून होते. आपले विद्यार्थी खरे राष्ट्रीय बाण्याचे निपजावेत, ही त्याची मनापासून फार इच्छा होती आर्यांची भाषा, त्याची उदात्त तत्त्वमीमासा व वाङ्मय, याचा त्यानी केव्हाहि निषेध अथवा अपमान केला नाहीं. उलट, स्वत ते त्याचें मोठ्या आस्थेने अध्ययन करीत असत. ही गोष्ट त्यानी आपल्या व्याख्यानातून जागोजाग आर्यांच्या वाङ्मयातून जी अवतरणे घेतली आहेत, त्यावरून चागली निदर्शनास येते विद्यार्थ्यांचे मूळचे जे उत्तम ग्रह होते, व ज्या गोष्टीचे ज्ञान त्याना अगोदरच चागल्या रीतीने झालेलें होते, त्याच्या आधारानेच ते त्याना शिक्षण देत असत, व त्याहून अधिक चागल्या रीतीने उन्नतीचा मार्ग ते त्याना रेखाटून देत. याच तऱ्हेने ते त्याच्या शारीरिक शिक्षणाचीहि काळजी घेत असत क्रिकेट व फूटबॉलसारखे खेळ केवळ इग्रज लोकाचे खेळ म्हणून ते मुलाना स्वत. शिकवीत असत असे नव्हे, तर ते खेळ खरोखरच मनुष्याच्या अगी शौर्य व धैर्य हे शारीरिक व मानसिक गुण उत्पन्न करणारे आहेत, अशी त्याची पक्की समजूत असल्यामुळे स्वत. त्याना फार प्रिय वाटत, व म्हणूनच ते मुलानाहि ते खेळण्यास सागत.

शिक्षणाविषयी लिहिताना त्यानी पुढील विचार प्रदर्शित केले आहेत.—

'जें इग्रजी शिक्षण आज आपण देत आहो ते हिंदुस्थानाला खरोखर फायदेशीर आहे काय ? त्यायोगे ज्ञानात भर पडते खरी, पण त्याबरोबरच लोकाची नीतिमत्ता बिघडविण्यालाहि ते कारणीभूत होत आहे असाच काहीसा अनुभव आलेला नाहीं काय ? या बाबतीत तरी निदान आपली सुधारणा ही कुचकामाची ठरलेली नाहीं काय ? त्यापेक्षा शिक्षणाच्या भानगडीत

न पडता ॰.'हे तशीच स्थिति राहूं देणे हे अधिक श्रेयस्कर होणार नाहीं काय ?' हे प्रश्न हिंदुस्थानातील शिक्षणपद्धतीच्या दुष्परिणामाबद्दल तिरस्कार प्रदर्शित करणाराच्या तोंडातून वारवार निघल्याचे ऐकूं येतात. या प्रश्नाचीं उत्तरे देणें हे काम सोपें आहे, असे नाहीं तरी पण व्यापक अर्थाने का होईना, शिक्षण म्हटले म्हणजे मनुष्याच्या ठायीं अप्रतिम असे जे गुण प्रच्छन्न रूपाने वास करीत असतात, त्याचा पूर्ण विकास करणे हे होय, व ते काम अगदीं कोवळया व अपरिपक्व मनाच्या मुलाकडून तत्काळ तयार करता येण्याजोगें आहे असे नाहीं ते काम यशस्वी रीतीने तडीस नेण्यास काळ लागेल, वर्षानुवर्षे लागतील, पिढ्यानुपिढ्या वाट पाहावी लागेल, फार काय पण कित्येक युगेहि लोटतील! व ज्या शिक्षणाचा शील तयार करण्याकडे सबध पोहोचतो त्याविषयी तर हे म्हणणे विशेषेकरून खरे आहे, पण आपलें कार्य अद्याप पूर्णत्वाला पोहोंचलेले नाहीं, अथवा असावे तितके ते चागलेहि नाहीं, म्हणून आपणास निराश होण्याचे, अथवा आपला हेतु शहाणपणाचा नाहीं असें मानण्याचें यत्किंचित्‌हि कारण नाही! स्वार्थलोलुपता, गर्व आणि दंभ हे जे दुर्गुण नैतिक सदाचाराच्या वाऱ्यालासुद्धा उभे राहत नाहींत, तेच मानसिक उन्नतीच्या सुरुवातीला जरी प्रचुरत्वाने अगी आल्यासारखे दिसले, उन्नत मन काही काळपर्यंत जरी ग्राम्य गोष्टींनीच पछाडलेलें दृष्टीस पडले, तरी पण आपण निराश होता कामा नये. उलट नैतिक उन्नतीमुळे अखेरीस मानसिक विकास हा खात्रीने होणारच, हा भरवसा ठेवून आपण आपले कार्य सतत करीत राहिलें पाहिजे. आता कदाचित् आपण ज्या मार्गाचा अवलब केला आहे, तो कधी कोणी न केलेला व बिकट असा असेल, पण बोलण्यापेक्षा करणे हें अधिक कठिण असते. उपदेश करणें जितके सोपे तितकेच आचरण करून दाखविणे कठिण असते, हे विसरता कामा नये. तथापि हा आक्षेप निदान राजकुमाराच्या कॉलेजाना तरी खरोखर लागू पडत नाहीं. तीं कॉलेजें म्हणजे निव्वळ बौद्धिक शिक्षणाच्या शाळा नसून काहींशा सर्वसाधारण शिक्षणाच्याच शाळा होत, व तेथे मानसिक सुधारणेपेक्षा नैतिक उन्नतीकडेच काहींसे अधिक लक्ष पुरविण्यात येत असते. कारण, या कॉलेजाचा मूळ उद्देशच हा आहे, कीं, तेथून शिक्षणामृत पिऊन बाहेर पडणारे राजकुमार मनानें थोर, दयाळु आणि सदाचारसपन्न असे निपजावेत. हाच हेतु सदोदित कायम राहो! केवळ

ग्रंथज्ञानाहून हा हेतु अजीबात वेगळा आहे. मुलें हीं अत्यत आदरास पात्र असतात ही म्हण फार प्राचीन व सत्य आहे. तरी पण शिक्षणाच्या बाबतीत इंग्रज लोकाच्या हवाली केलेल्या हिंदु मुसलमानाच्या कुलीन घराण्यातील मुलापेक्षा अधिक आदरयुक्त काळजीने वागविण्यास पात्र असा अन्य मुलाचा वर्ग साऱ्या दुनियेत सापडणार नाहीं"

आणखी ते असें म्हणतात –

"काहीं थोडी श्रीमंत घराण्यातील मुले आपले शिक्षण पुरे करण्यासाठी इंग्लंडात जातात, त्याच्यावर जर योग्य देखरेख असली तर हल्लीच्या परिस्थितीतहि ते अत्यत चागले आहे. एकाद्या खरोखर चागल्या थोर इंग्रज गृहस्थाच्या घरी जर ती राहिली, तर आजच्या काळीहि हिंदुस्थानातल्यापेक्षा उच्चतर व शुद्धतर समाजात राहिल्यासारखे त्याना वाटेल, पण अलीकडे जे काहीं थोडे विद्यार्थी इंग्लंडात जातात, त्याच्यावर घरी दारी देखरेख करण्यास व त्याच्या कल्याणाची काळजी घेण्यास कोणी नसते. त्याचा परिणाम असा होत आहे, कीं, चागल्या मंडळीची त्याची गाठ पडत नाहीं, व आंग्लसमाजाची हीन बाजूच तेवढी त्याच्या अवलोकनात येते. ज्ञानाच्या दृष्टीने जरी त्याचा थोडासा फायदा होत असला, तरी शीलाच्या बाबतीत उन्नति होण्याऐवजी काही अशी त्याची अवनतिच होत असते. असले विद्यार्थी हिंदुस्थानात परत आल्यावर त्याचे वजन ते काय पडणार! ज्याच्यावर कोणी देखरेख करावयास नसते त्याची ही गोष्ट झाली; पण उत्तम प्रकारच्या देखरेखीखाली जे इंग्लडात जातात त्यानासुद्धा जितके फायदे तितकेच तोटेहि आहेत. आपलेपणा म्हणून जो काहीं असतो, त्यापैकीं बऱ्याचशा भागावर पाणी सोडावे लागते. हिंदी गृहस्थाने सर्वांशीं आंग्ल लोकाच्या रहाणीने रहावे हे कोणालाच प्रशंसनीय वाटणार नाही, व इंग्लिश वातावरणात अशी काहीं दुर्दैवी प्रवृत्ति आहे, की, तेणेकरून हिंदी विद्यार्थी आपल्या यच्चयावत् प्राचीन बंधनातून अजीबात मोकळे होत असतात. आता त्या बंधनात काहीं चागलींहि आहेत व काही वाईटहि आहेत. माझी अतःकरणपूर्वक व नम्रतापूर्वक अशी सूचना आहे, कीं, हिंदुस्थानातील एतद्देशीय लोक हिंदुस्थानात राहून आपले रीतरीवाज, आपला पोषाख व सामान्यतः आपला स्वधर्म देखील कायम ठेवतील, तर तेणेकरून हिंदुस्थान

व इंग्लंड ह्या उभय देशाचें कल्याणच होईल! कारण, माझी अशी समजूत आहे, कीं, अजीबात कोणताच धर्म नसण्यापेक्षा स्वधर्माभिमान ठेवणें हें अत्यंत श्रेयस्कर आहे. माझी इच्छा एवढीच आहे, की, पुढे आयुष्यात जबाबदारीचीं कर्तव्ये बजाविण्याची पात्रता अगीं येण्यापुरते उच्च नैतिक शिक्षणाचे यच्चयावत् फायदे हिंदी विद्यार्थ्यांना स्वदेशात राहत असताना प्राप्त झालेले दृष्टीस पडावे.''

हे विचार बऱ्याच वर्षांपूर्वी जरी प्रकट झालेले असले, तरी आजच्या काळालाहि ते बऱ्याच अर्शी लागू आहेत. वरील विचारावरून मॅकनॉटन साहेबाचे हिंदी विद्यार्थ्यांविषयी विचार किती पोक्त व उदार मनाचे आहेत, हें चागले कळून येते.

याबरोबरच धार्मिक शिक्षणाचा प्रश्न ओघानेच उद्भवतो. या नाजुक प्रश्नाचा विचार मॅकनॉटन साहेबानी कसा केलेला आहे, व त्याना तो किती महत्त्वाचा वाटत असे, हे त्याचीं पुढील व्याख्याने वाचूनच ध्यानात येईल. त्याच्या व्याख्यानावरून एवढी गोष्ट चागली निदर्शनास येते, कीं, धर्ममते भक्तिरसाने ओथंबलेल्या मनोभूमिकेंत वरींच खोल रुजलीं होतीं त्याची वृत्ति फारच विनम्र असून ते निस्सीम भक्त असत. ख्रिस्ती लोकात त्याच्याइतके उदार मनाचे फारच थोडे सापडतील मुलापाशीं ख्रिस्तधर्ममताबद्दल त्याना एक अवाक्षर काढता आलें नाहीं, व तें त्यानी मोठ्या काळजीपूर्वक टाळले होते; पण ख्रिस्तधर्मातील तत्त्वे व हेतु याचा मात्र त्यानी मधून मधून उल्लेख केला व तोहि आचरणांत पाळता येणाऱ्या गोष्टीपुरताच होता. त्यानीं स्वतः ज्या रीतीने आचरण ठेवले होते व जो उपदेश ते करीत होते, त्याप्रमाणें आपण जर नेहमी वागूं लागलों, व तसाच उपदेश करीत आलों, तर धार्मिक शिक्षणाच्या बाबतींत आज जो इतका वाद आणि मतभेद दृष्टीस पडत आहे तो पार नाहींसा होईल. परस्पर भेदाभेद विसरून सर्वांना जेथे एकत्र मिळून ईशभक्ति करता येईल, व सर्वव्यापी एक अशा दिव्य प्रेमाला आपलेंसें करून घेतां येईल, अशा सर्वसामान्य भूमिकेचा प्रत्यय जर कोठे पहावयास मिळत असला, तर तो मॅकनॉटनसारख्याच्या चरित्रात व तत्त्वोपदेशातच होय. धर्मशिक्षणाविषयी त्यानी पुढीलप्रमाणें उद्गार काढिले आहेतः—

"प्रत्यक्ष धार्मिक शिक्षण देणें ही गोष्ट अगदीं अशक्य आहे. पण जेणेकरून एकमेकांनां प्रेमरज्जूनें निगडित करता येते, व सर्वांना सन्मार्गाने राहण्यास लावता येतें, अशा सहानुभूतीचा एक जगद्विख्यात धर्म आहे हे लक्ष्यात ठेवावे."

धार्मिक शिक्षण नको, वर्गात अठरापगड जातीचीं मुलें असता कोणाला कोणत्या धर्माचें शिक्षण द्यावयाचे, वगैरे आक्षेप घेणाराना हे उत्तर कदाचित् आवडेल असें मला वाटते.

हीं व्याख्याने हायस्कूलच्या सर्व शिक्षकानी वाचावीत, अशी मि. जाइल्स, मुंबई इलाख्यातील शाळाखात्याचे माजी डायरेक्टर, यानी इच्छा प्रदर्शित केली होती त्यानी असें म्हटलें आहे, कीं, "साधारणपणे शिक्षकाच्याठायी कोणत्या गोष्टीचे अज्ञान असते, अथवा कोणत्या गोष्टीत ते निष्काळजीपणा दाखवीत असतात, हें हीं व्याख्याने वाचली असता चागले कळून येईल. दररोज काही तास भाराभर विषयाच्या चरकातून मुलाना पिळून काढण्यापेक्षां 'शिक्षण' या शब्दात पुष्कळच अधिक पटीने अर्थ आहे आपल्या हायस्कूलातून एक मोठा दोष माझ्या पाहण्यात नेहमी आलेला आहे, तो हा कीं, इयत्तेसाठी जो काहीं अभ्यासक्रम नेमलेला असेल, त्या क्षेत्राच्या मर्यादेच्या बाहेर अन्य एकादे कर्तव्य आपल्याला आहे कीं नाहीं, याची कल्पनासुद्धा शिक्षकाना नसते; व ते शाळेत अथवा शाळेच्या बाहेर मुलावर आपला बोज राखून त्याच्या वर्तनक्रमाला योग्य वळण लावण्याचा प्रयत्नहि करीत नाहींत. मुलावर आपलें वजन कसें ठेवावें आणि त्यांना सन्मार्गाला कसे लावावे, हें तुमच्या पुस्तकावरून चागले कळून येईल."

हीं व्याख्याने विद्यार्थिवर्गाला किती महत्त्वाची आणि सन्मार्गदर्शक आहेत, हे सिद्ध करण्यास शिक्षणखात्यातील एका उच्च अधिकाऱ्याच्या वरील अभिप्राय पुरे होईल असें वाटतें. हीं व्याख्यानें केवळ मुलानाच उत्तम मार्गदर्शक होत असें नव्हे, तर सामान्य वाचकानाहि तितकींच बोधप्रद व सन्मार्गदर्शक होतील, यात सदेह नाहीं. मनावर थोडा कां होईना पण चांगला संस्कार केल्यावांचून तीं राहणार नाहींत, अशी खात्री आहे.

अखेरीस मला येथे एवढे नमूद केल्यावाचून राहवत नाहीं, कीं, ज्या थोर, मार्मिक व विद्वान् विभूतीच्या प्रेमळ इच्छेवरून मीं हें रूपातर करण्यास हातीं घेतलें, ते माझे परमहितैषी प. वा. श्रीयुत मल्हार खडेराव चिटणीस,

बी ए., एल्एल् बी., उमरावती येथील हायकोर्ट वकील, ते पूर्ण झालेलें पाहण्यास आज दुर्दैवानें राहिले नाहींत, याबद्दल फार वाईट वाटते! त्यांच्या इच्छेप्रमाणे हें रूपातर मी सहा वर्षांपूर्वीच करावयास पाहिजे होते. पण अनेक अडचणीमुळे ते लाबणीवर पडत गेलें

प्रस्तुत व्याख्याने मुख्यत विद्यार्थ्यांसाठीं असल्याकारणाने रूपातर करताना पहिली तीनचार व्याख्यानें खेरीज करून बाकीची बहुतेक व्याख्याने मुळातील स्वारस्य कायम ठेवून सोप्या भाषेत लिहिण्याचा होईल तितका मी प्रयत्न केला आहे प्रसगविशेषी अवातर विचारहि घातले आहेत. प्रकृत ग्रंथाचे कामीं माझे स्नेही श्रीयुत श्रीधर रामचंद्र देसाई यानी मला बरेच सहाय्य केलें, त्याबद्दल मी त्याचा फार आभारी आहे.

सरतेशेवटी ज्या जगन्नियत्याच्या कृपेमुळें हे काम अल्पावकाशात तडीस गेलें त्याला अनन्य भावाने शरण जाऊन, व ज्यानीं हे रूपातर प्रसिद्ध करण्याचे श्रेय पदरात घेऊन मला ऋणी केलें ते श्रीयुत काशीनाथ रघुनाथ मित्र, मासिक मनोरजनाचे सपादक, याचे आभार मानून, मी वाचकाचा मार्कस आरेलिअसच्या वचनानेच निरोप घेतों —

"If any man be able to convince
and shew me
That I do not think or act right
I will gladly change, for
I seek the truth, by which no man
was ever injured,
But he is injured who abides in his
error & ignorance"

सीताबर्डी, नागपुर,
मध्यप्रात, ता २५,
माहे जानेवारी, स. १९११.

महादेव रामचंद्र प्रधान.

# बोधपर व्याख्यानें,

अथवा

## गहन विषयांवर सामान्य विचार.



### ान्निध्य.

To the sou…
And where it cometh, a
And it cometh everywhere."

—*Emerson.*

"That God, which ever lives & loves,
one God, one law, one element."

—*Tennyson.*

"तो एक देव सर्व
पाहणारा आहे तो स
आहे"

…र्व भूतांतरात्मा आहे तो सर्व कर्मे
… व निर्गुण

…निषद् ११ ६ अ…

प्रत्यहीं आपण एकमेकांनां भेटतों व आपल्या सभोंवतालच्या … वस्तूविषयीं—ह्या रमणीय दृश्य जगतांतील वस्तूविषयीं व त्याचा संबंध असणाऱ्या सर्व पदार्थांविषयीं—आपण बोलतों. आणि तें अशा रीतीनें बोलत असतों, कीं, जणु काय तेवढ्याच काय त्या साऱ्या वस्तूंचा आपल्या जीवनदशेशीं संबंध असतो. पण वास्तविक सर्वकाल ह्याहूनहि अधिक महत्त्वाच्या अशा इतर वस्तु असतात. त्या वस्तु पारमार्थिक आहेत; त्या इहलोकच्या नाहींत, अदृश्य आहेत; परलोकीं त्यांचा आपल्याशीं संबंध घडतो; ज्या जीवाला अंत ह्मणून ठाऊक नाहीं त्याच्याशीं त्यांचा संबंध पोहोंचतो.

दृश्य वस्तूंबरोबर ह्या इतर अदृश्य वस्तूंचाहि विचार केव्हां केव्हां केल्यास ते आपणास हितकर होईल असें मला वाटतें. असले विचार आपणा सर्वांना अधिक कल्याणप्रद झालेच पाहिजेत, व ह्या विश्वविद्यालयात आपण सर्व एकत्र जमण्याचा जो योग जुळून आला आहे त्याचें तरी विशिष्ट कारण हेंच होय. त्यांतील हेतु एवढाच, कीं, एकाच्या आचरणाचा परिणाम दुसऱ्याच्या मनावर घडून आपणांस परस्पराची स्थिति अधिक श्रेयस्कर करता यावी, ह्मणजे आपल्या नुसत्या ज्ञानात अधिक भर पडावी एवढेच केवळ नव्हे, तर आपले मनहि अधिक सुसंस्कृत होऊन एकंदर जीवनचरित अधिक सुखावह करतां यावें.

जीवनदशा [illegible] श्रेयस्कर [illegible] आपणा सर्वांना कळतो, व ती स्थिात आ[illegible] सर्वांकरिता [illegible] आहे [illegible] मेश्वराचे आपण खरोखर आभार मानले पाहिजेत, कीं, आपले परस्पर धर्म केतीहि भिन्न असले तरी पण सत् कोणते व असत् कोणते याच्या अर्थाबद्दल आपले सर्वांचें एकमत आहे; आणि जेव्हा आपली स्थिति अधिक चागली व्हावी असे आपण ह्मणतों, तेव्हा त्याचा अर्थ असा, कीं, तुह्मीं काय अथवा मीं काय, उभयतानांहि सारखेच लागू व एकच असें जें सत् शब्दाचे परमोच्च प्रमाण त्याच्या अधिकाधिक सन्निध आपण येऊन पोहोंचावे. अतएव आपले मतभेद बाजूला ठेवून [illegible] ह्मणून गोष्टी परमेश्वरकृपेनें सर्वांना सामान्यतः एक [illegible] गोष्टीं [illegible]षयीं आपण विचार करू.

ह्या आपल्या शांतिप्रद व्याख्यानमालेंत, [illegible], प्रत्येक रविवारी एखाद्दुसऱ्या विषयावर बोलावे व तुमच्या आयुष्याच्या बाह्य वर्तनात जेणेंकरून त्याचा परिणाम दृग्गोचर होईल अशा रीतीने त्याचा ज्ञातपणे विचार करण्यास व तदनुरूप आचार ठेवण्याचा प्रयत्न करण्यास तुह्माला सागावे, अशी माझी इच्छा आहे.

या इच्छेस अनुसरून आजच्या प्रसंगीं आपल्या ह्या मालेंतील प्रथम व्याख्यानासाठी मीं ज्या विषयाची निवड केली आहे, ज्या विषयाचें प्रतिपादन करण्याचे योजिलें आहे, तो विषय ह्मणजे परमेश्वराच्या पवित्र सान्निध्याची प्रचीति, हा होय. आपण मानतो त्याप्रमाणें परमेश्वर आपल्या सन्निध आहे, तो सदैव आपल्या ठायीं वास करीत आहे, एवढी जर प्रचीति आपणास आली,

तर मला वाटते आपली स्थिति आहे त्याहून पुष्कळ पटीने अधिक चागली होईल यात शका नाहीं.

परमेश्वर आहे एवढी गोष्ट तर आपणा सर्वांना सारखीच मान्य आहे नव्हे, आपणा सर्वांची खात्री आहे असेंहि मला ह्मणता येईल. त्याचें नाव परमेश्वर असो, वा कोणी त्याला ईश्वर ह्मणो, आपणा सर्वांची समजूत अशी आहे, कीं, अखिल चराचर वस्तूंना निर्माण करणारा एक सर्व शक्तिमान् पवित्र विधाता आहे; त्याचे साम्राज्य त्रिभुवनावर आहे एवढेंच केवळ नव्हे तर तो आपणा सर्वांचें ... आपल्या अखिल सृष्टीचेंहि पितृवात्सल्याने पालन करीत आहे असाहि मानतो, ... चागलें आणि शुद्ध आहे, जें जें पवित्र आणि सत्य आहे त्या सर्वांचें उगमस्थान ... आहे. ... एकटा पूर्ण असा आहे, व आपल्या ठायीं जेवढा ह्मणून चांगुलपणा आहे त्याचें तो पालन करून अंगीकार करितो, व जेवढा ह्मणून वाईटपणा भरला आहे त्याचा तो तिरस्कारपूर्वक प्रतिकार करतो.

आपणापैकीं प्रत्येकाच्या ठायीं कांहीं तरी दिव्यांश आहे अशीहि आपली समजूत आहे हा दिव्याश ह्मणजे आपल्या अतर्यामीं वास करणारी 'सदसद्विवेकबुद्धि' अथवा 'प्रकाश' होय, आणि ह्यालाच देववाणी असें आपणांस ह्मणता येईल जगाच्या कोणत्याहि भागात जा, तेथे प्रत्येक मानवी प्राण्याच्या ठायीं ही सदसद्विवेकबुद्धि अथवा अतर्यामींची ज्ञानज्योति असतेच, अशी माझी समजूत आहे ... अंधःकारात चाचपडणाऱ्या प्रत्येक मर्त्य मनुष्याला मार्ग दर्शविणारा ज्ञानदीप असें तिला ह्मणतात ... कर्तव्याच्या मार्गावर उज्वल प्रकाश पाडून त्याच मार्गांना अवलब करण्यास प्रत्येक मनुष्याला प्रेरणा करणारा हाच ज्ञानदीप असतो! पण आपणास ठाऊक आहे, कीं, ह्या सदसद्विवेकबुद्धीशिवाय मनुष्यमात्राचे ठायीं एक पापी स्वभाव अथवा प्रवृत्ति वास करीत असते हा स्वभाव मनुष्याला आपल्या वासनानुरूप स्वच्छदानें वाग्व्ययास व ह्या क्षणभंगुर जगतातील अहकारांना ह्मणजे मिथ्या अहमहमिकेला बळी पडण्यास ... करीत असतो. आणि ह्या ऐहिक लौकिकांचा पाठलाग करण्याच्या भरीस पडल्यामुळें ईश्वराकडे आपलें मन लागेनासें होतें, व सदसद्विवेकबुद्धीचा ह्मणजे अतर्यामातून निघणाऱ्या देववाणीचा ध्वनि आंतल्या आंत गुदमरून बाहेर पडेनासा होतो.

ह्मणून मी ह्मणतों, होतां होईल तों आपली सदसद्विवेकबुद्धि अगदीं निष्कलंक, तेजस्वी, शुद्ध आणि दिव्य ठेवण्याचा आपण सर्वांनीं प्रयत्न करावा; तेणेंकरून ह्या क्षणभंगुर जगातील मायापाशामुळें ईश्वरापासून आपण पराङ्मुख होणार नाहीं, उलट त्याच्या सान्निध्यांत आपणास राहतां येईल, सदैव त्याच्या पवित्र साक्षित्वानें आपणास आपला जीवनव्यापार चालवितां येईल.

ईश्वराच्या सान्निध्याची नुसती भावना जरी आपणांस करतां आली, तरी तेवढ्यानेंसुद्धां आपली पापाचरणाकडे फारशी प्रवृत्ति होणार नाहीं अशी माझी खात्री आहे. नुसती भावनाच कां होईना [illegible] ती आपणांस [illegible] करतां आली तर त्यांतहि आ[illegible] विचार करा, ईश्वराच्या [illegible]याची कल्पना मनात आणा! याहून अधिक आश्चर्य[illegible], व अधिक उदात्त असें अन्य कांहीं असू शकेल काय? त्याचा [illegible]थ तुमच्या लक्ष्यात आला काय? त्याचा अर्थ असा, कीं, ज्याप्रमाणें पिता आपल्या मुलाला हातीं धरून मार्ग दाखवीत असतो, तद्वत् चांगुलपणा, ज्ञान व सामर्थ्य हीं ज्याच्या ठायीं अमर्यादपणें वास करीत आहेत असा सर्वश्रेष्ठ ईश्वर आपणास साहाय्यक होऊन मार्ग दाखविण्यास सदैव आपल्या सन्निध असतो. जें जें प्रत्येक कर्म आपल्या हातून घडतें त्यात परमेश्वराला आपणास वांटेकरी करिता येईल जो प्रत्येक उच्चार आपण आपल्या मुखावाटे काढतों तो त्याच्या वाणीनें आपणास बोलतां येईल. जो प्रत्येक विचार आपल्या मनात उदय पावतो तो त्याच्या मनानें विचार करितां येईल. माझ्या ह्मणण्याचा आशय हा, कीं, आपल्या यच्चयावत् विचारांत, उच्चारात आणि आ[illegible]ांत आपणास ईश्वराला आपल्या सन्निध ठेवता येईल, आणि असें झाल्यावर आपण पापापासून अर्थातच दूर राहू. ईश्वराच्या सान्निध्याची जेव्हा आपणास विस्मृति होते तेव्हाच आपले ह[illegible]न पापाचरण घडतें; व सांगण्यास वाईट वाटतें, कीं, ही विस्मृति किती वारंवार आपणास होत असते? आपण ईश्वराला सदोदित खरोखर स्मरत असतों असें तुह्माला वाटतें काय? ईश्वर आपल्या सन्निध आहे, आपल्या पाठीशीं उभा आहे, आपलें सर्व भाषण तो ऐकत आहे, एवढी आठवण ठेवून जर आपण आपलें आचरण करीत गेलों, तर पापाचरण करण्यास कधीं आपलें धारिष्ट होईल असें तुह्मांला वाटतें काय? ईश्वर सर्वसाक्षी आहे, त्याचें लक्ष्य आपल्यावर आहे, एवढा विचार आपल्या मनांत जागृत असला तर आपला बहुमोल वेळ

आपण कधीं व्यर्थ दवडूं असें तुह्मास वाटतें काय? ईश्वर आपलें बोलणें एकत आहे एवढी भावना आपल्या ठायीं सदैव असली तर रागाचा अथवा कठोर असा शब्द कधीं तरी आपल्या मुखावाटे निघेल काय? ईश्वराच्या सान्निध्याची भावना जर आपल्या ठायीं असली तर अपवित्र, अशुद्ध विचाराचा संपर्क आपल्या मनाला कधीं तरी होईल काय? ईश्वर आपल्या सर्वांच्या किती सन्निध आहे, व बापाचें मुलावर जसें प्रेम असतें तद्वत् आपण जीं त्याचीं लेंकरें त्याचें तो वत्सलतेने लालनपालन करीत असतो, याची आपणास जर प्रचीति आली तर आपल्या हातून केव्हाहि पापाचरण [illegible] असें [illegible] वाटत नाहीं.

[illegible] जो [illegible] तुम्हीं [illegible] काळजीपूर्वक लक्ष्यांत ठेवावा अशी [illegible] छा आहे तो हा—"ईश्वर [illegible] पहातो, ईश्वर माझ्या [illegible] उभा आहे, जो काहीं आचार माझ्या हातून घडतो, जो विचार माझ्या मनांत येतो व जो उच्चार माझ्या मुखावाटे बाहेर पडतो तो सर्व त्याला कळतो आणि तो सर्वसाक्षी आहे, तो अत्यंत श्रेष्ठ व अत्यंत पवित्र आहे म्हणूनच केवळ नव्हे तर पितृवात्सल्याने व स्नेहवात्सल्यानेंहि तो मला बघत असतो. अतएव तो जरी अदृश्य आहे तरी मीहि त्याच्या अगदीं सन्निध राहीन, आणि माझ्या सर्व अडचणीच्या प्रसगीं मी त्याचें साहाय्य मागेन. जसें त्याला अति मोठें असें काहींच नाहीं, तद्वत् अति लहान असेंहि काहींच नाहीं. त्याच्या ठायी उच्चनीच भाव नाहीं त्याच्या सान्निध्यानें मी समर्थ व सदाचारी होईन. उलट त्याच्या सहवासावाचून मला चागलें असें [illegible] नाहीं, तर पदोपदी मी ठेंचा खाऊन पडेन मात्र."

ईश्वराविषयीं असा जर तुम्ही विचार करूं लागलांत [illegible]र तो तुम्हाला साहाय्य केल्यावाचून वंचित राहणार नाहीं. यात मला तिलप्राय देखील संदेह वाटत नाहीं.

तर मग ईश्वराच्या सान्निध्याचा विचार करण्याचा तुम्हीं प्रयत्न कराल काय? आणि ह्या आठवड्यात दररोज प्रभातसमयीं निजून उठतांच 'ईश्वरा! तूं माझे सन्निध आहेस," असें तुम्ही आपल्या मनाशीं म्हणाल काय? तसेंच फिरून रात्रौ निजण्याचे पूर्वी हाच विचार तुम्हीं आपल्या मनांत आणाल काय? व दिवसासुद्धां केव्हा तरी त्याच्याविषयीं विचार करण्याचा तुम्ही प्रयत्न कराल काय? कदाचित् जेव्हां जेव्हां शाळेंत घांट होईल तेव्हां

ईश्वराविषयीं विचार करण्याची तुम्हांला संवय लागेल. अशा अगदीं अल्प साधनांचा इंद्रियांच्या द्वारा मनावर कार्य घडून केव्हां केव्हा फार उपयोग होत असतो, आणि हीं साधनें जरी इहलोकींचीं दिसतात तथापि तीं स्वर्गलोकाप्रत व पुण्यलोकाप्रत नेऊन पोंहचविणारी असतात. अतएव आपण करावयाचेच मनात आणल्यास, जगातील अत्यंत साधारण व क्षुल्लक गोष्टी, आपल्या प्रत्यहींच्या आचरणातील नित्यकर्मे, हीं आपणास दैवी सामर्थ्यानें युक्त अशीं वाटूं लागतील.

देवाचे इच्छेनें वर्तावें । देव करील ते मानावें ।
मग सहजचि भावे । कृपाळु देव ॥
देव भ[illegible] । देव पतितांसि तारी ।
देव होय सहाकारी । अनाथांचा ॥

—दासबोध.

# श्रद्धा.

* Whom we, that have not seen thy face,
By faith, & faith alone embrace,
Believing where we cannot prove "

—*Tennyson's "In memoriam.*

नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया ।
शक्य एवंविधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा ॥ १ ॥
भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन ।
ज्ञातुं द्रष्टुं च तत्वेन प्रवेष्टुं च परंतप ॥ २ ॥

—भगवद्गीता, अ. ११.

ईश्वराचें सान्निध्य व तो आपल्या सदैव पाठीशी उभा असतो या विभावनेपासून प्राप्त होणारी धन्यता याविषयी मी गेल्या व्याख्यानाचे प्रसगी चार शब्द बोलल[illegible] [illegible] होण्यास आपणास भीति वाटते एवढ्याच दृष्टीने [illegible] त्याच्याविषयीं विचार करण्याचा प्रयत्न करावा असें नव्हे, तर भक्ताचे गाऱ्हाणे [illegible]कून त्याच्या साहाय्यार्थ धावण्यास सदैव तयार [illegible] एक वत्सलपूर्ण पालनकर्ता व सखा या दृष्टीनेंहि [illegible] [illegible]चा आपण प्रयत करावा, असे मी बोललों. मी आणखी असे म्हणालो, [illegible], त्याच्या पवित्र सहवासाचा विचार जर खरोखर आपल्या हृदयात नित्य राहिला तर आपले हातून पापाचरण होणार नाही व अन्य कोणत्याहि मार्गानें होणे शक्यच नाही, इतका आपल्या भूतदयेचा उत्कर्ष तेणेकरून होईल.

---

* तुझ्या साक्षात् दर्शनाचा लाभ ज्याना घडलेला नाहीं असे आम्ही पामर तुझ्या स्वरूपाचा विचार करीत असता मति कुंठित होऊन जेथ आम्हाला प्रत्यक्ष प्रमाण देता येत नाहीं तेथे शेवटीं तुझ्या अगाध सामर्थ्यावर विश्वास ठेवून श्रद्धेने आणि श्रद्धेनेच केवळ तुझ्या चरणकमलाला आम्ही मिठी घालतो.

मी मागील खेपेस असेंहि म्हणालों, कीं, ईश्वर आहे अशी आपली समजूत आहे, अशी आपली खात्री आहे. मला वाटतें, आपणां सर्वांसंबधीं असेंहि म्हणतां येईल, कीं, ईश्वर आहे ही गोष्ट आपण जाणून आहों. आपणांला या गोष्टीची एवढी खात्री वाटते, आपल्या प्रत्यहीं आचरणाचा हा एवढा एक भाग होऊन बसला आहे, कीं, त्याबद्दल आपणांस कधींहि तिलप्राय देखील संदेह वाटत नाहीं, तिच्या सिद्धतेची आपण कधींहि वाट पहात नाहीं. बुद्धिग्राह्य अथवा साधारण बुद्धिवादाला पटेल अशा रीतीनें म्हणा, किंवा इंद्रियगोचर पद्धतीनें म्हणजे चक्षुर्वै सत्यं या पद्धतीनें म्हणा, जशा आपण साधारण गोष्टी सिद्ध करतों तसा आपण जर प्रयत्न केला तर ही गोष्ट आपणास सिद्ध करितां येईल काय ? नाहीं त्या रीतीनें ही गोष्ट आप[illegible] सिद्ध करिता येणारच नाहीं. कारण, मानवी बुद्धि [illegible] ईश्वराचें स्वरूप [illegible] श्रेष्ठतर आहे व शिवाय तो दृष्टिगोचर नाहीं, चर्मचक्षुंनां दिसणारा नाहीं, किंवा हस्तपादादि कर्मेंद्रियानांहि त्याचा स्पर्शाभास होणारा नाहीं तथापि, मी मागील खेपेस सांगितल्याप्रमाणें, बहुतेक प्रत्येक बाबतींत आपलें कर्तव्यकर्म कोणतें, सत् कोणते व असत् कोणतें हें आपणास सांगत असल्याचा ज्याचा भास होतोच होतो असा कोणीतरी अथवा काहीं तरी आपल्या अतर्यामीं वास करीत आहे आणि ज्याला मी सदसद्[illegible] म्हणालो, आपल्या अतर्यामींची दिव्य वाणी, अशी मी संज्ञा [illegible] हें [illegible] ही वाणी जितकी अधिक आपण ऐकावी तितकी अधि[illegible] उदात्त, स्पष्टतर आणि दिव्यतर [illegible] लागते. हीच दिव्य वाणी हें, ईश्वर आहे असें म्हणण्याला अन्य कोणत्याहि गोष्टीपेक्षा अधिक यथार्थ प्रमाण आहे असें मला तर वाटतें. हें प्रमाण म्हणजे भूमितीच्या सिद्धांताप्रमाणे एखादें प्रमाण आहे असें मी म्हणत नाहीं, माझे म्हणणें एवढेच आहे, की, तें प्रमाण असें आहे, की, तेणेंकरून माझ्या मनाचे सात्वन होतें, व कालाच्या प्रारंभापासून मानवी स्वभावात सहज उत्पन्न होत आलेल्या ईश्वरविषयक कल्पनेचा त्याला पाठिंबा आहे. आणि आश्चर्यकारक विश्वरचना व पद्धति ही स्वयंविकसित शक्तीचा एक योग असें क्वचितच म्हणता येतें. उलट, आपल्या सभोंवार दिसणारी प्रचंड नियममालाहि अखिल चराचर सृष्टीवर साम्राज्य चालविणाऱ्या विधात्याचेंच कार्य खात्रीने असलें पाहिजे हें जे यथार्थ अनुमान यानेंहि त्या प्रमाणाला दुजोरा मिळतो.

आणखी एक विचार आहे; त्याचा सदसद्विवेक बुद्धीशीं अगदीं निकट संबध आहे. तो आपल्या इच्छाशक्तीचा विचार हा होय. आपली इच्छा स्वतंत्र आहे किंवा नाहीं? सदसत् कार्यांची निवड आपणांस करिता येते काय? अथवा आंधळ्यासारखे आपण नुसते दैवालाच बळी पडत आहों? प्रत्येक जण जें कार्य करीत असतो तें तो त्याची निवड करून करीत असतो, अथवा त्याला तें केल्यावाचून गत्यंतरच नसतें ह्मणून विश्वांतील कार्यकारणाच्या स्वाभाविक नियमानुरूप तें तो करीत असतो? ईश्वर नाहीं, सदसद्विवेकबुद्धि नाहीं, इच्छा नाहीं व प्रत्येक गोष्ट केवळ कार्यकारण-नियमान्वयें घडत आहे असें जर आपण ह्मणू लागलों, तर नैतिक जबाबदारी अथवा नीतिदृष्ट्या अपराध ह्मणून ह्मणावयास असें कांहींच असू शकत नाहीं! जर अमुक प्रकारचें कार्य केल्यावाचून आपणांस गत्यंतरच नाहीं असें असेल, तर तें केलेंच पाहिजे मग सत् अथवा असत् या प्रश्नाचा तेथेंच शेवट व निकाल लागतो, तो प्रश्नच उरत नाहीं आपण मग मनुष्य या संज्ञेस मुळींच पात्र होणार नाहीं उलट, दैवाच्या हातातील बेजबाबदार दोऱ्यानी वाटेल तशा ओढल्या जाणाऱ्या केवळ बाहुल्या ठरू. माझे मित्रानों! माझा तर यावर विश्वास नाहीं व तुह्मींहि यावर विश्वास ठेवू नये असा मी तुह्माला आग्रहपूर्वक उपदेश करितो. जगांतील व्यवहारज्ञानसंपन्न माणसेंहि यावर विश्वास ठेवित नाहींत. कारण, प्रत्येक ठिकाणी व्यवहारज्ञानी माणसानीं लोकाना त्याच्या कर्माबद्दल जबाबदार धरून स्वेच्छाचारी ह्मणून दोषी ठरविलें आहे

आणि आपल्या इच्छाशक्ति स्वतंत्र आहेत, हें आपणास ठाऊक आहे. त्या एकट्या सदसद्विवेकबुद्धीनेच बद्ध आहेत, आणि अशा तऱ्हेनें बद्ध असूनहि त्या अत्यंत स्वतंत्र आहेत.

पण, जर आपल्या इच्छाशक्ति स्वतंत्र आहेत, आणि जर त्या नीतिदृष्ट्या स्वतंत्र असल्यामुळे त्याच्या सामर्थ्यांचा संस्कार सभोंवतालच्या पदार्थांवर घडत असतो—तो घडतो हें आपणास ठाऊक आहेच—तर सर्वश्रेष्ठ अशी एक **नैतिक इच्छाशक्ति** आहे, तीच अखिल पदार्थमात्राचें नियमन करीत आहे, व आपली इच्छाशक्ति ही तिचाच अंश आहे, असें यथार्थतया आपणास मानतां येणार नाहीं काय? कारण, जेथे एखाद्या गोष्टीच्या सिद्धीपुढें बुद्धि कुंठित होते, अर्थात्, जी गोष्ट आपणास सिद्ध करितां येत नाहीं तेथें ती मान्य केल्यावाचून आपणास गत्यंतरच नसते. लोक तिला **आदिकारण** ह्मणोत,

अथवा काय वाटेल ते नाव देवोत, पण आपण तिच्या ठायी आदरबुद्धि ठेवू व तिला ईश्वर अशी संज्ञा देऊ जर इच्छाशक्ति नसेल, नीति नसेल अथवा अनीति नसेल तर ही एक अनर्थपरंपरा होणार नाहीं काय? कशाचा काहीं ताळ मेळच राहणार नाहीं, सर्वच असंगति होईल.

ठीक, आपण कार्यकारणनियमावर व आश्चर्यचकित करणाऱ्या स्वाभाविक सृष्टिक्रमावर विश्वास ठेवू पण तो विश्वास आपण असा ठेवू, कीं, ते सर्व ईश्वराचेच कार्य आहे, तोच त्याचे केंद्रस्थान व प्रभवस्थान आहे, तीं सर्व त्याचीच केवळ विच्छिन्न किरणें अथवा प्रतिबिंबें आहेत

ईश्वर जरी आपल्या चर्मचक्षूनां दिसत नाहीं, त्याचें अस्तित्व आपणास जरी प्रत्यक्ष सिद्ध करून दाखविता येत नाहीं, तरी त्याच्याविषयीं असणाऱ्या ह्या विश्वासालाच आपण श्रद्धा असें ह्मणतो चक्षुरिंद्रियाला अगोचर व इंद्रियज्ञानातीत असें काहीं तरी आहे असें निश्चयपूर्वक मानण्यारा हीच श्रद्धा आपणांस साधनीभूत होते. आणि खऱ्या श्रद्धेनें नुसत्या विश्वासाचाच बोध होतो असें नव्हे, तर त्याच्यापासून स्वभावत उदय पावणाऱ्या आचाराचाहि बोध होतो. अतएव ईश्वरावर जर आपली खरी श्रद्धा असेल, तर तदनुरूप आपले हातून आचरण घडेल, त्याला हृदयात बाळगून त्याची सेवा करण्यास आपणास आनंदच वाटेल माझे मित्रानो! अशी श्रद्धा आपल्या ठायीं आहे काय? आमचा सर्वांचा ईश्वरावर भरवसा आहे असें आपण ह्मणतो मात्र, पण तदनुरूप आपले हातून आचरण घडते काय? आपली श्रद्धा सखेद, उदासीन व दुर्बल नाहीं काय? वारंवार, कित्येक दिवसपर्यंत ईश्वरसान्निध्याची आपणास अजीबात विस्मृति पडत नाहीं काय? आपल्या आयुष्यातील चांगल्या गोष्टी ईश्वराच्या चांगुलपणाच्या व कृपेच्या देणग्या असें न मानता त्या आपल्या स्वत:च्या प्रयत्नाचेंच फल आहे असें आपण मानीत नाहीं काय? ह्या ससृतीच्या व्यामोहांत आपणास ईश्वराच्या अस्तित्वाचा विसर पडणे, व जीवनार्थकलहात आपल्या सभोवार दिसणाऱ्या वस्तूंचीच तेवढी आवश्यकता आहे असा विचार मनात येणें, साहजिक नाहीं काय? मला तर असें वाटतें, कीं, आपणापैकीं बहुतेकाचा अनुभव असाच असेल, आणि हें जर खरें असेल, तर जेथे ईश्वरावर आपली श्रद्धा आहे असें आपण ह्मणतो तेथे खरोखर ईश्वरावाचूनच आपण आपली प्राणयात्रा चालवित असतों. आपण श्रद्धेने वागत नसून मूढ दृष्टीनेंच वागत असतों.

सर्वश्रेष्ठ ईश्वराचे ठायीं जेवढी श्रद्धा आपण ठेवतों तेवढी सामान्य व्यवहारातहि आपणांस ठेवता येईल, व असें आपण वारवार करीत असतों. आपण कधींहि न पाहिलेल्या गोष्टीवर नित्य विश्वास ठेवतो व तदनुरूप आपण आचरणहि करितो. काहीं गोष्टीचा जरी आपण प्रत्यक्ष अनुभव घेतलेला नसर तरी विश्वसनीय प्रमाणावरून, त्या खत. खऱ्या असें आपण मान[illegible] उदाहरणार्थ, इंग्लंड देश आपण घेऊ. या देशाच्या अस्तित्वाबद्दल तुमच्या [illegible] विश्वास आहे तुम्हीं नकाशावर त्याचे रेखाकृतीचें चित्र पाहिलें अ[illegible] त्याच्याविषयीं तुह्मी ऐकिलें आहे व वाचलेंहि आहे इंग्लंडहून आलेल्या लोका[illegible] तुह्मी बोलला आहात. ह्या सर्व गोष्टींवरून जरी इंग्लंड तुह्मीं खत प्रत्यक्ष पाहिलेलें नाहीं, तरी त्याच्या अस्तित्वाबद्दल तुमची खात्री पटते इंग्लडचे स्मरण तुमच्या [illegible] . जितकें अधिक [illegible] [illegible] अधिक [illegible] त्याच्याविषयीं [illegible] व विचार कराल, तितकें अधिक त्याच्या अस्तित्वाचे तुह्मा[illegible] ज्ञान होई[illegible]. तितका अधिक त्याच्या अस्तित्वाचा परिणाम तुमच्या [illegible] [illegible] उच्चार[illegible] होईल.

हीच गोष्ट ईश्वरावरील विश्वासाची आहे कारण, अन्य गोष्टीप्रमाणें श्रद्धा ही अभ्यासानें बळावते आणि जितका अधिक आपण ईश्वराविषयी विचार करू तितकी अधिक आपली श्रद्धा बलवत्तर होईल ईश्वराचा विचार करण्याची आपल्याला जर खरोखर लालसा असेल, तर ती सवय फार सौकर्यानें लागेल. पण खेदाची गोष्ट ही, कीं, आपल्या वासना अदृश्य वस्तूवरून निघून दृश्य वस्तूं-वर—ईश्वराचा विचार सोडून ससृतीच्या विचाराकडे—इत[illegible] स्वाभाविकपणे धाव घेत असतात, कीं, काहीं विशिष्ट साधनाचा आश्रय घेतल्यावाचून आपले प्रयत्न बहुतेक निष्फलच होतात अशा प्रकारच्या साधनांपैकीं एक साधन म्हटले म्हणजे बहुतेक औपचारिक कर्म होय. तशा एखाद्या औपचारिक कर्मानें ईश्वरसान्निध्याची भावना आपल्या ठायी जागृत होते. ह्याविषयी मी पहिल्या व्याख्यानात सागितले आहेच. हे औपचारिक कर्म उपासनेसारखे उच्चतर व पारमार्थिक कर्म करण्याला आपणास प्रवृत्त करीत असते. या उपासनेवर अधिक सविस्तर निरूपण पुढील व्याख्यानात करूं.

**श्रद्धाचि करितसे हित धर्मांचें, जेवि माय तनयाचें;**
**जप, तप, मख, गुरुपूजा, मुख्या श्रद्धाचि आयतन यांचें.**

—मोरोपंत.

## उपासना.

*" Pray for my soul More things are wrought by prayer
Than this world dreams of Wherefore, let thy voice
Rise like a fountain for me night & day
For what are men better than sheep or goats
That nourish a blind life within the brain,
If knowing God, they lift not hands of prayer
Both for themselves and those who call them friend ?
For so the whole round earth is every way
Bound by gold chains about the feet of God "

—*Tennyson's " Morte d' Arthur "*

गेल्या व्याख्यानात श्रद्धेविषयीं मीं जें सागितलें तें असें. ज्या अदृश्य वस्तूंचा आपणास प्रत्यक्ष अनुभव येत नाहीं त्याच्या अस्तित्वाविषयीं जी खात्री असते तिला श्रद्धा असें म्हणतात आपल्या आयुष्यातील रोजच्या व्यवहारात याच श्रद्धेनें आपण आचरण करीत असतों. उदाहरणार्थ इंग्लंडदेश आहे ही गोष्ट आपणांस निस्सदेह वाटते. पृथ्वी वाटोळी आहे याबद्दल आपली खात्री आहे. अमुक दिशेनें गेलों असतां हिमालयाचें दर्शन घडेल यात आपणांस शंका [illegible] नाहीं या सर्व गोष्टी प्रत्यक्ष अनुभवानें जरी आपणास

*माझ्या आत्म्याला शाति मिळावी एतदर्थ तू देवाजवळ प्रार्थना कर इहलोकीं लोकाना जी कल्पना आहे त्याहून कितीतरी अधिक गोष्टी नुसत्या प्रार्थनेच्या बळावर घडून येतात अतएव माझ्यासाठीं तुझ्या प्रार्थनेचा ओघ निर्झराप्रमाणे रात्रदिन सारखा प्रसवू दे कारण, ईश्वराला ओळखून स्वत च्या व स्नेही म्हणून म्हणणाऱ्या इतराच्या आत्मोन्नतीसाठीं जर आपण त्याची प्रार्थना करणार नाहीं, तर आधळ्यासारखी जीवयात्रा चालविणाऱ्या श्वापदाहून आपली स्थिति अधिक चागली ती कोणती असणार ? देवाच्या प्रार्थनेवाचून आपणास तरणोपायच नाहीं, त्याला आपणास क्षणभर देखील विसबता येत नाहीं कारण, या भूतलावरील यच्चयावत् प्राणिमात्र परमेश्वराच्या चरणकमलाशीं सुवर्णशृखलानीं सर्वतोपरि निगडित आहे ( जीवशिवाचा बंध इतका अभेद्य आहे ).'

सिद्ध करून दाखवितां येत नसल्या, तरी त्यांच्यावर आपला विश्वास आहे. कारण, विश्वास ठेवण्यास आपल्याजवळ फार सबळ कारणें आहेत. म्हणूनच अदृश्य ईश्वरावरहि आपण श्रद्धा ठेवतों.

आज उपासनेवर चार शब्द सांगावेत अशी माझी इच्छा आहे, आणि हा विचार ईश्वरावरील श्रद्धेच्या विचाराच्या पाठोपाठ ओघानेंच येतो. कारण, उपासना म्हणजे तरी काय? उपासनेचा अर्थ ईश्वराशीं प्रेमानें सलगीचें भाषण करणें यावांचून अन्य कांहींहि नाहीं. आणि ईश्वरावर जर आपली खरी निष्ठा असेल, तर तेणेंकरून त्याचा नित्य सल्ला घेण्याचा, त्याच्या वरदहस्ताच्या साहाय्यावर भरंवसा ठेवण्याचा, त्याच्या अभिनंदनीय कृपार्द्रदृष्टीची मार्गप्रतीक्षा करण्याचा, आपणांस श्रेष्ठ हक्क आहे असें सांगावें लागेलच पाहिजे, असें म्हणण्यास प्रत्यवाय दिसत नाहीं. अशा संगतीचा लाभ होणें म्हणजे इहलोकींच स्वर्गसुखाचा आस्वाद् घ्यावयास सांपडणें, असें आपणांस वाटेल.

असेंच, ईश्वरसान्निध्याच्या प्रचीतीविषयीं मीं जें पहिल्या व्याख्यानांत सांगितलें त्याचा, आतां मी जें कांहीं सांगणार आहें त्याच्याशीं अत्यंत निकट संबंध आहे. कारण, ईश्वराच्या सान्निध्याची भावना असणें म्हणजेच अत्युच्च अर्थानें त्याची उपासना करणें होय, व ईश्वरविषयक विचाराच्या अभ्यासानें आध्यात्मिक उन्नति आपणांस करून घेतां येईल. घांट वाजल्याबरोबर ईश्वरसान्निध्याची जागृति आपल्या ठायीं ठेवतां येईल, असें जें मी म्हणालों त्याचाहि अर्थ उपासनेचें कर्म हाच होता. आपल्या प्रत्यहीं आचरणांत अशा तऱ्हेनें ईश्वराचें नित्य स्मरण करणें सदैव हीच खरी उपासना.

पण उपासना कधींहि मुळींच न करूनसुद्धां ईश्वरसान्निध्याची आपणांस आठवण ठेवतां येईल, नाहीं असें नाहीं; व आपणापैकीं बहुतेकांना त्याचें स्मरण वारंवार होतेंच. ईश्वराची आठवण करून देणारीं आपणा सर्वांना सर्व साधारण अशीं जीं साधनें त्याचीहि उपेक्षा आपण कदाचित् करूं. ईश्वराच्या पवित्र नामाचा उच्चार वारंवार करून आपण म्हणत असतों, "परमेश्वराला ठाऊक," "ईश्वर जाणे," "परमेश्वर करो तुझें कल्याण होवो," "परमेश्वराच्या कृपेनें," 'गुडबाय्' ( ईश्वर तुमच्या सन्निध असो ), आणि असें असूनहि ईश्वराचा नामोच्चार करीत असतांहि आपण त्याच्याविषयीं विचार करीत नाहीं. 'परमेश्वराचे मोठे उपकार आहेत, मी फार सुखी आहें,' असें जेव्हां आपण

म्हणतों, तेव्हा आपण खरोखर अंतःकरणपूर्वक त्याचें उपकार मानीत असतों काय? आणि जीविताच्या क्षणभंगुरतेची, काल व नित्यता याच्यामध्यें असणाऱ्या जवनिकेच्या विरलतेची, ईश्वरसान्निध्याला आपल्या दृष्टिआड करणाऱ्या जवनिकेची आठवण करून देणारी स्पष्ट चिन्हें आपल्या वारंवार नजरेस पडत असतात; आणि असें असूनहि जणुं काय ह्या महाघडामोडींचा आपल्या मनावर काहींच संस्कार घडत नाही अशा तऱ्हेनें आपण आपला जीवयात्रेचा मार्ग आक्रमीत असतो तथापि, हें पक्के लक्ष्यात ठेवा, की, ह्या घडामोडी म्हणजे ईश्वराचे संदेशच होत. त्या संदेशाने तो आपणास त्याच्या आधीन होण्यास निमंत्रण देत असतो.

अशाच प्रकारचा एक संदेश गेल्या आठवड्यांतच आपणास आलेला होता. तुम्हाला ठाऊक आहे, कीं, गेल्या बुधवारी *एका अरब जमादाराला देवाच्या येथील एकाएकीं बोलावणें आल्यावरून तो आपल्याला सोडून गेला. त्याची शरीरप्रकृति व सामर्थ्य अगदीं नेहमीप्रमाणें दिसत होतीं, तरीपण एकाएकीं मूर्च्छा येऊन तो पडला, व पांच मिनिटांतच त्याचें प्राणोत्क्रमण झालें! एवढ्या धिप्पाड मनुष्याचा नुसता निश्चेष्ट देहच अवशिष्ट राहिला देह येथें राहिला खरा, पण त्याचा जीवात्मा कोठे गेला? ह्या आकस्मिक स्थित्यंतरांत त्याचा जीवात्मा इहलोक सोडून देवाप्रत गेला, अशी आपली समजूत आहे देवाकडे गेला व तो कायमचा गेला याचा विचारच आपण करूं लागलों तर तो खरोखरच आश्चर्यकारक होय देवाच्या जवळ राहण्यास कायमचा गेला! आपणापैकीं प्रत्येकाला हें असेंच घडलें असतें. तें बुधवारींच घडले असतें. तें आज घडेल अथवा उद्या केव्हा तरी घडेल. तसा प्रसंगच आल्यास आपण तयारीनें असावें काय? ह्या अरबाचा मृत्यु म्हणजे जीविताचा घडिभरसुद्धा भरंवसा नाहीं, तें अत्यंत क्षणभंगुर आहे, मरण हें आजना उद्या केव्हा तरी ठेवलेलेंच आहे, ज्याच्याच एकव्या स्वरूपात आपणांस अमरत्वाचा अनुभव घेतां येणें शक्य आहे अशा ईश्वराच्या सन्निध जाणें चुकतच नाहीं, 'जातस्य हि ध्रुवो मृत्युः' अशी आपणा सर्वांस खरोखर सूचनाच नव्हे काय? हे विचार तुमच्या मनांत

---

* भावनगरचे कुमार भाऊसिंगजी यांच्या सेवेला अमार नावाचा एक अरब जमादार होता. सन १८८७ साली फेब्रुवारीचे २१ वे तारखेस विश्वविद्यालयांत एका स्नेह्याशीं भाषण करीत असतां हृद्रोगानें एकाएकी त्याला देवाधीन व्हावे लागले

कधीं आले आहेत काय? आले असल्यास त्यांचा तुमच्या मनावर कांहीं परिणाम झाला आहे काय? त्याचें निमंत्रण येतांच तदाधीन होण्याची आपली पूर्ण तयारी राहील अशा रीतीनें त्याच्या उज्ज्वल व पवित्र सान्निध्यांत आपला जीवनव्यापार यापुढे चालविण्याचा तुम्हीं कधीं निश्चय केला आहे काय? अशा प्रकारचे कांहीं निश्चय केले असतील तर ईश्वराला ह्या गोष्टीवरून जो धडा आपणास शिकवावयाचा होता तो तुम्ही शिकलात, असें म्हणता येईल. आपण ईश्वराचे सन्निध अधिकाधिक राहावे, आपण आपले सर्व आयुष्य भक्तिरसामृताचा आस्वाद घेत घालवावे, हाच तो धडा.

भक्तियुक्त आचरणाने राहणें ह्मणजे ईश्वरी इच्छेवर हवाला ठेवून विनम्र स्थितींत जीवनयात्रा चालविणे होय. कांहींहि भोगणे प्राप्त होवो, ती ईश्वरी इच्छा. आपलें सुख हें त्याच्या कृपेच्या देणग्या व दुःख हें त्याच्या शिक्षणाचा भाग, असें मानणें होय, व कांहींहि घडो, त्याचें सर्वाभूतीं प्रेम आहे, तोच आपला मातापिता व सखा आहे, ही भावना जागृत ठेवणं होय.

आपणांस देवाजवळ काय वाटेल ते सागतां येतें व मागतां येतें. आपलीं सर्व रहस्ये, आपल्या सर्व वासना, आपल्या यच्चयावत् आशा आणि भीति सर्वज्ञ व दयामय परमेश्वराजवळ आपणास विश्वासाने सांगता येतात. पण परमेश्वराजवळ आपलें मन मोकळें करीत असताना त्याच्या इच्छेविरुद्ध तो आपले मनोवाछित पुरवील, अशी अपेक्षा मात्र आपण करता कामा नये. स्वार्थलोलुपतेनें जर आपण एखादा दुष्ट मनोविकार अथवा ऐहिक वाच्छा ह्मणजे संपत्ति, कीर्ति अथवा लौकिकमान आदि मिळावा अशी त्याच्यापाशीं मागणी केली तर ती तो मान्य करणार नाहीं असेंच आपण समजलें पाहिजे. असल्या गोष्टीची अपेक्षा करणें ह्याला खरोखर उपासना अथवा देवाशीं आपलें मन लावून ध्यान करणें ह्मणताच येत नाहीं. तर उलट कांहीं अशी देवापासून आपण विभक्त होऊन अर्थात् देवाला विसरून ऐहिक गोष्टींतच मन तल्लीन करणें होय. आपणास काय वाटेल तें देवाजवळ मागता येतें असें मी ह्मणालों, पण आपल्या सर्व उपासनांनां "माझ्या इच्छेचा पाड काय? देवा तुझ्याच इच्छेनें सर्व गोष्टी घडत आहेत," अशा भक्तिभावनेची जोड असलीच पाहिजे. देवाच्या इच्छेलाहि तसेंच वाटल्यावांचून आपली इच्छा ही सदिच्छा नाहीं असें आपणास वाटलें पाहिजे. अशा प्रकारच्या भक्तीने आपणांस आश्चर्यकारक शांततेचा अनुभव घ्यावयास सापडेल, आयुष्यांत

आपल्याला आश्चर्यकारक सुख व सांत्वन प्राप्त होईल. कोणतीहि स्थिति आपणांस प्राप्त होवो, अत्यंत श्रेष्ठ व अत्यंत पवित्र असा ईश्वर आपला पालनकर्ता आहेच ही भावना जागृत राहील, व "मीं देवाजवळ मला सांगावयाचें तेवढें सर्व सांगितलें आहे, तो सर्वज्ञ दयाघन व वत्सलनिधी आहे; ही त्याचीच इच्छा आहे, व त्याची इच्छा सर्वोत्कृष्ट आहे," या श्रद्धेंतच तेजस्वित्व व आनंद वाटेल.

कांहीं गोष्टी अशा आहेत, कीं, त्यांच्यासंबंधीं देवाची उपासना आपणांस साशंक वृत्तीनें करतां येईल, व कांहीं अशा आहेत, कीं, त्या बाबतींत निश्चयानें उपासना करतां येते. ईश्वराच्या इच्छेनें नियमन होणाऱ्या सृष्टींतील यच्चयावत् घडामोडीचा पहिल्या वर्गांत अंतर्भाव होतो, तर दुसऱ्या म्हणजे सामान्य वर्गांत ज्याला आपण परमेश्वरी इच्छेचें व्यक्त स्वरूप अथवा दृश्य कार्य असें मानतों त्या नियमानुरूप होणाऱ्या घडामोडी मोडतात. कार्यकारणनियम यच्चयावत् सृष्टपदार्थांत दृष्टिगोचर आहे, व तें ईश्वरी इच्छेला अनुसरून दिसतें. अतएव परमेश्वरानें मनांत आणल्यास त्याला आपल्या नियमांत रूपांतर करतां येईल अशी जरी आपली खात्री आहे, तथापि आपल्यासारख्या मर्त्य माणसांपैकीं एकाच्या अंध वासनेप्रमाणें तो आपलें नियमांतर करील असें आपणास मानतांच येत नाहीं आणि अशा प्रसंगीं एक मर्त्य जर एक गोष्ट मागूं लागला व दुसरा त्याच्या अगदीं विरुद्ध असें मागूं लागला तर त्याचा परिणाम काय होईल बरें? कल्पना करा, कीं, दोन शेतकऱ्यांनीं आपापल्या शेतांत निरनिराळीं पिकें पेरिलीं असून एकाला पावसाची अधिक गरज आहे व दुसऱ्याला त्याची आवश्यकता नाहीं; म्हणून एक पावसाकडे डोळे लावून व दुसरा उघाडीची अपेक्षा धरून देवाची करुणा भाकूं लागला. दोघेहि सारखींच चांगलीं माणसें असतील व दोघांचीहि उपासना सारखीच मनापासून असेल, तरीपण देवाला दोघांच्याहि करुणा एकसमयावच्छेदें करून ऐकतां येतील काय? अथवा अशी कल्पना करा, कीं, युद्धप्रसंगीं दोन्हीहि पक्ष यशासाठीं देवाची प्रार्थना करीत आहेत; तरी पण कोणत्या तरी एका पक्षाला यश हें येणारच व दुसऱ्याला अपयश हें ठेवलेलेंच. पण एवढ्यावरून आपणांस असा सिद्धांत काढतां येईल काय, कीं, विजयी पक्षाचेंच म्हणणें परमेश्वरानें ऐकिलें व त्याचाच पक्ष सत्य होता म्हणून विजयश्रीला त्याच्या गळ्यांत माळ घालावयास सांगितली? ज्याचा पक्ष अधिक चांगला त्याला परमेश्वर यश देत

नाहीं असें मी ह्मणत नाहीं. माझ्या ह्मणण्याचा आशय एवढाच, कीं, ईश्वराच्या दारीं व्यवस्था असून सर्व गोष्टी यथाक्रम होत आहेत, व तो जी जी गोष्ट करतो ती आपल्या स्वत:च्या इच्छेनुरूप सर्वांच्या कल्याणासाठींच करीत आहे; आणि अतएव अशा प्रकारच्या एकपक्षीय स्वार्थलोलुप उपासनेनें देवावर आपणास कधीं भार घालता येईल अशी आपणास कल्पनाच करतां येत नाहीं. आपणास वाटेल तर असले अर्ज देवाजवळ आपण खुशाल करावेत; पण ही खरी उपासना नसून त्याला प्रत्यक्ष फळ मिळेल अशी आपणास अपेक्षाहि करता येत नाहीं.

तर ज्यात निश्चयाने फलप्राप्ति होईल अशी उपासना आपण कोणत्या बाबतींत करावी बरें? पवित्र, दिव्य व ईश्वरतुल्य अशा प्रत्येक गोष्टींत आपणास निश्चयपूर्वक उपासना करतां येईल. ह्या ऐहिक गोष्टी नाहींत; त्या द्रव्याच्या, भूमीच्या, मानाच्या अथवा लौकिक कीर्तीच्या गोष्टी नव्हेत; त्या ज्ञानाच्या अथवा शहाणपणाच्याहि गोष्टी नव्हेत. पण पुरुष असो, स्त्री असो वा मूल असो, प्रत्येकाच्या ठायीं असणाऱ्या चांगुलपणाचा जो अर्थ आपण समजतों त्याच्याच संबधीं ह्या सर्व गोष्टी होत. ज्या गुणसमुच्चयानें मनुष्यांस चांगुलपणा प्राप्त होतो, व मरणोत्तर देवाधीन व्हावयाचें ह्या आपल्या आशेला अनुरूप अशी श्रेष्ठतम व पवित्रतम देवाच्या चरणाजवळ राहाण्यास अगीं योग्यता येते, त्याच्यासबधीं ह्या सर्व गोष्टी होत. हे गुण अंत:करणाचे व मनाचे आहेत. अत्यंत अर्थपूर्ण दृष्टीनें ते देण्याचे सामर्थ्य एकट्या ईश्वराचेच ठायीं आहे कारण, ईश्वरच सर्व गुणाचें केंद्रस्थान व प्रभवस्थान आहे. शुचिता, पावित्र्य, सत्य, सौजन्य, बधुप्रीति, स्वार्थत्याग हे आणि ह्यासारखेच अन्य गुण परमेश्वराच्या देणग्या होत. आणि ह्या देणग्या अशा आहेत, कीं, त्या आपण मागितल्या असतां परमेश्वर कधींहि नाहीं ह्मणणार नाहीं, हें आपणास ठाऊक आहे.

पुढील व्याख्यानात ह्याच उच्चतर गुणांविषयी चार शब्द तुह्मांला सागावे असें माझ्या मनांत आहे. हे गुण खरोखर अति महत्त्वाचे आहेत, व त्यापैकीं प्रत्येकाचा स्वतत्र विचार आपण करूं. सुरुवातीच्या ह्या व्याख्यानांत पुढील व्याख्यानांच्या इमारतीसाठीं मजबूत पाया रचावा अशी माझी इच्छा होती व ह्मणून ह्या व्याख्यानत्रयींत ईश्वराच्या सान्निध्यावर विश्वास, व त्या श्रद्धेपासून स्वाभाविकपणेंच उद्भवणारी उपासना यावर

मी चार शब्द बोललों. कारण, माझी अशी खात्री आहे, कीं, नीति ही ईश्वरा-वांचून अगदीं मिणमिणीत अधुक प्रकाशाप्रमाणेंच भासली पाहिजे; कोठें सहस्ररश्मी दिनमणी, व कोठें निस्तेज हिमकिरणें प्रसवणारा रजनीनाथ ! मनुष्य स्वत· अगदी असमर्थ असतो, तरी पण परमेश्वराच्या पवित्र तेजाच्या सामर्थ्यबलावर त्याचे हातून उच्चतर व उदात्त अशीं कार्यें, पूर्वजविभूतींचें पराक्रमवर्णन जें पुराणेतिहासात ग्रथित करून ठेविलेलें आहे त्यापेक्षाहि अधिक उच्चतर व श्रेष्ठतर अशी कार्यें अजूनहि, ह्या निकृष्ट दशेंतहि घडून येतील.

समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः ।
शीतोष्णसुखदुःखेषु समः संगविवर्जितः ॥ १८ ॥
तुल्यनिंदास्तुतिर्मौनी संतुष्टो येनकेनचित् ।
अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः ॥ १९ ॥
ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते ।
श्रद्दधाना मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रियाः ॥ २० ॥

—भगवद्गीता, अध्याय १२.

# कर्तव्यकर्म.

'धर्म हा प्राणिमात्राचा आधारस्तंभ आहे प्रत्येक गोष्टीचा धर्मात अंतर्भाव होतो अतएव धर्माला सर्वोत्कृष्ट असें म्हणतात'

—तैत्तरीयारण्यक

'ज्या गुणाची सर्व आर्य लोक अतिशय प्रशंसा करितात तो धर्म हा होय' व ज्याची ते निर्भर्त्सना करितात तो अधर्म होय'

—आपस्तंब धर्मसूत्र

प्रत्येकाला कांहीं तरी कर्तव्य ह्मणून आहेच याविषयीं आपणां सर्वांचें एकमत आहे. कर्ममार्ग ह्मणून एक आहे अशी आपली सर्वांची समजूत आहे. तो आपला धर्म आहे, ते आपणांस फेडावयाचें ऋण आहे; कारण तो सदाचार आहे. सत्कर्म करण्याची मनापासून इच्छा धरून जर एखादे वेळी आपण आपले कर्तव्यकर्म कोणतें ह्मणून प्रश्न केला, तर त्याचें सर्वोत्कृष्ट असें उत्तर आपणा सर्वांच्या अंतर्यामीं वास करीत असलेल्या सदसद्विचारातच आपणांस मिळते. ह्या सदसद्विचारालाच मी आपल्या प्रथम व्याख्यानात कांहीं तरी दिव्य असें, अंतरात्म्याचा ध्वनि, ह्मणून ह्मटलें आहे.

सारांश, आपणांस जें अवश्य केलें पाहिजे तेंच आपलें प्रत्येकाचें कर्तव्य जाणावें. सर्वांचे कर्तव्यकर्म ह्मणजे अगदी एकसारखेंच असतें, असा मात्र त्याचा अर्थ नव्हे. कारण, अर्थातच मातापितराच्या कर्तव्यकर्माहून मुलाचें कर्तव्यकर्म वेगळें असतें. राजाचें वेगळें व राजकुमाराचें वेगळें; गुरूचें वेगळें आणि शिष्याचें वेगळें; योद्धयाचें वेगळें व शेतकऱ्याचें वेगळें. स्थितिपरत्वें कर्तव्य-भिन्नता जरी असली तरीपण उच्च असो वा नीच असो, श्रीमंत असो वा दरिद्री असो, वयोवृद्ध असो वा तरुण असो, पुरुष असो, स्त्री असो वा मूल असो. सर्वांच्या पाठीमागें कर्तव्यकर्म हें लागलेंच आहे. आपणांपैकीं प्रत्येकाला कर्तव्य-कर्म आहे व तें दोन प्रकारचें आहे. एक देवासंबंधीं कर्तव्यकर्म व दुसरें मानवी वर्गासंबंधीं कर्तव्यकर्म.

आपलीं हीं दुहेरी कर्तव्यकर्मे म्हणजे मुलांना जशी एक मातापितरासंबधी व दुसरें आपल्या बंधुभगिनींसंबंधी अशी दोन प्रकारचीं कर्तव्यकर्मे आहेत, तद्वतच होत. आपल्या व मुलांच्या कर्तव्यकर्मात उच्चतर अर्थानें बरेंच साम्य आहे. कारण, आपण तरी एका प्रचड विश्वकुटुंबांतील लेंकरेंच आहोंत, त्या विश्व-कुटुंबाचे आपण सर्वजण सारखेच नातलग आहोत, व परमेश्वर हा त्या कुटुंबाचा महान् चालक आहे. आणि ज्याप्रमाणें कर्तव्यबद्ध मुलाला आपल्या जन्मदात्या पित्यावर निस्सीम प्रेम करून त्याच्या आज्ञेत राहावें लागतें, तद्वतच, उच्चतर अर्थाने, आपणा सर्वांचा विश्वपिता जो परमेश्वर त्याचे ठायीं निस्सीम प्रेम ठेवून त्याच्या आज्ञेत आपणास राहिलें पाहिजे. आणि मुलाचं जसें आपल्या भावडावर प्रेम असते, तद्वत आपलेंहि आपल्या बांधवांवर प्रेम असावें.

आता ईश्वराविषयीं कर्तव्यकर्म कोणतें, याचा आपण विचार करूं. जन्मदात्या पित्याप्रमाणें परमेश्वर आपणास दृष्टिगोचर नाहीं. तरी पण श्रद्धेनें आपणांस त्याच्यावर विश्वास ठेवता येतो. अगदी मनापासून आपणास त्याच्यावर प्रेम करता येते. कारण, तो वत्सलतेनें आपली काळजी वाहून आपला योगक्षेम चालवित असतो आपल्या आवडत्या मातापितराना आनद देण्यासाठीं मूल जसें सदोदित प्रयत्न करीत असते, तसेंच, आपणास आपल्या यच्चयावत् गोष्टींत, ईश्वराला स्मरून आपल्या हातून घडणाऱ्या यच्चयावत् कर्मांत, त्याला प्रसन्न ठेवण्याचा प्रयत्न करतां येईल. सारांश, ईश्वराविषयींचें आपलें कर्तव्यकर्म म्हटले म्हणजे त्याच्यावर विश्वास अथवा श्रद्धा ठेवणें, त्याच्यावर प्रेम करणें, व कायावाचामनेंकरून त्याची सेवा करणें, हेंच होय. ईश्वरासंबंधीं ह्या कर्तव्यकर्माविषयीं गेल्या तीन व्याख्यानांत उल्लेख येऊन चुकलाच आहे. हें कर्तव्यकर्म सुकर आहे असे म्हणतां येणार नाहीं. कारण, स्पष्ट श्रद्धेची तेथे आवश्यकता असते, व श्रद्धेनें राहावयाचें म्हणजे ह्या इंद्रियगोचर जगतांत फार सावधगिरीनें व काळजीपूर्वक राहण्याची आपणास दक्षता ठेवली पाहिजे. पण मीं मागें सांगितलेंच आहे, कीं, श्रद्धा दृढतर होण्यास व्यावहारिक साधनांनीं आपणांस आत्मशिक्षण संपादन करता येतें. आणि अशा साधनांपैकीं सर्वोत्कृष्ट साधन म्हटलें म्हणजे उपासना हेंच होय. माझी एवढी खातरी आहे, कीं, ईश्वर व त्याचे सान्निध्य याविषयी खरी श्रद्धा एकदा उदय पावली, मग ईश्वरविषयक कर्तव्यकर्माचे बाकीचे दोन

विभाग आपोआपच तिच्या पाठोपाठ येतात. (ईश्वरविषयक कर्तव्यकर्मांत श्रद्धलाच मीं आद्य स्थान दिले आहे) आपला भाव जर शुद्ध असेल तर ईश्वरावर आपले प्रेम सहज जडेल, व प्रेम जडलें म्हणजे कृतज्ञतापूर्वक आपल्या हातून सेवा घडेल.

कर्तव्याच्या दुसऱ्या भागाकडे आपण आता वळूं. आणि हा दुसरा भाग आपणा सर्वांना फार अनुलक्षून आहे. आपल्या बाधवाविषयीं आपलें कर्तव्यकर्म ह्याचा उल्लेख लहानशा वाक्यात सूत्ररूपाने करता येईल आपण आपल्या स्वत वर जसें प्रेम करतों, तद्वत् ते आपण आपल्या शेजाऱ्यावरहि करावे आपल्या बाधवानी आपणाशीं जसें वागावे अशी आपली इच्छा असते, तद्वतच आपण त्याच्याशी आपलें आचरण ठेवावे स्वतःच्या सुखाची पर्वा न करता लोकाच्या सुखाकरिताच आपले प्रयत्न असावे दुसऱ्याना सुखी करण्यातच आपणास अत्यंत सुख वाटलें पाहिजे हे कर्तव्यकर्मपद्धा सुकर आहे असे नाहीं, थोर आणि चागली अशी कोणतीच गोष्ट सोपी नसते. मात्र कर्तव्य दुष्कर म्हणून तेणेकरून आपण आपला उत्साहभग होऊं देता कामा नये, ईश्वराचे साहाय्य असल्यावर आपणास पार पाडता येणार नाहीं अशी एकहि गोष्ट नाहीं ! बाधवाविषयींचे हे कर्तव्यकर्म खरोखर सोपें नाहीं कारण, आपल्या पापी स्वभावाला अनुसरून आपले आचरण आपमतलबी होण्याचा सभव असतो स्वार्थैकदृष्टीनी व वासनानी अवत्व येऊन स्वार्थलोलुपतेमुळे आपल्या बाधवाचा विसर पडण्याकडे व आपल्यापुरताच विचार करण्याकडे आपणा सर्वांची फारच स्वाभाविक प्रवृत्ति असते, आणि आपल्या स्वतःच्याच स्वार्थासाठी व ऐहिक हेतु पुरविण्यासाठी आपल्या हातून जे प्रयत्न घडत असतात तेणेकरून वारवार आपल्या शेजाऱ्याचे कल्याण होणें तर एकीकडेच राहते, पण उलट त्याचे नुकसान मात्र होते

पण आजपासूनच आपण आपल्या स्वत पेक्षा इतराविषयीं अधिक विचार करण्याचा प्रयत्न करूं व या कामी आपण ईश्वराजवळ साहाय्य मागूं. तुमचा ज्याच्याशीं सबध पोहोचतो अशा तुमच्या सभोवतालच्या सर्व माणसाशी प्रेमाने वागण्याचा तुम्ही निश्चय करा. त्याच्याविषयीं प्रेमळ विचार करण्याचाहि तुम्ही निश्चय करा. फार लाब कशाला, कदाचित् ह्या विश्वविद्यालयातच ह्या बाबतींत आपलें कर्तव्यकर्म बजावण्याच्या कामीं हयगय होण्याचा विशेष सभव आहे. तरीपण, माझ्या मित्रानों ! हे लक्ष्यात ठेवा, कीं, आपल्या ह्या मंडळींत

कृपालु व धर्मशील विचार हेंच आपलें विशिष्ट कर्तव्यकर्म होय. आपल्यापैकी प्रत्येकाला असें वाटलें पाहिजे, कीं, माझ्या स्वतःच्या अब्रूपेक्षा माझ्या लेखाची अब्रु अधिक महत्त्वाची आहे येथे तुमचे कर्तव्यकर्म म्हटलें म्हणजे ज्यात आपणास आनंद वाटतो त्या गोष्टींचा उपभोग आपल्या मित्रास घेतां येईल अशा रीतीनें स्वार्थत्याग करून, दुसऱ्याच्या सुखात सुख मानून, एखाद्या गोष्टीच्या अत्यंत वाईट भागाकडे नजर न देता त्याच्या उज्ज्वल भागाचाच विचार करून, अर्थात् दोषाकडे लक्ष्य न देता गुणच तेवढे घेऊन, आणि वाईट गोष्टी सहन करून व चागल्या गोष्टीवर श्रद्धा ठेवून, परस्पर प्रेमानें, परहिततत्परतेनें व दयाळुत्वानें वागणें हेंच होय. माझ्या मित्रानो! ह्या विश्वविद्यालयात जर तुम्ही अशा रीतीने वागाल, तरमग तुमच्यापैकीं प्रत्येकजण येथे—येथील तुमच्या बाल्यदशेतील प्रत्यहीं आचरणातच—भूतलावरील देवदूताप्रमाणें शोभू लागेल!

तुम्ही अशा तऱ्हेने आजवर वागत आला आहांत काय? विप्रिय गोष्टी कानीं आल्या असता त्याच्यावर विश्वास ठेवण्याचें साफ नाकारून त्या खोट्या आहेत असें तुम्ही कधीं म्हटले आहे काय? त्या कर्णोपकर्णी पसरणार नाहींत अशा तऱ्हेने तुम्हीं कधीं प्रयत्न केला आहे काय? अथवा तुम्हाला त्या विश्वसनीय वाटून तुम्हींच त्या फिरून इतराना सागत सुटला आहात काय? लोकाची प्रशंसा झालेली ऐकून तुम्हाला कधी आनंद वाटला आहे काय? स्वतःला आनंदविण्यापेक्षा इतरानां आनदी करण्यात तुम्हाला कधी अधिक आनद वाटला आहे काय? तुम्ही आपल्या खेळात नेहमीं न्यायानें व प्रामाणिकपणानें वागत आला आहात काय? तुमच्याहून जे वयानें लहान त्याच्याशी तुम्ही आपला उच्चार व आचार प्रेमळ ठेवीत आला आहात काय? वडिलाशीं आज्ञाधारकपणाने वागत आला आहात काय? साराश, लोकानीं आपल्याशीं जसें वागावें अशी आपली इच्छा असते, तद्वत् थोर अनुकपायुक्त प्रेमबुद्धीनें त्यांच्याशीं तुम्ही वागत आला आहात काय? ह्या प्रश्नाचीं उत्तरें माझीं मलाच देणें जसें भाग आहे, तसें तीं तुमचीं तुम्हींच देण्याचें मी तुम्हांवरच सोंपवितों. आपणा सर्वांना हीं उत्तरें अस्तिपक्षीं देता आली तर आपल्याला किती बरें संतोष वाटेल! आयुष्यात कोणतीहि स्थिति प्राप्त होवो, कोठेहि राहण्याचा प्रसंग येवो सर्वांनीं आपल्या स्वतःला विचारण्याचे हे प्रश्न होत. तरीपण मला वाटतें ह्या विश्वविद्यालयात एकत्र वास करण्याचा ज्याना योग आला आहे त्यांनां तर ते विशेषेंकरून लागू आहेत.

येथे शिक्षणावस्थेंत असणाऱ्या तुह्मांलाच विशेषेंकरून लागू असा आणखी एक प्रश्न आहे. तो असा. माझ्या वरिष्ठासंबंधीं जें माझें कर्तव्यकर्म तें मी यथायोग्य बजावतों काय? त्यांच्याशीं आदरयुक्त आज्ञाधारकपणानें मी वागत आहें काय? त्यांनी सांगितलेलीं सर्व कामें, नेमून दिलेले सर्व धडे, भो माझ्यानें होईल तितक्या चांगल्या रीतीनें तयार करीत असतों काय? जे नेहमी तुमच्या कल्याणाचीच केवळ इच्छा करीत आहेत, व ज्यांच्या आज्ञेत वागणें हें तुमचें कर्तव्यकर्म आहे, अशाच्याकडून तुह्माला लाभलेल्या हितकर अवसराचा तुह्मीं होईल तितका सदुपयोग करून घेणें हें तुमचें येथील स्पष्ट कर्तव्यकर्म होय. ह्या अवसरांचा फायदा करून घेण्याचें नाकारणें ह्मणजे केवळ कर्तव्यातिक्रम करणेंच नव्हे, तर कृतघ्नतेचें व मूर्खपणाचेंहि मोठें पातक शिरावर घेण्यासारखे आहे! आणि विश्वास ठेवा, मी खरें आहे तेंच सागतों, ज्यानीं ज्यानीं ह्मणून आपल्या बाल्यदशेंत शाळेंतील हितकर अवसर वाया दवडले, त्याना सर्वांना पुढें मोठेपणी आपल्या अशा या अविचारी वर्तनाचा पश्चात्ताप होऊन नेहमीं दु ख वाटत आलें आहे!

ह्मणून आज मी तुह्माला दोन विचार सागतो व ते तुह्मीं नीट लक्ष्यांत ठेवून या आठवड्यात त्याचा वारवार विचार कराः—

( १ ) सर्वांभूतीं, विशेषेंकरून विश्वविद्यालयांतील माझ्या सहाध्यायांविषयीं प्रेम ठेवणे, त्यांना अपकार करणाऱ्या अथवा त्याच्या कीर्तीला कलक लावणाऱ्या गोष्टीचा मुखावाटे पुनरुचार न करणें अथवा तिकडे कानहि न देणें त्याचा चित्तक्षोभ होईल अथवा त्यानां उपहासास्पद वाटेल असें कांहींहि न करणें; उलट त्यांच्यावर प्रेम करून त्याच्या प्रीतीस पात्र होणे, व त्यांच्या हातून आपला अपराध घडला असल्यास त्याबद्दल त्यांना क्षमा करणे हें माझें कर्तव्यकर्म होय.

(२) माझीं विश्वविद्यालयांतील कामें मी माझ्यानें होतील तितकीं नीट बजावणें व मजवर अधिष्ठित असलेल्या अध्यापकानां आपल्या अभ्यासाने व चागल्या वर्तणुकीनें प्रसन्न ठेवणे, हें माझें कर्तव्यकर्म होय कारण, माझ्या कल्याणार्थंच ईश्वराचे सेवक ह्मणून मजवर अधिकार गाजविण्यास त्याची योजना झालेली आहे, व त्याना प्रसन्न ठेवण्यात व आपलें कर्तव्यकर्म बजावण्यांत मी खरोखर ईश्वराचीच सेवा करीत आहे.

एवच, आपणांस एवढी गोष्ट पूर्णपणें कळून येईल, कीं, देवासंबंधीं कर्तव्यकर्म व मानवासंबंधी कर्तव्यकर्म अशा ज्या दुहेरी कर्तव्याचा मीं वर प्रारंभी

उल्लेख केला, तें खरोखर अखेरीस एकच कर्तव्यकर्म आहे, व 'प्रेम' या एकच शब्दाने त्याचा अर्थबोध होणांरा आहे. ईश्वराविषयी व मानवी वर्गाविषयी प्रेम हेंच काय ते आपणा सर्वांचें अखिल कर्तव्यकर्म आहे. आपल्या ठायी एक प्रेम असलें ह्मणजे बाकीचे सर्व अन्य गुण आपोआप त्याच्यामागे येतील. ज्याच्या हृदयसागरावर ईश्वराविषयीं प्रेमलहरी उसळत असतात त्याच्या ठायी बाधवाविषयी प्रेम खात्रीने असलेंच पाहिजे; पण प्रथमत. शेजाऱ्याविषयी मनात प्रेम असल्यावाचून ईश्वराविषयीं प्रेम क्वचितच असते. आपल्या मानवबंधूंवरील प्रेमाच्या द्वाराच दिव्य पित्यावर आपण प्रेम करावयास शिकले पाहिजे. कारण, दृश्य बांधवावर जर आपण प्रेम करणार नाहीं तर अदृश्य ईश्वरावर प्रेम ते आपणास काय करता येणार? पुढे दिलेल्या **ले हंट** कवीच्या हृदयोद्गाराचा हाच खरोखर अर्थ आहे. ते तुम्हाला कदाचित् परिचित असतील त्याच शब्दानी मी हें विवरण पुरे करितों.

"अबू बेन् अढेम् (त्याचा वर्ग वृद्धिंगत होवो!) हा एके रात्री गाढ व शात स्वप्नसुखाचा अनुभव घेत असता जागा झाला, व पाहतो, तो खोलीत चंद्रप्रकाश पडून प्रफुल्लित कमलाप्रमाणे जिकडे तिकडे शोभायमान दिसत असून कोणीएक देवदूत सुवर्णाक्षरमुद्रित ग्रथात काहीं लिहीत असल्याचे त्याच्या नजरेस पडले. अत्यंत शातिजन्य धैर्यानें त्याने त्याला हें तूं काय लिहीत आहेस म्हणून विचारिले त्यावर तो अत्यंत प्रेमल हास्यमुद्रेने म्हणाला, कीं, ईश्वरावर कोणाकोणाचें प्रेम आहे त्याची मी यादी करीत आहे. 'त्यात माझे नाव आहे काय' म्हणून अबूने विचारिले देवदूताने 'मुळींच नाही!' म्हणून उत्तर दिले अबूने थोडे अधिक नम्रपणाने, पण आनदी वृत्तीत यत्किंचित्‌हि फरक न पडू देता, म्हटले 'तर मग स्वदेशबाधवावर प्रेम करणारा म्हणून तरी माझे नाव यादीत घाल, अशी मी तुझी प्रार्थना करतो.' देवदूताने काय लिहावयाचे ते लिहिले व तो दिसेनासा झाला दुसरे दिवशीं रात्री फिरून देवदूताने येऊन ती यादी जेव्हा दाखविली तेव्हा आश्चर्य हे, कीं, ईश्वरावर प्रेम करणाराच्या यादीत अबूचें नाव अग्रस्थानी घातलेले दृष्टीस पडलें."

**"ज्यांच्या हृत्कासारीं होय गुणस्नेहबिंदुही फार,**
**सारज्ञ असूयोज्झित त्यांनां माझा असो नमस्कार." १.**

—मोरोपत.

# उच्चारसत्यता.

"सत्य आहे ह्मणूनच वायु वाहतो व सूर्य उगवतो सत्य हे अत्युत्कृष्ट आहे, त्यावरच प्रत्येक गोष्ट अवलंबून असते अतएव सत्य हे अत्यंत उन्नतकारी आहे असे ह्मटले आहे"

—तैत्तरीयारण्यक

**'बोले तैसा चाले, त्याचीं वंदावी पाउलें ।'**

—तुकाराम.

तीन दृष्टींनी सत्याचा विचार आपणास करता येईल आपल्या उच्चारात सत्यता, आचारात सत्यता व विचारात सत्यता. ह्यापैकीं प्रथमभागाचा ह्मणजे उच्चार-सत्यतेचा आपण प्रस्तुत विचार करूं.

जे अगदी खरे असते तेच आपण नेहमी बोलतो काय? मला तर असें वाटते, की, आपणापैकी कित्येकजण, एखाद्या क्षुल्लक बाबीसाठीं सत्य लपवून खोटे बोलणे सोइस्कर वाटत असल्यामुळे तेणेकरून आपण आपल्या आत्म्याला केवढें दु ख देत असतो याचा फारसा विचार न करता बेधडक खोटे बोलत असतात प्रत्येक सत्यपराङ्मुखता ह्मणजे परिपक्क व्रणच जणु काय असून पथ्याचे अपथ्य व धर्माचा अधर्म करण्यासारखें होय अशा तऱ्हेचा प्रत्येक व्रण आपणास ईश्वराची लेकरें असें ह्मणण्याऐवजीं सैतान प्रजा असें दूषणास्पद लावण्यास अधिकाधिक कारणीभूत होत असतो. असे का असावे? तुह्मी कदाचित् असा युक्तिवाद कराल—कारण, अशा तऱ्हेचा युक्तिवाद मीं एकदा एका मुलाचे तोंडून ऐकिला होता, पण मला वाटते तो त्याने आपल्या स्वत च्या सदसद्विवेकबुद्धीच्या विरुद्धच केला असला पाहिजे—कीं, "जर खोटे बोलून दुसऱ्या कोणाचे नुकसान न होता माझा स्वतःचा फायदा होतो, तर जेणेकरून तोटा न होता केवळ सुहितच होते असे असत्य भाषण करण्यास मुळीसुद्धा हरकत नाही, तेच करणे खात्रीनें रास्त होईल मी जर दुसऱ्या कोणाला दुखवीत नाही, तर स्वत.ची अब्रू राखण्यासाठी मी खोटे का बोलूं नये? त्यात वावगे काय आहे?" माझ्या मित्रानो! अशा तऱ्हेचा बुद्धिवाद जर तुह्मी केला असला तर तो तुह्मी आपल्या आत्मविनाशासाठींच केला ह्मणून समजा! अशा प्रकारचे असत्य भाषण

**'आत्मानं अवसादयेत्'** या भगवदुक्तिप्रमाणें आपल्या श्रेष्ठतम आत्म्याच्या नाशाला अन्य कोणत्याहि गोष्टीपेक्षां अधिकच प्रवृत्त होतें, व बाह्यत. जरी तुमची उन्नति झाल्यासारखी दिसते तरी तुह्मी अतर्यामी खरोखर अवनतीप्रत जात असतां. देवाच्या द्वारी तुह्मांला यत्किंचितहि थारा न मिळून तुमचें जीवन ह्या ऐहिक जगाकरिताच केवळ आहे असें होतें. कारण, वर सांगितल्या-प्रमाणें, वाणीची प्रत्येक लबाडी ही आत्मव्रणाप्रमाणें असून तो त्यांच्या नाशास कारणीभूत होतो. आणि आत्मविनाश होतो ह्मणजे तरी काय ? त्याचा अर्थ हा, कीं, आपल्या ठायीं जो दिव्यांश असतो, जेणेंकरून आपणास ईश्वराशी समरसतेचा पवित्र सुखानुभव घेता येतो, तो इतका व्रणांकित व विद्रूप होतो, कीं, त्याला मग ईश्वराच्या मूर्तीचे भान राहत नाहीं. आणि अशा रीतीनें आपली व आपल्या आरोग्यदात्या व प्राणदात्या परमेश्वराची ताटातूट होते—किंबहुना ती आपली आपणच करून घेतो कारण, सत्य हें ईश्वराचा सत्वांश आहे, व एखाद्या गोष्टीत सत्यापासून पराङ्मुख होणें ह्मणजे ईश्वरापासून पराङ्मुख होण्यासारखें आहे; आणि ईश्वरापासून पराङ्मुख होणे ह्मणजे अगीं जे गुण खरोखर असावयास पाहिजेत, जे खरोखर बहुमोल आणि सद्गुण ह्मणून गणलेले आहेत, त्या सर्वांपासून आपण पराङ्मुख झाल्यासारखें होतें. साराश, असत्य बोलणें हे किती य कश्चित् आहे हे तुमच्या ध्यानांत येईल एखाद्या क्षुल्लक ऐहिक लाभासाठी, उदाहरणार्थ द्रव्यप्राप्तीच्या लालसेनें अथवा शिक्षा टाळण्याच्या हेतूने ह्मणा आपण जेव्हा ईश्वरापासून जाणूनबुजून पराङ्मुख होतों, तेव्हा अत्युत्कृष्ट गुण टाकून देऊन त्याच्या मोबदला केवढें निकृष्टतम दोषाचें खापर आपण पदरात घेत असतो! सत्याचा खात्रीलायक व भरभक्कम पाया ह्याच विचार आहे हें पूर्णपणें जाणून—व माझी तर अशी खरी व पक्की समजूत आहे—ह्या पायावरच सत्यतेच्या इमारतीची उभारणी करावी अशी मी इच्छा करीत आलों आहें. सत्य हें दिव्य आहे, ईश्वर हेच सत्य आहे. अतएव ज्या प्रमाणाने आपण सत्यापासून पराङ्मुख होतों त्याच प्रमाणाने आपण ईश्वरापासून पराङ्मुख होतों, व आपल्या अंतस्थ ज्ञानदीपाची प्रज्वलित ज्योत आपण होऊन कमी करीत असतो.

ह्मणून ईश्वराचीं लेंकरें ह्मणवून घेण्याचा ज्या अर्थी आपणांस उच्चतर हक्क प्राप्त झालेला आहे त्या अर्थी **'सत्यं वद'** हेंच आपलें उच्चतम

कर्तव्यकर्म असें आपण मानलें पाहिजे कारण, कडकडीत सत्यनिष्ठेनेंच आपणांस ईश्वराशीं सान्निध्य ठेवतां येतें ईश्वर हा सत्यपूर्ण असून तोच मूर्तिमंत सत्य आहे त्याच्याजवळ असत्याची छायासुद्धां राहू शकत नाहीं. सत्याचा दिव्य दृष्टीने विचार ह्मणून जें मीं ह्मटलें तें हेंच होय **'सत्यान्नास्ति परो धर्मः'** येवढा सत्याला आदर आपण कां द्यावा, याचेहि कारण वरील विचारसरणीतच आपणास सापडते सत्यावर ज्याची निष्ठा व प्रेम असतें त्याचें ईश्वरावर प्रेम असून तो ईश्वरी स्वरूपात व ईश्वर त्याच्या स्वरूपांत वावरत असतो. **'यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति'** अशी त्याची वृत्ति होते. असत्य भाषण करणाराला ईश्वरावर प्रेमच करता येत नाहीं.

मानवी व सामाजिक दृष्टीनींहि सत्याचा विचार होतो. ह्यात आपल्या शेजाऱ्यांचा सबंध येतो यच्चयावत् तत्वमीमासक व नीतिशास्त्रज्ञ असें प्रतिपादन करितात, कीं, सत्यावाचून जगाचें चालावयाचेच नाहीं काहीं झालें तरी सर्व सामाजिक व व्यावहारिक सबधात परस्पर सत्यपालनावाचून समाजाला एकत्र निगडित राहताच येणार नाहीं आणि ह्मणूनच प्रत्येक सुधारलेल्या देशात लोकाना आपलीं वचने पाळण्यास व आपल्या व्यवहारांत विश्वासूपणा दाखविण्यास भाग पाडण्यासाठीं सरकाराला कायदे करावे लागले. वैवाहिक नियम तरी ह्यासारखेच होत, व व्यापारातील करारासंबंधीं नियमहि ह्याच प्रकारचे आहेत उघडपणें दिलेलें वचन एखाद्याने जर जाणूनबुजून मोडलें तर त्याला उघडपणेंच शिक्षा होते

पण कित्येक असें विचारितात, कीं, काहीं विशिष्ट प्रसगीं आपण अपवादात्मक आचरण करून सद्धेतून जर सत्यापलाप केला, तर तेणेकरून समाजाचें कधी हित होईल काय? अशा प्रसगीं सद्धेतूमुळे लबाडीला सत्यस्वरूप जरी आलें नाहीं तरी चागले स्वरूप येणार नाहीं काय? या प्रश्नाना मला एकच उत्तर देता येते, आणि तें हे, कीं, असत्य हें चागले असें केव्हाहि होणार नाहीं! कारण, असत्य ही देवाची इच्छा असें कधीच होत नाहीं केव्हाहि व कोणत्याहि, सर्वकाळीं व सर्व परिस्थितीत सत्य बोलणें हा अत्युत्कृष्ट मार्ग आहे. परिणाम जरी अनिष्ट झाल्यासारखे दिसले तरी त्या बाबतींत आपणास खुशाल ईश्वरावर हवाला ठेवता येतो. तैत्तिरियोपनिषदांतील शिक्षावल्लीच्या एकादश अनुवाकात सागितल्याप्रमाणे, **'सत्यं वद धर्मं चर—सत्यान्न प्रमदितव्यं'** आपण नेहमीं सत्य बोलावें; सत्य, सगळें सत्य, व सत्यापरतें अन्य काहीं नाहीं,

ह्राच आदेश. हाच उपदेश ही माझी समजूत आहे व ह्या उपदेशानुसार वागण्यांत आपण ईश्वराचे सन्निध राहून स्वबाधवांचेंहि कल्याण आपणास करता येईल. ''सत्य हें ईश्वराच्या आनंदाचें कारण आहे सरळ रस्त्यावर कोणी वाट चुकला असें माझ्या आजपर्यंत पाहण्यांत नाहीं!'' या हफीज नामक एर्शिअन कवीच्या उद्गाराप्रमाणें, ह्या आपल्या असार ससारांतहि मान्यतेच्या शिखराप्रत जाऊन पोंहचण्यास सत्याचरण हाच खरा मार्ग होय.

ह्याच मार्गानें सत्प्रतिबंधातून मुक्त होऊन मनुष्यास स्वर्गसुखाचा अनुभव घ्यावयास सापडतो कारण, जगातील इतर सर्व वस्तूचा जरी विनाश झाला तरी सत्य हे अनतकालपर्यंत अविनाशीच राहील !

आदेश हा धर्म व शास्त्र यांचा,
हा आमुचा, वा ! उपदेश साचा;
हें सर्व वेदांतिल सार पाहें,
ही ईश्वराज्ञा सकलासि आहे.

म. ख. चिटणीस.

# आचारसत्यता.

"सत्य आहे म्हणूनच वायु वाहतो व सूर्य उगवतो सत्य हे अत्युत्कृष्ट आहे, त्यावरच प्रत्येक गोष्ट अवलबून असते अतएव सत्य हे अत्यत उन्नतकारी आहे असे म्हटलें आहे"

—तैत्तरीयारण्यक

अधिकारसपन्न न्यायाधीश लाच घेण्याच्या हेतूनें जर खोटा निकाल देऊ लागला तर आचरणांत लबाडी केल्याचा दोष त्याच्या पदरीं येतो. ही लबाडी अत्यंत नीच प्रकारची असते सरकारानें विश्वासु म्हणून नेमलेला प्रत्येक अधिकारी स्वार्थ साधण्यासाठीं, स्वत-ची तुंबडी भरण्यासाठीं, अथवा शेजाऱ्याचा गळा कापण्यासाठीं, श्रीमंतावर मर्जी दाखविण्यासाठी अथवा गरिबाना नागविण्यासाठीं जर आपल्या सत्तेचा दुरुपयोग करू लागला, वाणीनें जरी यत्किंचित्‌हि लबाडी करीत नसला व आपलें कर्तव्यकर्मच बजावित आहे असें वरपंगीं जरी दाखवू लागला तरी, तो लबाड व विश्वासघातकी ठरल्यावांचून राहतच नाहीं. ज्याला म्हणून तळ्याचें पाणी राखावयास नेमावे त्यानेंच त्यांत जाणूनबुजून विष कालवावें इतका तो विश्वासघातकी होतो न्यायदेवतेच्या नावाखालीं अन्यायाचाच तो प्रसार करीत असतो. ईश्वराचा सेवक म्हणून मिरवून जी गोष्ट ईश्वराला अत्यंत तिरस्करणीय वाटते तीच तो करीत असतो.

अधिकाऱ्याला ईश्वराचा सेवक म्हणून का म्हणावयाचे? याचे कारण असें, कीं, जगांतील प्रत्येक राज्य व प्रत्येक सत्ता ही ईश्वराधिष्ठित असते व ज्या लोकावर त्यांची योजना झालेली असते त्याच्याबद्दल ईश्वराजवळ ते जबाबदार असतात. आणि आपल्यावर सत्ता चालविण्यासाठी ज्याची योजना होते अशा राज्यकर्त्याच्या आज्ञेंत 'आपण का वागावें याचें कारण तरी तेंच होय. ती ईश्वरी योजना असते. राजा म्हणजे ईश्वराचा अंश असें जे मनूनें म्हटलें आहे त्याचा तरी अर्थ हाच. सामान्य जनतेपेक्षा राजाच्या ठायीं अधिक दिव्यतेज असे काहींतरी असते। त्याचा सांगण्याचा आशय हा आहे, कीं, राजसामर्थ्याचा आपण आदर केला पाहिजे. कारण तें ईश्वरदत्त असते. त्याच विचारसरणीने पाहता, राजाच्या हाताखालीं

असणारे सर्व अधिकारी हे जनतेमध्यें ईश्वराचें कार्य करण्यासाठींच नेमलेले असतात. ते कार्य म्हटले म्हणजे व्यवस्था, न्याय आणि शातता हेंच होय. आणि हें उदात्त कार्य करण्यासाठीं त्याची योजना झाली असता ते स्वतःच जर अन्यायाचें माप पदरीं घेऊं लागले, तर ईश्वराच्या अत्युच्च व अत्यंत पवित्र अशा कार्यांत लबाडी केल्याचा दोष त्यांचे माथीं येणार नाहीं काय? अतएव, ईश्वराच्या इच्छेप्रमाणें न वागणारीं राजापासून ते यच्चयावत् अधिकारी वर्गापर्यंत श्रेष्ठ दर्जाची अधिकारनियुक्त माणसें म्हणजे ईश्वराशीं व आपल्या बांधवाशीं विश्वासघातकीपणानें वागणारींच होत ते आपल्या स्वतःच्या कुलीनतेचाहि विश्वासघात करीत असतात. पण ईश्वराला हें त्याचें पापाचरण फार दिवस सहन होत नाहीं. आणि म्हणूनच प्राचीन मनूनेंहि असें म्हटलें आहे, कीं, 'राजाच्या अंगचा पहिला गुण म्हटला म्हणजे त्यानें सदैव सत्यव्रत राखलें पाहिजे.' मनु असेंहि म्हणतो, कीं, 'जो राजा आपल्या कर्तव्याला जागत नाहीं त्याचा न्यायदेवता निर्वंश केल्यावाचून राहतच नाहीं' ज्याप्रमाणें राजा हा प्रामाणिक असला पाहिजे तद्वत् त्याचे मंत्रिमंडळ व त्याच्या हाताखालचे सर्व सत्ताधारी पुरुष हेहि प्रामाणिक असले पाहिजेत. कारण, ते सर्व ईश्वराच्या हाताखालचे अधिकारी असतात, व ईश्वर त्यांनां त्याच्या कृत्याबद्दल जबाबदार धरल्यावांचून राहत नाहीं. म्हणून, माझ्या मित्रांनों! सार्वजनिक कृत्यात केलेली लबाडी, अप्रामाणिकपणा हें दुहेरी काळिमा आणणारें पाप आहे हें तुमच्या ध्यानांत येईलच. दुहेरी असें, कीं, एकतर प्रत्येक लबाडी हें पाप आहेच व दुसरें अशा विशिष्ट प्रकारच्या पापाचरणाने ईश्वराच्या मंध्यासारख्या उच्चस्थानापासून मनुष्याची अवनति होऊन विश्वासघातकी व शत्रु याच्या लाजिरवाण्यापदाप्रत येऊन तो पोहोंचतो. लबाडी ही कोणाच्याहि ठायीं वाईटच; पण ईश्वराच्या सैन्यांतील उच्चदर्जाचा सेनापति शत्रूला जाऊन मिळाला असतां आपण त्याला काय म्हणूं? अर्थात्, आपण त्याला अत्यंत नीच, विश्वासघातकी असें म्हणूं राजद्रोही म्हणून त्याला देहांत शिक्षाच उचित असें आपण ठरवूं. ईश्वरदत्त कर्तव्याला खरेपणानें जागून जो आपलें आचरण ठेवीत नाहीं असा प्रत्यंक राजा व श्रेष्ठ दर्जाचा अधिकारी हे या वरील कोटींतलेच विश्वासघातकी ठरतात.

अधिकारपद प्राप्त झालें असतां सत्याचरणाच्या ह्या सार्वजनिक कर्तव्याविषयीं चार शब्द तुम्हांला सांगावे अशी माझी इच्छा आहे. कारण,

कदाचित् लोक केव्हांकेव्हा असें समजतात, कीं, एतद्देशीय संस्थानांतील उच्चप्रतीच्या जागा मिळणें म्हणजे द्रव्यप्राप्तीची व स्वतःच्या कुटुंबात ऐहिक संपत्तीची भर घालण्याची चागली सधि सांपडण्यासारखें होय. माझ्या मित्रानों! ज्याच्या मनात असा विचार येत असतो तो ईश्वराच्या विचारापासून कितीतरी दूर असतो व मी आपल्या पहिल्या व्याख्यानात सागितल्याप्रमाणें, ईश्वराच्या पवित्र सान्निध्याची प्रतीति आपण जर नित्य घेत राहिलो व ह्या जगात आपलें कर्तव्यकर्म कोणतें आहे याचा विचार करीत राहिलो तर स्वार्थी अथवा ऐहिक प्रगतीच्या इच्छेसारखे अनुदार विचार आपल्या मनाला कधींहि शिवावयाचे नाहींत ! उलट, ईश्वराच्या चागुलपणाविषयीं अत्यंत भावनेने व त्याच्याच इच्छेनें वागण्याच्या कृतज्ञतापूर्ण उत्साहानें, ईश्वराच्या सर्ववत्सलतेचा, दयाघनत्वाचा व न्यायाचा मनोहर विचार जिकडेतिकडे प्रसृत करण्याचाच आपण प्रयत्न करीत राहूं. जर यच्चयावत् अधिकारीवर्ग त्याच विचाराचा झाला, अखिल राजे व राज्यकर्ते आपले कर्तव्यकर्म अशा तऱ्हेने मानूं लागले, तर पृथ्वीवरील 'ईश्वराचे अश' म्हणजे राजे ह्या जगालाच स्वर्गातील साम्राज्याची शोभा आणतील

हे विचार आपणास निरर्थक वाटता कामा नयेत. कारण, तुमच्यापैकींच काहींजणाचें भाग्य राज्यपद भोगण्याचें असेल तर काहींना श्रेष्ठ दर्जाच्या अधिकाराच्या जागा मिळण्याचा संभव असेल. प्रत्येकाचें भाग्य कांहीं का असेना, आपणा सर्वांनां सत्याचरण हें लागलेंच आहे. तीं कर्तव्यकर्मे पुढें करावयाचीं आहेत असेंच केवळ नसून आज येथें विश्वविद्यालयांतहि आचरावयाचीं आहेत. आपल्या हातून जीं जीं कर्मे घडतील त्यात आपण परस्पराशीं सत्यानें वागून विशेषतः ईश्वराशीं तरी आपण खोटे आचरण करता कामा नये. कारण, ईश्वराशीं आपण सत्यतेनें वागूं लागलों तर परस्पर आपलें आचरण सत्यानें झालेंच पाहिजे. पण सत्याचरणावांचून आपणांस खरेपणाने कर्तव्यास जागतांच यावयाचें नाहीं. कारण, आपण जर असत्याचरण केलें तर आपल्या हातून घडलेल्या लबाडीवर पाघरूण ओढण्याचा प्रयत्न आपणांस खात्रीनें करावा लागेल. अर्थात्, त्यात आपण खोटे ठरूं. ईश्वराचें साहाय्य असल्यावाचून सत्याचरण करताच येत नाहीं. आणि म्हणून मीं मागें सागितलेलें सत्य फिरून सागण्याची पाळी येते. त्याचा उच्चार कितीहि वेळां केला तरी तो थोडाच होणार. तें हें, कीं, ईश्वरसान्निध्याच्या भावनेवाचून आपणास खरेपणाचें आचरण करतांच येणार नाहीं.

जो शिष्य गुरूसमक्ष आपले कर्तव्यकर्म बजावण्याचा बाह्यात्कारें डौल मिरवित असतो व गुरूची पाठ वळते न वळते तोंच आपल्या इच्छेनुसार ज्यांत गुरूच्या मनाला वाईट वाटेल असें आचरण करतो, विश्वविद्यालयात एक व घरीं दुसरी अशी ज्याची वर्तणूक असते, गुरूशीं आदरयुक्त पण स्नेह्यांशीं उद्धटपणानें व कठोरतेनें जो वागतो, त्या मुलाचें जीवनचरित म्हणजे मूर्तिमंत असत्याचरण होय! ह्याचें आचरण स्वदेशबांधवांशीं व देवाशी खोटेपणाचें असतें. अर्थात्, तुमची गुरूशी जी वागणुक तीच तुमच्या बालस्नेह्याशीं असणार नाहीं. माझ्या म्हणण्याचा आशय तसा किंवा त्याच्यासारखा मुळींच नाहीं. तुम्ही आपल्या बरोबरीच्या स्नेह्यांशीं स्वभावतःच मोकळेपणानें व घसवटीनें वागाल, पण तेच तुम्हाला आपल्या वडील वरिष्ठासमक्ष तसें वागतां यावयाचें नाहीं. आणि वर्तुणूकींतला हा विशेष म्हणजे अगदी स्वाभाविक, यथार्थ व खरेपणाचा होईल. पण एखादें कृत्य वाईट आहे हें जाणून व जें वाईट असल्यामुळें आपल्या गुरूसमोर करण्याचे भय तुम्हाला वाटलें असतें ते जर तुम्हीं आपल्या स्नेह्याच्या समक्ष केलें, उघडपणें जी गोष्ट करावयास लाज वाटते ती जर तुम्हीं अधारात केली व फिरून न केल्यासारखें लोकांत मिरविलें, तर मात्र मी ह्याला असत्याचरण म्हणेन. घोड्यावर बसून बाहेर फिरावयास जातों म्हणून मला सागून तुम्ही जर बाजारात गेलात, अथवा जेथें जावयाचे नाहीं अशी माझी ताकीद असल्याचे तुम्हाला ठाऊक आहे अशा ठिकाणीं गेलात, तर मग मात्र तुम्ही माझा विश्वासघात करून माझ्याशीं असत्याचरणाने वागलात असें मी म्हणेन.

माझ्या मित्रानों! लोकाच्या डोळ्यात धूळ घालणें हें काम सोपें आहे; पण ईश्वराशीं मात्र आपणास कधींहि लबाडी करता येणार नाहीं! वाणीनें अथवा कृतीनें लबाडी करून काहीं आपणास खरोखर फायदा होईल असें तुम्हास वाटते काय? असें जर आपणांस वाटत असेल तर तें खोटे आहे. असत्याचरणात आपण आपल्या स्वत.शीच लबाडी करीत असतों. कदाचित् कांहीं थोडा ऐहिक फायदा होईल. उदाहरणार्थ लाच घेणाराला थोडासा हरामाचा पैसा मिळतो अथवा काहीं सांसारिक लाभ घडतो ख़रा, पण तेणेंकरून त्याचें त्याहून सहस्रपटीने बहुमोल असें नुकसान होत असतें; नित्य बहुमोल अशी जी एकच वस्तु ती तो गमावून बसतो, ईश्वरी प्रेमाला तो मुकतो, त्याचें आत्मसौख्य नाहीसें होतें.

# विचारसत्यता.

"सत्य आहे ह्मणूनच वायु वाहतो व सूर्य उगवतो सत्य हे अत्युत्कृष्ट आहे. त्यावरच प्रत्येक गोष्ट अवलंबून असते. अतएव सत्य हे अत्यंत उन्नतकारी आहे असे ह्मटले आहे"

—तैत्तरीयारण्यक

मागल्या आपल्या दोन व्याख्यानाच्या संदर्भानेच आज आपल्या विचारातील सत्यतेविषयी आपण विचार करू. त्या दोन व्याख्यानाशीं याचा सबंध अर्थात् स्वाभाविकच आहे आपले विचार जर पूर्णपणें न्याय्य व खरे असतील तर आपल्या उच्चारात व आचारातहि आपणास खरेपणानें राहता येईल उच्चार व आचार हे विचाराचे स्वाभाविक परिणाम आहेत; विचार हा त्याचा जनक आहे ज्याचे विचार अगदीं पूर्णपणें शुद्ध असतात, त्याचे ससारातील आचरण अगदी शुद्ध असते. जगातील इतर कोणत्याहि माणसापेक्षा त्याच्या अगी दिव्यतेज अधिक असतें ईश्वरासारखा तो पूर्ण दिसतो उच्चार व आचार ही विचाराचीं स्वाभाविक कार्यें असून त्याच्यातील ह्या परस्पर सबंधामुळेच, बुद्धिपुरस्सर कार्य केल्यावाचून, तसेच मनानें, इच्छेनें, वाणीनें अथवा स्वहस्ताने ते कार्य घडल्यावाचून कायद्याच्या दृष्टीनें कोणी दोषी ठरत नाहीं. बुद्धिभ्रंश झालेल्या माणसाला निंदाव्यजक अथवा नास्तिक लेखाबद्दल दोष देताच येत नाहीं. बेशुद्ध भ्रातचित्तावस्थेंत अथवा अजाणपणामुळें चुकीनें जर एखाद्यानें दुसऱ्याचा प्राण घेतला तर तो खुनाबद्दल अपराधी ठरत नाहीं; अथवा नीतिदृष्ट्या कोणत्याहि तऱ्हेनें त्याला गुन्हेगार ठरविता येत नाहीं. साराश काय, कीं, सर्व खरेपणा हा मनातून व अंत.करणातून उदय पावला पाहिजे. ज्याला आपला उच्चार व आचार खरा ठेवावा अशी इच्छा असेल त्यानें अगोदर आपल्या विचारात खरेपणा हा ठेविलाच पाहिजे.

असे काहीं खोटे विचार असतात, कीं, त्याचीं प्रत्यक्ष कार्यें वाणीच्या अथवा कृतीच्या रूपानें बाहेर उमटत नाहीत, पण ते मिथ्या प्रतिमा मनात उत्पन्न

करून व अनुदार संशयजन्य कल्पनातरंग मनात उसळून, मनाला वेदना मात्र देत असतात आपल्या व आपल्या नातलगाच्या विचारातच अतिशय दंग असल्यामुळे असले विचार वारंवार मनात येतात. ते स्वार्थी, ऐहिक व ईश्वरापासून पराङ्मुख करणारे आहेत

वरील माझ्या म्हणण्याचा भावार्थ मी अधिक स्पष्ट करून सागतो आपल्या-विषयीं आपल्या शेजाऱ्याचे मन चागले नाहीं, त्याचे हेतु पापी आहेत, असा आरोप तुम्हीं त्याच्यावर कधी केला नाही काय ? व मागाहून तुमच्या नजरेस येते, कीं, अरेरे ! ह्या दुष्ट विचाराना आपल्या कल्पनेच्या बाहेर मुळी खरोखर अस्तित्वच नव्हते ! स्वार्थमूलक सशयामुळे आपल्या शेजाऱ्याची परीक्षा करण्यात तुमच्या हातून अन्यायाने चूक झाली नाहीं काय ? उदाहरणार्थ अशी कल्पना करा, की, तुमच्या वर्गातील एखाद्या मुलाने तुह्माला वाटले होते त्यापेक्षा अधिक मार्क (गुण) मिळविले, व जेथे आपला नंबर त्याच्यावर लागेल अशी तुम्हाला खात्री होती तेथे त्यानेच तुमच्यावर कदाचित् ताण केली. अशा वेळीं त्याने अप्रामाणिकपणाने यश सपादन केले, असा त्याच्या माथी आरोप लादून त्याच्या श्रेयाला मात्सर्याने कमीपणा आणण्याचा तुम्ही प्रयत्न केला आहे काय ? मला असे वाटते, की, परोत्कर्षासहिष्णुतेचे विचार, दुसऱ्याविषयी मत्सरी विचार, आपल्या अत करणात प्रच्छन्न रूपाने वास करण्यास आपणच त्याना वारवार जागा देत असतो हे विचार जितके अपकारक तितकेच ते असत्य असल्याचे मागाहून आपल्या ध्यानात येत असतें. अशा सर्व प्रसगी आपल्या शेजाऱ्याविषयी अत्युत्कृष्ट विचार मनात आणणे व त्याच्या सर्व यशाबद्दल त्याला पूर्ण श्रेय देणे हे अधिक श्रेयस्कर होणार नाहीं काय ? आपल्या मनाच्या शाततेला तसेंच सत्यतेला ते अधिक हितावह होणार नाहीं काय ? इतराच्या गुणदोषाचा निर्णय कठोरतेने कधीहि न करिता त्याच्याविषयी चागला विचार करण्याचा आपण नियम करावा आपले अत्यंत दयाळुपणाचे विचार हेच अत्यंत खरेपणाचे विचार असतात, असा अनेकवार आपणास अनुभव आल्यावाचून राहणार नाहीं. हा खरोखर आपल्या कर्तव्यकर्माचाच–प्रेमाच्या कर्तव्यतेचा–एक भाग आहे. आणि प्रेम हे दोषांवर पाघरूण घालते व गुणावर विश्वास ठेवते, सुखाची

आशा वृद्धिंगत करते व दु ख सहन करते, असे जें प्रेमाविषयीं ह्मटले आहे तें किती यथार्थ आहे !

हीच गोष्ट इतर सशयमूलक विचारानाहि लागू आहे. तुम्हाला कदाचित् असे वाटते, कीं, आपले गुरु आपल्याशी सरलतेनें वागले नाहींत; आपल्याकडून व्हावी तितकी मेहनत झाली नाहीं हें आपणास माहीत असल्यामुळें गुरूने आपल्याविषयी मनात काही तरी ठेवले असले पाहिजे, आणि मनात असा विचार एकदा आला म्हणजे तो वाढत वाढत परिणत होतो व पुढे तो मोठी मानसिक चिंता उत्पन्न करीत असतो पण त्यात सत्य म्हणून मुळींच नसतें कदाचित् गुरूचे वर्तन अगदी न्याय्य असेल. तुमच्याविषयीं यत्किंचित्हि विचार न करता आपल्या कर्तव्यतेचाच त्याने विचार केला असेल. वर्गातील इतर मुलाप्रमाणे तुमच्याशीहि त्याचे वर्तन अगदी सरल असेल, व आपल्या स्वत च्या उत्कर्षासाठी तुमच्या मनात असलेल्या अनुचित व मत्सरी वासनेमुळेच खोट्या सशयानी तुम्हाला घेरले असेल. कदाचित् असेंहि असण्याचा सभव आहे, कीं, तुमच्या ठायी असलेल्या न्यूनतेच्या जाणीवेमुळेच अशत. तसे सशय तुमच्या मनात असतील. कारण, सशय हा कर्तव्याच्या हयगयीचा स्वाभाविक परिणाम आहे.

'आपला तो बाब्या व दुसऱ्याचा तो कार्टा' याप्रमाणे स्वत विषयीं तेवढे चागले व शेजाऱ्याविषयी वाईट विचार आपल्या सर्वांच्या मनात अगदीं अपरंपार भरलेले आहेत आपल्या स्वत.विषयी यत्किंचित्हि विचार न करिता शेजाऱ्याविषयीच चागला विचार करणे हे अत्यंत श्रेयस्कर आहे. स्वतःबद्दल ईश्वराच्या कृपेवर हवाला ठेवण्याचा प्रयत्न आपण करावा, ह्मणजे ईश्वर आपली काळजी घेतल्यावाचून राहणार नाहीं. ईश्वराविषयीच चिंतन करीत राहिल्यास मग आपल्या स्वत चा विचार मनात आणण्याची आपणास गरज उरत नाहीं.

ह्यावरून आणखी एक विचार सुचतो तो असा. जे सामान्य जनप्रवाद आपल्या ठायींच्या ह्या खोट्या सशयामुळेच उद्भवत असतात, त्यानां आपण गप्पा असे म्हणतो व त्या नेहमी विघातक अशा असतात. मी काय म्हणतों त्याचा अर्थ तुम्हा सर्वाना ठाऊक आहे. येथे राजकोटमध्ये

१ येथे भर्तृहरीनीं केलेल्या सन्मित्रलक्षणाची आठवण झाल्यावाचून राहत नाहीं 'पापान्निवारयति योजयते हिताय । गुह्य च गूहयति गुणान् प्रकटीकरोति ॥'—नीतिशतक.

फार लांब कशाला आपल्या या विद्यालयातच, आपल्या परिचयाच्या बहुतेक माणसांबद्दल सामान्यतः विप्रिय अशा गप्पा आपल्या कानी येतात. एखादा आपल्या परिचयाचा मनुष्य जर एकाएकीं मेला तर तो विषप्रयोगाने मेला असावा, अशा तऱ्हेच्या गप्पा आपल्या कानावर किती वारंवार येत असतात. अथवा एखादा मनुष्य श्रीमंत झालेला दिसला, कीं, त्याने ही एवढी संपत्ति अन्यायाने मिळविलेली आहे, अशा गोष्टी आपल्या कानावर येतात. अथवा एखाद्या घराला आग लागून ते जळून खाक झाले तर घराच्या मालकाच्या वैऱ्याने (बहुधा कोणाचे तरी नांव सांगण्यात येते,) हा द्रोहबुद्धीने डाव साधला, असें सागतात. तरीपण अशा प्रसगीं ज्या गोष्टी घडून आल्या आहेत त्या जगाच्या रहाटी-प्रमाणेंच घडून येण्याचा फार करून सभव असतो. मरण हें स्वाभाविक आलेलें असेल; संपत्ति ही प्रामाणिकपणानेच मिळविलेली असेल; घराला आगहि आकस्मिक लागली असेल. अनुभव आपली अशी खात्री करीत असतो, कीं, हे जनप्रवाद साधारणपणें खोटे असतात, व ते खोट्या व अनुदार विचारामुळेंच, मनाच्या अस्थिर व सशयी अवस्थेमुळेंच उद्भवत असतात. आणि मला वाटतें, हा प्रकार आपल्या काठेवाडात तर सामान्येकरून दृष्टीस पडतो. तेव्हा अशा प्रकारचे विचार आपल्या मनात कधीं आलेले आहेत काय? अशा प्रकारचे निर्दय जनप्रवाद आपण कधीं ऐकिले आहेत काय? त्याचा आपण कर्णोपकर्णी प्रसार केलेला आहे काय? जर असें आपल्या हातून घडलें असेल, तर आपण आपल्या विचारात खोटेपणाने वागलों, व विचाराबरोबर आपल्या उच्चारात व आचारातहि आपण असत्याचरण केलें, म्हणून समजावे.

म्हणून आपल्या मनात पापविचार कधींहि येऊं देऊं नयेत. आपल्या कर्तव्यतेचा व त्यातहि आज आपलें कर्तव्य कोणतें याचाच काय तो आपण विचार करीत राहावें. अशा रीतीनें आजचाच जर आपण विचार करूं लागलों, तर जेणेकरून आपलीं मनें सत्यपराङ्मुख व ईश्वरपराङ्मुख होऊन ढळतात अशा कल्पनासृष्टींतील मनोराज्याचा, अस्थिरता उत्पन्न करणाऱ्या पूर्वास्वादाचा, आपल्या मनाला विटाळ होणार नाहीं. सदुपदेश ऐकण्यासाठींच काय ते आपण आपले कान उघडे ठेवावे व जगाच्या वटवटीकडे लक्ष्य जाऊं नये म्हणून ते बंद ठेवावेत. आणि ईश्वराचा आदेश तरी आपणांस

काय सागत असतो? आपल्या सदसद्विवेकबुद्धीच्या द्वारा तो तुम्हाला, मला व जगातील प्रत्येक माणसाला हेंच सागत आहे, कीं, "मजवर व आपल्या शेजाऱ्यावर प्रेम करा, म्हणजे या प्रक्षुब्ध भवसागरावर तुमची जीवननौका सुखाने व शातपणे आपला मार्ग आक्रमीत राहील" खरा 'संसारत्याग' हाच होय जगात राहून ऐहिक वस्तूचा लोभ ठेवावयाचा नाही ज्याच्या मनात दुसऱ्या कोणाविषयी पापविचार येत नाहीं, त्याच्या अगावर कोणत्याहि वाईट गोष्टीचा शितोडा न उडता, त्याचें अत करण शुद्ध राहते व जीवनदशेतील यच्चयावत् रूपातरात व दैवगतींत सर्व प्रसगी त्याचे विचार खरे आणि पोक्त असेच राहतात तो सद्विचारानेच वागेल

"एकीकडे, चिता आणि पाप ह्याच्या कानठाळ्या बसणाऱ्या कर्कश अशा लाटा ऐकूं येतात, तर त्याबरोबरच दुसरीकडे स्वरसंवादाचे सुश्राव्य आलाप कानी पडतात, व परस्पर मिलाफ होऊन मधुरस्वर निघत आहे असे वाटते. वावटळीनें भरलेल्या गल्लीकुचीतून व भाडणाऱ्या बजबजपुरीतून जात असतां ज्याच्या अत·करणातून मधुरालाप निघत असतात तेच आपले रोजचे कर्तव्य खरें बजावीत असतात कारण, त्याच्या अतर्यामी पवित्र ईशनामाचा गजर होत असतो."

*Keble's Christian year, "St Mathew"*

**पापाची वासना नको दावूं डोळां, त्याहूनी आंधळा बराच मी. १.**
**निंदेचें श्रवण नको माझे कानीं, बधिर करोनी ठेवीं देवा ! २.**
**अपवित्र वाणी नको माझ्या मुखा, त्याजहुनी मुका बराच मी ३.**

—तुकाराम.

# आपलें विश्वविद्यालय.

* "I believe the realisation of this idea" (that we are all members of one common body) "to be the glory of a Public School, and I believe the redeeming Point in public Schools as they are, with all their imperfections, defects, and faults, to be this, that they do to a certain extent inspire those who belong to them with a feeling of membership in a body"

*Dr Vaughans "memoirs of Harrow Sundays"*

मनुष्याना एकलकोंडे राहणे हितावह नसते कारण, समाजाकरिताच मनुष्यप्राण्याचा जन्म आहे आणि आपल्या आयुष्यात आपणास जे खरें सुख मिळते ते सामाजिक सुखोपभोगामुळे, आपण ज्याच्यावर प्रीति करतो अशाच्या स्नेहामुळे, जे आपणास सन्माननीय व आदरणीय वाटतात अशाच्या सहवासामुळे मिळत असते हें सुख इतके सामान्य असते, कीं, ते आपल्या लक्ष्यात क्वचितच येते, आणि त्यावाचून आपली प्रत्यहींची जीवनदशा किती भयाण झाली असती याची ओळख आपणास क्वचितच होते कदाचित् ज्यानी आपल्या आयुष्यातील काहीं दिवस एकातवासात घालविले आहेत अशानाच कायती समाजसौख्याची खरी कल्पना करता येईल

मानवी समाज अनेक प्रकारचे आहेत. समाज या शब्दाचा अर्थ मी असा घेतो, कीं, एकाच राहणीनें एकत्र राहणाऱ्या लोकाचा जमाव. कुटुब हा एक समाज आहे ह्या गृहस्थाश्रमात कुटुंबातील सर्व माणसे एकत्र वास करीत असतात, व गृहस्थाश्रम हा किती रमणीय व आनंदप्रद असतो हें आपणा सर्वांस ठाऊक आहेच. नंतर छात्रसमाज, विद्यालयसमाज, सैन्यसमाज, साहित्यसमाज, शास्त्रसंशोधकसमाज, राजसेवकसमाज,

---

*आपण सर्व एका सामान्यसस्थेचे सभासद आहोत ह्या कल्पनेचें सत्याकरण एखाद्या सार्वजनिक शिक्षणसस्थेची कीर्ति होण्यात आहे अशी माझी समजूत आहे, त्या सस्था जरी सार्वजनिक असल्या व न्यूनता, व्यगे व दोष हे त्याच्या ठायीं कितीहि असले, तरी त्याचा उपकारक उद्देश हा असतो, कीं, त्याच्याशीं ज्याचा ज्याचा म्हणून सबध येतो त्याच्या मनात सस्थेचे आपण एक सभासद ही भावना काहीं अशाने त्या प्रेरित करीत असतात

ग्रामसमाज अथवा नागरिकाचा समाज, असे अनेक समाज आहेत. ह्या प्रत्येक भिन्नभिन्न समाजात परस्पर सहाय्यार्थ व सुखार्थ मानवीप्राण्याचे एकत्र साहचर्य असते मी म्हणतों ह्या प्रत्येक समाजामुळे कमी अधिक प्रमाणाने जें सुख आपणास मिळत असते ते मानवी वर्गाच्या यच्चयावत निसर्गसिद्ध हक्कात अप्रतिम असे असते. ते नसेल तर जिणे अगदी व्यर्थ होते.

आता, हक्कांना अनुरूप अशी कर्तव्यकर्मे ही लागलेलीच आहेत म्हणजे काय ? ह्याचा अर्थ येथे असा, की, आपापल्या बांधवांच्या कल्याणासाठीं अस्तित्वात असणाऱ्या प्रत्येक समाजात, एकाने दुसऱ्याच्या कल्याणासाठी तत्पर असले पाहिजे व स्वत करिता जगावयाचे नसून आपल्या समाजासाठी आपणास जगावयाचे आहे या भावनेने त्याच्या हातून आचरण घडले पाहिजे. आपले जीवित इतके परावलंबित असते, कीं, अशा तऱ्हेने आचरण करीत असता आपण आपल्या स्वत च्या सुखासाठी राहत आहोत हे त्याच्या निदर्शनास आल्यावाचून राहतच नाही

ज्याच्याशी प्रस्तुत आपला सबध आहे अशा आपल्या ह्या विद्यालयसमाजाच्या व ह्या सस्थेतील आपल्या एकत्र सहवासामुळे होणाऱ्या हिताचाच आज आपण विशेषत विचार करूं अशा समाजात आपलीं परस्पर विशिष्ट कर्तव्ये कोणती, त्याचाहि आपण येथे उल्लेख करूं आणि मला अशी आशा आहे. की, हे विचार तुम्हाला या नूतन साहामाहीच्या प्रारभीं हितावहच होतील; गतकाली आपल्या हातून घडलेल्या प्रमादाची पुनरावृत्ति होऊ नये एतदर्थ आपणास मिळणाऱ्या सधीचा उपयोग अधिक चागल्या कामाकडे करण्यासाठी, आपले ज्याच्यावर एवढे प्रेम आहे त्या विद्यालयाला ते कसे असावे याचा कित्ता जगाला दाखविणारें नमुनेदार वळण देण्यासाठी, आणि आपणा स्वतःला व आपल्या सहाध्यायाना यच्चयावत् चागल्या गोष्टीचा आस्वाद येथेच आपणास घेता येईल अशा तऱ्हेचे स्वरूप त्याला येण्यासाठीं, हे विचार तुम्हाला उपयोगी पडतील.

प्रथमत· अशा तऱ्हेच्या विश्वविद्यालयात सर्वांनी एकत्र राहण्यापासून कोणते फायदे आहेत ? माझ्या मित्रानों ! हे फायदे अर्थात् पुष्कळ आहेत व ते सर्वस्वीं आपल्याच स्वाधीन आहेत. आपण ज्या तऱ्हेने मिळवूं त्या तऱ्हेने ते आपणास मिळणारे आहेत आपण सर्वजण जर सत्याचरणाने वागूं लागलो,

व प्रत्येकानें आपले शेजाऱ्यासंबवीं व ईश्वरासंबवी कर्तव्यकर्म केले तर आपले हेंच विद्यालय जगातील इतर शिक्षणसस्थामध्ये अप्रतिम व अत्यंत आनदप्रद असें होईल, अशी माझी खरोखर समजूत आहे ह्या म्हणण्यात अतिशयोक्तीचा भाग आहे असे नाही कारण, येथे आपणास कसकसे प्रसग येतात, जीविता-वस्था कोणत्या, येथील आपल्या आयुष्यक्रमातील अधिकार कोणते आहेत, याचा विचार तर करा. ज्या वयात चिंता आणि काळजी याचा मनाला कसा तो सपर्क नसतो, ज्या वयात तारुण्यभराचा आनंदमय रस सर्व शरीरात रसरसून खेळत असतो, ज्या वेळीं आरोग्य हीच आनंदाची कल्पना, हाच सुखाचा खरा अनुभव असे वाटत असते, व प्रत्येक कार्यात व व्यवसायात आनंद वाटत असतो अशा वयात तुम्ही येथे आला आहात. विशेषेकरून तुमच्यापैकीं काहीजण तर तारुण्याच्या अगदी ऐन भरात असल्यामुळे तुम्हाला ब्रौनिंग कवीच्या पुढील उक्तीची यथार्थ कल्पना करता येईल

"तारुण्याच्या ऐन भरात अगात जो जोम रसरसत असतो त्याचे वर्णन काय करावे! उत्साहभंग कसा तो ठाऊक नसतो. अगातील सर्व स्नायूंतून रक्त इतके आवेशाने उसळत असते, कीं, कोणत्याहि अवयवांत शिथिलता म्हणून मुळीं देखील दृष्टीस पडत नाहीं. तारुण्यातील हर्षनिर्भराचे वर्णन करावें तेवढे थोडे! या खडकावरून त्या खडकावर उड्या मारणे म्हणजे सहजलीलेनें पाऊले टाकणे, असे वाटत असते. तसेच मोठमोठाल्या वृक्षाच्या फाद्या नुसत्या ओळखंबण्यासरसे कडकड मोडणे, खोल जलाशयात आनदाने वाटेल तशा उड्या मारणे, हिंस्र श्वापदाची शिकार करणे, ह्या गोष्टी म्हणजे त्या वयात काहींच वाटत नसतात. बरे, निवात वेळीहि चर्या अशी दिसत असते, कीं, जणुं काय निदाघकालाच्या प्रखर तापामुळे वनराज केसरी आपल्या गव्हरात निद्रिस्त आहे. साराश, तारुण्यात मनुष्याला जीवित हें किती रमणीय वाटत असते! नुसत्या जगण्यातच किती आनंद वाटत असतो! एक तारुण्य असल्यावर—आरोग्यपूर्ण शारीरसौष्ठवयुक्त तारुण्य असल्यावर—मग बाकीचीं मन आदिकरून यच्चयावत् इंद्रिये सदैव आनदाने कार्यव्यापृत कां ठेवता येणार नाहींत?"

संसारकाळजीचा लवमात्रहि गंध नसणे व शारीरिक उत्साहाचा पूर्ण उपभोग, ह्याच गोष्टी तुमच्या आयुष्याच्या प्रस्तुत वयाला अत्यंत अप्रतिम जरी नसल्या तरी, अत्यंत ओजस्विता आणण्यास कारणीभूत होत असतात. माझ्या मित्रानो! ह्या मोठ्या धन्यत्वाबद्दल तुम्ही ईश्वराचे खरोखर आभार मानावे व त्या ईश्वराच्या अप्रतिम देणग्या आहेत असे मानून त्यांचे चीज करावे. आणि यौवनावस्थेच्या ऐन बहारीच्या समयी अंगात संचार करणाऱ्या उत्कंठेच्या जोमाच्या जाणिवेने जेव्हा एका प्रकारचा सामर्थ्यमद अंगात येऊ लागतो तेव्हा तुम्हीं विशेषेकरून एवढी गोष्ट विसरता कामा नये, कीं, हा चमत्कारिक चित्तोल्लास शरीराच्या द्वारा प्रकट होत असून तो त्याच्याच द्वारा विलयास जाण्याचा संभव असतो व शारीरिक आरोग्य व सामर्थ्य ह्या ईश्वराच्या अप्रतिम देणग्यापैकीं देणग्या असून त्या मनुष्याच्या अविचाराने अथवा पापाचरणाने विलयास जाणाऱ्या असतात. माझ्या मित्रानो! तुम्हीं आपल्या यौवनावस्थेतील आरोग्याची विशेष खबरदारी घ्या. आपल्या शरीराची विशेष काळजी वाहा एवढे पक्के लक्ष्यात ठेवा, कीं, शरीरें हीं ईश्वराने आपल्या पवित्र सेवेसाठीच दिलेल्या पवित्र वस्तु आहेत. आणि ज्या स्वार्थी व पापी भोगतृष्णामुळे केवळ जड देहालाच नव्हे तर मनालाहि रोगग्रस्तता व भ्रष्टता प्राप्त होते त्याच्यापासून ह्या पवित्र शरीराचें तुम्हीं मोठ्या साभिमान उत्कंठेने संरक्षण करा, एवढे माझें तुम्हाला कळकळीचें सांगणे आहे

सारांश, माझ्या मित्रानों! ज्याच्याशीं तुम्हाला वाटेल त्या विषयावर अगदीं मनमोकळेपणाने व अत्यंत अनुकंपायुक्त संभाषण करता येते अशा तुमच्या समवयस्क समाजात तुम्हाला येथे एकत्र राहण्याचा योग आला आहे ही केवढी आनंदाची गोष्ट आहे! ज्याचे विचार व ज्याच्या भावना ह्या अगदी ततोतंत तुमच्या विचाराशीं व भावनाशीं सुसंगत आहेत, आदर्शात चेहऱ्याचे प्रतिबिंब जसें दृष्टीस पडतें तद्वत् ज्या विचाररूपी आदर्शात तुमचे विचार प्रतिबिंबित झालेले दृष्टीस पडतात, अशाच्या बरोबर प्रत्येक आचारांत व विचारात वाटेकरी होऊन तुम्हाला आनंद मानता येईल. मला वाटतें, आपल्या ह्या विद्यालयासारख्या छात्रसमाजात, तारुण्यदशेतील सतेज व शुद्ध अंतःकरणाच्या अन्योन्य निर्व्याज संगमापासून उद्भवणारे स्नेहभाव हे यच्चयावत् स्नेहभावांमध्यें अत्यंत मनोहर व रमणीयतम असे

आहेत. हे स्नेहभाव निष्कलंक मनामध्यें अन्योन्य प्रेमादराच्या अत्यंत पवित्र हेतूमुळे जडत असतात. प्रीतीस पात्र अशा वस्तूवरच निष्कलंक मनाचे शुद्ध प्रेम असते ऐहिक सपत्ति अथवा लोकिकमान ह्या स्वार्थमूलक विचाराचा त्या मनाला विटाळहि नसतो हे विचार पुढें आपल्या मोठेपणाचे स्नेहभाव जोडण्यास अथवा तोडण्यास किती प्रबलतेने वारंवार कारणीभूत होतात! साराश, आपल्या एवढे निदर्शनास येईल की,—व याबद्दल आपण आभार प्रदर्शित करावे तितके थोडेच—शाळेतील म्हणा अथवा विद्यालयातील म्हणा, एखाद्या विद्यार्थ्याची जी योग्यता ठरविण्यात येते ती नेहमीं त्याच्या अगच्या खऱ्या गुणावरूनच होय तो गर्भश्रीमंत म्हणून, किवा तो सूर्य-वंशीय म्हणून, अथवा तो सय्यद आहे म्हणून त्याला कोणीहि मान देत नाहीं. तर तो प्रीतीस पात्र म्हणूनच केवळ त्याच्यावर प्रेम करण्यात येते, किंवा तो तिरस्करणीय वाटतो म्हणूनच त्याचा तिरस्कार होतो. जे खरोखर चागले व खरे असते अशाच गोष्टीचा ह्या विद्यालयात नेहमी आदर होतो हे आपण पाहतो विद्यालयातले दिवस कसे असतात हे माझ्याइतकेच तुम्हालाहि ठाऊक आहे, व तुम्ही माझ्या ह्मणण्याचें सत्यापन करून त्याला पुष्टी द्याल, हे मी जाणून आहे आणि ह्मणूनच मी तुह्माला असें सागतो, की, शाळेतील मुलामध्ये आपणास आढळून येणारी चागल्या विषयीची शुद्ध प्रीति ही खरोखर धन्यता वाटणारी गोष्ट आहे, व ह्या गोष्टीबद्दल आपण सर्वांनी कितीहि आभार मानले तरी ते थोडेच होतील या विद्यालयात ज्याअर्थी ती बहुमोलवस्तु ह्मणून तिचे चीज करणे उचित आहे, त्याअर्थी तिला आपण आज मान देऊं पुढे आपल्या मोठेपणी संसृतीच्या महान शाळेंत ती इतकी निदर्शनास येईल किंवा नाहीं याचा वानवाच आहे

समवयस्काच्या अनिरुद्ध सगतीपासून होणाऱ्या ह्या फायद्याशिवाय, तुमचे जे वरिष्ठ, तुमच्याहून वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध तपोवृद्ध व अधिक अनुभवशीर असे जे, तुमच्या कल्याणार्थ आयुष्य घालविणे एवढाच ज्याचा अखिल हेतु, त्यांच्या सगतीपासून केवढे अपरिमेय हित होणारें आहे याचाहि तुम्ही विचार करा. माझी अशी समजूत आहे, कीं, कित्येक मुलानां शाळा ह्मणजे बंदिवास वाटतो, तेथे परिश्रम व कष्ट फार करावे लागतात, व तेथील शिस्तीमुळें व शिक्षेमुळें जीव अगदी कंटाळवाणा होतो. पण माझ्या मित्रानो! तुमचा अनुभव याहून अगदीच वेगळा असेल अशी माझी खात्री आहे.

तुम्हीं हें पूर्णपणें जाणतच आहा, कीं, तुमच्यावर गुरुस्थानी ज्याची येथे योजना झालेली आहे त्याच्या मनांत केवळ एकच विचार वास करीत आहे, व तो 'तुमचा उत्कर्ष' हाच होय ! यावाचून अन्य विचार त्याना ठाऊक नाहीं. कर्तव्यकर्माने व तितक्याच प्रेमाने त्यानी आपणां स्वत स ह्या एकच हेतूला वाहून घेतलें आहे तुमच्या दु खाने ते दु खित होतात, तुमच्या न्यूनतेबद्दल—अपराधाबद्दल त्याना खेद होतो, तुमच्या कल्याणामुळे व सौख्यामुळे त्याचीं मने प्रमुदित होतात, व ह्या विद्यालयात जी जी गोष्ट घडते ती तुमचे कल्याण व्हावे एवढ्याच एका हेतूने होत असते तुम्हीं चागलें निपजावे व तेणेकरून तुम्हीं सुखी व्हावे एतदर्थ आम्हीं सर्वजण आमच्याकडून होईल तेवढे सहाय्य तुम्हाला देण्याचा सारखा प्रयत्न करीत आहों. मनुष्याना सद्वर्तनी आणि सुखी करण्यास ज्ञानदानावाचून अन्य कोणतीहि गोष्ट अधिक कारणीभूत होत नाहीं, हे आह्माला ठाऊक आहे; व उच्चकुलात ज्याचा जन्म झालेला आहे त्याचे तर ज्ञानावाचून चालावयाचेंच नाहीं हेंहि आम्ही जाणून आहो अतएव, तुमची स्थिति अधिक चागली होण्यास व तुमच्या अगी अधिकारपात्रता येण्यास विवेक व ज्ञान ह्याच गोष्टी अत्यंत खात्रीने कारणीभूत होतील हे जाणूनच आम्ही तुह्माला तो बोध करण्याचा प्रयत्न करीत आहों शिस्तीवाचून आणि नियमितपणा-वाचून कोणतीहि गोष्ट नीट शिकविताच येणार नाहीं हे आह्माला ठाऊक असल्यामुळे, तुमच्या शारीरिक तसेच मानसिक शिक्षणाकडे लक्ष्य देऊन आमच्या प्रत्यहींच्या कर्तव्याची विभागणी करून ती आम्ही वाटून घेतों

आता ह्या गोष्टी जर तुह्माला कंटाळवाण्या वाटत असतील तर त्या तशा खरोखर नाहींत त्या इतक्या उत्कृष्ट गोष्टी आहेत, कीं, त्याहून अधिक चागल्या अशा देण्यास आमच्यात सामर्थ्यच नाहीं, व त्या आह्मी तुह्माला देत आहों याचें कारण तुमच्या कल्याणाची इच्छा हेंच होय. त्या सर्व ह्मणजे शुद्ध आनददायक आहेत असें मी ह्मणत नाहीं. त्या गोष्टी हस्तगत करण्यास परिश्रम व कष्ट करावे लागतात हे मी कबूल करतों. पण मी विचारतों, शुद्ध आनद अशी जगात कोणती वस्तु आहे ? साऱ्या दुनियेत अशी वस्तुच नाहीं परिश्रमावाचून आणि कष्टावाचून खऱ्या सुखाची आपणास प्राप्तीच होणें नाहीं, व नाव घेण्यास योग्य असा जीवनव्यापार चालविता येणारच नाहीं. माझ्या मित्रानों! कोणत्याहि मनुष्याला, मग तो कृषिकर्मी असो

वा राजकुमार असो, चागले असे आयुष्य जर कोणतें असेल तर ते उद्योगशील व्यवसायात निमग्न राहणें हेच होय, हे पक्के लक्ष्यात ठेवा. आणि अशा प्रकारच्या जीवनदशेतच काय तो सुखाचा अनुभव घ्यावयास सापडतो. कारण, आपण सर्व ईश्वराचे दास आहों. त्याने आपणापैकीं प्रत्येकास, मुलाना तसेच प्रौढ मनुष्याना, मुलीना अथवा प्रौढस्त्रियाना कर्तव्य असे नेमून दिलेलें आहे. आणि येथे विद्यालयातील तुमचें प्रस्तुत कर्तव्य तर फारच रमणीय असें आहे कारण, जगातील बाह्योपाधीपासून तुह्मी येथे सुरक्षित आहात व प्रशात मनानें, पूज्य अशा आपल्या समवयस्क मित्राच्या सहवासात, व तुमच्या कल्याणासाठी एकनिष्ठपणे झटणाऱ्या तुमच्या वरिष्ठाच्या मदतीनें आणि विचाराने आपला कर्तव्यमार्ग आक्रमण्यास तुह्माला पूर्ण स्वतत्रता आहे. अतएव माझ्या मित्रानो! ईश्वरी कृपेने तुह्माला ह्या विद्यालयात एकत्र राहण्याचा योग आला आहे याबद्दल तुम्ही त्याचे अत करणपूर्वक आभार माना, व येथे मिळणारी अमोल सधी साधून आपल्या सामर्थ्यानुरूप आपले हित करून घेण्यास तुम्ही दक्ष रहा. अशा तऱ्हेने जर तुह्मी आजपासून वागूं लागला, तर इतउत्तरहि तुमच्या हातून असेंच आचरण घडल्याबद्दल तुम्हाला आनंद वाटल्यावाचून राहणार नाहीं, अशी माझी बालंबाल खात्री आहे

ह्या वरील हक्काना अनुरूप अशा कर्तव्याचा आपण आता थोडा विचार करू. ज्या समाजाचे तुम्ही घटक आहात त्याच्या लौकिकाला तुमचे तुम्हीच कारण होणार आहा हे लक्ष्यात ठेवा हे विद्यालय चागले व्हावे, येथील स्नेहभावाचा तुम्हाला उपभोग घेता यावा म्हणून, शाळेत आणि खेळाच्या मैदानात दोन्हीं ठिकाणी यच्चयावत् गोष्टी तुम्हांला सौख्यावह व कल्याणप्रद अशा व्हाव्यात एतदर्थ तुम्हापैकीं प्रत्येकाने स्वतः चांगलें असलेंच पाहिजे. तुह्मापैकीं प्रत्येकाने अशा तऱ्हेनें राहण्याचा प्रयत्न केला पाहिजे, कीं, जेव्हा हे विद्यालय सोडून जाण्याचा प्रसंग येईल तेव्हा, विद्यालयांत आपण आपला काळ व्यर्थ दवडला, आपल्या हातून पापाचरण घडलें, अथवा आपल्या वाणीतून अमंगल अथवा कठोर उच्चार निघाले, अथवा आपल्या मनात अपवित्र विचार आले, याबद्दल पश्चात्ताप वाटण्यास कधींहि जागा राहणार नाहीं! प्रत्येकाने आपले कर्तव्याचरण करून आपल्या

समवयस्क मित्राचें, तसेंच आपल्या गुरुस्थानी असलेल्या वरिष्ठांचें आयुष्य अधिक सुखी करण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

अन्य कोणत्याहि गोष्टीपेक्षा आपणा सर्वांना उपकारक होणारा असा जर कोणता एखादा शब्द असेल तर तो 'प्रेम' हाच होय. यच्चयावत् समाजात आद्य व अप्रतिम असा जो कुटुंबसमाज त्याला तेजस रमणीयता आणण्याला हेंच प्रेम कारण असते. ह्या विद्यालयाला जें पाहिजे ते देण्यास अन्य कोणतीहि गोष्ट तितकी समर्थ नसून प्रेम हीच एक कामधेनु आहे. ह्मणून माझ्या मित्रानों ! ह्या नूतन सहामाहीच्या प्रारंभीं आपण सर्वांशी प्रेमाने कार्य करण्याचा आज दृढनिश्चय करूं या. आपल्या सोबत्याशीं प्रेमानें व दयाळुपणाने वागा. आपल्या वरिष्ठाचा कर्तव्यपूर्ण आदर ठेवा. आपण सर्वजण ईश्वराच्या पवित्र विश्वकुटुंबांतील नातलग आहोंत, म्हणून ईश्वराचे जसें आपणा सर्वांवर प्रेम आहे तद्वतच आपण अन्योन्य प्रेम-भावानें राहू या आपल्या शेजाऱ्यावर प्रेम करण्यातच ईश्वरावर प्रेम करण्याचा बोध आपणास मिळतो हें मी मागें सागितलेच आहे. आणि ईश्वर आपणावर जसे प्रेम करतो तसेंच आपण जर त्याच्यावर प्रेम करूं लागलों, व आपल्या अत.करणांत उदय पावणाऱ्या विचारात सदैव त्याचे स्मरण ठेविलें, तर आपल्या ह्या विद्यालयाला भूतलावरील लहानशा नंदनवनाची रमणीयता खरोखर आल्यावांचून राहणार नाहीं !

कारण, जेथे परमेश्वर तेथेच स्वर्ग !

# सौजन्य.

" Come wealth or want, Come good or ill,
Let young and old accept their part,
And bow before the Awful Will,
And bear it with an honest heart
Who misses, or who wins, the prize ?
Go, lose or conquer as you can,
But if you fail, or if you rise
Be each, pray God a gentleman "

—*Thackeray.*

निन्दन्तु नीतिनिपुणा यदि वा स्तुवन्तु ।
लक्ष्मी. समाविशतु गच्छतु वा यथेष्टम् ॥
अद्यैव वा मरणमस्तु युगान्तरे वा ।
न्यायात्पथः प्रविचलन्ति पद न धीरा. ॥१॥

—भर्तृहरि.

—शीलं पर भूषण.

उदासीनवदासीनो गुणैर्यो न विचाल्यते ।
गुणा वर्तत इत्येव योऽवतिष्ठति नेङ्गते ॥
समदु खसुख. स्वस्थ. समलोष्टाश्मकोचन ।
तुल्यप्रियाप्रियो धीरस्तुल्यनिंदात्मसंस्तुति ॥
मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयो ।
सर्वारंभपरित्यागी गुणातीत स उच्यते ॥

—भगवद्गीता अ. १४, श्लो २३, २४, २५

स्वत च्या वंशाविषयी सामान्यत्वे करून जे आपले मत तयार झालेले असते त्याचा योग्य, आनंददायक असा परिचय जर कशाने होणारा असला तर तो बहुधा शब्दार्थांच्या विशिष्ट प्रयोगावरूनच वारवार होत असतो ह्याच्या प्रत्ययार्थ इंग्रजी भाषेतील काही उदाहरणे आपण घेऊ Human 'ह्युमन्' हा शब्द घ्या 'जे जे ह्मणून मानववंशासबधी' हा जो त्या शब्दाचा मूळ भावार्थ, तोच सामान्यत. अद्याप कायम आहे पण Humane 'ह्युमेन्' हा शब्द, त्याचा मूळचा अर्थ तोच असून व अर्थाअर्थी तो व हा एकच शब्द असून, अलीकडे मात्र 'दयार्द्र, कोमल, प्रेमळ,' अशा विशिष्ट अर्थानें वापरण्यात येऊं लागला आहे याचे कारण असे, की, जे लोक हा शब्द वापरतात त्याचें असें ठाम मत झाले आहे, कीं, मानववंशीय जे

स्त्रीपुरुष असतील त्यांनी 'दयार्द्र, कोमल, व वत्सल,' असलेच पाहिजे, व सामान्येंकरून ते असतातहि याचप्रमाणे Inhuman 'इनूह्युमन्' हा शब्द 'निष्ठुर, क्रूर, कठोर,' अशा विपरीत अर्थाने वापरीत असतात.

एकमेकाच्या शीलाविषयी लोकमत इतक्या अनुकूलतेने तयार झालेले अशा प्रकारच्या शब्दावरून ओळखणे हे काम मोठे हृदयगम असते, असे मी समजतो. याचे कारण असें, कीं, अशा तऱ्हेच्या लोकमतावर आपणास विश्वास ठेवता येतो घाईने, सारासार विचार केल्यावाचून, अथवा योग्य कारणावाचून शब्दावर कोणी विश्वास ठेवीत नाहींत उलट पक्षी, ते शब्द ह्मणजे अनेक पिढीतील लोकाच्या पोक्त विचाराची व त्यातहि प्रत्येक पिढीतील अत्यंत बुद्धिमान् माणसाच्या विचाराची कार्ये होत. तुह्माला शब्दाची किमत ह्मणजे उच्चारलेले विचार एवढीच कायती वाटेल, विशेष काहीं नाही; व प्रस्तुत आपण जे शब्द वापरतो ते आपल्या पूर्वजाच्या देणग्या, अथवा ठेवी आहेत आपल्यासारख्याच एके काळी मानवकोटीत असलेल्या आपल्या पूर्वजामध्ये अप्रतिम अशा मानवरत्नाच्या विचाराची ती ठेव आहे, व ती मानवरत्ने खरोखरच वत्सलपूर्ण असावी असें आपणास वाटते आज त्याना इहलोक सोडून कैक वर्षे लोटल्यामुळे त्याची आपणास आठवण होत नाहीं एवढच कायते.

Generous 'जनरस' ह्मणजे उदार व gentle 'जन्टल' ह्मणजे सभावित ह्या दोन शब्दाचाहि मनुष्याचे विशिष्ट गुण वर्णन करण्याकडे वरील प्रमाणेच विशिष्ट अर्थाने उपयोग करीत असतात ह्या दोन्हीं शब्दाचा मूळचा अर्थ Well-born 'कुलीन' belonging to genns or, gens 'घरदाज' असा होता; पण प्रस्तुत लोकाच्या सामान्य अनुभवावरून एवढी गोष्ट निश्चित ठरलेली आहे, कीं, जे कुलीन घराण्यात जन्मास येतात ते साधारणत· मोठ्या आणि उदार मनाचे असतात आणि ह्याप्रमाणे generous 'जनरस' ह्याचा अर्थ थोर मनाचा, परोपकाररत, असा अलीकडे होत आहे त्याचप्रमाणें, अनुभवाने आपल्या हेहि निदर्शनास आणून दिले आहे, कीं, कुलीन घराण्यातील लोक सामान्यत· दयाळु व कोमल अत करणाचे तसेच उदार असतात, तसें 'gentle' हा शब्दहि काहींसा निराळ्या अर्थाने वापरण्यात येऊन त्याचा अर्थ 'कोमल' 'दयाळु,' 'निरुपद्रवी,' 'परमतादर करणारा,' असा होऊं लागला आहे. मूळच्या एकाच अर्थाच्या शब्दाना आज निरनिराळा अर्थ कसा प्राप्त झाला हें सोपपत्तिकरीत्या नेहमींच आपणास

सागता येईल असें नाहीं पण त्यांची उपपत्ति जर हातीं लागली तर ती मानवेतिहासाची, अनुभवाची व विचाराची दिशादर्शक या नात्याने फारच मनोरम असते यात शका नाहीं

ह्या gentle 'जटल' शब्दाविषयींच मी तुह्माला आज चार शब्द सांगणार आहे. जरी त्याचा उपयोग नेहमीपेक्षा बऱ्याच अशीं व्यापक अर्थानें होतो, तरी येथे मर्यादित अर्थानेजो त्याचा उपयोग करितात तोच आपण घेऊन चालूं त्याचा मर्यादित अर्थानें जो उपयोग करितात तो फक्त Man 'मॅन्' ह्या शब्दाला जोडूनच करीत असतात, व अशा तऱ्हेने त्याचा उपयोग केला ह्मणजे मग मात्र त्याचा अर्थ 'कोमल,' 'दयाळु,' 'निरुपद्रवी' असा न होता, gentle-man, जंटलमन्' ह्मणजे सभ्यगृहस्थ असा होतो 'सभ्यगृहस्थ' याचा खरोखर अर्थ काय आहे ह्याविषयी तुह्मीहि आज माझ्याबरोबर थोडा विचार करावा, असें मी तुह्माला सागतो एखादा सभ्यगृहस्थ दृष्टीस पडला म्हणजे हा सभ्य-गृहस्थ असें आपण सर्वजण ओळखतों. पण सभ्यपणा कशात असतो याबद्दल मात्र आपणा सर्वांना स्पष्ट कल्पना आहे किंवा नाहीं याची मला शंका वाटते कदाचित् ती गोष्ट स्वभावत च इतकी चागली असेल, इतकी सरळ तथापि भानगडीची, इतकी स्वाभाविक तथापि सस्कृत असेल, कीं, तिचें बारकाईने निरीक्षण करण्याची आपण पर्वाच केलेली नाहीं.

सभ्यगृहस्थ दृष्टीस पडला ह्मणजे मात्र आपण त्याला सभ्यगृहस्थ असे ह्मणतों असें मी वर ह्मटले आहे तरी पण मला वाटते, कित्येकदा आपण जेथे खरोखर ते नाव शोभत नसते अशाच ठिकाणी तें देत असतों, व त्याच-प्रमाणें जेथे ते खरोखर द्यावयास पाहिजे तेथे ते देत नसतो. ह्मणून आपण प्रथम पात्रापात्रतेचा विचार करूं.

प्रथमत', दर्जाने, सपत्तीनें अथवा अधिकारानें जीं श्रेष्ठ, अशीं सर्वच माणसें त्या नावाला पात्र असतात असें नाहीं. कोणीहि, मग तो रंक असो वा राव असो, दास असो वा राजा असो, सभ्य गृहस्थ असू शकेल. डीन् स्टॅन्ले म्हणतात, "स्टेशनवर ( पोर्टरानीं ) हमालानी जर प्रेमळ उत्तरें दिलीं, तर कितीतरी कार्यभाग होईल! रस्त्यातील नाक्यावर पहारा देत असलेल्या पोलिसच्या शिपायाने जर अदबीनें भाषण केलें तर लोकानां कितीतरी आनद व सुख वाटेल! अशा तऱ्हेच्या आचारसौजन्यानें जीवित-कर्तव्याना कितीतरी शोभा येईल! तीं किती आनददायक होतील!"

मनुष्य आपल्या स्वतःला कसा विसरत असतो ही गोष्ट एकदा अथवा दोनदा नव्हे अनेकवार त्याच्या नजरेस आलेली असते. आत्मपरित्याग, निर्हेतुक दुःख, निर्व्याज सुशीलता, यदृच्छयापरोपकार, निष्कपट आत्मनिर्भर्त्सना, ह्या गोष्टी त्याच्या अवलोकनातून गेलेल्या असतात आणि असेंहि असेल, कीं, लोककल्याणार्थ उगीच काहींतरी नव्हे तर आपलें सर्वस्वहि अर्पण करणाऱ्या थोर विभूतींचे उदाहरण पाहून मानवीप्रकृतीत दिव्यांश असतो याची त्याना अस्पष्ट का होईना, पण कल्पना झालेली असते. ह्या सर्व प्रकारांत सहृदयतेने मनोभाव सोत्साह व प्रसगविशेषी प्रदीप्त होण्यास तत्पर असे असतात. त्याचे सारेच विचार उन्नत असतात. कारण, जी प्रकृति त्याच्या अभ्यास आलेली असते तिची व ज्या समाजांत ते वावरत असतात त्याची ओजस्विता त्याच्या भागात खेळत असते."*

माझ्या मित्रानों! जेथे साधारणपणें खरा सभ्यपणा दृष्टीस पडतो अशाच घराण्याचें हे वरील चित्र होय ज्याला कधी स्वतःसाठी दगदग करावी लागली नाहीं तो आपण होऊन ती आपल्यासाठी करण्यास तयार होण्याचा सभव फार कमी उलट, लोककल्याणार्थ झटण्यास तो तयार राहण्याचा फार करून सभव असतो. लोकाच्या स्वार्थत्यागातील रमणीयता अवलोकन करून तो स्वतः स्वार्थत्याग करू लागतो. सभोंवतालच्या परिगणाचे आयुष्य जेणेंकरून आनंददायक करता येईल तेणेकरून तो आपल्या स्वाधीनच्या सर्व गोष्टी करण्यास सदैव तत्पर असतो.

माझ्या मित्रानों! तुमच्याहि कुटुबात अशाच प्रकारची रमणीयता यावी असें तुम्हाला वाटत नाहीं काय? परमेश्वरकृपेने आपल्या मार्गात जे अनेक मोठे फायदे आहेत ते तुमच्या ध्यानात आहेत काय? जें उच्च कर्तव्य तुम्हांला करावयाचे आहे त्याच्या नावाला साजेल असें सौजन्य तुम्ही स्वतः दाखविण्यासाठीं दक्ष आहात काय? लोककल्याणाचा विचार मनात बाळगण्याविषयीं, सर्वांशीं आपल्या व्यवहारात शिष्टाचाराने व परमतादरानें, प्रेमाने व आनंदाने वागण्याची तुम्ही खबरदारी घेत आहा काय? आपल्या नीच व स्वार्थी वासनांस तुम्ही आपल्या ताब्यात ठेवीत आहा काय? इतिहासप्रसिद्ध थोर विभूतींचें अनुकरण करण्याची पात्रता आपल्यामध्यें आहे

*" Ecce Homo," p. 163.

हें दाखविण्याची महत्त्वाकांक्षा तुमच्या ठायी आहे काय ? सामान्य व्यवहारातहि हें तुह्माला फार चांगल्या रीतीनें दाखविता येण्याजोगे आहे ज्याचे गुणानुवाद प्रत्यक्ष शत्रु देखील गात आहेत, ज्याची संपत्ति गेली, भूमी गेली, पण ज्यानें आपलें शीर ह्मणून वाकविलें नाहीं, दारिद्र्ययातना सहन करण्यास तयार झाला पण अपमान ह्मणून ज्याने केंव्हाहि सहन केला नाहीं, कितीहि खडतर प्रसंग आले तरी ज्याने आपल्या खऱ्या क्षात्रतेजाचा व शालीनतेचा लोकाना परिचय करून दिला, असा मेवाडचा महाराणा प्रताप ज्या उदात्त ओजस्वितेने विराजत होता ती तुह्माला आपल्या आपत्कालीं व दारिद्र्यात दाखविता येईल काय ? गेड्रोसिआच्या वाळवंटात तान्हेनें प्राण कासावीस होत असताहि आपल्यासाठीं आणलेले पाणी आपली व आपल्या सोबत्याची तृषा भागविण्यास पुरेसें नाहीं एवढ्याचमुळे ज्याने जमीनीवर ओतून टाकण्यास मागेपुढे पाहिलें नाहीं त्या अलेक्झांडरच्या अंगी केवढे सौजन्य असलें पाहिजे ! सर फिलिप सिडनेचें औदार्यहि याच मासल्याचें आहे झुटफेनच्या तटबंदीसमोर मर्मी घाव लागून तो पडला असता त्याच्यासाठी आणलेले पाणी त्यानें आपल्याजवळच मरणासन्न पडलेल्या एका शिपायास देऊन ह्मटले "बाबारे, माझ्यापेक्षा तुला या वेळी अधिक गरज आहे." हींच खरी उदार माणसें !

मिसेस एविंग हिने 'जॅकानेपस्' नावाची एक फार हृदयंगम गोष्ट लिहिलेली आहे, ती तुम्हीं एक वेळ वाचावी ती सोपी असून सर्वांना नीट कळण्यासारखी आहे असें मला वाटते जॅकानेपस् नावाच्या एका तरुण उदार शिपायाची ती गोष्ट आहे, त्याने तोफांचा प्रचंड भडिमार चालला असता जखमी झालेल्या आपल्या मित्राला समरभूमीतून ओढून आणून त्याचा प्राण वाचविला; पण हें शूरात्मक कृत्य करीत असताच स्वत गोळी लागून तो ठार झाला. येथेहि मनाचेच औदार्य व्यक्त होते तो एक उदार पुरुष होऊन गेला. त्याचें कथानक अथपासून इतिपर्यंत मोठे मनोरम आहे. सारांश, लोककल्याणार्थ आयुष्य वेचणें व प्रसंग पडल्यास त्यांच्यासाठीं आपल्या प्राणाचीहि आहुति देणें, हेंच सर्वकाळीं व सर्वप्रसगीं सौजन्याचें लक्षण, असें मानलेले आहे

दुसऱ्यासाठीं आयुष्य घालविणें याचा अर्थ दुसऱ्यावर प्रे· पणास प्रत्येक आहे. आणि माझा तर असा विश्वास आहे, कीं, जे ईश्वराचे सान्निध देतात वास

करतात त्यांनांच फक्त इतरांवर खरें प्रेम करतां येतें. हें प्रेम ह्मणजे दिव्य प्रकाश, दिव्य प्रेम व दिव्य सौजन्य असते, याच उच्चतम गुणानी मनुष्याना सौजन्याची शोभा प्राप्त होत असते. आपण जर ईश्वरावर प्रेम करीत असूं व तो जर आपल्या अत.करणात खरोखर वास करीत असेल, तर आपणासहि आपल्या बंधुजनांवर प्रेम केल्यावांचून राहताच येणार नाहीं. मनुष्याचे अत्युदात्त असें जीवनचरित जर कोणते असेल तर ते हेच होय मिसेस् एर्विंगबाई ह्मणतात त्याप्रमाणे त्याचा उल्लेख अर्थशास्त्रावरील ग्रथातरींहि सापडणार नाहीं, वा राष्ट्राच्या सपत्तीतहि त्याची गणना होत नाहीं "पण अशाहि कांहीं गोष्टी आहेत, कीं, त्याचा चागुलपणा व उपयु[illegible] इतकी अमोल असते, कीं, त्याच्यापुढे ऐहिक वस्तूच्या चागुलपणाची व उपयुक्ततेची कांहींच किमत नसते. प्रेम, मान प्राण ह्या वस्तुच अशा आहेत, कीं त्या पैशाने विकत मिळत नसून मृत्यूनेंहि त्याचा नाश होत नाहीं; आणि इहलोक सुटल्यावर स्वर्गसुखाची अपेक्षा करणारे आपण आपल्या ह्या आयुष्यरूपी धब्यातून ह्या गोष्टी वगळताच कामा नये.

नेहमी सुखात राहू ह्मटले तर आपणास राहताच येणार नाहीं. आयुष्यात भोग हे सर्वांच्या पाठीमागे लागलेलेच आहेत; पण आपणास उदात्त व सद्वर्तनी असे मात्र नेहमी राहता येणे शक्य आहे. आपल्या सभोंवतालच्या परिगणाची जीवनदशा अधिक सुखावह अशी आपणास करिता येईल. ईश्वराची कृपा असल्यास आपणांस नेहमीं सौजन्याने राहता येईल.

# अल्पकर्तव्यांची तेजस्विता.

* 'The trivial round, the common task.
Will furnish all we ought to ask.
Room to deny ourselves, a road
To lead us daily nearer God"

वरील अवतरण हे केबल् नामक आग्लकवीचे उद्गार असून ते अल्पकर्तव्यांचा महिमा आपणास सागत आहेत बारिकसारीक कर्तव्ये मिळूनच आपल्या आयुष्यातील रोजची एकंदर बेरीज होत असते, व कवि असें सागत आहे कीं, हीं अल्पकर्तव्येच मनुष्यास प्रत्यही ईश्वराचे अधिकाधिक सन्निध नेऊन पोंहचवीत असतात मागे पहिल्या व्याख्यानाचे अखेरीस व गेल्या व्याख्यानातहि मी या गोष्टीचा उल्लेख केलेला आहे आज याचाच आपण विस्तारपूर्वक विचार करू.

आपलीं प्रत्यहींची कर्तव्ये हीं आपणा सर्वांना लागलींच आहेत. तीं जरी सर्व एकसारखी नसली, तरी तीं सर्वांना सारखी येत असतात, व तीं अति नियमितपणें येत असतात येथे या विद्यालयात विशेषत आपल्याबद्दल तर त्याचा नियमितपणा विशेष लक्ष्यात ठेवण्यासारखा आहे प्रात काल-पासून ते रात्रीं निजेपर्यंत, रोज सोळा तास, आपणापैकीं प्रत्येकजण लहानसान कर्तव्यकर्में करीत दिवस घालवीत असतो हीं कर्तव्यकर्में साधारण-पणें पुरीं एकेक तासाची असतात, व तीं नित्य एकापाठीमागून एक अशा अविच्छिन्न परंपरेने होत असतात अशा रीतीनें घालविलेला रोजचा प्रत्येक तास अथवा प्रत्येक क्षणहि ह्मणावयास हरकत नाहीं, मग तो आपल्या मित्राशी बोलण्यात, कामात खेळण्यांत अथवा अन्य कोणत्याहि रीतीनें गेलेला असो, दिसण्यात जरी क्षुल्लक असा वाटला तरी तो एक मोठी महत्त्वाची बाब होऊन बसतो कारण, समुद्र हा जसा जलबिंदूंचा झालेला

* आपली नित्याचीं बारिकसारीक कामे, साधारण व्यवसाय, हींच अ गोष्टींन योग्य तो सल्ला देत असतात, आपणास आत्मपरित्याग करण्यास अवक., ,
प्रत्यहीं ईश्वराचे अधिक सन्निध नेऊन पोहचविण्यास मार्गदर्शक होतात.

असतो, तद्वत् ह्या लहानसान गोष्टी मिळूनच आपलें अखिल जीवनचरित तयार झालेलें असतें. जसा एक भाग असेल त्याप्रमाणेंच समग्र भाग तयार होईल 'थेबे थेबे तळे साचे' लहानसान प्रसगाचा तो सदुपयोग असतो. ती आयुष्यातील साधारण कर्तव्याची योग्य बजावणी असते, व ती नित्य करीत राहिले असता अर्ती आपल्या एकदर जीवनदशेला उदात्त स्वरूप दिल्यावाचून राहत नाहींत ह्या अल्पकर्तव्याची उपेक्षा केल्यामुळें, ह्या प्रसगाचा दुरुपयोग केल्यामुळेच, आपल्या प्रकृतीचें सामर्थ्य क्रमश: [illegible] ळून निघून अती आपल्या जीवनदशेला नीच व निकृष्ट अशी अ[illegible] प्राप्त [illegible]ते.

हीं अल्पकर्तव्ये आपल्याला येथे या विद्यालयातच [illegible] तात असे नाहीं. तीं घरीदारी सर्वत्र सारखीच लागले [illegible] कोठेंहि असलों तरी प्रत्येक क्षण आपणास कोणत्या तरी [illegible]मांत [illegible] पाहिजे, त्यावाचून शरीरयात्राच चालणार नाहीं, व प्रत्येक क्षण सद्व[illegible] [illegible] हें आपले कर्तव्यकर्म आहे. या विद्यालयात तुमची कर्तव्या[illegible] [illegible]रशा स्पष्टपणें रेखाटलेली असल्यामुळे, घरच्यापेक्षा येथे सदाचरणानें वागणें हें अधिक सुकर आहे असें कदाचित् तुह्माला वाटेल. पण हे लक्ष्यात ठेवा, कीं, तुम्ही कोठेंहि असलात तरी सदाचरणात घालविलेला प्रत्येक क्षण हा तुम्हांला ईश्वराचे अधिकाधिक सन्निध नेऊन पोहचवील, व दुराचरणात गेलेला प्रत्येक क्षण तुम्हाला ईश्वरपराङ्मुख होण्यास प्रवृत्त करील ज्या मानानें हीं अल्पकर्तव्ये ईश्वरसन्निध नेणारी वा ईश्वरपराङ्मुख करणारी होतील त्या मानाने आपलें एकंदर जीवनचरित चागलें अथवा वाईट होईल.

हें अल्पकर्तव्याचरण सोपें आहे असें नाहीं आणि इतर गोष्टीप्रमाणें ह्या अल्पकर्तव्याच्या मोठेपणाची खरी कल्पना अडचणीच्या प्रसगावरूनच होत असते. नेहमींच सावध राहणें सोपे काम नाहीं. तरी पण, प्रत्येक क्षणीं प्रत्येक कामात जे केलेच पाहिजे तें करण्याची जर आपली इच्छा असेल तर, नेहेमीं सावध राहिल्यावाचून आपणास गत्यतर नाहीं. सदासर्वदा प्रेमानें वागणे सोपे नाहीं सदैव परमतादर ठेवणें सोपे काम नाहीं. जें केले पाहिजे तें नेहमीं हातून घडणें सोपें नसते शाळेंत नेहमीं अभ्यासाकडे लक्ष्य ठेवणें व खेळाचे वेळी नेहमीं सौजन्य दाखविणें हीं कामे सोपी नाहींत. ह्या गोष्टी साधण्यास इच्छेचे ठायी मोठी स्थिरता लागत असते, अंगीं मोठे सावधान असावे लागते, व मोठे आत्मदमन करावे लागते. हे गुण संवयी-

सारखे अंगवळणीं पडावे लागतात, आणि म्हणूनच आकस्मिक एखादें मोठें शूरत्वाचें कृत्य करण्याचा प्रसग आला असता ह्या गुणाची जितकी आवश्यकता लागते त्याहून अधिक गरज वरील गोष्टी साधण्यास खरोखर लागत असते. आणि, दिनचर्येतील साधारण आचरण ज्याला उत्कृष्ट रीतीनें बजावता येतें त्याला गरजेच्या वेळी, आकस्मिक सकट प्राप्त झाले असता व खऱ्या परीक्षेच्या वेळींसुद्धा उत्कृष्ट आचरण ठेवता येईल. प्रत्यहींच्या आचरणात ज्याला आत्मदमन करता येतें तोच खरा वीर होय! सालोमनच्या मुखांतून ो पुढील उद्गार निघाले आहेत त्याचे तरी कारण हेंच होय. "ज्याला ाग सहसा येत नाहीं तो सामर्थ्यवानाहूनहि अधिक श्रेष्ठ असतो, व ज्याला ात्मदमन करिता येतें तो एखादें शहर पादाक्रात करण्याऱ्या वीराहूनहि ्रधिक श्रेष्ठ असतो" आणि मला वाटते, जरी आपला अनुभव फार ोडथोडा आहे तरी, स्वानुभवावरून ही गोष्ट आपणा सर्वांना ठाऊक आहे ़णभूमीवर दोन हात करण्याचा ज्याना कधीहि प्रसग आलेला नसतो तरी पण ांततेच्या वेळी आपल्या निश्चयात्मक व करारी वर्तनाने 'चागले' म्हणून जे प्रसिद्धीस आलेले असतात अशा अनेक शिपायाच्या गोष्टी आपण ऐकतों व त्याच्या ह्या वर्तनावरून आपणास येवढी खात्री वाटत असते, कीं, जर त्याना लढाईवर जाण्याचा प्रसग आला तर ते शूरत्वानेच वागतील व पराङ्मुख कधीहि होणार नाहींत सत्कार्यातील इच्छास्थैर्य, थोडेंथोडें मिळून तयार झालेले शील, सदाचरणाने वागण्याचे वारंवार प्रयत्न, ह्याच गोष्टी अंगीं खरे सामर्थ्य येण्यास व अखेरीस प्रभाव गाजविण्यास कारणीभूत होत असतात

माझ्या मित्रानो! तुमची येथील दिनचर्या तुह्माला केंव्हा केंव्हा निस्सत्व व निरानंद अशी वाटते काय? तुमच्या कार्यातील निर्विशेषता, तुमचे एकाच प्रकारचे काम, तुह्माला अकीर्तिकर अथवा व्यर्थ कालक्षेप असें वाटते काय? शिस्तीनें राहण्यापेक्षां व ज्ञानप्राप्तीपेक्षा अन्य व्यवसायांत कदाचित् आपण आपल्या कालाचा व्यय अधिक चांगल्या रीतीनें केला असता असें तुह्माला वाटतें काय? अथवा ह्या खटाटोपीत तरी काय अर्थ आहे अशी कुरकुर तुम्हीं—तुमच्यापैकीं एकानें अथवा दोघांनी अथवा अधिकानीं—कधीं केली आहे काय? तसेंच परमेश्वरानें जर आपणांस अधिक मोठें बुद्धिसामर्थ्य दिलें असतें, अधिक शारीरिकबल व चपलता दिली असती, तर खेळण्यात

व अभ्यासांत दोन्ही ठिकाणीं आपलें आयुष्य अधिक यशस्वी व आनदकारक कदाचित् झालें असते, असा विचार तुमच्या मनात कधी आला आहे काय ? पण ज्या अर्थी आपली स्थिति तशी नाहीं त्या अर्थी निरर्थक गोष्टीसाठीं व्यर्थ धडपड करण्यांत अर्थ कोणता ? तुमच्या हातून एखादे सत्कृत्य घडेल असें तुह्माला वाटते काय ? प्रयत्न कधीहि व्यर्थ जाणार नाहीं.

माझ्या मित्रानों ! सगळा अर्थ प्रयत्नातच आहे आणि ईश्वर जे आपणास कसोटीस लावीत असतो ते आपल्या कल्याणासाठीच. आपणा सर्वांनाच सामर्थ्यवान् अथवा बुद्धिवान् होता येणें शक्य नाहीं. तरी पण ईश्वराने ठेवलेल्या परिस्थितींत सुख मानून त्या स्थितीत ईश्वराला प्रसन्न करण्यात व आपले कर्तव्य बजावण्यात आपली पराकाष्ठा करणे एवढी गोष्ट आपल्या सर्वांच्या स्वाधीनची आहे. आपणापैकी प्रत्येकाला आपापले विशिष्ट असे कसोटीचे प्रसग असतात, प्रत्येकाला आपापले विशिष्ट ससारयुद्ध खेळावयाचें असते, विशिष्ट अडचणीना तोंड द्यावयाचे असते आणि एवढ्या बाबतीत आपण सर्वजण सारखे आहोंत, मग आपणापैकीं कोणी अत्यंत सामर्थ्यवान् असो वा अत्यंत दुर्बल असो, कोणी अत्यंत मंदबुद्धी असो वा अत्यंत बुद्धिमान् असो. आणि हे प्रसग कसेहि असले तरी ते ईश्वराला ठाऊक असतात. आणि ज्या अर्थी ते प्रसंग ईश्वरच आणीत असतो त्या अर्थी त्यातून पार पडण्याचे सामर्थ्य व चातुर्य जर आपणांस कोठे आढळत असेल तर ते ईश्वराच्याच अगाध सामर्थ्यावर व चातुर्यावर भरंवसा ठेवण्यातच होय. पण यातायातीवाचून यश नाहीं, युद्धावाचून जय नाहीं 'कष्टीं फळ व तपी राजा' ही ह्मण प्रसिद्ध आहे. उपरिनिर्दिष्ट शंका आणि विकल्प हेच आपले रिपु असून त्याना आपणास जिंकावयाचें आहे, व ते ईश्वरावर भरवसा ठेवल्यानेच करता येईल आपल्या अडचणीतून पार पडण्याचा, आपल्या शंकाचें निरसन करण्याचा व आपल्या अंगचें दौर्बल्य घालवून सामर्थ्यवान् होण्याचा पुढील एकच मार्ग आहे, अन्य मार्गच नाहीं. रोजचें कर्तव्य ईश्वराज्ञा ह्मणून मानणे व ते त्याच्याच सहाय्यानें पार पाडणें, ईश्वरी प्रेरणेनेंच आपण आपलें प्रत्येक कर्तव्य करीत असतों याबद्दल खात्री ठेवणें, व त्याच्याच कृपाप्रसादावर भरंवसा ठेवून, वेळोवेळीं त्याचीच सल्ला घेऊन व आश्रयार्थ त्याचा धावा करून तें बजावणें; हाच तो मार्ग. अतएव आपली विशिष्ट अडचण कशीहि असली—व ती

इतरापेक्षां आपली आपणांलाच चागली कळते—तरी आजपासून तिच्यातून पार पडून जाण्याचा निश्चय करा व हा निश्चय रोज प्रतिक्षणीं धैर्यानें व निग्रहानें चालू ठेवा. आपल्या स्नेह्याविषयीं शीघ्रकोपी, कलहप्रिय असें होण्याची तुमची कधी प्रवृत्ति होते काय? ह्या दोषाचा विशेषेकरून विचार करण्याचा प्रयत्न करा, व ज्या वेळी हीं व्यंगे मनात येण्याचा संभव असतो असें तुह्मांला वाटतें त्या वेळी तर विशेषेंकरून त्याच्याविषयीं सावध रहा. शारीरीक परिश्रमामुळें जेव्हा थकवा येतो तेव्हां विशेषेंकरून सावध असा. कारण **'क्षीणा नरा निष्करुणा भवन्ति'** या कव्युक्तिप्रमाणें शारीरिक दौर्बल्यामुळेंच स्वभावदुर्बलता नेहमीं उद्भवत असते, व ती घालविता येणारी आहे, नाहीं असें नाहीं शाळेंत स्वार्थासक्त अथवा आळशी होण्याकडे तुमची केव्हा प्रवृत्ति होते काय? होत असल्यास तशी न होऊं देण्याचा तुह्मी निश्चय करा, व स्वत साठीं आत्मनिर्बंधक नियम करून ठेवा इच्छा असल्यास तुह्माला ते सहज करता येतील, व तेणेकरून आपली स्वाभाविक स्वार्थलोलुपता, स्वाभाविक आलस्य हीं आपल्या ताब्यात ठेवता येणारी आहेत हें तुह्माला कळून येईल. राग, अपवित्र वासना, अथवा गर्व अशासारखे पापविचार तुमच्या मनात येण्याचा सभव आहे काय? अशा वेळीं ईश्वर आपल्यासन्निध उभा आहे व असल्या विचाराचा त्याला अत्यत तिटकारा येतो, याची आठवण ठेवण्याचा प्रयत्न करा एकदा ईश्वराविषयी मनांत विचार आला कीं सारे पापविचार एकदम नाहींसे होतात ह्मणून जें जें कर्म आपण करतों ते ते ईश्वरार्पण मनुष्यार्पण नव्हे, असें समजून अंत.करणपूर्वक करीत रहावें, व असें झाल्यावर आपल्या हातून प्रत्येक कर्म चांगलेच घडेल, व कोणतेंहि कर्म क्षुल्लक असें वाटणार नाहीं.

अडचणीच्या व परिणामाच्या दृष्टीने अल्पकर्तव्यकर्मे मोठी कशीं असतात, हें मी सागितलें पण अतीं, वस्तूंच्या माहात्म्याबद्दल अथवा लघुत्वाबद्दल निर्णय कोणीं करावयाचा? अनुभवावरूनच जर हें आपणास ठरवावयाचें असेल, वस्तूंच्या परिणामावरूनच जर त्याच्या मोठेपणाची अथवा लहानपणाची कल्पना बाधावयाची असेल, तर मला वाटते, जी गोष्ट एके काळी अगदीं क्षुल्लक व साधारण अशी दिसली तिलाच मागाहून विलक्षण महत्त्व प्राप्त झाल्याचें आपणास वारंवार दिसून येते. उदाहरणार्थ वाफेच्या शक्तीच्या उपयोगाचाच विचार करा. चुलीवरील अधणाच्या भाड्याचें झाकण वाफेनें

कसें हादरत आहे याकडे सहज दृष्टि गेल्यामुळें वूरसेस्टरचे मारक्विस् यांना कल्पना सुचून वाफेच्या जोरावर चालणाऱ्या अर्वाचीन यंत्रांचा जो शोध त्याना लावतां आला त्याला उणीपुरीं अडीचशे वर्षेंहि लोटली असतील नसतील, पण त्यापूर्वी कितीतरी वर्षे अगोदर जगाला वाफेचे ज्ञान होतें. अधणाच्या पाण्यावरील झाकण ते काय, ती एक घरगुती गोष्ट असून तिला असें महत्त्व ते काय, असें कदाचित् तुम्ही म्हणाल पण त्या क्षुल्लक गोष्टीवरून आज जगात केवढे आश्चर्यकारक परिणाम घडून येत आहेत याचा विचार करा आणि जी गोष्ट भौतिकशक्तीविषयी अशा तऱ्हेने खरी दिसते, ती विलक्षण नैतिकसामर्थ्याविषयींहि तितकीच खरी असते हें नैतिकसामर्थ्य असें काहीं विलक्षण असते, कीं, तेणेकरून अगदी क्षुल्लक गोष्टीचा, साधारण कृत्याचा आपल्या मनावर सस्कार घडत असतो तो कसा घडतो हे मात्र आपणास कळत नाहीं. आता, ज्या वेळी हे सस्कार घडतात त्या वेळच्या मानसिक वृत्तीवर व परिस्थितीवर ही गोष्ट बऱ्हाशीं अवलंबून असते यांत शंका नाहीं तरी पण एवढी गोष्ट खरी आहे, कीं, प्रत्यहीं दृष्टीस पडणारे क्षुल्लक देखावे, सहजी दिसणाऱ्या व कानीं पडणाऱ्या साधारण गोष्टी आपल्या मनावर वारंवार चिरस्थायी सस्कार करीत असतात, व त्याचा परिणाम आपल्या शीलावर व चारित्र्यावर असा काहीं होत असतो, कीं, तसा परिणाम ज्याला आपण खरोखर मोठ्या गोष्टी ह्मणतों त्याचाहि होत नाहीं याचें एक उदाहरण मी तुह्माला सागतो तुम्ही अशी कल्पना करा, कीं, मुंबईशहर पहावयास जाण्याची तुमची पहिलीच खेप आहे, व त्या मोठ्या आणि प्रसिद्ध शहरात तुमच्या नजरेस अशा अनेक गोष्टी पडल्या असतील, कीं, तेणेकरून तुमचे मन अगदी आश्चर्यभरित झाले आहे. ते विस्तीर्ण व सुव्यवस्थित रस्ते, फोर्टमधील रमणीय इमारती, महाराणी व प्रिन्स् ऑफ् वेल्स यांचे पुतळे, मनोहर असें राजाबाई टॉवर, विश्वविद्यालयीन पुस्तकालय, एल्फिन्स्टन कॉलेज, क्रॉफर्ड मार्केट, बोरीबदरचे स्टेशन, प्रिन्सेस्डॉक्, नाणीं पाडण्याचें ठिकाण, सेक्रेटरिएट् कचेरी, कुलाब्याची दांडी अथवा दीपगृह, मलबार पॉइटवरील गव्हर्नरसाहेबाचें वसतिगृह व मलबारटेकडीवरून दिसणारा वैभवशाली देखावा, इतक्या गोष्टी तुम्हीं पाहिल्यात. या सर्व गोष्टी तुह्माला अगदी आश्चर्यकारक व प्रशंसनीय वाटल्या असतील यांत शका नाहीं, पण वाटेत तुम्ही बडोद्याला थाबलात, व तेथे अगदीं

साधारण, क्षुल्लक अशी एक गोष्ट तुमच्या नजरेस पडली व तिचा तुमच्या मनावर परिणाम मुंबईत दृष्टीस पडलेल्या सर्व गोष्टींपेक्षा अधिक चिरस्थायी झाला. तो असा, कीं, बडोद्याच्या स्टेशनावर अगदीं संध्याकाळींच, एक तरुण मनुष्य आपल्या मातेचा निरोप घेताना तुमच्या नजरेस पडला, व त्याच्या चेहऱ्यावर एकप्रकारची सुंदर तरी पण अवर्णनीय दु खकारक अशी छटा तुमच्या नजरेस पडली, व तेणेकरून तुमचें सारें मन त्याच्याकडे वेधलें. तुह्मांला असें वाटलें, कीं, हा मातृपुत्रवियोग म्हणजे एक अवर्णनीय वियोगजन्य वेदनांचा देखावा होय, व तो घालविण्यासाठी तुम्हीं काय वाटेल ते केले पण उपयोग काय ? गाडी चालू झाली. बडोदे अंधारातच पाठीमागे राहिलें दुसरे दिवशीं प्रात काळी मुंबईच्या स्टेशनवर तुम्ही जागे झालात जिकडे तिकडे नवीन देखावे, नवीन माणसें तुम्हाला दिसू लागली. तरी पण त्या दुःखकारक तरुण चेहऱ्याची आठवण तुमच्या मनातून कधींहि गेली नसेल व तिने आमरण तुमच्या मनावर कायमचा सस्कार केल्याचेहि तुमच्या ध्यानात आलें असेल

आता तुमच्यापैकीं एखाद्याच्या पहाण्यांत प्रत्यक्ष अशीच गोष्ट आली असेल असें मी अर्थात् ह्मणत नाहीं. पण मला वाटते, अशासारखे प्रसग केव्हा तरी आपल्या अनुभवाला आलेले आहेत. आयुष्यांत महत्त्वाचे बोध घेण्याजोगे सस्कार आपल्या अत:करणावर अक्षय्य अक्षरानी जे उमटत असतात ते मोठाल्या गोष्टींपेक्षा काहीं अशी अशा लहानसान गोष्टीमुळेंच उमटत असतात ह्या रोजच्या परिस्थितींचा परिणाम आपल्या मनावर कायमचा झाल्याचा उल्लेख वर्डस्वर्थ कवीनी जागोजाग केलेला आहे. वर्डस्वर्थचे काव्य समजण्यास इतके अवघड नाहीं ते तुम्हीं वाचावे सरोवराच्या काठीं इतस्तत तरंगणारा सुवर्णपुष्पराशीचा देखावा, शेतात कष्ट करणाऱ्या कुमारीचा मधुरालाप, पर्वतश्रेणीची, अरण्याची अथवा निर्झराची मनोरमणीयता, ह्या गोष्टी तर त्याच्या स्मरणातून कधीहि गेल्या नव्हत्या. वाऱ्याने उडून येणारें "य.कश्चित्फूल, पण तेंच त्याच्या मनोदधींत अशी काहीं विचारतरंग उसळवीत असे, कीं, तेणेंकरून डोळ्यांतून अश्रुधारा निघाल्यावाचून राहत नव्हत्या"

वर्डस्वर्थचें विचारगाभीर्य आपणा सर्वांच्या ठायीं असूं शकणार नाहीं, तरी आपलीं सर्वांचीं मानवी अत:करणेंच आहेत. आणि जसे बाहेर चे

संस्कार आपल्या मनाबर होत असतात तसेच ते आपण इतरांच्या मनावरहि करीत असतों. आपल्या हातून घडणारे एखादें कृत्य, मुखातून निघणारा उच्चार, नुसती दृष्टिसुद्धा इतकी क्षुल्लक नसते. तिचा परिणाम आपल्या सभोंवतालच्या परिवारावर बरा म्हणा वाईट म्हणा पण तो कायमचा होत असतो. जी जी गोष्ट आपण करतों अथवा बोलतों त्या प्रत्येकीसंबधीं एवढी गोष्ट आपण ध्यानात ठेवण्याचा प्रयत्न करावा. आपल्या आयुष्यातील एक क्षणसुद्धा वृथा जात नाहीं प्रत्येक क्षणाचा आपल्यावर अथवा इतरावर परिणाम हा होतच असतो व तो तात्पुरता नसून कायमचा होत असतो ह्या दृष्टीने विचार केला असता प्रत्येक क्षुल्लक कर्तव्य अल्प असें न वाटता अमर्याद मोठे आहे असेंच खरोखर वाटेल.

# स्नेह.

*" A man that hath friends must, shew himself friendly, and there is a friend that sticketh closer than a brother "

Proverbs of Solomon, xviii, 24.

आपण मानवी प्राणी किती य कश्चित् आहोंत, आपले जीवित परस्परांवर कसें अवलंबित असते, व जगांत औदासिन्यापेक्षा प्रेमळपणाच अधिक असता तर आपली स्थिति याहून किती तरी पटीने चागली व सुखकर झाली असती, ह्या गोष्टींचा विचार करू लागलो असता जगतात खरे मित्र किती थोडे सापडतात याचें आपणास सखेदाश्चर्य वाटेल विश्वासाची व प्रेमाची अन्योन्य देवघेव यथेच्छ करून यदृच्छेने व सत्कृद्दर्शनीच आपण आपलीं अंतःकरणें एकमेकाजवळ का उकलूं नयेत ? सामान्य व्यवहाराने जो एक साधारण स्नेहभाव आपआपसात जडत असतो तो जणुं काय आपल्या अंतःकरणरूपी आदर्शावर असलेल्या अविश्वासरूपी हिमाच्या थराचे हळूहळू पाणी करणेच होय, पण ही गोष्ट आपल्या मानवी धर्माला कितीशी भूषणावह आहे ? एखाद्यावर विश्वास ठेवण्यास धजण्यापूर्वी त्याच्यासबंधी आपणास पूर्ण माहिती अगोदर का झाली पाहिजे ? माहिती होण्यापूर्वी विश्वास ठेवणे, सत्कृद्दर्शनीच आपल्या शेजाऱ्याना प्रीतीचें व सदीच्छेचें जणुं काय उसनें वाणच देण्यास आपण प्रवृत्त होणे ही गोष्ट अधिक उदात्त, अधिक श्रेष्ठ व सामान्यतः तितकीच सुरक्षित ठरणार नाहीं काय?

मला वाटतें, ह्या वरील प्रश्नाची उत्तरे देताना, अशा तऱ्हेच्या निर्व्याज स्वभावसारल्याचा व विश्वासाचा अभाव म्हणजे खरोखर जगातील पापाचे अत्यत खेदजनक व अत्यंत स्पष्ट असे परिणाम होत, ही गोष्ट आपणास कबूल करावी लागेल. जगांत जर खरोखर पापाला म्हणून मुळींच कोठें थारा नसता, तर आपणास शंका बाळगण्याचें अथवा टाळाटाळी करण्याचें प्रयोजन उरलें नसते. पण ज्याअर्थी जग हें असें आहे त्याअर्थी सर्व

* ज्याला मित्र असतात त्यानें स्वत स्नेहभावाने वागलेंच पाहिजे, व जो पाठच्या भावापेक्षांहि अधिक जिव्हाळ्यानें चिकटून राहतो तोच खरा मित्र होय.

माणसें विश्वासाला सारखींच पात्र आहेत असे धरून ह्या जगतात आपणांस वागता येत नाहीं. अथवा, आपण जरी तसें वागूं ह्मटले तरी आपली वर्तणूक जगाच्या खरोखर लक्ष्यातच येणार नाहीं शेक्स्पीअरचें मानवी स्वभावज्ञान खरोखरच आश्चर्यकारक होते. त्याने मानवी अनुभवाचे चित्र किती यथार्थतया रेखाटलें आहे पहा! पोलोनिआनें लोर्टसला जो उपदेश केला आहे त्या वेळचे उद्गार याची साक्ष देत आहेत.

*" Those friends thou hast, and their adoption tried,
Grapple them to thy soul with hoops of steel
But do not dull thy palm with entertainment
Of each new hatched unfledged comrade. "

1 Hamlet, Act 1 Sc 3.

आता प्रथमत स्नेह ह्मणजे काय हे आपण पाहूं. एका प्राचीन रोमन लेखकाने ह्या विषयावरील आपल्या एका निबंधा[illegible] [illegible] आहे पुढीलप्रमाणे दिली आहे:—

"धार्मिक व सामाजिक अशा यच्चयावत् [illegible]बंधी ज्याचें पूर्ण एकमत असते, व जे अन्योन्य सदिच्छेने व प्रेमा[illegible] [illegible] [illegible]गडित असतात, तेथेच स्नेह जाणावा "

त्याचें असेंहि मत आहे, कीं,

"खरा स्नेह सज्जनामध्ये असू श[illegible]—पराकाष्ठेचें प्रेम व खरी अशी मैत्री सच्छील माणसाच्या सच्छी[illegible] [illegible] नेहमीं दृष्टीस पडते."

मला वाटतें, '[illegible] बाबतीत पूर्ण मतैक्य असणे' हे स्नेहभावाचें मुख्य लक्षण आहे. हे मत [illegible]र्वांशी आपणास पसत पडेलच असें नाहीं, पण अन्यथा सिसेरोची व्याख्या आपणास ग्राह्य वाटेल यात शका नाहीं

आता, चांगुलपणा, सद्वर्तन हें जर स्नेहभावाचे आवश्यक असें लक्षण आहे व जगातील स[illegible]च माणसें जर चागलीं नाहींत, तर सर्वांना स्नेहभावानें

* "तुझ्या कसोटीला उ[illegible] विश्वासार्ह असे जे तुझे स्नेही असतील त्याच्यावर तू अगदीं जीवापलीकडे प्रेम कर व त[illegible] प्रेमात आमरण अतर पडणार नाहीं अशा तऱ्हेने तू त्याच्याशी वाग, पण अड्यातून को[illegible] तुरतेंच बाहेर पडून ज्याना अद्याप पखहि फुटले नाहींत अशा पिलाची ज्याना उपम[illegible] अशा उठल्यासुटल्या प्रत्येक नूतन परिचित सोबत्याचें आदरातिथ्य करण्या[illegible] [illegible]सि [illegible]न तू आपल्या वैभवाला दूषण लावून घेऊ नकोस."

वागतां येणें शक्यच नाहीं. आणि वर सांगितल्याप्रमाणें, जगाला ह्या गोष्टीचा अनुभवहि आलेला आहे व तदनुरूप जगातील व्यवहार, लोकांचें आचरण, आपण पहात आहोंत.

पण स्नेहसंबंध एकदा जडला म्हणजे मनाला केवढा आनंद होत असतो! स्नेह म्हणजे केवढी आल्हादकारक वस्तु अशी वाटू लागते! याहून अधिक सुखावह व आनंदजनक असे अन्य काहीं असूं शकेल काय? सिसेरोच्या भाषेने फिरून सांगावयाचें म्हणजे 'स्नेहावांचून अधिक मौल्यवान् असें ह्या जगात काहींच नाहीं!' अन्योन्य प्रणयाने ज्यांचीं मनें एकत्र निगडित झालेलीं असतात तीं एकमेकांच्या जीवनचारित्र्याला केवढी तेजस्विता आणित असतात, केवढे सौख्य देत असतात, सुखदुःखांत केवढी अनुकंपा दाखवीत असतात व प्रसंगी केवढा योग्य सल्ला आणि उत्तेजन देत असतात याचा विचार करा ज्याला मित्र आहे त्याला एकलकोंडेपणा वाटण्याची गरज नाहीं, व कधी भांबावून जाण्याचेंहि कारण उरत नाहीं. आपल्या संकटसमयीं आपणांस सोडून जाणार नाहीं अशी जगात कांहींतरी एक वस्तु आहे हें त्याला ठाऊक असते. ती कोणती म्हणाल तर अनुकंपा दर्शविण्यास सदैव तत्पर असें मानवीमन व सहाय्यार्थ सदैव तत्पर असा मानवी उदारहस्त ही होय, व ह्याहून अधिक श्रेष्ठ व अप्रतिम वस्तु साऱ्या दुनियेत सापडणार नाहींत

जेथे पदोपदीं निराशा, खडतर प्रसंग व दुःखें हीं हात धुवून पाठीस लागतात अशा या दारुण जीवनसंग्रामात आपण निमग्न होण्यापूर्वी, संसारात शिरण्यापूर्वी ज्या वयात आशा सतेज व बलवत्तर असते अशा आपल्या तारुण्यात जे स्नेह जडत असतात तेच सर्व स्नेहामध्ये अत्यंत सरस आणि पवित्र असे होत. जो वेळपावेतों पापाचरणापासून आपलें योग्य संरक्षण होत असते व जीवनदशेची बहुतेक उत्तम बाजूच आपल्या अवलोकनांत येत असते, अशा आपल्या तारुण्यावस्थेंतील निरतिशय स्वभावसरलतेंत आपण उत्साहानें व निर्व्याजतेनें अंतःकरणाला अंतःकरण देत असतों. पण मोठेपणीं आपल्या अनुभवांत हे गुण सामान्यतः दृष्टीस पडत नाहींत. तारुण्यावस्थेंत भीति बाळगण्यासारखें कांहीं नसतें, अथवा शंका येण्यासहि कोठें जागा नसते. त्या वयात आपली परिस्थिति अशी असते, कीं, तेणेंकरून

त्यांना मनोरमणीयता प्राप्त होते. मोठेपणीं मात्र असें नेहमींच घडतें असे नाहीं. मोठेपणीं संसारात निराशा, स्पर्धा, मीमीपणा यांचा अनुभव पदोपदी येतो. कदाचित् मित्र शत्रु होतात, स्नेह्यास्नेह्यात विरोध उत्पन्न होतो. कदाचित अत करणे विदीर्ण करणारे प्रसगहि येतात; आणि ह्या गोष्टीमुळें तरुणपणांत अंगीं असणारा जोम शिथिल होण्याचा—अगदीच तेजोहीन होण्याचा असें मी म्हणत नाहीं—फारकरून सभव असतो. तथापि तारुण्यावस्थेप्रमाणेंच पुढें मोठेपणीं ज्याला मित्रानंदसुखाचा लाभ घडतो तोच अत्यत धन्य होय एक मित्राची जोड असली म्हणजे मग निराशेचे व कसोटीचे कितीहि प्रसग आले, कितीहि निर्दय, स्वार्थलोलुप व पापी माणसाशीं गाठी पडल्या तरी त्याला असें वाटत असते, कीं, आपले वैभवास्पद अद्याप साऱ्या दुनियेतून काहीं नाहींसें झाले नाहीं. बालमित्राचें प्रेम हेंच जीवित-वैभव आहे त्याचा उदय जर प्रशात मनातून झालेला असला तर ते वृद्धापकाली, आयुष्याच्या अखेरीस अधिक दृढतरच होत जाते ज्याचे वृद्धापकालात बरेच दिवस जातात अशा दीर्घायुषी बहुतेक लोकांना ह्या प्रकारच्या सौख्याचा अनुभव आलेला असतो, व त्याबद्दल त्यानी खरोखर ईश्वराचे आभार मानावेत

तुम्हीं तर ईश्वराचे आभार त्यांच्यापेक्षांहि अधिक मानावेत. कारण, येथे ह्या विद्यालयात तुम्हाला तारुण्यदशेतील स्नेह सपादन करण्याचे अनेक प्रसग आहेत. त्यातून तुम्ही वयानें, सामाजिक योग्यतेनें, तत्सदृश गुणांनीं व त्यासारख्याच आकाक्षानीं सर्व बरोबरीचे आहात तुमच्यापैकीं कित्येक तर सगोत्र बंधुत्वाच्या बंधनानें एकत्र सलग्नहि आहेत तुमची येथील परिस्थिति अत्यंत सुखावह असल्यामुळें, परस्पर साहाय्य करण्याचे, एकमेकाना हितोपदेश देण्याचे, एकमेकांच्या विचाराचे व भावनाचे वाटेकरी होण्याचे, परस्पर दु खभार कमी करण्याचे, परस्परांच्या सुखानदात भर घालण्याचे तुह्मांला पदोपदी प्रसंग आहेत अत्यंत सुखावह अशा परिस्थितींत तुह्माला हे प्रसंग आले आहेत असें मी ह्मणतों, याचें कारण असें, कीं, आपणास वाटतें व आपली समजूत आहे त्याप्रमाणें, एकपक्षीं तुमचीं अतःकरणें स्वभावसारल्यातिशयानें अगदीं स्नेहपूर्ण आहेत, तर अन्यपक्षीं जेणेंकरून अयोग्य मत्सर अथवा नीच आणि स्वार्थीविकल्प याच्या लहरी मनोदधींत उसळण्याचा संभव असतो अशा सांसारिक गोष्टींच्या संसर्गापासून तुम्ही सुरक्षित आहात.

मला असें वाटतें, कीं, ह्या हितावह परिस्थितीचा फायदा घेऊन तुम्हीं येथे ह्या विद्यालयात चिरकाल टिकणारे स्नेह संपादन केले असतील व करालहि; पण एवढी गोष्ट विसरू नका, कीं, मैत्रीचा पाया सदाचरणांत घातल्यावांचून कोणतीहि मैत्री खरी असूं शकणार नाहीं ! अन्योन्य आदराला अन्योन्य प्रेमाची जोड मिळाल्यावाचून स्नेह जडतच नाहीं, व कोणालाहि, मग तो गरीब असो वा अत्यज असो, वाईटाचा आदर वाटत नाहीं स्नेही म्हटले म्हणजे बुद्धि-सामर्थ्याने, शीलाने अथवा रुचीनेहि सारखेच असले पाहिजेत असें मी म्हणत नाहीं. उलटपक्षीं जे गुण आपल्या अंगीं नाहींत हें आपणास ठाऊक असतें ते जर आपल्या स्नेह्याच्या ठायी दृष्टीस पडले तर आपण त्याबद्दल त्याची वारंवार वाहवाच करतों, व असे करण्यात, जणुं काय आपण एकमेकांच्या उणीवा भरून काढीत असतो असे म्हणता येईल पण माझ्या ह्मणण्याचा आशय एवढाच, कीं, प्रत्येकात सद्गुण हे असलेच पाहिजेत; व दुसऱ्याला त्याची त्याबद्दल प्रामाणिकपणानें प्रशंसा करता येते. आणि परस्पर उत्तेजन व साहाय्य याचा उदय परस्पर प्रशंसेंतूनच होत असतो. कारण, अन्य प्रकार-चेहि सोबती असतात वरवर पाहणाराना त्यांच्यात स्नेहसादृश्य दिसत असतें खरे, पण वस्तुतः ते मित्र मुळींच नसून उलट 'वैरी' या नावालाच ते काहीं अशीं पात्र असतात. म्हणजे, अमुक एखादी गोष्ट वाईट आहे हे माहीत असून ती करण्याच्या हेतूनी, जी गोष्ट उजेडात करता येत नाहीं म्हणून ती लपून करण्यासाठीं, अमगल प्रकारच्या भाषणात आनद मानण्या-साठीं, अथवा विद्यालयातील नियमाविरुद्ध आचरण करण्यासाठीं जीं मुलें एकत्र जमत असतात, त्याची सगति वरील कोटींतलीच होय. माझ्या मित्रांनो ! अशा प्रकारचे स्नेही जो सपादन करीत असतो तो आपल्या व आपल्या सोबत्याच्या मनाला कलक लावीत असतो, व अशा तऱ्हेनें दुहेरी पापाचरणाचे खापर त्याच्या माथीं फुटत असतें. तो जाणूनबुजून स्वतः पाप करीत असतो व दुसऱ्यालाहि पापाचरणांत ओढीत असतो. तुमचें कल्याण व्हावें एवढ्या एकाच हेतूनें ह्या विद्यालयाचे नियम रेखाटलेले आहेत हें तुम्हाला पूर्णपणें ठाऊक आहेच, व तदनुरूप आचरण करण्यांत तुम्ही केवळ स्वतःशींच स्नेहभावानें वागत आहांत व आपल्या सोबत्याला आपला मित्र करण्याचा अत्युत्तम मार्ग म्हटला म्हणजे त्यालाहि तदनुरूप आचरण करण्याचे कामीं साहाय्य करणें हाच होय. पुनः

एकवार हॅमलेट्मधील पोलोनिआच्या शब्दांनींच मी तुम्हाला सांगतों, की, * "दुसऱ्याशीं सख्य करण्याचा हाच सर्व श्रेष्ठ असा मार्ग आहे तूं आपल्या स्वतःशींच खरेपणानें वाग, मग तुला कोणाशींहि खोटेपणाने ह्मणून वागताच येणार नाहीं, व जसा रात्रीच्या पाठोपाठ दिवस हा ठेवलेलाच तद्वत् आपण स्वतः खरेपणानें वागूं लागलों ह्मणजे त्याचे पाठोपाठ दुसऱ्याशीहि खरेपणाने वागणे प्राप्त होते"

* 'Tom Brown's School days' हे पुस्तक बहुतेकानी वाचलें असेल. टॉम ब्राउनला जेव्हा प्रथम शाळेंत घातला त्या वेळीं त्याच्या बापानें त्याला जो उपदेश केला त्याची येथे आठवण झाल्यावाचून राहत नाहीं. "खरें बोल. धीर आणि दया अंत करणात असूं दे व जी गोष्ट आपल्या मातेच्या अथवा भगिनीच्या कानीं पडू नये असें तुला वाटतें ती तूं स्वत: कधींहि ऐकूं नकोस अथवा तिचा मुखावाटे उच्चारहि करू नकोस !"

हाच उपदेश मी तुह्मा सर्वांना करावा असें मला वाटते. तदनुरूप जर तुह्मी वागाल, तर तुह्माला मित्राची वाण कधींहि पडणार नाहीं, याबद्दल माझी अगदीं खात्री आहे

ह्या विद्यालयांत प्रत्येकानें एकमेकांशी खऱ्या मित्रत्वाच्या नात्याने कां वागूं नये, याचें कारण मला दिसत नाहीं. गुरु आणि शिष्य, लहान आणि थोर, हुशार आणि मंद, दुर्बल आणि प्रबल, अशा आपण सर्वांनीं एकमेकासाठीं व सर्वांनी सर्वांच्या कल्याणासाठीं झटून मित्रत्वाच्या नात्यानें एकत्र सुखानें का असूं नये, याचें कारण मला दिसत नाहीं, व ह्या विद्यालयात अशा तऱ्हेच्या मित्रत्वाचा पाया रचला असतां विद्यालयाचा संबंध सुटल्यावर पुढे मोठेपणींहि तो तसाच का टिकूं नये, याचेहि कारण मला काहीं सागता येत नाहीं सारांश, विद्यार्थिदशेतच केवळ नव्हे, तर आमरण, आपल्या साऱ्या आयुष्यात आपणास एकमेकाला केवढी अनुकंपा, केवढे साहाय्य देता येईल !

---

* "This above all To thine own self be true
And it must follow as the night the day,
Thou canst not then be false to any man.

Hamlet, Act 1, Sc 3

# आपल्या शेजाऱ्याविषयीं थोर विचार.

* नारुंतुदः स्यादार्तोऽपि न परद्रोहकर्मधीः ।
ययास्योद्विजते वाचा नालोक्यां तामुदीरयेत् ॥

—मनुस्मृति, अ. २, १६१.

मनुष्याच्या बाह्यवर्तनावरून त्याच्या अगच्या शीलाची व मनाची थोडीतरी, परीक्षा होते यात शंका नाहीं. आणि ही बाब अशी आहे, की, आपल्या परस्पर व्यवहारात तिच्याकडे आपणास दुर्लक्ष्य करिताच येत नाहीं. ती खरोखर इतकी महत्त्वाची बाब आहे, कीं, 'पब्लिक सर्व्हिस' साठीं होणाऱ्या परीक्षामध्ये तिला महत्त्व द्यावे—प्रत्येक उमेदवाराच्या बाह्यवर्तनावरून परीक्षकांच्या मनावर जो काहीं बरावाईट ग्रह होईल त्या मानानें त्याला काहीं गुण द्यावेत—अशा अर्थाच्या सूचना झालेल्या आहेत खरोखर, रोजच्या व्यवहारांत मनुष्याची रीतभात, स्वरूप आणि चेहऱ्यावरील मुद्रा ह्या गोष्टी, त्याचा ज्यांच्याज्याच्याशी निकट सबध येतो त्याच्या मनावर बरीवाईट छाप बसविण्याला प्रमुखत्वानें कारणीभूत होत असतात, हें आपण सर्वजण अगदी कबूल करूं. पण लोकाच्या नुसत्या बाह्य रीतिभातीवरून आणि स्वरूपावरून सकृद्दर्शनी त्याची परीक्षा करण्यात आपल्या हातून ज्या चुका होतात त्यापेक्षा अधिक चुका होण्याचा अन्य कोणत्याहि बाबतीत फारसा सभव नसतो. पहिल्या मुलाखतीला एखाद्याविषयी आपल्या मनावर झालेला प्रतिकूल ग्रह मागाहून त्याची चागली ओळख झाल्यावर आपणास एक तर बदलावा लागतो, किंवा तो अजिबात घालवावा तरी लागतो, असे प्रसग वारंवार येतात. येथे प्रतिकूल ग्रहच असे मी म्हणतो. कारण, प्रथमतः आपल्या मनावर जे चागले ग्रह होतात ते अखेरपर्यंत नेहमी तसेच राहतात. ते अगदीं न्याय्य असतात. आणि केव्हाहि त्याबद्दल पश्चात्तापाला जागा राहत नाहीं. नेहमींच्या अनुभवाप्रमाणें प्रतिकूल ग्रह

---

*स्वत ला दु ख झाले असताहि कोणाच्या मर्मी लागेल असे भाषण करू नये कायेनें अथवा मनाने, आचाराने अथवा विचाराने कोणासहि दुखवू नये दुसऱ्याच्या मनात उद्विग्नता उत्पन्न होईल असे शब्द उच्चारूं नयेत कारण, ह्या सर्व गोष्टी स्वर्गसुखप्राप्तीच्या आड येणाऱ्या आहेत

सामान्यत. खोटे ठरत असतात आणि फिरून आपल्या मनावर होणाऱ्या प्रतिकूल ग्रहाबद्दल जर कोणाजवळ उद्गार काढलेलें असले, कोणाला ते आपण होऊन सागितलेले असले, वा आपल्या वागणुकींत तेणेंकरून काहीं फरक झाल्याचें जर आपण दाखविलें असले, तर आपण आपल्या बाधवाला दुखविल्यासारखें होतें व मागाहून कितीहि आपण कळकळ दाखविली तरी मग त्याची बुजवणूक म्हणून होत नाहीं !

म्हणून प्रथमत· होणाऱ्या सस्कारावर विसंबून न राहण्यासाठी आपण नेहमीं दक्षता ठेविली पाहिजे खुद्द सस्काराविषयीच जर पाहिलें तर त्याच्यापुढे आपला इलाज नसतो. पण ते एखाद्याची बिनचूक परीक्षा करण्याचे कामी आपल्या मुळीच उपयोगी पडत नाहींत, व त्याचा पगडा आपल्या मनावर बसूं देता कामा नये उलटपक्षीं, आपला असा ग्रह का बरें झाला अशी शंका घेण्याकडे, आपल्या शेजाऱ्यात जो अवगुण दिसत असतो तो आपल्याच अवगुणामुळे असतो अशी शका घेण्याची आपली प्रवृत्ति झाली पाहिजे· आणि खरे पाहिले असता, आपल्या स्वत च्या अज्ञानात व वृथा अभिमानांत जेवढा दोष असतो तेवढा खरोखरी तो आपल्या शेजाऱ्यात नसतो ही गोष्ट आपल्या निदर्शनास आल्यावाचून राहत नाहीं·

हरबामजीनी[1] सागितलेली गोष्ट तुम्हीं कदाचित् ऐकिली असेल बॅरिस्टरची परीक्षा पास होण्यास जे काहीं इतर गुण लागत असतात त्यामध्येच तीन निरनिराळ्या प्रसगीं मेजवानीच्या वेळी उमेदवारांनीं इतर ब्यारिस्टराची ओळख करून घ्यावी, असा लिंकन्स इन् येथील सोसाएटीचा नियम आहे. मेजवानी आटोपल्यावर विद्यार्थी जाऊं लागले असता एखाद्या ब्यारिस्टराला जर एखादा विद्यार्थी अयोग्य असा वाटला तर तो खुशाल त्याचा झगा ओढून अथवा त्यानें आणलेलें प्रवेशनपत्र टरकाऊन आपली नापसती दर्शवित असतो· मला वाटते, ज्याच्या मनाची प्रवृत्ति चमत्कारिक असते

---

१ हे मोरवी सस्थानाधिपति ठाकुर साहेबाचे कनिष्ठ बधु असून त्याचे नाव कुमार श्रीहरबामजी असे आहे राजकुमार कॉलेजात अध्ययन झाल्यानतर हे केम्ब्रिज येथील ट्रिनिटी कॉलेजात विद्याभ्यासासाठीं गेले, तेथे ते बी ए ची परीक्षा उत्तीर्ण होऊन पुढे लिंकन्स इनचे बॅरिस्टर झाले हे वऱ्हाडात कलेक्टरच्या हुद्यापर्यंत चाढले होते प्रस्तुत ते भरतपुर येथें दिवाण आहेत.

अशा ब्यारिस्टरांकडेच विद्यार्थ्यांना पास नापास ठरविण्याचें काम देण्याचा हा प्राचीन प्रघात, वकीलीसारख्या सन्माननीय धंद्याची ज्याना परवानगी द्यावयाची असते ते बाह्य स्वरूपावरून तसेंच इतर बाबतीतील आचरणावरूनहि आदरणीय असलेच पाहिजेत, या समजुतीवर पडलेला असावा. इतर सर्व धंद्यापेक्षा वकिलीच्या धंद्यात प्रामाणिकपणाची व अब्रूची फारच गरज असते. तरीपण नुसत्या बाह्य स्वरूपावरूनच केवळ कोणाहि विद्यार्थ्याला कधीं नापास करण्यात येत नाहीं आणि हें अर्थात् अगदीं न्याय्य व रास्त आहे. नाहींपेक्षां आज जे इग्लंडात काहीं नावाजलेले वकील आहेत त्याना वकील म्हणून मुळींच होतां आलें नसतें, हे काहीं मनुष्याच्या हातचे नसते, जात्या स्वरूप जसें असेल तसेंच ते असणार, पण नुसत्या बाह्य स्वरूपावरून फसण्याचा एवढा सभव असतो.

मानवी प्राणी ते मानवी प्राणीच, ते जसे दिसतात तसेच असतात. प्रत्यक्ष आपल्या स्वत च्याच चित्तवृत्तीचा पूर्णपणे बोध होणे किती दुरापास्त असते. मग दुसऱ्याच्या मानसिक वृत्ति नीट कळणे हे त्याहूनहि किती कठिण आहे हे सागावयासच नको. स्वभावानें, शिक्षणानें, सवयीनें, रुचीनें आपल्या एकमेकातच केवढी तफावत असते, आणि निरनिराळ्या वेळीं भिन्न भिन्न परिस्थितीत आपल्या स्वतःमध्येच केवढा विशेष दृष्टीस पडत असतो! सामान्यत असें म्हणतात, कीं, जलपर्यटणाने मनुष्याचे आकाश बदलतें पण मन बदलत नसतें. 'स्वभावो दुरतिक्रम.' या न्यायानें नुसत्या हवेत बदल झाल्यानें किंवा स्थलांतर केल्याने मनुष्याच्या स्वभावात फरक पडणे शक्यच नसतें. आणि हें म्हणणे एथपर्यंत ठीक आहे पण कामाच्या भारानी चेपून गेलेला मनुष्य विश्रातीसाठी व मानसिक स्वास्थ्यासाठीं समुद्रप्रवास करीत असता, जरी त्याच्या स्वभावात काहीं बदल झाला नाहीं तरी, विश्रातीमुळे व हवापालट झाल्यामुळे त्याच्या चेहऱ्यावर अगदी नवीन टवटवी दिसू लागते. कामानें गागरून गेल्यामुळे तो कदाचित् उदास, असंतुष्ट, अप्रिय असा दिसला असेल; पण तोच आता नूतन परिस्थितींत, शिरावर कोणत्याहि तऱ्हेचा बोजा नसल्यामुळे, त्याचा स्वभाव आनंददायक, सोल्हास आणि प्रेमळ असा दिसेल. अशा या निरनिराळ्या परिस्थितींत त्याची ज्याच्या ज्यांच्याशीं गाठ पडली असेल त्यांचा त्यांचा त्याच्या शीलाविषयीं बहुधा निरनिराळाच ग्रह होईल. तथापि मनुष्य तोच

असतो. पण त्याच्या वृत्तीत जो फरक होतो तो परिस्थितीमुळें होतो. त्या परिस्थिति मात्र त्याच्या स्वाधीन नसतात.

हीच गोष्ट आपणा सर्वांना रात्रंदिवस आणि घटकेघटकेस सारखीच लागू आहे. कित्येक स्वभावत च दुसऱ्यापेक्षा अधिक चागले असतात, तर कित्येक अधिक तेजस्वी आणि प्रेमळ असतात कित्येक स्वभावतःच अधिक निस्स्वार्थी असतात, तर कित्येक जात्याच फार हुशार असतात. पण बाह्य परिस्थितीच्या बाबतींत मात्र आपणा सर्वांची स्थिति सारखीच असते त्याचा पगडा आपणा सर्वांवर चालत असतो, व बाह्यपरिस्थितींत नेहमीं रूपातर होत असते व्यामोहाचे व कसोटीचे प्रसग जरी प्रत्येकाचे वेगवेगळे असले तरी ते ह्या जगात आपल्या सर्वांच्या पाठीमागें सारखेच लागलेले आहेत म्हणून प्रत्येक बाबतींत आपल्या शेजाऱ्याला कोणते विशिष्ट व्यामोह आहेत हे जर आपणास कळणे शक्य नाहीं तर तेवढ्याबद्दल प्रत्येक बाबतींत त्याला सवलत देण्यास आपण तयार असलें पाहिजे. नाजुक प्रकृतीच्या कित्येक लोकाना पूर्वेकडील वारा अगदी अप्रिय असतो तरीपण पूर्वेकडच्या वाऱ्याला अथवा तेणेकरून त्याच्या स्वभावावर घडणाऱ्या परिणामाला त्याचा काहीं उपाय नसतो; अशा एखाद्या माणसाची आपली प्रथमच जर गाठ पडली तर बहुवा त्याच्या स्वभावाबद्दल आपला चुकीचा ग्रह होईल, व त्याचा खरा स्वभाव चागला आणि प्रेमळ असण्याचाच फार सभव असेल त्याचा बाह्यात्कारे दिसणारा वाईट स्वभाव आचाराच्या पलीकडे कदाचित् जात सुद्धा नाही. त्याचप्रमाणे सर्व प्रकारच्या शारीरिक विकृतींचा आणि ग्लानीचा शरीराच्या द्वारा स्वभावावर परिणाम होत असतो, व ते परिणाम मनुष्याच्या आचारात भासमान होत असतात इतकेच नव्हें तर ते झाल्यावाचूनहि राहत नाहींत. तद्वतच सपत्तिविनाश व मित्रांची ताटातूट ह्यासारखे आयुष्यात अनुभवास येणारे दु खद व परीक्षा पाहणारे प्रसंग हे आपणापैकीं उत्तम म्हणविणाराच्या अगीं उत्साहक्षीणता आणण्यास कारणीभूत होत असतात, सशक्ताना दुर्बल व मनोहर स्वभावाच्या माणसान' चिडचिडे बनविण्याकडे त्याची प्रवृत्ति असते, व अशा गोष्टी वारंवार घडत आल्या आहेत. त्या वेळीं त्याच्यासबधीं आपणास काहींच कळत नसतें. सशक्त माणसाच्या अगावर सामर्थ्याचे एक चिलखत असतें. त्याच्या आंत त्याचा रक्तस्राव होत असतो व बाहेर चेहऱ्यावर दु.खाची

स्पष्ट छायाहि आपण पाहत असतों, तरीपण जेणेकरून त्याला यातना होत असतात त्या जखमा आपल्याला त्या चिलखतामुळे दिसत नाहींत; त्याचा काटा त्याला कोठें टुपत असतो हे आपणाला कळण्याचा मार्ग नसतो. म्हणून अमुक एखादा मनुष्य दिसण्यात सुखी दिसत नाहीं अतएव तो चागला नाहीं अशी त्याच्याबद्दल घाईनें परीक्षा करिता कामा नये.

सामान्य व्यवहारांतहि ह्याच प्रकार लागू आहे अमक्याचा अमुक अमुक हेतु असावा असा आपण जो आरोप करीत असतो, तो त्या हेतूच्या खरेपणा-बद्दल आपली पक्की खातरी झाल्याविना कधीहि कोणावर आपण लादतां कामा नये ज्याची आपणास फारशी चागली माहिती नसते अशाच्या संबंधीं आपले मत तयार करण्याचे कामीं आपण फार दक्षता ठेविली पाहिजे, व ती मते तोंडावाटे बाहेर काढताना तर त्याहूनहि अधिक दक्षता ठेवणे जरूर असते आजन्म ज्ञान सपादन करून देखील खत च्या हेतूबद्दल आपल्या हातून चुका होण्याचा सभव असतो. मग शेजाऱ्याच्या हेतूबद्दल आपण चुकीस किती अधिक पात्र असूं याचा आपणच विचार करावा मनुष्याच्या हृदयोदराचा थाग आपणास लागणे कधीच शक्य नसते, व त्याचे अतस्थ विचार काय असतात हे आपणास केव्हाहि कळत नसते.

साराश ह्या कीं, आपण सर्व माणसाविषयीं उदार बुद्धीनें व प्रेमानें विचार करावा व तदनुरूप आपण आपलें वर्तन ठेवावे. माझी पक्की खातरी आहे, कीं, वाईट स्वभाव म्हणून जो दिसत असतो तो दहात नऊ जणामध्ये मानसिक दुर्गुणापेक्षा काहीं अशी शारीरिक दौर्बल्यामुळेंच होत असतो. आणि असा हा वाईट स्वभाव प्रेमपूर्ण दृष्टीने व मृदुवचनानें वारंवार बदलतो. येथे या काठेवाडातच कितीतरी निर्दय गोष्टी आपल्या नेहमी कानीं येत असतात. अशा निर्दय गप्पा कर्णोपकर्णी पसरविण्यात लोकाना काय आनद वाटत असेल कोण जाणे. आनद का वाटावा याचें मला तर काहीं कारण दिसत नाहीं. माझी कल्पना अशी धावते, कीं, केवळ अविचाराने शिळोप्याच्या काहीं तरी गप्पा माराव्यात एवढ्याचसाठीं ते वाटेल त्याच्याजवळ त्या सागत सुटतात. कारण, काठेवाडात काय अथवा अन्यत्र कोठें काय मानवी स्वभाव जाणून बुजून एवढी निर्दयता दाखवील अशी कल्पनाच करणें मला प्रशस्त वाटत नाहीं. पण असल्या कित्येक गोष्टी खोट्या ठरलेल्या मला ठाऊक आहेत. आणि त्या सर्वांत

अथवा जवळ जवळ बहुतेक सर्वांत, कांहींतरी निर्दयतेनें तिखटमीठ लावून फाजील वर्णनाचाच भाग असतो, अशी माझी खातरी आहे. असल्या गोष्टीवर कधींहि विश्वास न ठेवण्याबद्दल आपण दक्ष असलें पाहिजे व केव्हांहि आपण त्या आपल्या मुखावाटे काढता कामा नयेत. जरी एखाद्या बाबतींत ह्या गप्पा खऱ्या असतील असें आपणास मानण्याला अथवा शंका घेण्याला सबळ कारण असलें, तरी देखील अशा प्रसंगीं आपण तिचा उच्चार न करण्याविषयी सावध असलें पाहिजे. तोंडावाटे बाहेर काढण्याने कांहींच फायदा होत नसतो; उलट हानि होण्याचाच फार करून संभव असतो. एकदा एखादी कंडी आपल्या तोंडातून बाहेर पडली, कीं, मग ती अनिष्ट का असेना, ती आपल्या ताब्यातून जाऊन सार्वजनिक मालकीची होते ही गोष्ट विसरता कामा नये तेणेंकरून वाईट प्रकारच्या गप्पामध्ये आपणहि एकप्रकारें निर्दयतेची भरच घालीत असतों.

कारण अथवा प्रमाण असो वा नसो कांहींएक विचार न करता नीच-पणानें, वाटेल तसा आपण इतराविषयी जो विचार मनात आणित असतों त्या बेअब्रूबद्दल जर ईश्वराच्या सिंहासनासमोर जाब देण्याची पाळी आली तर आपणास काय उत्तरें देता येतील? प्रेम ही फार अमोल वस्तु आहे, व आपले आवडतें काम आपल्या विचारांना आपआपल्या व्यवसायात गर्क ठेवित असतें. ईश्वरावर आणि मानवजातीवरहि प्रेम करा. स्वतःविषयीं वाटेल तितका आपण वाईट विचार केल्यास हरकत नाहीं. उलट तसा जितका अधिक आपण विचार करू तितके अधिक तें श्रेयस्कर असतें. पण आपल्या शेजाऱ्याविषयी मात्र आपल्याकडून होईल तितके प्रेमानेंच आपण विचार करीत असावें एवढेहि नच साधेल तर निदान मूग गिळून तरी आपण असावें. 'मौन सर्वार्थसाधनं'.

# परमभाग्यशाली महाराणी.

'Thro' all this tract of years
wearing the white flower of a blameless life".

—Tennyson.

इ. सन १८८७ साली सर्व लोकांचीं मनें महोत्सवाने आनदपूर्ण झाली होतीं. सचित्र वर्तमानपत्रें महाराणीच्या चित्रानी, तिचें चरित्र व कारकीर्द याच्या वर्णनानी अगदीं भरून निघाली होतीं, तीं तुम्हीं सर्वांनी पाहिलेलीच असतील. त्यापूर्वीहि तिच्याविषयीं वर्णने ग्रथित करून ठेवलेली होतीच. पण तीं सर्वच तुमच्या अवलोकनातून कदाचित् गेलेली नसतील. तो महोत्सव येथे राजकोटातहि राजनिष्ठापूर्वक साजरा करण्यात आला होता व त्या संस्मरणीय वर्षाच्या महोत्सवात साम्राज्याच्या यच्चयावत् इतर भागाप्रमाणेच हिंदुस्थानाच्या दृष्टीनेहि फार मोठा अर्थ होता, हे तुम्हांला ठाऊक आहेच.

ह्या महोत्सवाला इंग्रजींत Jubilee (ज्युबिली) असें म्हणतात. प्रथमतः या शब्दाला हा अर्थ कसा प्राप्त झाला हे आपण पाहूं. हा शब्द मूळ हिब्रू Yobel या शब्दापासून व्युत्पन्न झालेला असून त्याचा अर्थ 'मेषशृग' अथवा 'मेषशृंगाचें केलेले तूर्यवाद्य' असा आहे यावरूनच पुढें त्याला 'तूर्याचें वादन' व विशेषेकरून 'आनददर्शक तूर्यवादन' असा अर्थ प्राप्त झाला. या तूर्यवाद्याच्या द्वारा ज्यूलोकामध्ये आनंददायक पन्नासावे वर्ष लागल्याची द्वाही फिरविण्यात आली होती. त्या वेळी सर्व बंदीजनानां कारागृहवासातून मुक्त करण्यांत आले होते. लोकाकडून येणें असलेला सर्व पैसा माफ करण्यात आला होता. जप्त झालेल्या जमिनी ज्यांच्या त्याना परत देण्यात आल्या होत्या. त्यामुळे विशेषेकरून ज्यूलोकामध्यें या शब्दाला 'स्वातंत्र्यसुखाचें आनददर्शक पन्नासावें वर्ष' असा अर्थ निष्पन्न झाला, व त्यांच्याखेरीज इतर राष्ट्रांत त्या शब्दाचा अर्थ कोणताहि महोत्सव एवढाच घेऊं लागले. पन्नास वर्षांच्या कालावधीच्या कल्पनेचें त्याला साहचर्य असलें वा नसलें याची त्यानी पर्वा केली नाहीं. आपल्या ह्या

महोत्सवांत पन्नासाच्या कल्पनेला अर्थातच फार महत्त्व होतें, व तें सानंद आभार प्रदर्शित करण्याचे वर्ष होतें. कारण त्या वर्षी महाराणीच्या कारकीर्दीला पन्नास वर्षें पुरीं झालीं होतीं.

आता सानंद आभार मानणें याचा वास्तविक अर्थ तरी काय? पन्नास वर्षांचें राज्य म्हणजे पन्नास वर्षें हीं जितकीं लाबलचक तितकेंच तें सुखी असतें असा अर्थ होतो काय? आणि अतएव आपण आनंद प्रदर्शित करतों? नुसती वर्षमालिका ही सुखाशीं समानार्थक आहे काय? दीर्घकाल टिकणारें राज्य, मग तें चांगलें असो वा नसो, अवश्यमेव सुखकर असलेंच पाहिजे काय? दीर्घकाल टिकलेलें राज्य नेहमींच सुखदायक असते असें नाहीं, व तें जर चागलें नसले तर ज्याचा ज्याचा त्याच्याशीं सबध येतो त्या सर्वांना विपत्तींत किती हाल काढावे लागतात हे सामान्यत अनुभवावरून निदर्शनास आलेलें नाहीं काय? व ह्या विशिष्ट बाबतींत महाराणीची कारकीर्द जरी चांगली व महनीय अशी होऊन गेली तरी स्वत. त्याच्या नशिबीं अखंड सौख्य नव्हतें हें खरें नाहीं काय?

मग हा सर्व आभार मानण्याचा देखावा कशासाठीं? महाराणीनें ह्या महोत्सवाच्यापूर्वी नुकतेंच होम सेक्रेटरींना एक पत्र लिहिलें होतें. त्यात त्यानीं आपण होऊनच ह्या प्रश्नाची उत्तरें दिलेलीं आहेत ते असें:— "माझा जो अत्यंत उत्सुकतेनें जिकडे तिकडे सन्मान होत आहे त्याच्यावरून एवढे स्पष्ट दिसत आहे, कीं, गेल्या उभ्या पन्नास वर्षांत जे परिश्रम मला करावे लागले व जी चिता मला रात्रंदिवस वाहावी लागली तिचें मर्म माझ्या प्रजेनें ओळखले, आता एवढी गोष्ट खरी, कीं, त्या पन्नास वर्षांपैकीं पहिलीं बावीस वर्षे माझ्या प्रियतम पतीच्या सहवासात निष्कलक सौख्याचा अनुभव घेत आनदाने मला घालविता आलीं, व तितकाच कालावधी पतीच्या आश्रयावाचून व साहाय्यावाचून दु खात व कसोटीच्या प्रसगात मला कंठावा लागला."

आमरण परिश्रम व चिंता, जितके सुख तितकेंच दु.ख व परीक्षा पाहणारे प्रसंग, पतिविरह, वीराला साजेल असा निस्स्वार्थीपणा, ह्यांचा तिच्या पन्नास वर्षांच्या कारकीर्दींत लाखों लोकाच्या मनावर एवढा परिणाम झाला, कीं, जगाच्या कानाकोंपऱ्यापासून चारी दिशानीं तिच्या प्रजेला व तसेंच इतर राष्ट्रांनाहि,

आपल्या सोत्कंठित प्रशंसेला व्यक्तस्वरूप देण्याचा महोत्सवासारखा प्रसंग आलेला पाहून खरोखर आनंद झाला होता. एवढे विरहजन्य दुःख व कष्टतम प्रसंग येऊनहि ज्यानें आपल्या गादीचें वैभव अधिक चांगल्या रीतीनें राखिलें अथवा, भूतलावरील साऱ्या लोकांच्या मनावर अधिक चिरसंस्मरणीय असा संस्कार केला, असा आजवर एकहि सार्वभौम राजा झालेला नाहीं. महोत्सवाचा जो कांहीं अर्थ आहे तो हाच.

अखिल ब्रिटिश साम्राज्याला महाराणीबद्दल अभिमान वाटत आहे. कारण, महाराणी म्हणजे स्त्रीवर्गाच्या ठायीं असणाऱ्या यच्चयावत् उच्चतम गुणाची, सुसंस्कृततेची, अखिल मानवजातीला उन्नतकारी गुणाची ती प्रतिनिधीच होऊन गेली असें त्याला वाटते ती जरी इतकी उच्चपदारूढ होती तरी आपल्याशी ती अगदीं मिसळून वागत होती, अशी तिच्या प्रजेची भावना होती. प्रजेशी ती अगदी एकजीव होती. परस्पर प्रेम व अनुकंपा यांच्या रज्जूंनी तिचें उदार अंतःकरण प्रजेच्या अंतःकरणाशीं अगदीं निगडित होतें. तिचे प्रेम आमरण अगदी एकसारखें होते, त्यांत केव्हांहि अंतर पडलें नाहीं हे लोक जाणून आहेत. प्रजेचे प्रेमहि तिजवर तितकेंच होतें. हें प्रेम मूर्तस्वरूपानें व्यक्त करून दाखविणें ह्यालाच 'ज्युबिलि' म्हणतात.

महाराणीच्या कौमार्यावस्थेतील काहीं गोष्टी तुम्हांला मला सांगाव्याशा वाटतात. महाराणीची ब्यारोनेस् लेहजेन् नामक एक गव्हर्नेस् होती. तिचीच एक गोष्ट मी तुम्हाला प्रथम सांगतों.

महाराणी बारा वर्षांची असतांनाच आपणच गादीचे वारसदार मालक होणार ही गोष्ट तिला प्रथमतः कशी कळली हे त्या गोष्टीवरून ध्यानात येईल. त्या वेळीं तिचा चुलता राजा वुइल्यम् (४ था) हा राज्य करीत होता. तो निसंतान वारल्यामुळें त्याच्या पाठीमागून महाराणी ही इ. १८३७ चे जून महिन्यात गादीवर बसली. त्या ब्यारोनेसने राजकुमारीच्या इतिहासांत एक राजघराण्याची वंशावळ जोडली होती. तें पुस्तक उघडून पाहतांच ही वंशावळ पूर्वी कधीं आपल्या दृष्टीस पडली नाहीं, असें राजकुमारी व्हिक्टोरियानी बोलून दाखविलें. त्यावर ब्यारोनेस म्हणाली "तें आपल्या नजरेस पडावेंच असें कांहीं वाटलें नव्हतें." राजकुमारी म्हणाली "मला वाटलें होतें त्यापेक्षां गादीला मी फारच जवळची वारसदार आहें हें आतां

माझ्या ध्यानात आलें" त्यावर गव्हर्नेसनें उत्तर दिले "बाईसाहेब, आपण म्हणतां तसेंच अगदीं आहे." हें ऐकून राजकुमारी क्षणभर थाबली व मग तिनें उत्तर दिले "आता कितीतरी मुले गर्वानें नुसतीं फुगतील; पण त्याना अडचण काय आहे, हें काय ठाऊक जितके वैभव अधिक तितकीच जबाबदारीहि अधिक असते" बोलताना तिने आपलें बोट मोठ्या आवेशाने वर उचलले होतें व तिनें गव्हर्नेसला अभिवचन दिले, आणि ती म्हणाली "मी चागली झाल्यावांचून राहणारच नाहीं. लॅटिन भाषासुद्धा मी शिकावी असा जो मला एवढा आग्रह केलात त्याचें कारण आता माझ्या ध्यानांत आलें. माझ्या दोन मावशी आगस्टा व मेरी, ह्या लॅटिन् कधीच शिकल्या नव्हत्या लॅटिन् म्हणजे इंग्रजी व्याकरणाचा व पदलालित्याचा पाया आहे ही गोष्ट तुम्ही मला सागितली होतीत, व तुमच्या इच्छेप्रमाणे मी लॅटिन् शिकलेंहि खरें, पण या सर्व गोष्टींचा उलगडा माझ्या आता चागला ध्यानात आला." फिरून तिनें एकवार सागितले "मी चागलीच होईन" ह्यावर ब्यारोनेस म्हणाली "पण तुमची चुलती ॲडलेड् ( ४ थ्या वुइल्यम राजाची राणी ) ही अझून तरुण आहे तिला मुलें होतील व तसे झाल्यावर अर्थातच आपल्या वडिलाच्या पाठीमागून तींच गादीवर येतील, तुमचा हक्क पोंहचणार नाहीं" ह्यावर तिनें असें उत्तर दिलें "आणि असें जरी झालें तरी मला कधीहि निराशा वाटणार नाहीं. कारण मजवर जें ऑंट् अडलेड्चे प्रेम आहे त्यावरुन मी सागते, कीं, त्याना मुलें म्हणजे जीव कीं प्राण असतात."

महाराणीच्या ठायी मनाचे औदार्य व आपल्या उच्चपदाबरोबर येणाऱ्या कर्तव्याची थोर जागरूकता केवढी होती, हे वरील गोष्टीवरून तुमच्या ध्यानात येईल मी चागली होईनच असें ती ह्मणत होती व त्याप्रमाणें ती झाली. ह्या विद्यालयांतील प्रत्येक तरुण राजकुमाराला पुढे आपल्या आयुष्यात त्याहून जरी कमी प्रमाणानें जबाबदारीचीं व दुस्तर अशा कर्तव्ये बजवावीं लागतीलच तरी प्रत्येकजण आपल्या महाराणीचें उदात्त उदाहरण डोळ्यांपुढें ठेवून, येथे मिळणारे धडे चागले मनात ठसवून चांगले निपजण्याचा प्रयत्न करील, तर केवढें श्रेयस्कर होईल !

येणेंप्रमाणें सरलपणानें पण उत्कृष्ट तऱ्हेनें सुशिक्षण संपादन करीत आपली माता डचेस् ऑफ् केंट् हिच्या पोक्त जोपासनेंत व [illegible] सहवासात

तिचें बाळपण गेलें. कायद्यानें ती कोठें नुकतीच वयात आली होती. म्हणजे जेव्हा ती गादीवर बसली तेव्हा तिचें वय अठरा वर्षांचें होतें

तिनें आपला वेळ कसा तो वाया घालविला नाहीं. आणि राज्यारूढ झाल्यानतर लागलीच जेव्हा मुख्य प्रधानाने भाराभर सरकारी कागद तिच्यापुढे ठेवून तिला तसदी दिल्याबद्दल क्षमा मागितली, तेव्हा ती म्हणाली "असल्या बाबीकडे द्यावें लागणारें लक्ष्य म्हणजे आलटून पालटून कार्य-व्यापृतताच होय." विद्याभ्यास सोडून फार दिवस लोटले नाहींत तोंच राज्य-सूत्रे हातीं आलीं व तेणेंकरून फुरसुद कशी ती तिला आजन्म मिळाली नाहीं.

ज्या ॲबेमध्यें तिची पन्नासावे वर्षाची ज्युबिली मोठ्या ऐश्वर्यानें साजरी करण्यात आली होती त्याच ठिकाणी तिने इ. स. १८३८ सालीं जून महिन्याचे २८ वे तारखेस मुकुट धारण केला होता व इ स १८४० चे फेब्रुवारींत ड्यूक ऑफ् सेक्सकोबर्ग—गोथा याचे चिरजीव राजकुमार आलबर्ट याच्याशीं तिचे लग्न झालें होतें. त्या वेळेपासून इ. स. १८६१ चे डिसेंबरात घडलेल्या राजकुमार कन्सर्टच्या निधनाच्या दु:खद प्रसगापर्यंत तिचे आयुष्य फार सुखात गेले. ह्याची हकीकत तिनें स्वतः केलेल्या "Leaves from the Journal of our Life in the High-lands" नामक ग्रंथात तुम्हास पाहावयास सापडेल. ह्या ग्रंथाचे गुजराथींत भाषातर मि. भावनगरी ह्यानी केलेले आहे. पतिवियोगजन्य अपरंपार दुःखाने तिचे पुढचें सारें आयुष्य दु:खात गेले, जिकडेतिकडे काळया कुट्ट ढगाची छाया पडली होती, व पतिवियोगानतर तिने सार्वजनिक कृत्यात कसें तें अग घेतले नाहीं. इतक्या निर्जनवासांत तिनं आमरण दिवस काढले. ज्याचा जीव म्हणजे आपला अर्धा प्राण असें तिला वाटत होतें त्या पतीबरोबर जेथे तिला इतउत्तर सुखसमभागी होता येणे शक्य नव्हते अशा राजकीय प्रदर्शनातून तिने आपले अग काढून घेतले होतें. पण पतिवियोगदु खानें दु खित असतांहि आपल्या प्रजेच्या दुःखाबद्दल व गरजांबद्दल तिच्या हृदयांत अनुकपा कमी होती असे नाहीं. प्रजा व प्रजेचीं दुःखे हीं तिच्या उदार अतःकरणात सदैव अतिशय जागृत होतीं. प्रिन्स कन्सर्टच्या निधनानतर लागलीच जेव्हा एका कोळशाच्या खाणीत भयंकर अपघात होऊन खाणींतील असख्य लोक मृत्युमुखीं पडले तेव्हा तिने जो उघड्या पडलेल्या विधवानां व मातानां अत्यत करुणार्द्रतेनें अनुकपायुक्त निरोप पाठविला त्यांत तिनें म्हटलें होते, कीं, "मजवरहि

असाच प्रसंग असल्यामुळें तुमच्याविषयी मला विशेष दुःख वाटत आहे" पतिवियोगजन्य मानसिक विरक्ततेमुळें जरी ती आपल्या प्रजेमध्यें उघडपणें मिसळून वागली नाहीं, तरी तिच्या एकदर आचरणांत प्रजेविषयीं खरी कळकळ थोडीथोडकी होती असें नाहीं. गरीब असो नीच असो, अमीर असो उच्च असो, सर्वांशीं तिची वागणूक सदैव सारखीच पोक्त, विचारी, न्यायी, अनुकंपायुक्त व दयार्द्र अशी होती. आपल्या पतीची आठवण म्हणून आपल्या आयुष्याचा उत्तरार्ध तिनें केवळ पतीलाच अर्पण केला होता असें नाहीं, तर तो आपल्या प्रजेलाहि अर्पण केला होता. आणि ज्या राज्ञीला आपल्या पतीची आठवण आपल्या हृदयात इतकी जागृत ठेवता आली तिच्याकडून आपल्या प्रजेविषयीं महान् व औदार्यपूर्ण अनुकंपा दाखविण्यात कसूर होण्याचा सभवच नाहीं असें मि. ब्राईट्सारख्या प्रसिद्ध इंग्रज मुत्सद्याच्या तोंडून निघालेले उद्गार जितके कोमल तितकेच खरे होते.

हिंदुस्थानातील आपल्या प्रजेविषयींहि वात्सल्याचा तिच्या ठायी अभाव होता असें नाहीं. इकडे जेव्हां जेव्हा सकट उद्भवे तेव्हा तेव्हां तिजकडून अनुकंपायुक्त निरोप येत असत. हिंदुस्थानातून कोणी तिच्या भेटीसाठीं गेले असता ती त्याचा मोठ्या आनंदाने सन्मान करीत असे, व खुद्द काठेवाडातून जातीनें तिचें अभिनदन करण्यासाठीं म्हणून गेलेल्याचा तिनें केवढा सानुकंप सत्कार केला होता हें आपणा सर्वांनां ठाऊक आहेच. तिनें व तिच्या घराण्यातील सर्व मंडळीनी हिंदुस्थानातील प्रजेच्या कल्याणार्थ व उत्कर्षार्थ सदैव स्नेहपूर्ण कळकळ दाखविली होती. जनाना स्त्रियांत कुशल डाक्टरिणींच्या औषधोपचाराचा प्रघात पाडण्यासाठीं लेडी डफरीनूनें केलेल्या उदात्त प्रयत्नांत तिनें केवढी कळकळ दाखविली होती हें आपणास ठाऊक आहेच. आणि सामान्यतः साम्राज्याच्या कल्याणाच्या बाबतींत तिनें खरोखर अत्यंत कळकळ बाळगिली होती. हिंदुस्थानांतील राज्यकारभाराच्या धोरणाबद्दल पाहावयाचें झाल्यास आपण नुसता तिचा १८५८ सालचा प्रसिद्ध जाहिरनामा वाचावा, म्हणजे तिचे व तिच्या प्रधानाचे हेतु किती परोपकार व समताबुद्धीनें प्रेरित होते, हें दिसून येईल. ही समताबुद्धि आपल्या छत्राखालच्या प्रजेसंबंधीच केवळ होती असें नाहीं तर ती यच्चयावत् एतद्देशीय संस्थानांविषयींहि होतीच. हीं संस्थानें आपआपला वेगळा स्वतंत्र

अधिकार चालवून ब्रिटिश सरक्षणाचें व शाततेचें अनुपम सुख आज अनुभवीत आहेत.

पण विशेषेंकरून जे तुम्हाला सागावयाचे ते महाराणीच्या राजकीय धोरणाबद्दल नव्हे. ते काहींसें तिच्या खाजगी वर्तनक्रमाबद्दल होय. ज्या आचरणामुळें महाराणी व्हिक्टोरियाच्या राजकीय धोरणाला उच्च व सन्माननीय असें सामर्थ्य प्राप्त झाले होते, व जेणेकरून तिची कीर्ति आपल्या राजनिष्ठ प्रजेच्या हृदयमंदिरांत कायमची विराजत होती, अशा आचरणाविषयीच मला तुम्हाला सागावयाचे आहे. सन १८८७ साली ज्युबिली करून जी सार्वत्रिक प्रशंसा व जो आदर व्यक्त करून दाखविण्यांत आला होता तोहि तिच्या अंगच्या ह्या सर्वमान्य गुणाबद्दलच होय. "समुद्रातील अत्यंत दूरवरच्या बेटातून, आस्ट्रेलिया व जपानमधून, चिली व कॅनडिअन शहरातून, युरोपच्या प्रत्येक राजधानीच्या शहरातून व अमेरिकाखडातील बहुतेक मोठमोठ्या शहरांतून तिला अभिनदनपर अथवा तिच्या सन्मानार्थ झालेल्या उत्सवाच्या हकीगतीच्या तारावर तारा येऊन कोसळल्या होत्या सयुक्त सस्थानाचे अध्यक्ष, चीनचे बादशहा व युरोपातील यच्चयावत् मुकुटधारी राजे या सर्वांनी तिच्या राज्याच्या चिरस्थायीपणाबद्दल आनंद व तिच्या वर्तनाविषयी अनुकपा व्यक्त करून दाखविली होती" तिच्या राजकीय धोरणापेक्षा तिच्या अगच्या गुणाबद्दलच तिची एवढी प्रशंसा व सत्कार झाला होता हे तुमच्या ध्यानात येईल तिचें राज्यहि फारच चागलें व अनुपम होऊन गेलें, यात शंका नाहीं, तिच्या कारकीर्दीतील पन्नास वर्षांत इग्लंड व हिंदुस्थान या दोन्ही देशाचा अगणित उत्कर्ष झाला. पोस्ट आफिस, वाफेचे सामर्थ्य व उपयुक्तता, टेलिग्राफ व टेलीफोन् ( विद्युत्संदेश ) आणि सुएझचा कॅनल इत्यादि बाबतींत फारच आश्चर्यकारक सुधारणा घडून आल्या. भौतिकशास्त्राच्या शोधाने मानवजातीच्या सपत्तींत आणि सुखात केवढी तरी भर पडली आणि ह्या सर्व गोष्टी व्हिक्टोरियाराणीच्या कारकीर्दीच्या इतिहासात नमूद झाल्या आहेत. पण असल्या गोष्टी कोणत्याहि राज्यात व राजछत्राखालीं घडण्याचा सभव आहे. त्या गोष्टी सुधारणेच्या व राज्यकारभाराच्या होत. त्या राजकर्त्याच्या स्वगुणाच्या बाबी नव्हेत. त्याचा मानवी अत:करणावर संस्कार होत नाहीं. ज्याचा आपल्या मनावर संस्कार घडत असतो ते मनुष्याचें स्वत:चे उदाहरण

होय व त्याप्रमाणें आपल्या महाराणीच्या स्वत:च्या आचरणाचा व अंगच्या चांगुलपणाचा संस्कार आपल्या मनावर झालेला आहे. आणि जगाला जर कशाची आठवण राहील तर ती याच गोष्टीची. प्रस्तुत बहुतेक राष्ट्रांना जे गुण प्रमाणभूत वाटत आहेत ते हेच होत.

पृथ्वीवरील साम्राज्याहून श्रेष्ठ असें एक साम्राज्य आहे. ते पवित्रतेचे व प्रेमाचें साम्राज्य आहे. ते देवाचें साम्राज्य असून त्याचे आपण सर्व राज्यकर्ते व प्रजाजन सारखेच सभासद आहोंत. आणि ह्या जगांत ज्याची अधिकारपदावर योजना होते, मग तो आपल्या महाराणीप्रमाणे साम्राज्य-पदारूढ असो वा तुमच्यापैकीं काहींजण जे पुढे अल्पप्रमाणवर राज्यशकट चालवितील ते असोत, त्यानी एवढे लक्ष्यांत ठेवलेच पाहिजे, कीं, सर्व श्रेष्ठ राजाधिराज जो ईश्वर त्याच्यासबधी आपणाला एक कर्तव्यकर्म करावयाचें आहे. ह्याच मार्गाचा अवलब केल्याने त्याला आपलें मानवजातीसंबधीं कर्तव्यकर्म यथार्थपणें बजावितां येईल. ह्याच मार्गाने त्याला आपली कीर्ति दिगतरीं चिरसस्मरणीय करता येईल. कारण, हें जग व जगडंबर आज आहे व उद्या नाहीं. तीं चिरकाल टिकणारी नाहींत. पण जो राज्यकर्ता ईश्वरी ईच्छेने वागतो तोच ईश्वराच्या प्रीतींत व कृतज्ञ लोकाच्या हृदयात सदैव वास करीत असतो.

यथा हि गर्भिणी हित्वा स्वप्रियं मनसोऽनुगं ।
गर्भस्य हितमादत्ते तथा राज्ञाप्यसंशयं ॥
वर्तितव्यं कुरुश्रेष्ठ सदा धर्मानुवर्तिना ।
स्वप्रियं तु परित्यज्य यद्यल्लोकहितं भवेत् ॥
धर्मेण निधनं श्रेयो न जयः पापकर्मणा ।
अधर्मयुक्तो विजयो ह्यध्रुवाऽस्वर्ग्य एवच ॥

— महाभारत.

# मुक्या प्राण्यांवर दया.

* " The Being that is in the clouds and air,
That is in the green leaves among the groves,
Maintains a deep & reverential care
For the unoffending creatures whom He loves "

—Wordsworth's ' Hart-leap Well "

गरीब बिचाऱ्या हिंदुस्थानावर ज्यानी अनेक स्वाऱ्या केल्या व निष्कारण रक्ताच्या पुरात त्याचीं मैदानें बुडवून काढिलीं त्याच्यापैकीं अत्यंत क्रूरतेनें धुडगुस माजविणारा असा बहुधा गझनीचा महमुदच होऊन गेला. त्याचा वडील जो सबक्तगीन त्याच्याविषयीं एक मोठी हृदयद्रावक गोष्ट सागतात. सबक्तगीन ह्याचा जन्म जरी राजकुळात झालेला होता, तथापि गझनीचा पहिला राजा जो अलप्तगीन ह्याचे पदरीं तो प्रथमतः गुलाम म्हणून राहिला होता[1]. पण ज्या अर्थी त्याचा विवाह अलप्तगीनच्या मुलीशीं होऊन त्याच्या पश्चात् तो गादीवर बसला त्या अर्थी निवळ गुलामापेक्षा त्याच्या ठायी थोडीतरी अधिक योग्यता होतीच, हें उघड आहे. तथापि तो आपल्या तारुण्यात फार गरीब स्थितींत होता ती गरीबी एवढी, कीं, त्याच्याजवळ काय तो एकच घोडा होता व त्यावर बसून निशापुरच्या सभोंवतालच्या मैदानात शिकार करण्यात तो आपला बहुतेक वेळ घालवीत असे. त्या वेळी तो निशापुर येथेच राहत होता. एके दिवशीं अकस्मात् एक हरीण आपल्या पाडसासह निर्धास्तपणें चरत असताना त्याच्या दृष्टीस पडलें. त्यासरसें त्यानें आपल्या घोड्याला टाच मारून त्याला भरधांव काढिलें व त्या पाडसाला ताबडतोब पकडलें व त्याचे पाय

---

* 'ढगात व वातावरणातहि ज्याचें वास्तव्य आहेच, रानावनातील झाडाच्या हिरव्यागार पर्णातहि जो आहेच असा स्थिरचरव्यापी परमेश्वर मुक्या निरपराधी प्राण्यावर प्रेम करून त्याचा अत्यत कळकळीने व आदरपूर्ण योगक्षेम वहात असतो '

१ बुखाऱ्याचा तुर्कराजा अब्दुल मलीक याच्याजवळ अलप्तगीन नावाचा एक तुर्क गुलाम होता. त्याने इ स ९६७ च्या सुमारास स्वपराक्रमावर गझनी येथे स्वतंत्र राज्य स्थापिले तो ९७६ त मरण पावला व पुढें त्याचा जावई सबक्तगीन हा राज्य करू लागला त्याने इ. स. ९९७ पर्यंत राज्य केलें.

—सरदेसाईकृत शालोपयोगी भारतवर्णन.

बाधून त्याला मोठ्या तजविजीने आपल्या पुढे खोगीरावर घातलें व शहराकडे परत जाण्यास तो निघाला पण तो जसा परत जाऊं लागला तसें ते हरीण करुणावह रीतीने सारखी त्याच्याकडे टक लावीत त्याच्या पाठोपाठ येऊ लागलें त्या वेळी सबक्तगीनाचे अत करणात दयेचा पाझर इतका काहीं फुटला, कीं, त्याने त्या पाडसाला लागलीच सोडून दिलें त्याबरोबर ते हरीण आपल्या पाडसाला घेऊन शेतातील जीवनस्वातन्त्र्यसुखाचा अनुभव घेण्यास हर्षनिर्भर होत्साते परतले पण परत जातांना मधून मधून मागे वळून कृतज्ञतेच्या व प्रेमाच्या अश्रुपूर्ण विशालनेत्रानी सारखी टक लावून सबक्तगीनाकडे ते बघतच होतें आणि त्याच रात्री त्याच्या स्वप्नात एक तेजस्वी पैगबर येऊन त्याला म्हणाला "हे अमीर[1] नशिरुद्दीन सबक्तगीना! एका निराश्रित व दु खी मुक्या प्राण्यावर जी आज तूं अत्यंत दया दाखविलीस ती ईश्वराच्या न्यायासनासमोर रुजू होऊन त्याच्या मंत्रिसभेत राजाच्या यादीत तुझे नाव दाखल करण्यात आलें आहे. अतएव ह्याच रीतीने तूं आपल्या अखिल प्रजेशीं सदैव वर्तन ठेव, व ह्या दयेच्या गुणाचा केव्हाहि त्याग करूं नकोस कारण, इहपरलोकीं सौख्याचे दोन जिवत झरे जर कोणते असतील तर ते प्रेम आणि दया हेच होत."

ही फार पुराण गोष्ट आहे. तथापि ती सर्वांशींच खोटी असेल असे मानणें माझ्या फार जिवावर येते. काहीं झाले तरी तेवढ्यावरून मुसलमानी धर्मपंथाची कोमल बाजू, त्यांच्यातील दया हा गुण, सत्यपणे आपल्या निदर्शनास येतो, व तो पथ आज जिवत आहे व राहिलाच पाहिजे याचे कारण तरवारीचा जोर व जुलूम हें नसून काहीं अशीं दयेचीं व प्रेमाचीं कृत्यें हींच होत.

प्रस्तुत विषयाचा उपन्यास या वरील गोष्टीनेंच करणें मला उचित वाटले. कारण, कनिष्ठ कोटींतील मुक्या जनावरावर प्रेम या विषयावर तुम्हाला आज चार शब्द सागण्याची माझी इच्छा आहे. हा विषय मनात येण्यास आणखी एक कारण असें की, मुंबई येथील प्राणिनिर्दयताप्रतिबंधक मडळीची एक शाखा काठेवाडांत स्थापन करण्याची सूचना लोकापुढें

---

१ भावी राज्यपदाच्या पूर्वज्ञानानेच जणु काय त्याने त्याला 'अमीर' म्हणून सबोधिलें, हे तुमच्या लक्ष्यात येईलच चे मॅ

आलेली होती. ही सूचना कुमार श्रीहरबामजी यांनी केलेली असून ती त्याच्या सौजन्यपूर्ण शीलाला अनुरूप अशीच आहे इंग्लंडाहून परत इकडे आल्यावर त्याच्या मनाला अत्यंत अद्भुत अशी जी गोष्ट वाटली ती गरीब बिचाऱ्या भारवाहक पशूच्या यातनाबद्दल दिसून येणारी शोचनीय अनास्था ही होय. ते पशु सार्वजनिक रस्त्यातून आपल्या किती उपयोगी पडत असतात. आणि त्याचे म्हणणे अगदी यथार्थ होते यात संदेहच नाहीं खरोखर, हिंदुस्थानात जनावराना ज्या तऱ्हेनें वागविण्यात येते ती फारच भयंकर निर्दयता आहे, व आपणा सर्वांच्या धर्मानुरूप पहावयाचे झाल्यास ती निर्दयता अत्यत अधर्मावह व निंद्य अशीच ठरते. मला तर असेंच म्हणावे लागते, कीं, ज्या देशात गाईसारख्या जनावराबद्दल विलक्षण आदर दाखविण्यात येतो, त्याच देशात बैलाच्या–ज्यानी आपली भारवाहक काबाडकष्टाची कामे करावींत–त्याच्या हालअपेष्टेकडे मुळीच कोणीहि लक्ष्य देऊ नये, ही नेहमी दृष्टोत्पत्तीस येणारी केवढी आश्चर्यकारक विसगतता बरे ? तुम्हीं जिला पवित्र म्हणून मानता त्या गोमातेचीच प्रजा बिचारे बैल, त्याच्या शेपट्या निर्दय गाडीवाले कसे पिरगळीत असतात हे तुम्ही पाहिले नाहीं काय ? अथवा त्याच्या पाठीवर व्रणें पडून ती निरर्थक झालेली किंवा मानेवर जूं देखील सहन करवत नाही इतकी त्याची मान सुजलेली तुम्हीं कधी पाहिली नाहीं काय ? मुक्या जनावराना निर्दयतेने वागविणे हे एकपरी हत्येचें पातक ठरेल, पण गाईबैलासबधी दिसून येणारी निंद्य हयगय ही त्याच्या मृत्यूला कारणीभूत होते असें कष्टाने म्हणावे लागते तथापि दोन्हीं प्रकारात जुलुमानें आकस्मिक प्राण घेणें हाच अधिक दयेचा प्रकार ठरेल, यात शका नाही. गाईचे प्राण वाचविण्यासाठीं जर आपण काळजी वाहिली पाहिजे तर तिच्या जीवनयातनाहि कमी करण्याची आपण तितकीच काळजी घेतली पाहिजे कमी पवित्र मानलेले इतर भारवाहकप्राणी उंट, घोडे, खेचर व बकरे आणि मेंढ्या यानांहि देखील हीच गोष्ट लागू आहे. नुसती सारखीच लागू आहे असें नव्हे, तर कदाचित् अधिक प्राबल्यानेंहि ती लागू पडते. अर्धपोटी उपाशीं आजन्म कष्ट करून पुढे कशीतरी आपली स्वतः उपजीविका चालविण्यासाठीं एकटे सोडून दिलेले घोडे आणि खेंचरें, इतकीं कृश व अशक्त कीं, बिचाऱ्यांनां धड उभेंसुद्धां राहतां येत नाहीं, व आपल्या स्वतःच्याच

ह्याडांचा व्याधिग्रस्त सांपळा अवलोकन करीत निराश्रित उभी असलेलीं, आपल्या किती वारंवार नजरेस पडतात! जीं जनावरें आमच्यासबधीं आपली कर्तव्यकर्मे इतकीं इमानेंइतबारें बजावीत असतात, त्याच्यासंबधीं आपणासहि कर्तव्यकर्म करावयाचें असतें असें मी म्हणतो तें कर्तव्यकर्म म्हणजे त्यांच्याविषयीं प्रेमळ विचार व कळकळ हेंच होय. आणि कुमार श्री-हरबामजींच्या प्रयत्नानें जर पूर्वीपेक्षां पुढे आपल्या कर्तव्याचें अधिक प्रत्यंतर घेण्यास साहाय्य झालें, तर आपण व तसेंच ज्याचा पक्ष त्यानीं आज उचलला आहे अशीं मुकीं व धिमी जनावरे त्याच्याशी कृतज्ञच होतील.

या भरतखडात आपल्या प्रत्यहीं आचरणांत ज्यांचा अत्यत निकट संबध घडतो अशीं वन्य आणि माणसाळलेली इतर सर्व प्रकारची जनावरें याच्या-विषयीं आपलें कर्तव्यकर्म कोणतें याचाहि आज मी येथें उल्लेख करतो. त्याच्याशीं आपला सबध किती घडतो व असें असून त्याचें आपणांस किती अल्प ज्ञान असतें, या गोष्टीचा विचार करू लागलें असता फार आश्चर्य वाटतें. त्याच्यापैकीं कित्येक तर आपले नेहमींचे सोबती असतात, व आपल्या स्नेह्यांपेक्षां व सुखसंवर्धकांपेक्षा त्यांची योग्यता अधिक असते. कारण, ज्याची बरोबरी आपल्या मानवी स्नेह्याकडून क्वचितच होते असें सहानुभूतीचें सामर्थ्य, वाणीने जरी प्रकट करून दाखविता आलें नाहीं तरी निःस्वार्थी संवादसामर्थ्य, त्याच्या ठायीं असतें. या भरतखडांत ह्या मुक्या सोबत्याची जितकी अधिक प्रशंसा आपण करूं तितकी थोडीच होणार. ते आपल्या किती उपयोगीं पडत असतात हें आपणांस क्वचितच सांगतां येईल. सारांश, आपल्या सभोंवतालचा प्रत्येक सजीव प्राणी, मग तो भिंतीवर सरपटणारा सरडा असो, अथवा प्रत्येक झाडावर घरटें करणारी खार असो, अथवा पक्षी असो, पाकोळी असो, वा, कृमीसुद्धा का असेना—जरी पुष्कळसे सर्प अगदीं निरुपद्रवी असतात तरी सर्पांनां या यादींत क्वचितच घेतां येईल—या सर्वांविषयीं आपल्या मनात दयाळु विचार असले पाहिजेत. पण जीं जनावरें आपलीं आवडतीं म्हणून आपण आपल्याजवळ बाळगीत असतों, विशेषें-करून ज्यांच्यावर आपलें अधिक लक्ष्य असतें, अशा जनावरांवर तर आपण विशेषतः दया दाखविली पाहिजे. त्याच्याविषयीं प्रत्यहीं आपल्या मनांत विचार येऊन त्यांच्या सुखाकडे आपलें लक्ष्य गेलें पाहिजे. अशा रीतीनें जर

आपण वागूं लागलों तर, माझी पक्की खातरी आहे, कीं, ते आपल्यावर अधिक विश्वास व पूर्ण आसक्ति दाखवून आपले उतराई झाल्यावांचून राहणार नाहींत. पण असें जरी झाले नाहीं तरी आपलें त्यांच्यावरील प्रेम हें कधींहि वांया जाणार नाहीं. कारण, त्याच्यावरील प्रेम हें 'नामरहित, लक्ष्यात ठेवण्याची कधी कोणीं पर्वा न केलेली अशीं अननुचिंतित जी कर्में' त्यापैकींच एक होय. हीं कर्में म्हणजे कवि वर्डस्वर्थ याच्या उद्गारांनीं बोलावयाचे झाल्यास, 'सच्छील माणसाच्या जीवनचरितातील अप्रतिम भाग'च होत. जनावरावरील प्रेमानें आपलें अंतःकरण स्नेहपूर्ण राहते, व तें आपल्या बांधवाशीं अधिक चांगल्या तऱ्हेने व प्रेमानें वागण्याच्या कामीं आपणांस साहाय्यभूत होतें. हिंदुस्थानातील न्यायमंदिरें ज्या अत्यंत सौजन्ययुक्त व विद्वान् न्यायाधिशांनी आजवर अलंकृत करून ठेविली अशापैकीं एकानें[1] पुढील उदात्त उपदेश मी स्वदेश सोडून जेव्हा प्रथम हिंदुस्थानात यावयास निघालो त्या वेळीं मला केला होता. **'कांहीं झाले तरी मुख्यत्वेंकरून तूं आपलें अंतःकरण स्नेहपूर्ण ठेव. प्रेम करण्यास योग्य असें अन्य कांहीं जरी सांपडलें नाहीं, तरी निदान एखाद्या पिपीलिकेवर तरी तूं प्रेम करीत जा.'** तोच उपदेश मी आज तुम्हाला करीत आहें. तुम्हीं आपली अंतःकरणें दयार्द्र व स्नेहपूर्ण ठेवा, असें तुम्हालाहि माझे सांगणें आहे. सबक्तगीनाप्रमाणें तुम्ही दयाळु व प्रेमळ व्हा. ह्या मुक्या प्राण्यांना थट्टेनें अथवा निरर्थकपणें कधींहि दुखवूं नका. तीं तुमच्या कह्यात इतकीं असतात, तरी पण तुम्हाला त्यांच्याविषयीं खरोखर फारच अल्प ज्ञान असते. आत्मा हा येथून तेथून एक आहे, सर्वांतर्यामीं एकच आत्मा वास करीत आहे ही ज्याची समजूत, अशा प्रत्येक सदाचारी हिंदूला तर असली प्रेमळ वागणूक म्हणजे आपलें कर्तव्यच असें वाटलें पाहिजे. काहीं झालें तरी एवढी गोष्ट खचित आहे, कीं, तेहि आपल्यासारखेच ईश्वराचे प्राणी आहेत. आपल्यासारखेंच त्यांनाहि ईश्वरानें निर्माण केलेलें आहे, व त्याच्या सृष्टीचे व कार्याचे तेहि अंशच आहेत. आणि आपण त्यांच्याविषयीं कळकळ दाखविली अथवा न दाखविली तरी एवढी खातरी ठेवा, कीं, ईश्वर त्यांना प्रेमानें व दयेने

---

१. सर लॉरेन्स् पील, कलकत्ता हायकोर्टातील चीफ जस्टीस्.

वागवीत आहे, व ईश्वराचे व आपले जे दास त्यांना आपण ज्या तऱ्हेनें वागवीत आहों त्याबद्दल ईश्वराजवळ आपण जबाबदार होऊ.

आता शिकारीविषयी तरी काय सांगावयाचें? ज्या वेळी आपण बदुक घेऊन बाहेर शिकारीस जातों तेव्हा जनावराना आपण योग्य कारणावाचून थट्टेने व उगीच दु ख देत नाही काय? प्राचीनकाळीं अन्नप्राप्तीसाठी कायदेशीर, धर्मानुरूप शिकार करण्यात येत होती, यात शका नाहीं. मी धर्मानें म्हटले याचे कारण असे, कीं, जीवानें जीवावरच प्राणरक्षण करणे हा एक ईश्वरीनियमाचाच भाग आहे. अरण्यातील हरिणावर उपजीविका करणाऱ्या वनराज सिंहापासून ते तहत भिंतीवरील पतगावर झडप घालण्याऱ्या पिपीलिकेपर्यंत हाच क्रम दृष्टीस पडतो. **'जीवो जीवस्य जीवन'** हा सृष्टिनियम आहे तो मानवी वर्गाला तसेंच इतर प्राण्यालाहि सारखाच लागू आहे. चैतन्यविशिष्ट सृष्टीतील मुकुटमणी जो मानवी वर्ग त्याला, तसाच प्रसग आल्यास, केवळ प्राणरक्षणार्थ म्हणून इतर प्राण्याचे जीव धर्मानें घेता येतील[1]. आणि जनावराचा प्राण जर ताबडतोब घेता आला, जाणूनबुजून निर्दयता केली नाहीं, तर त्याचा जीव घेणे क्षम्य होईल.

पण सर्वच शिकार खाण्यासाठींच होते, असें नाहीं डुक्कर, कोल्हे याची जी शिकार करण्यात येते त्याला काय म्हणावे हें समजत नाहीं असली शिकार निर्दयपणाची नाहीं असें कोणालाच म्हणता यावयाचे नाही. तिची नेहमी आवश्यकता असते असे कोणाला केव्हाहि साधार म्हणता येणारच नाहीं. केव्हा केव्हा अर्थात् विषारी सर्पासारखे प्राणी मानवी सौख्यासाठी जिवत मारावे लागतात, हे कबूल आहे. पण असले प्रसंग नेहमींच येतात असें नव्हे. सामान्यत मानवी सुखासाठीच तें घडत असते, व मानवी सुख म्हणजे त्या प्राण्यांचें दु ख. ज्या रानडुकराच्या सभोंवार भाल्यांच्या फेका होतात त्या वेळीं त्याला केवढ्या यातना होत असतील याचा घटकाभर तुम्हीं त्याच्या स्थितींत आहात अशी कल्पना करून विचार करा मदोन्मत्त हत्तीच्या कळपानीं जर तुमचा तसा पाठलाग केला तर तुमची जो स्थितिं होईल त्याहिपेक्षा त्याची स्थिति अधिक कठीण होत असेल

1 See Dr. Buhler's "Manu" ("Sacred Books of the East" Series), V. 28-30, p. 173.

असें मला वाटतें अशा तऱ्हेची शिकार म्हणजे निर्दयपणाची कमाल हें कबूल करावे लागेल ही निर्दयता न्याय्य आहे काय ? ह्या प्रश्नाचे उत्तर ज्याचें त्याने आपआपल्याशींच दिले पाहिजे आता, आरोग्य आणि बल, दीर्घोद्योग आणि धैर्य, नेत्राचे व अवयवाचे चापल्य व कौशल्य, यासारख्या पौरुष व उत्कृष्ट गुणाचा शिकारीच्या योगे विकास होतो हे खरे आहे. आणि कित्येकाची अशी समजूत आहे, व कदाचित् ती सकारणहि असेल, कीं, हे वरील गुण सपादन करण्यासाठी मानवी वर्गाला कनिष्ठ कोटीतील जनावराना दु:ख देण्याची मोकळीक असावी. कित्येकाना, जैनधर्मीय, बौद्धधर्मीय व हिंदूतील वैष्णवपंथाच्या लोकाना असे वाटते, कीं, अशा तऱ्हेने जनावराना दुःख देणे हे केव्हाहि न्याय्य होणें नाहीं. **'अहिंसा परमो धर्मः'.** साराश, या प्रश्नाचा निर्णय ज्याचा त्यानेच केला पाहिजे. लक्ष्यात ठेवावयाचे ते एवढेच, कीं, यदाकदाचित् शिकारीला काहीं हरकत नाहीं असे जरी आपले मत पडले, तरी ती निर्दयतेन न करण्याची मात्र आपण खबरदारी घ्यावी होता होईल तों पाठलाग केलेल्या जनावराचा प्राण वाचविण्याविषयी आपण दक्ष असले पाहिजे, व सबक्तगीनाप्रमाणे आपले अत करण दयार्द्र असले पाहिजे

शिकार म्हणून ज्याला म्हणतात तिचा आणखी एक प्रकार आहे त्याला खरोखर पाहिले तर शिकार हे नावच शोभत नाही, व कोणत्याहि आधारे ती न्याय्य ठरत नाहीं हा प्रकार म्हटला म्हणजे कित्येक लोक हत्ती-हत्तीत, रेड्यारेड्यात व मेंढ्यामेंढ्यात जी झुज लावीत असतात ती होय तसेच कित्येक खबुतराची व कोंबड्याचीहि परस्पर झुज लावीत असतात. ही झुज त्या जनावराच्या दृष्टीने जितकी निर्दयपणाची असते तितकीच ती अवलोकन करणारांनाहि अवनतकारी असते असल्या अनियंत्रित निर्दय-तेचे प्रकार तुम्हीं कधीहि डोळ्यानीं पाहणार नाहीं, अशी मला आशा आहे.

"ज्याला मानवीवर्गावर तसेच पशुपक्ष्यावर उत्तम प्रेम करिता येतें त्यालाच ईश्वराची उत्तम भक्ति करिता येते. लहानमोठ्या यच्चयावत् गोष्टीवर त्याला अत्युत्कृष्ट प्रेम करिता येतें त्यालाच भक्ति अत्युत्तम करिता येते. कारण, ज्यानें आपणास निर्माण केले व जो आपणा सर्वावर प्रेम करीत आहे त्या दयाघन परमेश्वराने यच्चयावत् चराचर वस्तूंना निर्माण करून त्यांच्यावर तो अखंड प्रेम करितो."

ज्यानें आपल्या राजाची पताका मस्तकावर धारण करून माहुताबरोबर समरागणावर प्रवेश केला तो हिंदुस्थानांतील 'हिरा' नामक थोर हत्ती देवाना व माणसाना सारखाच प्रिय झाला असला पाहिजे, यात शका नाहीं. जी गोळी लागून माहुत खालीं पडला तिच्यायोगें हत्तीलाहि जबर दुखापत झाली होती, पण मालकाच्या हुकुमाची वाट पहात जागच्या जागीं उभा राहून इकडचा तिकडे जरा देखील तो हलला नाहीं. आपला मालक मरण पावला आहे हें त्या बिचाऱ्या हत्तीला कसें कळणार? आजुबाजूच्या सैन्याची त्रेधा उडून इतस्तत. वाताहत होण्यास सुरुवात झाली व शत्रु जसे पुढें चाल करून येऊ लागले तशी सैन्याने माघार घेतली. ते भयाभीत होऊन जीव घेऊन पळू लागले. पण तो थोर पशु मात्र जागच्या जागीं न डगमगतां अढळ उभा राहिला. धन्याची आज्ञा होई तोंपावेतों त्याला हलतांच येईना. निश्चयानें तो तेथेच उभा राहिला व पताकाहि त्याच्या मस्तकावर तशीच फडकत होती. हे पाहून धैर्यविगलित झालेल्या शिपायानीं पुनः एकत्र जमून असा निकराचा हल्ला केला, कीं, त्याच्यापुढे मग कोणींहि टिकाव धरिला नाहीं. येणेंप्रमाणें जेथें माघार खाण्याचा प्रसंग आला होता तेथेंच विजयश्रीनें त्याच्या गळयात माळ घातली. लढाई तर जिंकली, युद्ध संपलें; पण तो निर्भय हत्ती तेथल्या तेथेंच उभा! ज्या मालकानें त्याला चाल करण्यास व थाबण्यास आज्ञा केली होती, तोच काय तो त्याला आतां परत फीर म्हणून सागण्याला समर्थ होता. तो अन्य कोणाच्याहि शब्दाला जुमानणारा नव्हता. सबध तीन दिवस व तीन रात्री त्यानें जागच्या जागीं उभ्या राहून काढिल्या. तेव्हा कोठे शिपायाना माहुताच्या मुलाची आठवण झाली. तो मुलगा म्हणजे अवघा ९ वर्षांचा होता. तो हिऱ्याच्या पाठीवर नेहेमीं बसत असे व त्याच्यावर त्या थोर प्राण्याचें प्रेम होतें. घरचा पल्ला १०० मैलाचा. पण घरून जेव्हां मुलाला आणलें तेव्हां त्या हत्तीनें त्या मुलाचा शब्द तत्काळ ओळखला व त्यासरसें त्यानें प्रणामपूर्वक आपलें डोकें खालीं वांकविलें. नंतर त्यानें धन्यासाठीं आपल्या सभोंवार मोठ्या उत्कंठेनें दृष्टि फिरविली व तो कोठेंहि दिसत नाहीं हें पाहून मुलाच्या आज्ञेप्रमाणें घरीं येण्यास तो परत फिरला. युद्ध-प्रसंगीं जे त्याच्या अगावर कपडे घातले होते ते अद्याप तसेच होते.

पण ते अगदींच मलीन होऊन जागोजाग फाटले होते. त्याच्या अंत त्याला झालेल्या दारुण जखमा दडून राहिल्या होत्या.

सरतेशेवटी जेथे तळ दिला होता तेथे मंडळी येऊन पोहोंचली. हिऱ्यानें आपल्या धन्यासाठीं तंबू न् तंबू मोठ्या धिमेपणानें हुडकून पाहिला. पण तो कोठेंहि सांपडला नाहीं हें पाहून त्याने निराशेचा एक मोठा फूत्कार काढिला, व अगोदरच जखमानीं अगदी शक्तिक्षीण झालेल्या त्या इमानी प्राण्यानें त्या पोरक्या पोराभोवतीं आपली सोंड फिरवून, त्याला कुरवाळीत कुरवाळीत प्राण सोडला. केवढी करारी व शूर आज्ञाधारकता! तीच युद्धात जयाला कारण झाली! त्याने आपलें कर्तव्य बजाविलें.

कुत्रा हा प्राणीहि फार प्राचीनकाळापासून मानवीवर्गाचा सोबती व सखा होऊन बसला आहे, व त्याचीहि विशेष तारीफ केल्यावाचून माझ्यानें राहवत नाहीं. कुत्र्याविषयी काहीं खऱ्या गोष्टी तुम्हाला मि. वुड यांच्या Petland revisited नामक ग्रंथात पुष्कळ आढळतील त्या गोष्टी इतक्या हृदयद्रावक आहेत, कीं, वाचणाराच्या नेत्रातून अश्रुधारा निघाल्यावाचून राहतच नाहीं. मेडोर नामक स्कॉच् टेरिअर जातीच्या लहानशा कुत्र्याची जी एक हृदयद्रावक गोष्ट आहे ती तर तुम्हीं विशेषेकरून वाचा.

ज्यानीं ज्यांनीं म्हणून आजपर्यंत कुत्रे पाळले आहेत त्याच्यापैकीं असा एकहि सांपडणार नाहीं, कीं, जो कुत्र्याच्या सहवासानें आपणास आनंद वाटला नाहीं असें म्हणेल. घोडा व हत्ती हे धूर्ततेच्या बाबतींत कदाचित् त्याची बरोबरी करतील, पण कुत्र्याच्या आटपशीर आकारामुळें घरात बाळगण्यास असा कुत्राच अधिक योग्य आहे. इतिहासाच्या सुरुवातीच्या कालापासून आतांपर्यंत मानवी कृपेच्या बाबतींत इतर सर्व प्राण्यांमध्यें अग्रगण्यतेचा हक्क कुत्र्यालाच प्राप्त झालेला आहे. ह्याच विषयावर 'ह्यारो स्कूल' मधील विद्यार्थ्यांनां उद्देशून बोलत असता डाक्तर वेल्डन् ह्यानी 'ओडिसिअस'मध्यें वर्णन केलेल्या विश्वासु कुत्र्याचाच उल्लेख केला होता. 'ओडेसी' काव्याइतकेंच, किंबहुना त्याहूनहि अधिक प्राचीन असें जें आर्यांचें महाकाव्य 'महाभारत' त्यांत वर्णन केलेल्या धर्मराजाच्या आवडत्या कुत्र्याच्या गोष्टींतहि लहानसान अर्थ आहे असें नाहीं. तिकडे 'ओडेसी' काव्याला कुत्र्याच्या कथानकानें प्रारंभ झालेला आहे, तर इकडे महाभारताची त्या कथानकानें परिसमाप्ति झालेली आहे.

ती हकीगत तुम्हांला स्मरत असेलच. कुरुक्षेत्रातील संहार, द्वारकेतील यादवी, पचनदातील अर्जुनाचे मन लज्जित करणारा प्रसग, या सर्वांमुळे पाडवाचे मन अगदी दु.खपूर्ण व निराशामय होऊन गेलें, तेव्हा श्रीकृष्णादि अवतारी पुरुष, कौरवासारखे दुष्ट लोक, पाडवांसारखे धर्मात्मे व पराक्रमी योद्धे मर्त्यलोकी जन्मास येण्यात परमेश्वरी हेतु सफल झाला आहे व तुम्हींहि कृतकृत्य झाला असून आता तुम्हीं सर्वांनी इहलोक सोडून जाण्याची वेळ आली आहे, असे व्यासानी त्याना सागितले. हे ऐकून धर्मराज म्हणाले "आपला इहलोकचा ऋणानुबध सपला, अतकाल समीप आला, व्रतस्थदशेत पृथ्वीप्रदक्षिणेला निघावे हे बरे" याप्रमाणें सर्वानुमते ठरून पाच पाडव व द्रौपदी यानीं वल्कले धारण करून हस्तिनापुरातून बाहेर प्रयाण केलें. पुढे धर्म, त्याचेमागून क्रमाने भीम, अर्जुन, नकुळ, सहदेव व द्रौपदी अशीं चालूं लागलीं व सर्वांचे मागून धर्माचा एक आवडता कुत्राहि निघाला. प्रथमतः पूर्वेकडे जाऊन बऱ्याच दिवसानी ते समुद्रतीरास पोहोचले. नंतर तेथून दक्षिण, नैऋत्य, पश्चिम या दिशांनी प्रवास करीत पाण्यात बुडालेली द्वारका पाहून ते हिमालयाकडे वळले मोठ्या कष्टाने त्या पर्वतावर चढल्यानंतर दूर अतरावर समोर मेरुपर्वताचें शिखर व मध्यंतरी वाळूचे भयाण मैदान त्याच्या दृष्टीस पडलें. या मैदानावर चालून गेल्यावर द्रौपदी मागचेमागें मरून पडली! आणखी थोड्या अतरावर सहदेव मरून पडला! थोडेसें पुढे गेल्यावर नकुळहि पडला व काहीं वेळाने अर्जुनाने व भीमसेनानेंहि तीच वाट धरली. राहतापैकीं एकटा धर्म व त्याचा आवडता कुत्रा एवढेच काय ते मागे राहिले. धर्माने सदेह स्वर्गात यावे एतदर्थ इद्राचा रथ तेथे आला. त्या वेळी धर्म म्हणाला "हा कुत्रा माझा फार आवडता असून त्याचीहि मजवर फार भक्ति आहे यासाठीं त्यालाहि बरोबर आणण्याची परवानगी असावी". ह्यावर इद्र म्हणाला "अरे, उत्तम यश व कीर्ति, स्वर्गीयवैभव, अमरत्व व सर्व प्रकारचे स्वर्गसुख हीं तुला मिळालीं आहेत. आता तूं हें कुत्रें सोडून दे." तेव्हा धर्मानें उत्तर दिलें, "असें करणें हें आर्याचें ब्रीद नव्हे! भक्तत्यागाने प्राप्त होणारें कोणतेहि सुख मला नको. प्राण गेला तरी बेहत्तर, पण त्याचा त्याग मी कदापिहि करणार नाहीं. त्याचा त्याग केला असतां स्त्रीवध, मित्रद्रोह व ब्राह्मणधनहरण

याचे पातक मला लागणार असल्यामुळें स्वर्गसुखास जरी मी आचवलों तरी या कुत्र्याचा मी त्याग करणार नाहीं." हें ऐकतांच तत्क्षणीं कुत्रा नाहींसा होऊन त्याचे जागी साक्षात् यमधर्म दिव्य देहाने त्याजसमोर उभा राहिला व ह्मणाला "मी तुझी सत्यप्रीति व कर्तव्यनिष्ठा पाहण्यासाठीच हें केलें." नंतर ते तिघेहि स्वर्गास गेले *

* यमधर्माला अन्य कोणत्याहि रूपानें प्रकट होऊन धर्मराजाची सत्वपरीक्षा घेता आली असती पण कुत्र्याच्या रूपाने येण्याची जी त्याला कल्पना सुचली तेवढ्यावरून कुत्र्याच्या स्वभावाची थोरवी लक्ष्यात आल्यावाचून राहणार नाहीं चे मं.

# वनपुष्पें.

* "I know I am grass of the lowly sod,
I know I am worthless and small,
But am I not grass in the garden of God,
And is He not Lord of all?".

†" Not only the nightingale singing on the rose bush telleth his beads to God, but even every thorn of the bush is a tongue to declare His praise "
Sadis' Gulistan (पुष्पवन)

ज्यांचा आपल्याशी अत्यंत निकट संबंध येतो अशा प्राणिकोटींतील जनावरांसंबधीं मागील व्याख्यानात उल्लेख करण्यात आला. आज वनस्पति-कोटींतील नानाविधसौंदर्याविषयी तुम्हाला चार शब्द सांगावे, असा माझा विचार आहे. आणि असल्या विषयावर विचार ह्या वर्षाकालाला विशेषे-करून अनुरूप असाच दिसतो. वर्षाकालीं सृष्टि जिकडेतिकडे हिरवीगार होऊन नयनमनोहर दिसूं लागते. जणु काय ती हिरव्या शालूच्या आभरणानी अलंकृत झालेली दिसत असते! उन्हाळ्याच्या रखरखीत उन्हानें, ग्रीष्मऋतूं-तील प्रखर सूर्यतापाने विदग्ध होऊन नेत्राना कंटाळवाणी दिसणारीं ओसाड मैदाने, एकाएकीं जणुं काय जादूच्या खेळाप्रमाणे हिरवींगार होऊन ताजी-तवानीं दिसू लागतात. अखिल सृष्टि महानिद्रेतून खडबडून उठून नवीन जीव व नवीन आनंद धारण केल्यासारखी दिसूं लागते! केवढे आश्चर्यकारक व किती रमणीय रूपांतर ते असते!

जेव्हा मुसळधारा पर्जन्यवृष्टि झाली, तेव्हा इंद्रकृपाप्रसादानें पृथ्वीवर आनंदाची व समृद्धीची वृष्टि झाली, असें जेथें काव्यात्मक हृदयंगम वर्णन केलेलें आहे तो विष्णुभागवतातील प्रसंग तुम्हाला कदाचित् आठवत

---

* निस्सत्व भूभागावर उगवलेले मी गवत आहे हे मी जाणून आहे, मी कवडीमोल व य किंचित् आहे हेंहि मला ठाऊक आहे, पण मी असे विचारितों, कीं, मी ईश्वराच्या बागेतीलच तृण नव्हे काय? आणि ईश्वर आपणा सर्वांचा प्रभु नाहीं काय?

† गुलाबाच्या ताटव्यावर बसून मधुरालाप काढणारा बुल्बुल पक्षीच केवळ ईश्वराचे नामस्मरण करीत आपली जपमाला ओढीत असतो असे नव्हे, तर त्या झाडावरील प्रत्येक काटा-देखील ईशस्तवनप्रतिपादक मुखच जणु काय आहे.

असेलच. असें सांगतात, कीं, ग्रीष्मऋतूंनी पृथ्वीवर, पशूवर, पक्ष्यांवर आणि सरपटणाऱ्या प्राण्यांवर फार दिवस अगदीं कहर उडविला होता. म्हणून इंद्राला पुढे येऊन त्याच्याशी युद्ध करावे लागलें. गर्जना करणारे मेघ ही त्याची दुंदुभी, विद्युल्लता हें त्याचें खड्गास्त्र, श्वेतक्रौंचपक्ष्याच्या दीर्घपंक्ति ह्या त्याच्या तेजस्वी पताका, केकारव व दर्दुरारव हे त्याचे वीरप्रशंसा करणारे युद्ध वैतालिक, पर्जन्यबिंदु हे त्याचे बाण. अशा तऱ्हेने युद्ध झाल्यावर ग्रीष्मऋतू पराजित होऊन वनातून पळ काढू लागतो; आणि आठ महिने वियोगावस्थेत काढल्यावर क्षुधाक्रांत पृथ्वीला पूर्णता देणाऱ्या पर्जन्यप्रभूचें–इंद्राचें–दर्शन झाले असता तिला केवढा आनंद होत असतो!

वर्षाकालाच्या सौख्याचें अतिशयोक्तीने वर्णन आपणास खरोखर क्वचितच करता येतें, मग ते वर्णन काव्यात्मक असो वा गद्यात्मक असो. कारण, आपल्या अर्थशास्त्रावरून (Political Economics) आपणास हे ठाऊक झाले आहे, कीं, जगातील अखिल संपत्ति ही भूमीतील उद्भिज्ज उत्पन्नापासूनच निष्पन्न होत असते सोने व रुपे हींसुद्धा भूमीच्या उदरातूनच आपणास सापडतात. पण आपल्याजवळ खाण्यासच काहीं नसले तर त्या सोन्यारुप्याचा उपयोग काय, अथवा त्याला विचारणार तरी कोण? मानवी वर्गाचे जीवित वार्षिक पिकावरच अवलंबून असते. धान्यच जर पिकले नाहीं तर लोकाना उपाशीं मरण्याची पाळी येते, व पिके हीं वार्षिक पर्जन्यवृष्टीवर अवलंबून असतात अतएव वर्षाकालाला आपण धन्यता देतों.

**'पर्जन्यादन्नसंभवः'** असें जरी आहे, तरी पर्जन्य हा आपणांस अन्नापेक्षांहि अधिक देत असतो तो पृथ्वीला सौंदर्याने व छायेने अलंकृत करीत असतो. गवतांत दडून उगवणाऱ्या अत्यंत यःकश्चित् पुष्पापासून, दगडफुलापासून, तों तहत वनस्पतिकोटींतील जो खरोखर मुकुटमणीच आणि आकारानें जो सर्वांत मोठा, अशा प्रचंड वटवृक्षापर्यंत जिकडेतिकडे हिरवेपणाचें सौंदर्य तो पेरीत असतो वटवृक्ष हा साऱ्या जगातील वृक्षामध्यें अत्यंत मोठा असा आहे, व काठेवाडापासून जवळच भडोचहून नर्मदेच्यावर सुमारें बारा मैल एक अति विख्यात जो कबीरवड आहे तसा वड अद्याप कोठेंहि झालेला नाहीं. ह्या झाडाचा घेर २००० फुटावर आहे, असें वर्णन मि. फार्बस् साहेबांनी जें केलें आहे त्याला आज १००

हूनहि अधिक वर्षे लोटली आहेत, व आतां तर तो त्याहूनहि कितीतरी मोठा झाला असलाच पाहिजे. मी माझी दहा वर्षांपूर्वीचीच गोष्ट सांगतों. त्याच्या बुध्यासभोंवती प्रदक्षिणा घालावयास मला पंधराच्या वर मिनिटें लागली होतीं. आणि त्याच्या आकाराच्या मानानें पाहिलें असतां, तो अति प्राचीन असलाच पाहिजे अनेक लेखक त्याच्याविषयीं अशी एक दंतकथा सांगतात, कीं, अलेक्झांडर दि ग्रेटच्या सरदारानें आपल्या लोकांसह ह्या वडाच्या छायेत तळ दिला होता आणि खरोखर जर अलेक्झांडरचें आरमार अडोचपर्यंत कधी आलेंच असलें (ह्याची मात्र जबरदस्त शंका आहे) तर मग त्याच्या वयाच्या बाबतीत तरी त्या गोष्टीत अशक्य असें कांहीं नाहीं. केवढा भव्य कीर्तिस्तंभ हा म्हणावयाचा[1] परमेश्वरानें जर त्याला वाणी दिली असती तर त्याला कितीतरी आश्चर्यकारक गोष्टी आपणास सांगता आल्या असत्या! लोक जें त्याला पवित्र मानून त्याची सत्कारपूर्वक पूजा करतात व सृष्टींतील महापूजास्थानांपैकी एक असें त्याला मानतात यांत आश्चर्य तें कोणतें?

पण वटवृक्ष जो एवढा मनोरंजक वाटतो ह्याचें कारण त्याचा आकार हेंच केवळ नव्हे त्याचें प्रत्येक पर्ण, त्याची प्रत्येक शाखा, त्याची प्रत्येक पारंबी हीं सारीं आश्चर्यचकित करणारी व अतर्क्यगूढ अशी आहेत. तीं इतकीं आश्चर्यकारक व गूढ वाटतात, कीं, जर ह्या वटवृक्षाची सर्वांग दृष्टीनें आपणास परिपूर्ण माहिती झाली, तर आपणास अखिल जीवनगूढाचा उलगडा करितां येईल. 'जीव आणि शिव' म्हणजे काय हें आपणास कळेल, असें म्हणणें अतिशयोक्तीचें होईल असें वाटत नाहीं. मी तुम्हाला फक्त एकच प्रश्न विचारितों. सामान्यतः वृक्षांना फुलें येत असतात हें तुम्हाला ठाऊक आहेच, प्रथम फुलें व नंतर फळें वटवृक्षाला जी फळें येतात त्याला आपण वडफळ व कोणी 'तेता' असें म्हणतात, पण फुलें असतात कोठे! वडाला अथवा पिंपळाला अथवा अन्य कोणत्याहि प्रकारच्या न्यग्रोधवृक्षाला कधीं

---

१ ह्या कल्पनासादृश्यावरून येथें श्रीमद्भगवद्गीतेतील पुरुषोत्तमयोग नामक १५ व्या अध्यायाच्या प्रारंभीच्या श्लोकाची आठवण झाल्यावाचून राहत नाहीं

सारांश अश्वत्थ वृक्षाच्या कल्पनेचा आधार घेऊन संसारवृक्षाचें विशदीकरण जितकें सुगम करून ठेविलें आहे तितकें तें अन्यत्र कोठेंहि सांपडत नाहीं —भा क

फुले आलेलीं तुम्हीं पाहिलीं आहेत काय? मला वाटते 'नाहीं,' असेंच तुम्ही सर्व म्हणाल. याचें कारण असें, कीं, ते फळ म्हणजेच पुष्पदेंठावर एकत्र झुपका झालेला फुलाचा एक गोळा असतो. छत्रीचें बाहेरचे अग आत फिरवून घेतलें असता जसा आकार दिसतो तसा तो गोळा दिसत असतो. ह्याप्रमाणें इतर झाडावर जशी फुलें बाहेर स्पष्ट दिसत असतात, तशी ह्या औदुबरादि वर्गांतील वृक्षाचीं फुले दिसत नसून ती आपल्या अतस्थ आश्रयदेठावरच अतर्मुख म्हणजे आतल्या अगानें तोड करून असतात, व ह्याचमुळे ती आपणास दिसत नाहींत पण ते फळ उघडून जर आत पाहिले तर फूल सहज दृष्टीस पडेल. हें अति मनोरजक नाहीं काय? फुलाविषयीं सागण्या-सारखे असे कितीतरी आहे. पण त्याचा विचार आणखी केव्हा तरी आपण करू.

प्रस्तुत तुम्हाला इतर झाडाविषयीच मला सागावयाचे आहे. घटकाभर कॅम्पकडे आपण फिरावयास जाऊं, व नेहमीप्रमाणेच आपण चालता चालता जे काही दृष्टीस पडेल त्याविषयी बोलू वनस्पतिशास्त्रावर एखादे व्याख्यान द्यावयाचे अशी माझी मुळींच इच्छा नाहीं, पण आपल्या सभोवती जे अति रम्य पदार्थ दृष्टीस पडतात त्याच्याविषयीं तुमच्या ठायी हृदयगमता जागृत करावी, एवढाच काय तो उद्देश आहे सामान्यत: फुलाना चार अगे असतात, हे तुम्हाला ठाऊक आहेच पहिले अग म्हणजे फुलाचीं वाटी; ही साधारणत. हिरव्या रंगाची असते. दुसरे अग सभोवार वलयाकार पानें असतात; ह्या पानाचा रग हिरव्या रगाहून निराळा असतो त्यानतर ततूसारखे काहीं केसर असतात; त्याना डोकी असून त्यातून ते कुसुमरेणु गाळीत असतात. आणि शेवटचे चवथे अग म्हणजे मध्यवर्ती अशी बी तयार होण्याची जागा त्याचा आकार काहींसा मुसळासारखा असून डोक्याकडे शुडाकृति असते. ह्याचीच पुढे शकले होऊन त्यातून बी बाहेर पडते

आता हे वर्णन सर्वच फुलाना सारखें लागू पडेल असें नाहीं. तथापि साधारणपणे एवढे लक्ष्यात ठेवल्यास चालेल. लाब कशाला, माझ्या हातातील हे नवमल्लिकेचें (कुंदाचे) फूल पहा, म्हणजे मी काय म्हणतों हे तुमच्या चागले लक्ष्यात येईल. आता आपल्या डाव्या अगाकडे असलेल्या त्या कुंपणाकडे पहा. सर्व कुंपण अगदी पर्णरहित वाळलेल्या काड्याच्या लतानीं आच्छादिलेलें आहे त्याच्या प्रत्येक साध्याला त्रिकोणाकृति कार्डी आहेत, व काड्याच्या शेवटी श्वेततारकाप्रमाणें फुलाचा एक रमणीय गुच्छ

दिसत आहे. कोणत्याहि सांध्यावर जर त्याची एखादी काडी तोडिली तर त्यांतून दुधासारखा जाड रस बाहेर निघूं लागतो. फार प्राचीन काळा-पासून धार्मिक व ऐतिहासिक दृष्ट्या ही लता फार प्रसिद्ध आहे. हिलाच **सोम**लता[१] असें म्हणतात. वेदात हिची फारच प्रशसा केलेली असून तिला देवतातुल्य मानलेली आहे. आणि असें असूनहि हल्लींच्या निकृष्ट स्थितींत किती थोड्या हिंदूनां तिला पाहिल्याबरोबर ओळखता येत असेल! केवढी ही शोचनीय स्थिति! राजकोटात तर ह्या लतांचा अगदीं सुकाळ असून त्या जागोजाग दृष्टीस पडतात व आसपासहि 'थॅार्' झाडातून त्या आहेतच. आपल्या वर्गातील इतर लतांप्रमाणेंच ह्या सोमलतेच्या बियाना पंख असतात. हीं पंखें फार मृदु, सुखस्पर्श गुच्छाचीं असतात. त्याच्या योगे ह्या बिया लहान विमानाप्रमाणें—मुलें ज्यांना म्हाताऱ्या म्हणतात—वर हवेत उडून जातात आणि हें रुईचें झाड पहा. तें केप-कामोरिनपासून तों हिमालयापर्यंत सर्व हिंदुस्थानभर सुकाळाचें उगवते. तेंहि ह्याच जातींतलें असून त्याच्या बियानाहि पंखें असतात. हें झाड तर असें आहे, कीं, त्याबद्दल आपणास नेहमीं विशेष आदरच वाटला पाहिजे कारण, असें ऐकितों कीं, ह्याच झाडाच्या छायेखालीं अकबरासारख्या थोर व प्रबल राजपुरुषाचा जन्म झाला होता. इ. स १५३९ त शीरखान व हुमायून ह्याची बक्सार येथे लढाई झाली तींत हुमायुनाचा पराभव होऊन तो जेव्हा अमरकोटच्या अरण्यांतून निराश्रित भटकत होता तेव्हा त्याची हमीदानामक तरुण व सुस्वरूप राणी ह्याच झाडाच्या सावलींत प्रसूत होऊन तिला पुत्ररत्न झालें. तोच पुढे प्रसिद्ध अकबर बादशाहा झाला. अरण्यांत उंट जर कोणत्या झाडाला तोंड लावीत नसला तर तें हेंच झाड होय, असा लोकप्रवाद आहे. ह्या झाडाला संस्कृतांत 'अर्क' अशी संज्ञा असून त्याच्यावरूनच हिंदीभाषेंत त्याला 'आंकडा' असें म्हणण्याचा परिपाठ पडला आहे. अर्क म्हणजे सूर्य ह्या झाडाला हें नांव पडण्याचें कारण त्याचीं किरणसदृश पंचदलें हींच होत, यांत शंका नाहीं. तसेंच ह्या कुंपणांत आपल्या अगदीं अगासरसा असलेला हा सूर्यवेल पहा. ह्या सूर्य-लतेला हिंदींत 'सुरजवेल' व लॅटिन भाषेंत Pentatropis microp-

---

१ हिचें पारिभाषिक नाव Sarcostemma intermadium असे आहे

hylla असें म्हणतात. ही लता जुलै व आगष्ट महिन्यांत सर्व कुंपणभर गुफलेली अशी दृष्टीस पडते. ही रुईच्या झाडाच्या वर्गांतीलच असून तिलाहि फारच लहान लहान अशीं पंचदलाकृति फुलें येतात. तीं हिरवट पिवळ्या रगाचीं असून इतकीं लहान व अस्पष्ट असतात, कीं, तीं जरी सामान्य आहेत तरी तीं तुम्हीं कधीं पाहिली असतील किंवा नसतील याची मला शकाच वाटते तीं मुद्दाम होऊन पाहावीं लागतात, त्यावांचून तीं दृष्टीसच पडत नाहींत. चाबकासारखे लाब लाब प्ररोह, अकुर व घंटाकृती सुरम्य फुलें असणारीं झाडेंहि ह्या कुंपणात वाटेल तितकीं मुबलक आहेत. तसेंच हृदयाकार पर्णें असणारीं हीं सुंदर 'चामर दुधेली' ( Dœmia extensa ) नावाची झाडें,व हिरव्यागार विलोल पुष्पाचा दाट गुच्छ असणारीं हीं 'खार खोडी' ची (Leptadenia reticulata) झाडेंसुद्धा फार आहेत. हीं सर्व एकाच वर्गांतील असून त्याना (Asclepiads) अस्क्लेपिअडस् असें म्हणतात. हें नांव ग्रीक लोकाची भिषग्देवता ( Æsculapius ) एस्क्युलेपिआ हिच्यावरून पडलेले आहे. ह्या सर्व झाडाना सोमलतेप्रमाणेच पंखाच्या बिया असतात. म्हणून शेंगा परिपक्व होऊन आतल्या दुमडीवर जेव्हां फुटतात तेव्हां त्यातून त्या बिया बाहेर पडून त्या लहान विमानासारख्या वर उडत जाऊन दूर अतरावर खाली पडतात. आता कदाचित् ह्या पंखाच्या बियाची उपयुक्तता काय, ह्याची तुम्हाला थोडीशी कल्पना होईल. सृष्टिघटनेंत अशी एकहि वस्तु नाहीं, कीं, जिचा काहीं उपयोग नाहीं तो उपयोग आपणांस माहीत असो वा नसो, तो भाग निराळा. विमानासारख्या हवेंत उडणाऱ्या ह्या पखाच्या बियाचा उपयोग हा आहे, कीं, त्या बिया एकाच ठिकाणीं पडून पुनः एकत्र झुबकाच्या झुबका उगवून दाटीने झाडें मरून न जावींत, म्हणून त्या बिया वाऱ्यासरशा उडून इतस्ततः वेगळाल्या पडत असतात, व अशा रीतीनें पडता येण्यास त्याना असणारे पख फार उपयोगीं पडत असतात. निरनिराळया मार्गांनी सृष्टीचा हाच हेतु इतर झाडेंहि पुरवीत असतात. कित्येकांनां अकुशाकार धरणी असते, तर कित्येक अगदीं रूक्ष असतात, व कित्येक कण्यासारखे असतात. ते जवळून जाणाऱ्या पदार्थांवर चिकटून व अडकून बसतात व त्याबरोबर ते निरनिराळया ठिकाणीं जातात. बिंची नांवाचें (Martynia diandra) एक विलक्षण बीं तुम्हांला ठाऊक असेलच. जवळून जाणाऱ्या जनावरांच्या अगावरील

केसांनां अथवा लोंकरीला, फार काय माणसाच्या कपड्यावरसुद्धां, चिकटून व अडकून बसतां यावे म्हणून त्यानी तसे रूप धारण केले आहे, यांत शका नाहीं. ह्याचप्रमाणे अघेडो (Achyranthes aspera) व झिप्तो (Triumfetta rotundi folia ) ह्याचेहि ते पुढे येणारे खरखरीत भाग जवळून जाणाऱ्या पदार्थाला अगदी कसे सहज चिकटतात, हें आपणास ठाऊक आहेच आणि अशा रीतीने या जगलातून त्या जगलात व त्या कुरणांतून या कुरणात त्याची सारखी अदलाबदल होत असते. त्याचप्रमाणे यांच्या फळाना जो रग व जे माधुर्य असते तेणेंकरून पक्षीहि ते खाण्यासाठी धावून येत असतात व येणेप्रमाणे ते वरचा गीर खाऊन आतील बीं वाटेल तेथे टाकीत असतात. हे सर्व आश्चर्य करण्याजोगे व कौतुक वाटण्याजोगे नाहीं काय? एखाद्या गावात लोकाची जर अतिशय गर्दी झाली तर त्याना वाहनासारखी स्थलातर करण्याची साधने उपलब्ध असल्यामुळे ते स्थानातराचा अवलंब करितात. पण झाडाच्या ठायी असले सामर्थ्य ईश्वरानें दिलेले नाही. अतएव त्याना इतर साधनाचाच आश्रय करणें भाग पडते, व ते काम ती किती चातुर्यानें करीत असतात हे तुम्ही पहातच आहात.

जेथून त्याना हलता येत नाही अशा एकाच जागी जरी झाडे बद्धमूल असतात, तथापि मनुष्याच्या अगी जसं आपल्या अवयवाचे चलनवलन करण्याचें इच्छा–सामर्थ्य असतें तद्वतच बहुतेक झाडाच्या अगीहि आपल्या फांद्या व पानें हलविण्याचे फारच अपूर्व सामर्थ्य असते उदाहरणार्थ तुमच्या पायाजवळच पसरलेल्या ह्या सुंदर लहान लहान पिच्छाकृति पानाच्या 'रिसाम्रो' ( Æschynomene Indica ) नामक फार लाजाळु झाडाला स्पर्श करून पहा. त्याला हात लावताच पानें मिटून सकुचित होतात. जणु काय तुम्हीं त्या बिचाऱ्या लहानशा झाडाच्या मनोवृत्तीलाच दुखविलें आहे,असें वाटते. हें झाड मोठ्या वाटाण्याचा झाडाच्या वर्गातलेच आहे. दुसरें एक असेंच झाड आहे. त्याला Biophytum Sensitivum असें नाव आहे. त्याला गुजराथींत अथवा मराठीत काय म्हणतात हें मला खात्रीपूर्वक ठाऊक नाहीं. ते जिरानिअमच्या वर्गातले असून त्यालाहि हात लावला असतां असाच प्रकार घडतो. ते लहानसे

फारच सुंदर झाड असतें त्याला पिवळीं फुलें येतात व त्याचा हा बहारीचाच समय आहे. तुमची इच्छा असल्यास मी तें तुम्हाला दाखवितों. वाटाण्याचीच एक जात आहे तिला 'telegraph plant' तारेचें झाड (Desmodium gyrans) असें म्हणतात. हें झाड उन्हासमोर जेव्हां असते तेव्हा आपली पाने इकडून तिकडे सकपरीतीनें, शीघ्रकोपीपणानें हालविण्याची त्याला सवय असते. मला वाटते, ते झाड येथे सापडणार नाहीं. पण तें मागें एकदा मी सिलोनमध्ये पाहिलें होते. ते पाहण्यास फारच विलक्षण असते त्याचप्रमाणे फव्यानिवडुंगाच्या केसराला जर तुम्हीं हात लावलात तर ते जणु काय लाजेनेंच एकदम सकुचित होतात. हिंदुस्थानात अथवा युरोपात दोन्हीं ठिकाणी टेकड्यावर उगवणारीं सूर्यदवाची Drosera rotundifolia लहानशी सुंदर झाडे पाहिली तर आपणास काय वाटेल? त्याच्या पानाच्या वरच्या बाजूला नाजुक व स्निग्धततु असतात. त्या तंतूंवर जेव्हा पतग अथवा माशा येऊन बसतात, तेव्हा त्याचा एकदम गुडाळा होऊन माशीला ते अगदी घट्ट धरून ठेवतात. तेथेच ती माशी अखेरीस मरते व तिच्या शरीराचा भाग आपल्या पोषणासाठी ते झाड शोषून घेत असते आणि अशा प्रकारचे सुदर व नाजुक झाड खरोखरच मोठे रगेल व निर्दयवचक–मासाहारी वनस्पतिच असते

ह्या अपूर्व व विलक्षण हकीकतीवरून असें दिसते, कीं, झाडानाहि प्राण्याप्रमाणे शिरा असतात. 'असें दिसतें' असें म्हणण्याचे कारण वनस्पतीच्या अगच्या ह्या गतीचे अद्याप पूर्ण विशदीकरण झालेले नाहीं.[1] कसेंहि असो, झाडानाहि शिरासारखीच इद्रिये असतात व त्यासारखेच सात्वन व क्षोभन हे विकारहि त्याना होतात. लाजाळु झाडावर जर अफूचे पाणी शिंपडलें तर त्याचा लाजाळुपणा नाहींसा होतो. प्राण्याला अगवायु झाला असता जशी स्तब्धगात्रता येते, तद्वत् त्या झाडाला झाल्यासारखे दिसते. हा प्रकार फारच विलक्षण नव्हे काय?

---

१ प्रस्तुत मात्र असे म्हणता यावयाचे नाहीं. डा. जगदीशचद्र बोस, सी. आय ई, एम्. ए., डी एस् सी, यांचा 'Plant Response as a means of physiological investigation' हा ग्रथ विद्वन्मान्य झाला असून तो सर्वप्रसिद्ध आहे. —भा० क०

त्या वनस्पतिकोटींत अशाच प्रकारच्या आणखी शेंकडों विलक्षण गोष्टी आहेत. त्या निरीक्षण करावयास आपणास दृष्टीच कायती असली पाहिजे. उदाहरणार्थ, सर्वांना हे ठाऊक आहे, कीं, सर्वच फुलें सारा दिवस उमललेली राहत नाहींत. प्रत्येक फुलाची उमलण्याची एकेक वेळ असते. कित्येक प्रभातसमयीं उमलतात, तर कित्येक उशिरा प्रफुल्लित होतात. 'चंद्रलते' सारखीं काहीं फुले तर रात्रींच विकसित होतात व दिवसा ती मुळींच फुलत नाहींत. आणि ह्यावरूनच कित्येक देशातील वनस्पति-शास्त्रज्ञानीं पुष्पघटिका (Flower-clocks) तयार केल्या आहेत. ज्या तासाला जें फूल उमलेल त्यावरून प्रत्येक तास ओळखता येतो. प्रत्येक तासाला उगवणारें फूल हें आहेच. म्हणून यदाकदाचित् जर घड्याळाच्या यंत्राचा शोध लागला नसता तर कालदर्शक साधने या दृष्टीनें बागबगीच्या-कडे आपण अधिक लक्ष्य घातले असतें अशा हजारों रीतींनीं शोभेच्या व उपयुक्ततेच्या दृष्टींनीहि झाडाचा उपयोग होतो.

वनस्पतीचे उपयोग खरोखर अगणित आहेत. आपलें प्रशसासामर्थ्य म्हणजे काहींच नाहीं, इतका त्याचा अति उपयोग होतो. अन्न तर वनस्पतीपासूनच आहे, पण त्याशिवाय आपलीं सर्व औषधें क्विनाईन् तागाईत वनस्पतीपासूनच तयार होतात हें तुझाला ठाऊक आहेच. इमार-तीचें लाकूड व दोरखडाची सामग्री, तसेंच आपल्याला अहर्निश लागणारे हजारों पदार्थ वनस्पतीपासूनच तयार होतात. उदाहरणार्थ, नारळाचें झाड घ्या. तें मनुष्याच्या किती उपयोगी पडत आहे तें पहा! त्याच्या सन्निध राहणाराना त्याच्यापासून दूध व मद्य मिळतें. खोबऱ्याचा खाण्याकडे उपयोग होतो. त्याच्या सोपट्याचा झोपड्यांच्या भिंतीला उपयोग होतो, व त्याचीं पानें छपरावर उपयोगी पडतात. उन्हाचा ताप होऊं नये म्हणून त्याच्या पानांचा छत्रीसारखा व टोपी सारखाहि उपयोग होतो. त्याच्या ततूंचे कपडे, चटया, शिडें व उत्कृष्ट दोर तयार करतात. नारळाचा दोर इतका चांगला असतो, की, तो पाण्यांत सडत नाहीं. नारळाचें मधुर तेल खाण्याला व दिव्यालाहि उपयोगी असतें.

या विषयानें माझें मन तर इतकें वेडावून गेलें आहे, कीं, आतां कोठें थांबावें हें माझें मलाच कळत नाहीं. इतका हा अमर्याद विषय आहे,

कीं, तासन् तास जरी मी बोलत राहिलो तरी संपणार नाहीं. पण आपल्या वेळेला मात्र मर्यादा आहेत हा विषय पुरा करण्यापूर्वी आणखी थोडें चार पाऊलें पुढे तुम्हाला न्यावेंसें मला वाटते. तेणेंकरून द्राक्षवेलीच्या वर्गातील ह्या रमणीय लता, सर्वत्र उगवणारी 'खाट-खाटुम्ह'लता, व शोभायमान पानें व मुबलक वाटोळ्या बोराचे द्राक्षासारखे झुपकेच्या झुपके बाजणारी 'धनवेल', पाहून तुम्हांला आनंद वाटेल. आणि ती कुंपणाच्या पलीकडे थोड्या अतरावरच, जमिनीत एकत्र दाट होऊन पुंजका बनलेल्या मुळाशीं 'द्राक्षासारखे झुपके' असणारी 'कदली' ( Phalangium tuberosum ) नामक अत्यंत रमणीय लहानशी कमळाची जात पहा. ती अगदीं इंग्रजांच्या 'हिमबिंदु'नामक कमलासारखीच आहे, असें रॉक्सबरो म्हणतात. आणि कुंपणावर सर्वात उत्तुंग असलेला तो शोभायमान 'शिंगाडी बचनाग' ( Gloriosa Superba ) पहा. त्याचीं फुलें किती सुंदर व पानें कशीं अजलिबद्ध दिसतात ! त्याच्या फुलात प्रथम पिवळा, नतर नारिंगी व मग तांबडा असें रंगातर करण्याचे सामर्थ्य असतें. सदा बदलणारा अस्थिर गुलाब ( Hibiscus mutabilis ) व लाल चमेली ( Quisqualis Indica ) हीं झाडेंहि अशींच घटकेत पांढरा तर घटकेंत फिकट गुलाबी, व घटकेत फिकट गुलाबी तर घटकेत तांबडा असे आपले रंग बदलीत असतात. जणु काय विनयशालीनतेचाच आव घालतात. 'तेड' ( Convolvuluses ) नांवाच्या जातीचीं काहीं सुंदर झाडेंहि येथे आहेत तीं पहा. तो अतिशोभन श्वेतवर्णी व आपल्या मोठ्या डौलदार फुलांनीं सारीं झाडें आच्छादून टाकणारा 'पांढरा फड' ( Rivea ornata ) व औषधाचें कामीं पुष्कळ उपयोगीं पडणारा 'नसोतार' (Ipomœa turpethum) पहा. ह्याला नसोतार म्हणण्याचें कारण हें कीं, त्याचीं खोडें त्रिकोणाकृति असून त्याला तीन शिरा असतात. तो विशाल 'समुद्रवेल' ( Argyreia speciosa ) ज्याला इंग्रजलोक 'गजलता' 'the elphant creeper' असें ह्मणतात, तो पहा. त्याला सुबक, हलकीं, नीललोहित वर्णाचीं फुलें असून, विशाल वर चढून जाणारीं पेरें आहेत. त्या कांडांनां अथवा पेरांनां वनस्पतिशास्त्रज्ञांनीं 'lianas' असें नांव दिलेलें आहे. कित्येक लोक ह्याला ग्राम्य भावेनें 'समुदरसूल' असें ह्मणतात. ह्या झाडाचाहि औषधीकडे चागला उपयोग होतो.

आतां ह्या विशाल व उत्तुग प्रदेशावरून आपली दृष्टी खालीं घेऊन निम्न व लहान पण तितक्याच रमणीय भागाकडे आपण वळवूं ज्याच्या पिच्छाकृति पानाच्या निवासस्थानावर तेज पुंज नीलवर्णाचे तारे जणुं काय लाजत लाजत मधून मधून चमकत आहेत अशा त्या तुमच्या पायाजवळ असलेल्या, लहानशा रोपाकडे पहा. ते किती रमणीय आहे! मद्रासचे माजी गव्हर्नर सर एल्फिन्स्टन ग्रँट डफ् ह्यानी आपल्या भाषणात त्याचा उल्लेख करून फार प्रशसापर उद्गार काढले होते व इग्लिश 'Speedwell' नामक झाडाशी त्याची तुलना केली होती. ते 'रुखाडी'चें झाड असून त्याच्या केसाळ पानामुळें त्याला ते नाव प्राप्त झालेले आहे. वनस्पति-शास्त्रवेत्त्यानीं त्याला 'Evolvulus hirsutus' अशी सज्ञा दिली आहे कारण, ते Convolvulus वर्गातील झाडाच्या अगदी उलट असून इतर वनस्पतींप्रमाणें त्याचीं पाने एकमेकात वेष्टून न जाता आपल्या सजातीय झाडाच्या पानासारखीं जमिनीवरच लोळत असतात आणखी एक लहान जातीची वनस्पति आहे. ती थडीच्या दिवसात आपल्या बगीच्यातून अगदी सुकाळाची उगवते. इंग्लडातहि ती तितकीच मुबलक सापडते. तिला गुजराथींत अथवा मराठीत काय म्हणतात हे मला माहीत नाहीं. इग्लडात तिला पिंपरनेल (Pimpernel anagallis arvensis) असें ह्मणतात. प्रतिवर्षी जानेवारी फेब्रुवारी महिन्यात ती फुललेली जेव्हा माझ्या दृष्टीस पडते तेव्हा मला केवढा आनद होतो म्हणून तुम्हाला सागूं! आपल्या इकडील 'पिंपरनेल' वनस्पति आणि इग्लिश 'पिंपरनेल' ह्या दोहोंत जर कोणता विशेष असेल तर हाच की, इग्लिश वनस्पति ताबड्या रगाची असते व आपली वनस्पति नेहमी निळ्या रंगाची असते[1]. पक्ष्यांत जशी चिमणी सर्ववासी तशा वनस्पतिकोटींत ही वनस्पति अल्प-प्रमाणावर सर्वत्रनिवासी अशी आहे. तिचीं फुलें कोमेजू लागली म्हणजे फुलांचे देंठ आतल्या अगाने व खालच्या बाजूने वाकडे होत जातात, आणि ह्या खुणेवरून तुम्हाला ती ओळखता येईल. असो. आतां मात्र मला येथें थांबलेंच पाहिजे.

---

१ केव्हा केव्हां इग्लिश वनस्पतिसुद्धा निळ्या रगाची आढळते चे. मॅं.

आतां, वनस्पतींच्या विषयावर मीं जें इतका वेळ लांबलचक चऱ्हाट वळलें याचें कारण काय, असें तुम्हाला वाटेल. याचें कारण इतकेंच, कीं, ह्या व इतर अशाच प्रकारच्या सृष्टिसौंदर्याच्या पदार्थांविषयीं साधल्यास तुमच्या ठायीं सकौतुक प्रेम उत्पन्न करावें अशी माझी फार इच्छा आहे मला वाटतें, असल्या विषयाच्या व्यासगानें तुमच्या ससारसुखात अगणित भर पडल्याचें तुम्हाला आढळून येईल तो व्यासग म्हणजे निर्मळ व कमनीय मनोरजनाचे एक साधन आहे असें तुम्हाला कळून येईल. तेणेकरून तुमची उन्नति होऊन स्वत विषयी क्षुद्र अथवा कुत्सित विचार तुमच्या मनात येणार नाहीत व सृष्टीच्या थोरपदाला तुम्ही पोहोंचाल, इतकेंच नव्हे, तर सृष्टीची देवताहि तुम्हाला प्रसन्न होईल. कारण सृष्टीविषयी वर्डस्वर्थकवीचे पुढील उद्गार मोठे हृदयगम आहेत.—

* " Tis her privilege
Through all the years of this our life, to lead
From joy to joy for she can so inform
The mind that is within us so impress
With quietness and beauty and so feed
With lofty thoughts that neither evil tongues,
Rash judgments nor the sneers of selfish men,
Nor greetings where no kindness is, nor all
The dreary intercourse of daily life,
Shall e'er prevail against us, or disturb
Our cheerful faith that all that we behold
Is full of blessings "

येणेंप्रमाणे वर्डस्वर्थकवीनें सृष्टीचें हृदयगम वर्णन केलेले आहे व ते जितके हृदयगम तितकें यथार्थहि आहे. त्याच्याच मुखांतून असे उद्गार

---

* सदासर्वकाळ आपल्या सुखात अधिकाधिक भर घालणे हा सृष्टिदेवतेचा निसर्गसिद्ध हक्क आहे कारण, आपल्या अतर्यामी वास करणाऱ्या मनाला ज्ञान करून देण्याचे सामर्थ्य तिच्या अगीं इतके आहे, शाततेचा व सौंदर्याचा एवढा बलवत्तर सस्कार तिला करता येतो, व मन उदात्त विचारानी ती इतके भरून काढते, कीं, तिच्यापुढे अभद्रवाणी, हूड विचार, स्वार्थलोलुप माणसाचे नाकें मुरडणे, प्रेमाच्या ओलाव्यावाचून कोरडें अभिनदन, अथवा प्रत्यहीं आचरणातील निरानद दळणवळण हीं सारीं लटपटतात, व जे जे म्हणून आपल्या दृष्टीस पडते ते सारें सुखपूर्ण आहे ही जी आपली आनदपूर्ण श्रद्धा तिच्यात तेणेकरून यत्किचित्हि चलबिचल होत नाहीं.

निघालेले आहेत, कीं, "ज्यानें म्हणून सृष्टीवर प्रेम केलेले आहे त्याचा तिनें कधींहि विश्वासघात केलेला नाहीं." आणि जेव्हा तुमच्या मनांत सृष्टीविषयीं एकनिष्ठ विचार येतील, विचाराने जेव्हा तुम्ही सृष्टीशीं एकजीव व्हाल, तेव्हा तुमचे विचार ईश्वराचे विचारापासून फार दूर राहणारच नाहींत, असें मला वाटतें.

# खेळ.

*"Archery, cricket, gun and fishing rod, horse and boat are all educators, liberalisers, and—provided only the boy has resources and is of a noble and ingenuous strain—these will not serve him less than the books. .Provided always the boy is teachable, football, cricket, archery, swimming, skating, climbing, fencing, riding, are lessons in the art of power, which it is his main business to learn,—riding, specially of which Lord Herbert of Cherbury said 'A good rider on a good horse is as much above himself and others as the world can make him.'"

—Emerson's "Conduct of life"

आपले हें विद्यालय जेव्हा प्रथम सुरू झालें, तेव्हा आपल्या एकदर कार्यक्रमात खेळाना आपण जें उत्तेजन दिले त्यावर जेवढी कडक टीका झाली तितकी अन्य कोणत्याहि बाबतींत झाली नसेल ! विद्यालय म्हणजे विद्यालयच, मग तेथे विद्याध्ययनावाचून अन्य कशालाहि वाव नसावा, व उत्साहपूर्ण खेळात जाणारा वेळ म्हणजे अगदीं वाया घालविणें अथवा त्याचा दुरुपयोग करणेच होय, असा लोकाचा ग्रह झालेला दिसतो. असली ही साशंकवृत्ति अद्यापहि कित्येकाच्या मनात दडून राहिलेली असेल, नाहीं असें म्हणवत नाहीं. पण सामान्य[illegible] आपल्या शाळातून व कालेजातून दोन्हीं ठिकाणी खुल्या हवेंतील मर्दानी खेळाकडे व शारीरिक व्यायामाकडे पूर्वीपेक्षा बरेंच अधिक

---

* निरदाजी, [illegible] (क्रिकेट) [illegible] पद्धतीच, [illegible] व मत्स्यवेधन, घोडा आणि होडी, हीं सारी [illegible], मनाचे ठायी उदारता [illegible] अशीं आहेत; व एखाद्या मुलाची सापत्तिक [illegible] चागली असून त्याच्या ठायी थोर व [illegible] भायासप्रवृत्ति असेल तर ह्या साऱ्या गोष्टी [illegible] इतकेच त्याला सुशिक्षित करण्याच्या [illegible] उपयोगीं पडतील मुलगा मात्र शिक्षणार्ह [illegible] पाहिजे, म्हणजे मग फुटबॉल (पायाने चेंडु उडविण्याचा खेळ), क्रिकेट, तिरदाजी, पोहणें, बर्फावरून घसरणें, दडयुद्ध, घोड्यावर बसून सहल करणे हें सर्व सामर्थ्य विर्धितीचे धडेच होत ते शिकणे हे त्याचे मुख्य कर्तव्य असतें. घोड्यावर बसणे ह्याविषयीं तर विशेषेकरून चेरबरीचे लॉर्ड हर्बर्ट ह्यानीं असे उद्गार काढिले आहेत, कीं, 'चागल्या घोड्यावरील चागला कसलेला स्वार म्हटला म्हणजे त्याच्यापुढे बाकीचे सारे लोक व साऱ्या वस्तु अगदीं तुच्छ होत जगाला त्याची जी कांहीं योग्यता वाटत असते त्यापेक्षा ती कितीतरी पटीने अधिक असते.'

लक्ष्य देण्यांत आलेले पाहून मला आनद वाटतो. गेल्या पंधरा वर्षांत साऱ्या हिंदुस्थानभर ह्या बाबतींत विलक्षण फरक झालेला दिसून येतो. आणि माझी अशी खात्री आहे, कीं, हा फरक लोकाच्या हिताचाच आहे.

कारण, मनुष्य म्हटला ह्मणजे एकट्या बुद्धीच्याच जोरावर त्याला जेवढे कार्य करतां येणे शक्य आहे तेवढीच त्याची योग्यता आहे व असावी असें कोणीहि म्हणणार नाहीं मानवी उन्नतीला मानसिक शिक्षणाचीच कायती गरज आहे असेंहि कोणाला वाटत नाही पण घटकाभर आपण तसेहि जरी गृहित धरून चाललो, तरी बौद्धिक सामर्थ्याचा शारीरिक आरोग्याशीं इतका काहीं निकट संबध असतो, कीं, आपल्या स्नायूच्या शक्तीचा विकास हा, अतिशयत्वानें जरी नसला तरी काहीं योग्य प्रमाणाने आपल्या मानसिक सामर्थ्याच्या योग्य विकासाला अवश्यमेव उपकारकच असतो.

मनुष्यदेह हा अनेक अवयवाचे संमिश्रण असून त्यांच्यापैकीं बुद्धि हा खरोखर एक महत्त्वाचा भाग आहे ज्याला आपण मानवी चारित्र्य अथवा शील असें म्हणतो, ते तयार होण्यास बुद्धीच एकटी स्वत: कारणीभूत होत नसून, ह्या सर्व अवयवाचे समिश्रणच कारण असते आणि जेणेकरून मनुष्याला सर्वांगपरिपूर्णता प्राप्त होते तेच पूर्ण चारित्र्य अथवा शील जाणावे. म्हणून तुम्ही सद्वर्तनी निपजून बहुश्रुतपणा अगी यावा हा जो आपल्या सर्व शिक्षणाचा प्रधान हेतु, तदनुरूप प्रत्येक अगाने आपला विकास होण्याकडे आपलें लक्ष्य असावे तेणेकरून सर्वभाग सुसगत व परिपूर्ण असे होतील. आणि ह्या हेतूच्या सिद्ध्यर्थ प्रभावाचे, सामर्थ्याचे व चातुर्याचे खेळ बऱ्याच अशीं कारणीभूत होतात अशी आपली समजूत आहे. कारण, स्नायूंच्या सुदृढतेबरोबर मन व शीलहि सुदृढ होत असते.

आणि खरोखर जगाच्या अत्यत प्राचीनकाळीं लोकानी ही गोष्ट चागली ओळखली होती असें दिसते. अत्यंत प्राचीन धर्मांतील देवयोनीतील पुरुष व थोर विभूति हे श्रेष्ठतम नीतिमत्तेचेच केवळ मूर्तिमत पुतळे होते असें नसून पूर्णविकसित बाहुवीर्याचे व शरीरसौष्ठवाचेहि ते पुतळे होते. रामावताराला सर्वोत्तम अशा सात्विक गुणाच्या पूर्णविकासाचा चित्रपट असें जें ह्मटलें आहे ते अगदीं यथार्थ आहे; कारण, श्रीरामचद्र हे नुसते महान्

१ हे उद्गार इ स १८८७ सालचे आहेत

प्रतापशाली व सदाचारी होते एवढेच केवळ नव्हे; त्याचें धनुर्विद्येतील प्रावीण्यहि सर्वोत्तम होते. त्याच्या धनुष्यातून सुटणारे बाण कधींहि चुकत नसत. निष्कलंक आचरणात व धर्मनिष्ठेत श्रेष्ठ असा युधिष्ठिर, सामर्थ्याने अतुल असा भीम, शौर्याचे कामात अर्जुन, उत्तम जनावरे आणि घोडे तयार करण्याचे कामात हातखंडा असा नकुळ, ज्योतिषशास्त्रात पारंगत असा सहदेव, अशा पाच पाडवात प्रत्येकजण जरी आपापल्या विशिष्ट गुणानी प्रसिद्धीस आला होता, तरी धनुर्विद्येच्या व अस्त्रविद्येच्या प्रावीण्याबद्दल सर्वांची सारखीच ख्याती होती असे सागतात, की, प्राचीन पर्शिअन लोकानी आपल्या शिक्षणाचे तीन मुख्य हेतु साराशरूपाने ठरवून टाकलेले होते १ धनुष्याने शिकार करणे, २ घोड्यावर बसणे, व ३ सत्यवचन. आणि ह्यासारखेच शारीरिक व्यायामाला प्रोत्साहन देणारे अनेक सदुपदेश आपल्या प्राचीन धर्मग्रथात जागोजागी आढळतात. उदाहरणार्थ "व्यायामरहित शरीराला होणारे अपचनादि विकार घालविण्यासाठी व सामर्थ्य, धैर्य व सहनशीलता इत्यादि श्रेष्ठगुणाचा विकास होण्यासाठीं व्यायाम हा पाहिजे," असा शुक्ल यजुर्वेदातर्गत आयुर्वेदात उपदेश आहे

प्राचीन आर्यांच्या तसेंच पर्शिअन व ग्रीकलोकाच्या महाकाव्यातून वर्णन केलेला व प्राचीनकाळी वारवार घेण्यात येत असलेला तिरदाजीसारखा हितकर व्यायाम युद्धास्त्र म्हणून धनुष्याचा अस्त झाल्या दिवसापासून तर सामान्यतः दृष्टीसच पडत नाही; पण घोड्यावर बसून व्यायाम घेण्याचा प्रकार पूर्वीसारखाच अद्यापहि चालू आहे, व तो कालाच्या अखेरपर्यंतहि तसाच चालू राहील, अशी आशा आहे. लोकांनीं घोड्यावर बसण्याचें सोडून देऊन बायसिकल व ट्रायसिकलवरच ते व्यायाम घेऊ लागले, तर मला अशी शका वाटते, कीं, ह्या व्यायामातराच्या योगे लोकांच्या अगचें बरेंचसें नैतिक सामर्थ्य नाहींसे होईल. एकात व्यायामाचे जेवढे म्हणून प्रकार आहेत त्या सर्वात घोड्यावरील व्यायाम हाच कायतो अप्रतिम आहे. आणि एका अर्थी पाहिले असता, त्यालाहि एकात व्यायाम म्हणता येत नाहीं. कारण, घोडा हा तरी एकप्रकारचा सोबतीच होय. घोडा व स्वार या उभयतामध्ये एकप्रकारे परस्पर अनुकपा उत्पन्न होत असते व ती उभयतांनां कल्याणप्रदच होते असें मला वाटतें. लांबचा पल्ला त्वरित

गांठतां येतो हा तर एक फायदा आहेच; पण त्याशिवाय शेतांतून भरधांव घोडा फेंकीत गेलें असतां थोड्याशा शारीरिक श्रमानें अगांत जें स्फुरण चढतें, तसें अन्य कोणत्याहि व्यायामानें चढत नाहीं. आणि ज्या विद्यार्थ्यांनें असल्या व्यायामाचा उपभोग घेतला असेल, त्याचे हातून विद्याध्ययनहि खचित चागलेंच झाले असेल. नुसत्या घोड्यावर बसण्यापेक्षां घोड्यावरील कवाइतींत व्यायाम अधिक चागला होतो कारण, प्रत्येकाने आपापल्या योग्य ठिकाणीं एकत्र काम करण्यास आपणास कवाईत शिकविते, व ह्या व्यवसायातील विशिष्ट स्वभावाला अनुरूप अशा रीतीनेंच ती व्यवस्थित व अगदीं शिस्तवार पद्धतीने सर्वांच्या होणाऱ्या एकत्र हावभावाची योग्यता आपणास दाखवीत असते. आणि घोड्यावर बसून भाल्याच्या फेकी ( Tilting ) व घोड्यावरून धावतां धावता भाला टोचून तंबूच्या मेखा उपटणें ( Tent pegging ) हे लष्करी खेळ अगीं धैर्य व बल वृद्धिंगत करण्यास व हस्तचातुर्य व नेत्रचापल्य अथवा अचुक दृष्टि याचा विकास करण्यास अर्थातच कारणीभूत होतात. हे प्राचीनकाळच्या भरतभूमींतीलच खेळ होत. इंग्रज लोकांचा पोलो ( घोड्यावर बसून चेंडूचा खेळ खेळणें ) हा सुद्धा उत्कृष्ट मर्दानी खेळ आहे. ह्या खेळात स्वाराच्या अगीं निर्भयता, अत्युच्च प्रतीची तत्परता व त्याबरोबरच शात व पोक्त विचाराची संवय हे गुण अवश्य असावे लागतात. प्राचीनकाळीं भरतखंडातहि कसरतीसारख्या मर्दानी खेळांकडे विशेष लक्ष्य देण्यात येत होतें. कुस्ती, बॉक्सिंग ( इंग्रजी पद्धतीचें बाहुयुद्ध ) व मुद्गलाचे सफाईचे हात लोक करीत असत. उदाहरणार्थ, कौरवपाडवाना मल्लविद्येत एकत्र शिक्षण कसें देण्यात आलें होतें व पाडवानीं नुसत्या मल्लविद्येंतच नव्हे तर मानसिकगुणसंपन्नतेंतहि कौरवावर कशी ताण करून दाखविली, हें महाभारतात वाचल्याचें तुम्हांला आठवतच असेल. हे कसरतीचे व्यायामसुद्धा त्या त्या प्रकारात उत्कृष्टच होत. नुसतें शरीर लोहासारखें कणखर करावयाचें एवढ्याच दृष्टीनें जरी पाहिलें तरी ते व्यायाम सर्वोत्तम असेच आहेत. साराश, माझ्यानें असें म्हटल्यावांचून राहवतच नाहीं, कीं, प्राचीन भरतखंडातील व्यायामाचे बाबतींत व विशेषेंकरून प्राचीन रजपूतलोकांच्या व्यायामपद्धतीच्या बाबतींत तरी, जर अर्वाचीन भरतखंडानें आपलें नांव कायम ठेवलें असतें तर मोकळ्या मैदानांत प्रभावाचे खेळ खेळण्याचें बाबतींत प्रस्तुतकालींहि पाश्चात्य राष्ट्रांपासून

बोध घेण्यासारखें असें फारसें कांहींच त्याला उरलें नसतें. पण खेदाची गोष्ट ही कीं, पूर्वीची कीर्ति आज नाहीं. पूर्वकालीन आर्यांच्या अगीं जें सामर्थ्य होतें व जे मर्दानीचे खेळ ते खेळत असत ते त्यांच्याचबरोबर विलयास गेले !

एवढें सागण्याचा माझा उद्देश हाच कीं, इंग्रज लोक मर्दानी खेळाला जें प्रोत्साहन देतात त्यांत भरतखंडातील सर्वोत्तम अशा राष्ट्रीय कल्पनांशी अथवा पद्धतीशीं विसगत असें काहींच नाहीं, हें तुमच्या नजरेस आणावें. प्राचीन आर्यांच्या अगीं जें स्फुरण सचार करीत होते, ज्या जोमानें त्यांच्या अगीं प्रोत्साहन आलेलें होतें, तेच स्फुरण व तोच जोम इंग्रजी खेळानीं अगात संचार करतो.

शिक्षणविषयांत ज्याचा अधिकार थोर अशा एका नामाकित गृहस्थानें असे उद्गार काढिले आहेत, कीं, "शिक्षणाला व्यायामाची जोड मिळाली, तर त्याच्या योगें शारीरिक व्यायाम व मनोरंजक खेळ असा दुहेरी फायदा होतो. निवळ श्रमसाध्य असा कोणताहि व्यवसाय करीत असता कंटाळा येऊन आपल्या आवडीप्रमाणें मनोरंजक खेळ खेळणें ह्यातच जीवितसाफल्य असतें. बंदिवासातून निघून स्वतत्र हवेत येणें, अधकारातून प्रकाशांत येणें, एकतानतेला कटाळून नानाविधतेचा आश्रय घेणें, दानावस्थेतून ग्रहणावस्थेत प्रवेश करणें, याचेंच नाव दु.खाचा विसर पाडून सुखोपभोग घेणें. हेच श्रमाचें अप्रतिम असें पारितोषक आहे व ते द्विगुणित उत्साहाने दीर्घ परिश्रम करण्यास अगीं सामर्थ्य व सहनशीलता हे गुणहि उत्पन्न करते."

आतां मानसिक परिश्रमानतर विश्राति म्हणून कोणतेहि खेळ मनोरजक तर वाटतातच; पण त्याच्या योगें केवळ मानसिक परिश्रमानें ज्या साध्य होणाऱ्या नसतात अशा अनेक गोष्टींचें शिक्षणहि आपणांस मिळत असतें. पोलोसारख्या खेळात घोड्यावर बसण्यात पटाईतपणा, शांत विचार, हस्तचापल्य व अढळ दृष्टि हे गुण अगीं आवश्यक असावे लागतात हें मीं वर सागितलेंच आहे. त्याशिवाय समता हा आणखीहि एक गुण अगी असावा लागतो व तो अन्य कोणत्याहि गोष्टींपेक्षां खेळानेंच आपणांस अधिक चांगला कळतो. शक्तीच्या खेळात फसवेगिरी ही आपणांस करतांच येत नाहीं.

---

१ बेनकृत 'Education as a Science' पृ. ४६ पहा.

आणि जर फसवेगिरी आपण करू तर खेळात अर्थच राहणार नाही. शुद्ध समताबुद्धि, उभय पक्षानां सारखीच निःपक्षपात न्याय्यता, यांची खेळात इतकी आवश्यकता असते, कीं, त्यांवाचून कोणतेहि खेळ खेळताच येणार नाहींत. क्रिकेटच्या खेळांत अम्पायर ( मुख्य गडी )च्या म्हणण्याविरुद्ध कोणालाहि ब्र काढता येत नाहीं याचें कारण हेच आहे. स्वत. आपल्याविषयी आपलें कसेहि मत असलें तरी दुसऱ्याच्या मताला मान देणें हे नेहमीं फार श्रेयस्करच असते ज्याना अधिक कळत असतें व ज्याच्या ठायी शीलसामर्थ्य अधिक असते अशा तरुण मंडळींच्या खेळापेक्षा लहान मुलाच्या खेळावर देखरेखीची नेहमी अधिक गरज लागते याचें तरी कारण हेंच असावें असे मला वाटते. फसवेगिरीच्या मोहपाशांत न पडणें हें लहान मुलाना नेहमी साधत नाहीं. अथवा खेळात आपणांस अपजय येणार हें कळतांच आपला रागहि त्याना आवरून धरता येत नाहीं, आणि असें झालें म्हणजे मग भांडणे होऊन सर्व खेळ अखेरीस बिघडतो ह्मणून व्यायामाचे जे मुख्य धर्म आहेत त्यापैकींच एक हा आहे, की, ते आपणास आपलें मन आपल्या ताब्यात ठेवण्यास, राग न येतां शात ठेवण्यास, शिकवीत असतात कारण, जर आपले मन अनावर होऊन राग आला तर आपल्या हातून सर्व खेळावर विरजण पडण्याचाच फार करून संभव असतो, व ही गोष्ट क्रिकेटच्या खेळातील आपल्या अनुभवावरून आपणास ठाऊक आहेच. विपरीत परिस्थितीत परिश्रम करणे, आशा बाळगणें व मन शांत राखणे, हाच नेहमी अप्रतिम मार्ग आहे. प्रयत्नात कसूर म्हणून कधींहि होऊं देता कामा नये, राग केव्हाहि येता कामा नये, आणि निराश म्हणून होता उपयोगी नाहीं. रग्बी येथील शाळेतील वर्तनक्रमासंबधी 'टॉम ब्राऊनचे शाळेंतील दिवस' या नावाचें जें एक इंग्रजीत पुस्तक आहे त्यात क्रिकेटच्या खेळाविषयी फारच उत्तम वर्णन आलेले आहे. त्यांतूनच मी येथे एक अवतरण घेतों तें वाचीत असतां आपणा सर्वांच्या परिचयाचें अशा एका प्रसगाचें हुबेहुब चित्र आपल्या डोळयापुढे उभें राहतें. ज्या पक्षाचा टॉम ब्राऊन हा कप्तान होता ती अकराजणाची टोळी फिल्डिंग म्हणजे चेंडु अडविण्याचें काम करावयास मैदानावर आली, व विरुद्धपक्षाचा एक महाप्रतापी, अचुक टोले मारणारा गडी ब्याट ( फळी ) घेऊन तीन उंच खुंट्या जेथे रोवतात तेथे वुइकेटजवळ आला तेव्हा

त्यांच्यापैकीं सर्वांनां असें वाटूं लागलें, कीं 'आतांच कायतें आपणास खरें कौशल्य दाखवावयाचें आहे. नवीन आलेल्या ब्याटरची ऑफ् हिटिंगची (समोरच्याबाजूने थोडा तिरपा टोला मारण्याची) पद्धत फारच भयकर होती. आणि तो इतका तिरासारखा धांवत असे, कीं, जणुंकाय वीज चमकत आहे, असें वाटे. वुइकेट खालीं पडल्यावाचून त्याचा पाय जमीनीवर असा कधींहि राहत नसे. मुलाची परीक्षेची वेळ अशी साऱ्या खेळात दुसरी कोणतीहि नसते. त्या गड्याने पहिल्या दहा मिनिटातच तीन 'बाईज़' (फळीला चेंडू न लागता तसाच तो दूर अतरावर जाऊन पुन्हा वुइकेट कीपरच्या अथवा बौलरच्या हाती परत येईपर्यंत मध्ये सापडणाऱ्या अवकाशात टोले मारणारा ज्या धावा काढीत असतो त्या) पटकाविल्या. 'लागस्टॉप' वर उभा असलेला जॅक् रॅगल्स् क्रोधाविष्ट होऊन अगदीं निष्ठुरतेने पलीकडील वुइकेटवर चेंडू जोराने फेंकू लागला. ते येथवर, कीं, अखेरीस कॅप्टनला त्याला असें करूं नकोस म्हणून कठोरतेनें सागावें लागलें आपल्या पक्षाच्या मडळींत स्थैर्य राखण्यासाठीं त्याच्या हातीं जेवढें होतें तेवढें त्याने केलें. आणि प्रत्येक गोष्ट स्थैर्यावर अवलबून असते हे त्याला माहीत होतें व त्याप्रमाणें त्याने आपलें काम शौर्यानें बजावलें. फळ्यावरील आकडा बघता बघता पन्नांसावर गेला. मुलाचीं तोंडें उतरत चाललीं व प्रेक्षकाच्या ज्या झुडीच्या झुडी लोटल्या होत्या त्या अगदी तटस्थ झाल्या. ब्याट्स्मनच्या ब्याटीला चेंडू लागून तो मैदानात वाटेल त्या भागात जात असे. कोणालाहि विश्राति म्हणून अथवा कोणच्याहि हातीं चेंडू म्हणून त्याने लागूं दिला नाहीं पण क्रिकेट म्हणजे वैभवशाली दैवयोगाचाच सारा खेळ आहे, व अम्पायरचें (अध्यक्ष) सारें लक्ष्य अत्यत चतुर खेळाडूंनां आपण जित केव्हा करूं इकडे लागलेलें असते. जॉन्सन् नांवाचा तरुण बोलर अगदी सताप्त चालला होता व प्रत्येक चेंडू बहुतेक 'बाईड टु दी ऑफ' असाच देऊं लागला. ब्याटरने पुढें येऊन 'कट' इतका नामी दिला, कीं, चेंडू अगदीं 'कव्हर पाइट' वर गेला. अर्थात तो फेकणारानें जमीनीच्या बाहेरूनच दिला होता व तेथून तीन फुटावरच चेंडू हळु हळू वळत येत गड्याच्या डाव्या हातात कसातरी अचानक घुसला. त्यासरसें त्याचें त्याला व मैदानावरील साऱ्या लोकांना अत्यंत आश्चर्य वाटलें. अशा तऱ्हेनें चेंडू झेललेला कित्येक वर्षेपर्यंत कोणाच्याहि पाहण्यात

आला नव्हता. तेणेकरून त्याचा आनंद गगनांत मावेनासा झाला. कॅप्टननें मोठ्यानें सुस्कारा टाकून उघड्या पडलेल्या वुइकेटच्याजवळच आंग टाकून 'प्रेटि क्रिकेट' किती सुंदर खेळ, ह्मणून उद्गार काढिले त्याला असें वाटत होते, कीं, मोठी आणीबाणीचीच वेळ टळली."*

अमुक एखादा गडी पुष्कळ वेळ टिकेल, तो 'आउट' होणार नाहीं, असे आपणांला वाटत असते, तोच जेव्हा एखाद्याचा चेंडू दुसरा अचानक झेलतो, अथवा अचानक चेंडू वुइकेटवरच येऊन पडतो, तेव्हां आपल्याहि मनात अगदीं असेच कितीतरी विचार वारंवार येऊन गेलेले आहेत. आणि आपणा सर्वांची अशी स्थिति या खेळात कशी साहजिक होत असते हे तुह्माला चागले ठाऊक आहेच. कारण मानवी स्वभाव हा येथून तेथून बहुतेक सारखाच, मग तो राजकोटांत असो वा रुग्बीत असो.

पुढे जेव्हा शाळेतील अकरा गड्याची ब्याटिंगची पाळी आली तेव्हा रुग्बी येथील शिक्षकापैकी एकजण टॉम ब्राऊनला ह्मणाला "क्रिकेट हा किती उत्कृष्ट खेळ आहे! तेणेकरून शिस्तीचे व अन्योन्य विश्वासाचे जे शिक्षण आपणास मिळत असते ते खरोखर फार अमोल आहे असें मला वाटते; आणि तो खेळ असाच निष्काम असला पाहिजे. त्या खेळात प्रत्येकाला आपल्या स्वतत्र आपलेपणाचा विसर होऊन अकराजणाचें मिळून एक असे आपलेपण वाटत असते, इतके प्रत्येकाचे व्यक्तित्व अकराजणाच्या व्यक्तित्वात विलीन होत असते. मला जय मिळावा या स्वार्थबुद्धीने प्रत्येक गडी खेळत नसून माझा पक्ष विजयी व्हावा या उदात्तभावाने तो खेळत असतो."

यावर टॉम् ह्मणाला "हे अगदीं खरे आहे. ज्या खेळात पक्षाभिमानाला जागा नसून, आपण पहिले यावे, अथवा आपल्यालाच एकट्याला यश मिळावे,

* क्रिकेट हा खेळ इग्रजाचा असून तो हल्लीं प्रत्येक विद्यार्थ्याला माहीत झालेला आहे व त्यातील शब्दप्रयोग इतके रूढ झालेले आहेत, की, त्याच्या जागी निवळ मराठी शब्द वापरणे हास्यास्पद होईल इतकेच केवळ नव्हे, तर हे अन्य एखाद्या खेळाचेच वर्णन आहे कीं काय असेहि वाटेल या भीतीने आम्हीं इग्रजीतीलच शब्दप्रयोग जसेच्यातसेच वापरले आहेत. —भा क.

ह्याच हेतु असतो, अशा 'हेअर ॲन्ड हाउन्डस्' सारख्या अथवा अशाच प्रकारच्या इतर अनेक खेळापेक्षा फुटबॉल व क्रिकेट हे पुष्कळ चागले असें जे अलीकडे प्रत्येकाला वाटू लागलें आहे, त्याचें तरी कारण हेंच आहे."

ह्यावर तो शिक्षक पुनः ह्मणाला "अकरा गड्याचा कॅप्टन होणे हेंसुद्धां आपल्या या शाळाखात्यात केवढे बहुमानाचें आहे! ती जागा ह्मणजे हेडमास्तरच्या जागेइतकीच कठीण आहे, तेवढीच जबाबदारीची आहे. त्याच्या अगी चातुर्य, सौजन्य व निश्चय हे गुण अवश्य लागतात व आणखीहि अनेक दुर्मिळ गुण असावे लागतात.

हे म्हणणें म्हणजे क्रिकेटच्या खेळापासून होणाऱ्या नैतिक फायद्यांचे अतिशयोक्तीचे वर्णन आहे, असें मला काही वाटत नाहीं. क्रिकेट हा सर्व खेळाचा राजा, सर्व खेळात अग्रगण्य, असें म्हटले तरी चालेल; व तो खेळ आपण खेळू लागल्यास त्यापासून आपले हितच होईल. या काठेवाडात तर तो बराच लोकप्रिय झालेला पाहून मला खरोखर फार आनद वाटतो. पण खुल्या हवेत खेळता येणारे आणखीहि इतर मर्दानी खेळ आहेत, नाहींत असें नाहीं तेहि आपण खेळलों तर वावगे नाहीं 'आत्मदमना'चे शिक्षण ज्याला शाळेतच चागल्या तऱ्हेनें मिळते, आपल्या पक्षात स्थैर्य कायम ठेवणे व आपले कर्तव्य धीटपणानें बजावणे, हे धडे जो शाळेतच नीट शिकलेला असतो तोच पुढें मोठेपणीं लोकात हुकमतीच्या अथवा अधिकाराच्या जागेवर आरूढ होण्यास पात्र ठरल्यावाचून राहत नाहीं शारीरिक आरोग्य व कार्यक्षमता या गुणाबरोबरच चातुर्य, सौजन्य, अढळता, निस्स्वार्थबुद्धि, धिमेपणा, सहनशीलता व आत्मदमन या उच्चतर गुणाचा विकास ज्या ज्या गोष्टीमुळे होतो त्या सर्वांकडे आपले लक्ष्य जाणें हे अगदी उचित आहे असेंच समजावे शाळेंत व अभ्यासाच्या वेळी जर तुम्हीं चागला मन लावून अभ्यास केलात

---

१ हा खेळ साधारणत आठदहा मुलात होत असतो एका पक्षाला चार व दुसऱ्या पक्षास चार मुले एकाला 'हेअर' ही सज्ञा व दुसऱ्याला 'हॉउन्ड' ही सज्ञा असते पहिल्याच्या जवळ लहान लहान पिशवींत कागदाच्या चिटोऱ्या देऊन त्याना दहा मिनिटे अगोदर सोडावयाचे व त्यानीं जाताना जागोजाग वाटेल तेथे ज्या चिटोऱ्या टाकलेल्या असतील त्यावरून त्याचा दुसऱ्या पक्षानी पत्ता लावण्याचा प्रयत्न करावयाचा

तर अशा प्रकारच्या खेळांत तुम्हीं जो कांहीं काळ घालवाल त्याबद्दल मग कोणालाहि तुम्हांला योग्य रीतीनें नावें ठेवतां येतील अथवा नाकें मुरडतां येतील असें मला वाटत नाहीं. अर्थात्, फुरसतीच्या वेळाचा याहून अधिक चांगल्या रीतीनें तुम्हांला कसा उपयोग करतां येईल हें सागणें कठिण आहे. कारण, जे शिक्षण तुम्हाला कोणत्याहि शाळेत मिळणार नाहीं ते ह्या रीतीनें घालविलेल्या वेळांत तुम्हाला संपादन करता येईल ते शिक्षण म्हणजे जी कर्तव्यें आणि ज्या अडचणी पुढें आयुष्यांत आल्यावांचून राहतच नाहींत तीं योग्य रीतीने बजावण्याची व त्यांना तोड देण्याची तुमच्या अगी जेणेंकरून अधिक पात्रता येईल असे स्वावलबन, शाति आणि धैर्य व इतर अनेक अप्रतिम गुण यांचा विकास होणें हेंच होय.

# स्वगृह.

"Heaven's light our guide."

आपल्या ह्या सहामाहीच्या प्रारंभीं येथील विश्वविद्यालयातील तुमचे हक्क व कर्तव्ये याविषयी मी तुम्हाला चार शब्द सागितले. आतां ही सहामाही लवकरच संपेल, व पुढचा आठवडा येतो न येतो तोंच तुम्ही सर्वजण कदाचित् आपआपल्या घरीं परत जाल. ह्मणून घरचे हक्क व घरचीं कर्तव्यें या विषयांवर आज चार शब्द तुह्मांला सांगावेत असा माझा मानस आहे या अति महत्त्वाच्या विषयावर बोलण्यास परमेश्वर मला साहाय्य करो.

आपल्या स्नेह्याच्या गाठी आतां पडतील, ज्याच्यावर आपले अतोनात प्रेम असते अशा आपल्या बाळपणच्या आनददायक ठिकाणीं आपणास आता जाता येईल, या विचारात निमग्न होऊन तुमची सर्वांचीं मने अगदीं हर्षनिर्भरित असतील, तुमच्या मनात आनदाच्या उकळ्या फुटत असतील. आणि हा आनद तरी अत्यंत स्वाभाविक व यथार्थ असाच असतो. केवढी धन्यता वाटण्याजोगी ती गोष्ट असते! मानवी अतःकरणात खळबळ उडविणारे जे अत्यत शुद्ध, अत्युदात्त असे मनोभाव आहेत त्यापैकींच कुटुंबप्रेम व गृहप्रेम हे होत आपल्या प्रिय नातलगांचा काहीं दिवसापुरता वियोग हा त्याचे आपल्यावर केवढें दृढबद्ध प्रेम असते याची खरी कल्पना होण्यास बराच साहाय्यक होतो 'माझें घर' या एका शब्दात जी अत्युत्कृष्ट धन्यता गर्भितार्थानें साठविलेली आहे त्याची योग्यता अधिक वाटूं लागते. कालेजात राहण्यापासून जे फायदे होतात त्यामध्यें हे फायदे लहानसान आहेत असें नाहीं. पित्याचा चागुलपणा, मातेचा कोमळपणा, बंधुभगिनींचें परस्पर निष्काम प्रेम याहून अधिक मौल्यवान् अशा वस्तु साऱ्या दुनियेत आपणास सापडणार नाहींत! स्वगृहाला धन्यता आणणाऱ्या ह्याच गोष्टी आहेत. स्वर्गलोकाशीं साम्य पावणारें ह्या जगांत जर काहीं असेल तर तें 'सुखमय स्वगृह' हेच होय. मग ते स्वगृह सुदाम्याची पर्णकुटिका असो वा एखाद्या राजाचा महाल असो. आणि ह्याबद्दल आपणा सर्वांनां सारखेच ईश्वराचे आभार मानतां येतात.

माझ्या मित्रांनो तुम्हांला तर ईश्वराचे आभार मानण्यास विशेष कारण आहे. कारण, परमेश्वरानें तुम्हाला अत्युच्च प्रकारचीं घरे दिलेली आहेत. अथवा ती देण्यात त्याचा हेतु असा दिसतो कीं, सुख आणि समृद्धि, मान आणि आदर, अत्युच्च कर्तव्यें आणि अनेक सुसवि याचा पूर्ण विकास होण्यास अवकाश मिळावा व तुमच्या सभोंवतालच्या यच्चयावत् परिगणाना आनदाश्रय देण्यास तुमचे अगचे तेज विलसावे प्रत्येक दरबार हा जणुंकाय सभोंवतालच्या यच्चयावत् इतर घराचे श्रेष्ठ घरच होय.

कालेजात सहा महिने विद्याध्ययनात व शिस्तीनें वागण्यात घालविल्यावर तुम्ही अशा प्रकारच्या घरी परत गेले असता, केवळ तुम्हालाच नव्हे तर तुमच्याचप्रमाणे ज्याचें तुमच्यावर निस्सीम प्रेम असते त्यानाहि खरोखर अत्यानद झाल्यावाचून राहत नाही. अशा प्रकारचा आनद केवढा असतो ह्याचा मला स्वत ला अनुभव आहे तो आनद खरोखरच फार मोठा असतो, हे मला माहीत आहे त्या आनदाचा तुम्हीं पूर्ण अनुभव घ्यावा अशी माझी इच्छा आहे. आणि आजचा आदित्यवार शेवटचाच आहे. म्हणून सुट्टीचा उपभोग चागल्या रीतीनें कसा घेता येईल, अथवा अन्य शब्दानी बोलावयाचे म्हणजे सुट्टीचा चागल्या तऱ्हेनें उपयोग कसा करून घेता येईल, याचा शातपणें विचार करण्यात चार मिनिटे तुम्हीं मजबरोबर घालवावीत असे माझें तुम्हाला सागणे आहे

सुट्टी म्हणजे रिकामा वेळ अथवा फुरसदीचा वेळ हे तुम्हाला ठाऊक आहेच. त्याचा अर्थ काम संपल्यावर आता आपल्याला विश्राति आहे असा आहे अशा प्रकारची विश्राति मिळणे हे शरीराला व मनाला हितावह असते, व आवश्यकहि असते कामाचा सारखा बोजा आपणास सहन करवतच नाही विशेषेंकरून मानसिक कामे तर विश्रातीवाचून होतच नाहीत. आपलें कर्तव्यकर्म बजावण्यासाठीं अत करणपूर्वक व कळकळीने प्रयत्न करण्यात जर आपण आपला वळ घालविला असला तर सुटीच्या दिवसात मिळणाऱ्या विश्रातीचा आपल्या मनावर अधिक चागला परिणाम होतो

पण हें मात्र विसरता कामा नये, कीं, वृथा कालक्षेप करण्यात विश्रातीचा उपभोग घ्यावयास सापडत नाहीं. मग पापाचरणांत निमग्न राहून, स्वार्थ-लोलुपबुद्धीने स्वार्थासक्त आचरण करून व इतरांना दुःख आणि त्रास देऊन

स्वत.ला आनद होईल अशा तऱ्हेनं वागण्यात तर विश्रातीचा उपभोग मुळोच सापडत नाहीं, हें सागावयासच नको. मला अशी शका वाटते, कीं, तुमच्यापैकी बहुतेकजण घरीं परत गेल्यावर बिघडण्याचाच फार करून सभव असतो. तुमच्या भेटीला फार दिवस झाले असल्यामुळे तुम्हीं घरी परत गेल्यावर तुमचे स्वागत करण्यात घरच्या माणसाना स्वाभाविकपणेच आनद वाटत असतो. आणि तुमची थट्टामस्करी करण्याची त्याची प्रेमळ इच्छा असते, व त्याचा परिणाम असा होण्याचा सभव आहे, कीं, त्याच्या योग्यतेच्या मानाने फारच कस्पटासारखे व अवमानानें तुम्हीं त्याच्याशी कदाचित् वागू लागाल. शाळेत काहीं दिवस काढल्यावर पुन घरी जाऊन चार दिवस काढण्यात जे एक भय असते ते हेच. त्यापेक्षा शाळेत राहण्याचा मुळीच प्रसग न येता घरीच ज्याचे सारे आयुष्य जाते, त्याला बहुतकरून तेवढी भीति बाळगण्यास जागा नसते. शाळेतील शिस्तीच्या कचाटींतून आपण आता मोकळे झालो या भावनेनं कदाचित् घरी गेल्यावर ज्याला त्याला उपद्रव देण्याकडे तुमची सहज प्रवृत्ति होईल. आणि घरी तर अत्यतश्रेष्ठ अशा माणसापासून तो अगदी अत्यंत कनिष्ठ दर्जाच्या माणसापर्यंत सर्वाची तुमची सुट्टी आनदात जावी म्हणून अत्यंत इच्छा असते. म्हणून तुम्ही त्याच्या प्रेमळपणाचा कदाचित् दुरुपयोग कराल मातापितराशी उद्धटपणाने वागून तुम्ही त्याची कदाचित् अवज्ञा कराल बंधुभगिनीशी तुम्ही कदाचित् भाडाल. तुमचा शब्द झेलण्यास अगदी तयार असणाऱ्या तुमच्या सेवकगणाच्या अगावर धसकन् घसरून तुम्ही कदाचित् त्याना कठोरतेनं वागवाल. आणि याहूनहि वाईट गोष्टी तुमच्या हातून कदाचित् घडतील. आईबापाच्या सदुपदेशाचा त्याग करून, ह्या शाळेत शिकलेले बोधपर धडे विसरून, सद्गुणाचा व कर्तव्याचा मार्ग सोडून, आणि ईश्वराला विसरून, घरच्या स्वातंत्र्याचा उपयोग तुम्हीं कदाचित् नीच व दुराचारी सल्लागाराच्या नादी लागण्याकडे कराल. आणि म्हणून जे काही चार सहा आठवडे तुम्हीं घरी काढणार तेवढ्या अल्पावकाशातच मर्यादातिक्रमाच्या व अवनतकारी विषयासक्तीच्या घाणेरड्या जळ्यात तुम्ही गुरफटून जाण्याचा सभव आहे कारण, मला सागण्यास फार खेद वाटतो, कीं, पापमोह असा काहीं बलवत्तर असतो, की, एकदा मनुष्य त्याच्या पाशात सापडला म्हणजे त्यात त्याचे पाऊल अधिकाधिक खोल रुतण्याकडेच त्याची

सहज प्रवृत्ति होते. अशा मार्गाने सुट्टीचा काळ आनंदात तर जाणार नाहींच, पण उलट आपली सर्व सुट्टी दुःखात व लाजिरवाण्या गोष्टीतच आपण घालविली, एवढी आठवण मात्र सदैव कायम राहील मी आज जितक्या कळकळीनें तुम्हांला हे सांगत आहे तितकेंच तें सत्य आहे हें ध्यानात ठेवा. आजपर्यंत तुमच्या हातून असें कधी झाले असेल असें मी म्हणत नाहीं पण तुम्हीं जर काळजी घेणार नाहीं तर मात्र असें होण्याचा संभव आहे एवढी सूचना करणें अगदी रास्त आहे असे मला वाटतें

म्हणून मी तुम्हाला अशी उपदेशपर सूचना करतों, की, तुम्ही आळशी होऊं नका. आपला काळ व्यर्थ घालविण्यात विश्रांतीचा व उद्योगविरतेचा खरा उपभोग घ्यावयास सापडत नाहीं हे मी वर सांगितलेंच आहे. येथे कॉलेजात तुमचे आचरण नियंत्रित असतें व घरच्या मानानें येथे तुम्ही निर्भय असता. आपापल्या घरीं तुमचा काळ सदाचरणानें आनंदात जावा म्हणून तुम्ही स्वतःसाठी काहीं नियम घालून ठेवावे, हे बरे. दररोज काहीं तास अमुक रीतीनें घालवावयाचे असा निश्चय करा, व योग्य आणि सदाचारी माणसांवाचून अन्य कोणाशीहि कधी संगति करावयाची नाहीं, असाहि निश्चय करा दररोज तीनचार तास जर नियमितपणें वाचनात घालविले—व ज्याच्या वाचनामुळे तुमचे चांगले हित होईल असे करमणुकीचे ग्रंथ गुजराथीभाषेंत काय व मराठीभाषेंत काय अनेक आहेत—तर मला वाटते, तुमचे दिवस फार आनंदानें जाण्यास, अगदी काहींच न वाचता दिवस जो कंटाळवाणा जावयाचा त्यापेक्षा कितीतरी अधिक आनंदानें दिवस जाण्यास एक चांगलें साधन सापडलें, असें तुम्हाला आढळून येईल. कॉलेजात अभ्यास करता तसा सुट्टींत तुम्ही करावा, असें मी तुम्हास सांगत नाहीं. पण तुम्हाला जे विषय विशेष आवडतात व जे ग्रंथ वाचण्यास कॉलेजात तुम्हाला अवकाश सापडत नाहीं, असलेच ग्रंथ तुम्ही वाचा. मग ते ग्रंथ सृष्टीच्या इतिहासावरील असोत, खेळाचे असोत, भौतिकशास्त्राचे असोत, काव्यग्रंथ असोत वा कल्पित गोष्टी असोत. पंधरा दिवसापूर्वी सृष्टिसौंदर्याविषयी मी जेव्हा बोललों त्या वेळीं तुमच्यापैकी काहींजणानीं मला असें अभिवचन दिले होतें, कीं, येत्या सुट्टींत आम्ही आपापल्या घराभोंवतीं मुबलक उगवणाऱ्या अनेक वन्य वनस्पतींचा संग्रह करू, आणि त्याबद्दल मला फार आनंद वाटतो. कारण, तें कार्य

करण्यात यच्चयावत् ग्रंथभांडारात अप्रतिम असा जो सृष्टिग्रंथ त्याचें तुम्हीं अवलोकन करीत राहाल. तो ग्रंथच असा आहे, कीं, त्याचे जितके अधिक पर्यालोचन करावे तितके त्याच्याविषयी अधिक कौतुक व प्रेम आपल्या मनात जागृत होते. आणि इतके होऊनहि त्या ग्रंथाचे संपूर्ण अवलोकन आपणास करताच येत नाहीं! मला वाटते, तुम्ही दररोज सकाळसंध्याकाळ काहीं वेळ उघड्या हवेत खेळ खेळून शारीरिक व्यायाम घेण्यातहि घालविल्यास बरे होईल. जे आरोग्यदायक व मनोरंजक खेळ तुम्ही येथे कालेजात शिकला आहात ते घरी इतर मंडळीनाहि खेळण्यास तुम्ही उत्तेजन द्याल अशी मला आशा आहे यांप्रमाणे वाचनात व शारीरिक व्यायामात तुमचा दररोज बराच वेळ मोठ्या आनंदात जाईल बाकीचा राहिलेला वेळ अर्थातच तुम्ही आपल्या नातलगाच्या व स्नेह्याच्या संगतींत घालवाल आता अशाच्या संगतींत सर्वकाल तुम्ही आपले आचरण नम्रतेचे, सौजन्याचे व प्रेमाचे ठेवा. आणि स्वतःविषयीच विचार करण्याच्या अगोदर इतराविषयी तुम्हीं विचार करा. घरी ज्या गोष्टी कळण्याचा संभव नसतो त्या तुम्हाला येथे कॉलेजात कळल्यामुळे आपल्याला जणुंकाय श्रेष्ठप्रतीचे ज्ञान प्राप्त झाले आहे अशा गर्वाने व अज्ञानाने तुम्ही त्याच्याशीं वागूं नका. पण नम्रतायुक्त, सौजन्यपूर्ण व विनयशाली असा आचार ठेवून, लोककल्याणार्थ स्वार्थत्याग करून व जेणेकरून तुमच्या सभोंवतालच्या सर्व मंडळीला आनंद व सौख्य होईल असे आचरण ठेवून तुम्हीं खरोखर राजकुमार कालेजातील विद्यार्थी या नावाला योग्य आहात हे त्याच्या निदर्शनास आणा. असें झाल्यावर तुमची सर्व सुट्टी तुम्हाला खरोखर सौख्यपूर्ण व आनंददायक होईल, सर्वांच्या प्रेमादरास तुम्ही पात्र व्हाल. आणि येणेंप्रमाणे, जेव्हा तुम्ही पुनः कॉलेजात परत याल तेव्हां (हुमायुनानें अकबरासाठीं जशी आपली इच्छा प्रदर्शित केली होती तद्वत्) तुम्ही आपल्यामागे आपल्या घराच्या आवारासभोंवतीं कस्तुरीच्या मधुर सुवासाप्रमाणें आपला कीर्तिपरिमल दरवळून सोडाल. जर प्रत्येक राजकुमाराने अशा प्रकारें आचरण ठेवलें तर तेणेकरून ह्या कॉलेजालाहि खरोखर भूषण व आनंद वाटेल.

तर मग घरी पाळावयाचे असे पुढील तीन नियम तुम्ही आपल्या स्वतःसाठीं घालून ठेवा.

१ ला. आपल्या वेळेची काळजीपूर्वक वाटणी करणे.

२ रा. सद्वर्तनी व योग्य अशाच सोबत्यांच्या सहवासांत सदैव राहणे.

३ रा आपल्याहून श्रेष्ठ, आपल्याबरोबरीचे व आपल्याहून कनिष्ठ अशा सर्वांशीं सारखेंच निरभिमानतेने, सौजन्याने व विनयाने वागणे.

हे नियम झाले खरे, पण आता याप्रमाणें वागावयाचें कसें ? ह्या प्रश्नाने माझ्या विषयाची एक अधिक खरी बाजू, खरे अंग, माझ्यासमोर उभे राहते. कारण, त्या प्रश्नाचें उत्तर असें आहे, कीं, त्या सर्व गोष्टी ईश्वराशीं सान्निध्य पावून करावयाच्या असतात. आणि तुमच्या सुट्टीचा वेळ अन्य कोणत्याहि गोष्टीपेक्षा भक्तियुक्त ध्यानातच अधिक जावा, असे मला वाटते. कॉलेजात तुम्हाला अशा गोष्टीकडे लक्ष्य पुरविण्यास अवकाश नसतो, याबद्दल मला खरोखर फार खेद होतो पण आपणापैकीं प्रत्येकाला आपले स्वत चें घर म्हणजे धर्माचे केंद्रस्थान, उगमस्थान व पाळणा असे असते. आपल्या मनावर धर्माचा जो एवढा ग्रह सामान्यत. होत असतो त्याचें कारण तरी आपल्या घराशी असणारा धर्माचा निकट संबंध हेच होय मूल जसें आपल्या मातेला कवटाळून धरतें, आपल्या कुटुंबालाच चिकटून राहते, तद्वत् प्रत्येकजण स्वभावतःच आपापल्या धर्माला चिकटून असतो. निदान माझी तरी तशी समजूत आहे माझे म्हणणें फक्त एवढेच आहे, कीं, आपणापैकीं प्रत्येकाने जे पवित्र व दिव्य आहे त्यालाच चिकटून राहण्यास दक्ष असावे. कारण तेणेकरून, आपला पंथ मग कोणताहि असला तरी, आपलें आचरण आपल्या स्वत.शी व परमेश्वराशीं सत्यपूर्ण असे झाल्यावाचून राहणारच नाही श्रीमद्भगवद्गीतेत हाच आदेश आहे

> **श्रेयान् स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।**
> **स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावह ॥ ३. ३५.**
> **स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नर । १८. ४५**

ह्या गोष्टीमुळें आणखी एक मोठी अडचण माझ्या डोळ्यापुढे दत्त म्हणून उभी राहते ते एक मोठे गूढ असून त्याचा उलगडा मला करता येत नाही. मला जर कशात समाधान व सुख वाटत असेल तर ते ईश्वराला ती अडचण ठाऊक आहे व तो सर्वज्ञ आहे ह्या ज्ञानातच होय. अर्थात्, माझी अडचण म्हटली म्हणजे, जेथे तुमचा धर्म एक व माझा धर्म दुसरा अशा ठिकाणीं धर्मासारख्या विषयावर बोलणें हीच होय. आपण सर्वजण

जर एक असतो, ह्या बाबतींत माझ्याचप्रमाणे तुम्हीं असतां, तर फार बरें झाले असते असें मला वाटते. तथापि एवढी गोष्ट अगदी खरी आहे, कीं, व तिच्यावर विश्वास ठेवल्यावाचून माझ्याने राहवतच नाहीं, ज्याच्या सहस्रकरांतून किरणप्रकाश सर्वांवर सारखाच पडत आहे ज्याची वाणी सर्वांच्या अत करणांत ज्ञानज्योत प्रज्वलित करून सर्वांना सारखीच मार्गदर्शक होत आहे असा परमेश्वर तुमचा वेगळा आणि माझा वेगळा असा नसून सर्वांचा एकच आहे यावत्कालपर्यंत आपण त्याची मनोभावाने सेवा करीत राहू व त्याच्या शुद्ध व पवित्र सान्निध्यात आपण आपलें आचरण शुद्ध व पवित्र ठेवण्याचा प्रयत्न करूं, तावत्कालपर्यंत त्याचे प्रेम आपणा सर्वांना पुरून उरेल इतके राहील, असा माझा ठाम ग्रह आहे याला अनुसरून मी तुम्हाला असें सागतो, की, तुम्ही ईश्वरासन्निध राहण्याचा प्रयत्न करा व सर्व सुष्टीभर सदाचाराने राहता यावे म्हणून त्याच्या साहाय्याची तुम्ही करुणा भाका

अखेरीस तुम्हाला जो उपदेश मला करावासा वाटतो तो मी* एका प्राचीन ख्रिश्चन लेखकाने जे सुंदर उद्गार काढिले आहेत त्या शब्दानीच सागतों माझ्याप्रमाणेच तुम्हालाहि ते प्रशसनीय वाटतील ते मला व तुम्हाला सारखेच लागू आहेत. त्याचा तुम्ही नीट विचार करा. ते असे —

"प्रेमाच्या ओलाव्यावाचून वरपंगी कितीहि काम केले, अर्थात् अत करण-पूर्वक जे काम घडत नाहीं त्यापासून अर्थनिष्पत्ति काहींच होत नाहीं! पण जे जे प्रेमपुरस्सर हातून घडते ते सर्व फलद्रूप होऊन जगाच्या दृष्टीनेंहि कधीच अत्यल्प अथवा तिरस्करणीय असें होत नाहीं

"मनुष्य काम किती करतो ह्यापेक्षा त्याच्या हातून प्रेमाने किती काम घडते याचीच परमेश्वर परीक्षा पाहत असतो व त्यालाच तो अधिक महत्व देत असतो ज्याचे हृदयी प्रेम पुष्कळ त्याचे हातून काम अधिक होते.

"ज्याचे हातून काम नीट घडते त्याचे हातून पुष्कळ कामगिरी होते

"स्वत च्या इच्छेचाच दास होण्याऐवजी जो काहीशी समाजसेवा करीत असतो, ज्याच्या हातून लोकसग्रह घडत असतो, त्याच्याकडून चागले काम होते

---

1 Thomas a' Kempis, First book, ch. XV c m

"ज्याच्या हृदयी खरें व पूर्ण प्रेम वसत असते, त्याला स्वार्थाची चाड नसते. उलट यच्चयावत् गोष्टीत परमेश्वराच्या वैभावाचा उत्कर्ष व्हावा अशीच त्याची इच्छा असते.

"तो कोणाचा हेवा करीत नाही, कारण, स्वहिताविषयी त्याला पर्वा नसते किंवा स्वार्थात त्याला आनंदहि वाटत नाहीं, उलट सर्व गोष्टीपेक्षा ईश्वरभजनातच अधिक सुखाची तो अपेक्षा करीत असतो"

सुसंगति सदा घडो, सुजनवाक्य कानी पडो,
कलंक मतिचा झडो, विषय सर्वथा नावडो,
सदंघ्रिकमळीं दडो, मुरडितां हटानें अडो,
वियोग घडतां रडो, मन भवच्चरित्रीं जडो.

न निश्चय कधीं ढळो, कुजनविघ्नबाधा टळो,
न चित्त भजनीं चळो, मति सदुक्तमार्गीं वळो;
स्वतत्व हृदया कळो, दुरभिमान सारा गळो,
पुन्हां न मन हें मळो, दुरित आत्मबोधें जळो.

# उत्कंठा.

"नेहमीं आपण आपली शिकस्त करीत असावें," ह्या लहानशा वाक्यात जनतेच्या अप्रतिम जीवनदशेला आवश्यक अशा यच्चयावत् गोष्टींचा सूत्ररूपानें समावेश केलेला आहे स्वबलानुरूप, आपापल्या मगदुराप्रमाणें, आपले आरोग्य आणि सौख्य, आपली सुशीलता आणि सुस्थिति, व आपल्या शेजाऱ्याविषयीची व ईश्वरासंबधीची आपल्या कर्तव्यकर्माची कीर्तिकर सिद्धि या सर्वांना हितकर होणाऱ्या सर्व गोष्टी त्यात समाविष्ट झाल्या आहेत.

'आपली पराकाष्ठा करणे' याचा अर्थ असा, कीं, चागल्या गोष्टी यथाशक्ति अप्रतिम रीतीनें करणें. कारण, वाईट गोष्टी ह्या आपलें परमोच्च ध्येय असें कधींहि होत नाहीं. आणि चांगल्या गोष्टी अप्रतिम रीतीने करणे ह्मणजे त्या कायावाचामनेंकरून, उत्साहाने, उत्कंठेनें व दीर्घोद्योगानें, अचल भक्तीनें, प्रेमजन्य आवेशाने व ईश्वराच्या साक्षित्वाने व ईश्वरार्पणबुद्धीने करणें होय. "ज्याच्या हृदयांत प्रेम पुष्कळ वसत असते त्याच्या हातून कामें फार होतात, व जो काम नीटनेटकें करतो त्याच्या हातून पुष्कळ कामगिरी होते," असें जें मी गेल्या व्याख्यानाचे शेवटी म्हणालों त्याचा तरी अर्थ वरीलप्रमाणेंच होय.

अन्यशब्दानें थोडक्यात सागावयाचें झाल्यास कोणतेहि काम चागल्या रीतीनें करणें ह्मणजे तें प्रेमपूर्वक केल्यावाचून गतिच नसते. वरील अवतरणाच्या प्रारंभी मागे सागितल्याप्रमाणें कोणतेहि काम प्रेमपूर्वक मन घालून न करतां नुसते वरवर केल्यास त्यापासून कांहींहि फायदा होत नाहीं पण ज्या प्रेमानें एकादें काम चागल्या रीतीने तडीस जाते तें दोन निरनिराळ्या कारणामुळें उद्भवत असतें. (१) एकतर कामच प्रिय असतें, किंवा (२) ईश्वरावर भक्ति असते ह्मणून. ह्या दोन्हीं कारणांच्या सयोगामुळेंहि तें प्रेम कधीं कधीं उद्भवण्याचा सभव असतो, व तसें झाल्यास ते प्रेम अत्युदात्त असतें.

आपणांस एखादें कार्य करण्यास आनद वाटतो म्हणून ज्या प्रेमानें तें आपण चागल्या रीतीने करीत असतों त्याला अभिरुचि असें ह्मणतात आता अभिरुचि अथवा आवड म्हणजे काय, हें आपणा सर्वांना ठाऊक आहे.

ते एक प्रकारचें स्वाभाविक प्रेम असते हे प्रेम अथवा ही अभिरुचि कांहीं अशी आनुवंशिक असते व काही अशीं परिस्थितीच्या आधीनत्वामुळें अथवा सामर्थ्यामुळे विकास पावलेली असते. ह्या परिस्थितीच्या सामर्थ्यामुळें एकाच प्रकारच्या व्यासंगाकडे, एकाच प्रकारच्या खेळाकडे, एकाच विषयाच्या अध्ययनाकडे एका मनुष्याची प्रवृत्ति होते तर दुसऱ्याची दुसऱ्याच विषयाकडे होते. हा प्रकार जगात सर्वत्र, प्रत्येक राष्ट्रातील लोकामध्यें, व प्रत्येक युगात आणि ससाराच्या प्रत्येक अवस्थेत आपल्या दृष्टीस पडतो बहुतेक आपणा सर्वांच्या बाबतीत अशा काहीं गोष्टी असतात, कीं, त्याविषयी आपणाला स्वभावत च आवड असते व त्या आपण मोठ्या उत्साहाने व चागल्या रीतीने करीत असतों पण मला अशी शका वाटते, कीं, ते जितके खरें आहे तितकेच हेहि पण खरे आहे, कीं, कित्येक गोष्टींविषयीं आपल्याठायी साहजिक आवड नसल्यामुळे आपणापैकी बहुतेकजण अनेक चागल्या गोष्टींची, ज्या करण्यास कर्तव्यकर्म आपणास प्रोत्साहन देत असते अशा अनेक गोष्टींची हयगय करीत असतात. याचा अर्थ असा, कीं, कर्तव्यासाठी आपली जी उत्कंठा असते त्यापेक्षा आपले स्वाभाविक कलच नेहमी अधिक बलवत्तर असतात. जी गोष्ट आपणास आवडते ती करणें सोपें असते, आणि ती सोपी असते म्हणून ती आपण करतो आणि आपणास ती आवडत असते म्हणून ती आपण चागल्या रीतीने करीत असतों. जसजशी ती अधिकाधिक चागल्या रीतीने आपण करूं लागतो, तसतसें अधिकाधिक उत्कंठेनें आपण त्यात मन घालूं लागतों. येणेप्रमाणे जी गोष्ट, उदाहरणार्थ पक्ष्याचीं व त्याच्या अड्याची, वनस्पतीचीं अथवा शिंपाचीं नावे, इतराना आमरण देखील कळत नाहीं, ती ज्याना सृष्टीच्या इतिहासाची अभिरुचि असते त्यानां कदाचित् अल्पावकाशातच कळूं लागते. ज्यांची स्मरणशक्ति व कल्पनाशक्ति चागली असते अशा कित्येक लोकाना वाङ्मयात्मक व्यासगाविषयी अभिरुचि व प्रेम असते. ज्याच्याठायीं विचार करण्याची शक्ति दाडगी असते त्यानां गणितविषय स्वभावत च पसत वाटत असतो. कित्येकाना गायनाची इतकी स्वाभाविक लालसा असते की, तो एक बहुतेक छंदच त्यांच्याठायीं होऊन बसलेला असतो. कित्येकाना चित्रकला व शिल्पकला आवडत असते. कित्येकाना मानसिक व्यासगापेक्षा शारीरिक व्यासंगच अधिक आवडत असतात,

तर कित्येकाना उघड्या हवेंतील मर्दानी खेळ, चपलतेची, सामर्थ्याचीं व विलासाची कामें आवडत असतात. ही सर्वप्रकारची अभिरुचि आपापल्या परीने चागलीच असते, पण ती सर्व पूर्णांशाने कोणाएकाच्याहि ठायी नसते. त्यापैकीं एक अभिरुचि ज्याच्याठायी अतिशयत्वाने वास करीत असते त्याला आपण त्या शाखेंत अत्यंत बुद्धिमान् असें ह्मणतो पण कोणाच्याहि ठायीं त्या सर्व किंवा त्याच्यापैकीं अनेक अभिरुचि ठळकपणे व उत्कृष्टतेने वास करीत असल्याचें दृष्टीस पडत नाहीं. बुद्धिमान् माणसाच्या अगचें सामर्थ्य म्हणजे चित्ताच्या एकाग्रतेवाचून, जी गोष्ट आपणास विशेष आवडत असते त्यावरच सतत परिश्रम घेण्याच्या सवयीवाचून अन्य अधिक असें काहीच नसते, असें त्याचे वर्णन केलेलें आहे.

आपल्या स्वाभाविक अभिरुचीमुळे आपले कर्तव्यकर्म करण्याकडेहि ज्याची प्रवृत्ति होते तो मनुष्य खरोखरच सुखी होय. पण पूर्णार्थानें जर ह्याचा विचार आपण करू लागलों तर हा प्रकारसुद्धा काहीं झालें तरी क्वचित् दृष्टीस पडतो आणि विशेषत मुलाच्या व तरुण जनाच्या बाबतीत तर हा प्रकार क्वचितच आढळतो. कारण, सामान्यत आपल्या असें नजरेस पडते—व ते अगदीं स्वाभाविक आहे—की, मुलाच्या व तरुणांच्या अभिरुचीचा कल आपणा सर्वाचे अत्युच्च कर्तव्य असे जे उच्चतर व पारमार्थिक व्यासंग असतात त्याच्यापेक्षा एखाद्या शारीरिक खेळाकडे अथवा काहीं झाले तरी अशत शारीरिक अशाच एखाद्या शारीरिक व्यायामाकडे काहींसा असतो. आणि वर ह्मटल्याप्रमाणे तो स्वाभाविकच असतो ह्या जगात आपणास जी अवस्था प्राप्त झालेली असते तिचा तो स्वाभाविक परिणाम असतो शारीरिक अवस्थाचे ते स्वाभाविक कार्य असतें आणि विशेषतः तरुणाच्या ठिकाणीं तर शारीरिक प्रवृत्ति फार बलवत्तर असतात. ह्या शारीरिक प्रवृत्तीचा व शरीराना जेथे आपापली कामे करावयाची असतात अशा भौतिक जगाचा—जड सृष्टीचा—कल पारमार्थिक विचार आपल्या मनात न येऊ देण्याकडे व अत्युच्च असें जें कर्तव्य तें आपल्या दृष्टीआड करण्याकडेच असतो म्हणून आपणास जागे करण्याची जी आवश्यकता असते ती एवढ्याचसाठीं विशेषत· तुमच्यासारख्या तरुणाना तर ही आठवण करून दिल्यावाचून भागतच नाहीं, कीं, आपलें अखिल कर्तव्यकर्म, आपली सारी इतिकर्तव्यता इहलोकचीच आहे असे नव्हे; खेळ, व्यायाम अथवा विहार

हे स्वतः चांगले जरी असले तरी तेवढ्यानेंच आपलें सारें कर्तव्य संपलें असें होत नाहीं, मग शारीरिक भोगतृष्णेंत स्वार्थलोलुपतेने निमग्न राहून तर होतच नाहीं, अथवा ज्ञान हा जरी कर्तव्याचा एक उदात्त भाग आहे तरी केवळ सर्वांशीं ज्ञानाच्याच पाठीमागें लागून अखिल कर्तव्य होत नसतें; तर उलट ज्या कर्तव्यनिष्ठेला आपण औत्सुक्य, अतिश्रद्धा असें म्हणतों, त्या कर्तव्यप्रेमाने, ज्यात मानवजातीवरील व मानवी जगांतील यच्चयावत् चागल्या गोष्टींवरील प्रेमाचा अतर्भाव होतो अशा ईश्वरविषयक प्रेमाने प्रेरित होऊन ह्या वरील साऱ्या गोष्टीच्या समुच्चयाला संस्कृतता आणण्यात व एक पूर्ण समग्र भाग असें मानण्यात कांहींसें आपलें सारें कर्तव्य येतें.

आणि म्हणून, माझ्या तरुण मित्रानो' जेणेंकरून साऱ्या यातना अगदीं क्षुल्लक वाटतात, साऱ्या अडचणी अगदी सुकर वाटतात, अशा ह्या अतिभक्तीच्या—औत्सुक्याच्या—पवित्र सामर्थ्याची,—उत्कंठापूर्ण कर्तव्यनिष्ठेच्या सामर्थ्याची मला तुह्मांला आठवण करून द्यावीशी वाटते ईश्वराच्या इच्छेने वागावयाचे—देवाच्या इच्छेनें वर्तावें, देव करील ते मानावे–ह्या दासबोधाने एकदा आपल्या मनांत जागृति झाली म्हणजे मग कोणतीहि गोष्ट दुष्कर अथवा अप्रिय अशी वाटणार नाहीं. कारण सर्वच गोष्टी ईश्वरावरील प्रेमासाठीं घडून येतील. आणि जी गोष्ट ईश्वरभक्तीनें होते ती चागलीच होते.

मूकं करोति वाचालं पङ्गुं लंघयते गिरिम् ।
यत्कृपा तमहं वंदे परमानंद माधवं ॥

"परमानंद माधवाच्या चरणारविंदीं मिलिंदायमान झाल्यावर कोणता दुर्बल समर्थ होणार नाहीं? कोणती शीतलता अग्निप्रदीप्त होणार नाहीं? कोणती कटुता मधुर होणार नाहीं?"

ह्मणून मी तुह्माला असें सागतों, कीं, जी जी गोष्ट तुम्ही कराल त्या त्या गोष्टींत ईश्वराचा विचार करा, व त्याचा विचार करीत असता, मनात उत्कंठा, कळकळ व एकाग्रता असूं द्या. आपणापुढे आलेलें कर्तव्यकर्म उत्तम रीतीने करण्यास तुम्ही आपली होईल तितकी पराकाष्ठा करा.

आजपर्यंत तुम्हीं असा प्रयत्न कधीं केला नसेल तर, मी सांगतों 'उद्याची वाट न पाहता तें आजच सुरू करा.' हें काम करणें अर्थात् सुकर नाहीं. अन्य गोष्टींप्रमाणें उत्कंठा आणि औत्सुक्य यांची पूर्ण वाढ व सामर्थ्य

एकाकी दृग्गोचर होत नाहीं. तरी पण मी ह्मणतों तुह्मी आपली पराकाष्ठा ही कराच. मनापासून प्रयत्न करा आजच प्रारंभ करा, व प्रारंभ करण्याच्या अगोदर ईश्वराचे साहाय्य मागा ईश्वराच्या साहाय्यावांचून आपणास काहींच करता येत नाही पण त्याचे साहाय्य असल्यावर कोणतेच कार्य अशक्य वाटत नाहीं म्हणून त्याची करुणा भाका, व तो तुम्हास साहाय्य केल्यावाचून राहणार नाहीं आणि यदाकदाचित् जर तुमचा प्रयत्न खरोखरच मनापासून असेल, तर तुम्हाला मिळालेल्या साहाय्याबद्दल तुम्हाला आश्चर्य वाटेल, व त्या आश्चर्यभरात तुमची उत्कठा आणि औत्सुक्य हीं झपाट्याने वृद्धिंगत होतील आणि ती लवकरच परमेश्वर-प्रतिबिंबाप्रमाणे तुमच्या ठायीं प्रदीप्त झालेली दिसू लागतील

आणि असें झाल्यावर बाकीच्या सर्व गोष्टी आपोआप त्याच्या मागोमाग येतील ससारातील यच्चयावत् बारीक सारीक गोष्टी सुद्धा ह्या प्रेम-ज्योतीने प्रकाशित होतील आणि अशा रीतीने प्रकाशित होऊन रमणीयता प्राप्त झालेले प्रत्येक कर्तव्यकर्म तुमच्या हातून मोठ्या उत्कठेने घडेल आणि म्हणून ते चागलेंहि होईल केवळ स्वार्थपरलालसेने अथवा आत्मतृप्तीनें, अथवा निव्वळ समारिक हिताच्या दृष्टीने व्यापार अथवा भौतिकशास्त्र अथवा कला एतद्विषयक व्यासगाला वाहून घेणाऱ्या लोकाना किती चागलें यश येत असते हे पाहून खरोखरच आश्चर्य वाटते ज्या अतिभक्तीने मनुष्य प्रत्येक गोष्ट आपल्या स्वत साठी न करिता ईश्वरार्पणबुद्धीने करीत असतो, त्या पवित्र औत्सुक्याने प्रेरित होऊन इहलोकच्या व्यासगात व व्यवसायातच पडणाऱ्या लोकाना किती अधिक चागले यश मिळत असते असे तुह्माला वाटते ? मी वर सागितल्याप्रमाणे, अशा रीतीने ईश्वराची सेवा करण्यात आपण आपल्या स्वत ची व बाधवाचीहि अप्रतिम ऐश्वरी मार्गाने सेवाच करीत असतो

म्हणून मी ह्मणतो, ईश्वराविषयी विचार करा व तुह्मी आपली पराकाष्ठा करीत रहा. तसें करण्यास आताच प्रारभ करा, आजच सुरुवात करा तुह्मी आपले कर्तव्यकर्म करा. मग ते कोणतेहि का असेना ते कायावाचा-मनेंकरून, नीट मन लावून व सामर्थ्याने करा. आपल्या स्वाभाविक अनिच्छेला, मानवी अप्रीतिला दूर सारण्यास तुह्माला तुमचें मन व सामर्थ्य

ही दुर्बल आहेत असे कदाचित् वाटेल तर तुम्ही ईश्वराचे साहाय्य मागा व तुमच्या ठायी अभिनिवेश असेल, तुमचा प्रयत्न अंतःकरणपूर्वक असेल तर, ईश्वराचे साहाय्य मिळाल्यावर तुम्हाला यश आलेच म्हणून समजा.

कोणतेंहि काम असेना, तुम्ही आपले कर्तव्यकर्म करावयास विसरूं नका ईश्वराचे साहाय्य घेऊन तुम्ही आपली शिकस्त करा तुम्हाला मदत व्हावी ह्मणून मी काहीं व्यावहारिक नियम तुम्हाला घालून देतो त्याचा तुम्हाला उपयोग होईल असा मला भरंवसा आहे निष्काळजीपणा अथवा आलस्य अगीं येऊ देऊ नका उलट कार्यक्षमता, तरतरीतपणा व चपलता हे गुण अगी असू द्या सकाळीं घांट वाजताच निजून उठा व वेळ दवडूं नका काळजीपूर्वक व नीटनेटका असा आपला पोषाख करा पोषाखाची बाब का होईना जे करणें उचित असते ते चागलेच करणे योग्य असते. मग दुसरी घंटा होताच खेळ खेळण्यास अथवा व्यायाम घेण्यास वेळेवर तयार रहा व्यायाम घेण्याचे कामात तरलता व चपलता दाखवा हीं कामेसुद्धा आपल्या हातून होतील तितकी चागली करावयाची असतात कारण, व्यायाम हे काम चागले असून तेहि चागल्या रीतीने करून दाखविणे योग्य आहे व्यायामापासून स्वतःला जेवढे हित करून घेता येण्याजोगे असेल तेवढे घेण्याचा प्रयत्न करा कारण सध्या तुह्माला येथे जसा हा फायदा करून घेता येण्यासारखा आहे तसा तो पुढे अन्यत्र तुम्हाला साधणार नाही तसेंच फिरून फुरसतीच्या वेळीहि व्यवस्थितपणाने रहा सौजन्यपूर्ण आचरण ठेवा, व आपल्या स्नेह्याना मदत करण्यासाठी तुम्हाला मिळालेल्या सधीचा अत्युत्तम उपयोग करून घ्या त्याच्या कल्याणाविषयी अत्युत्कठा असूं द्या ईश्वराच्या साक्षित्वाने सदैव वागा तुम्ही शाळेत जेव्हा येता तेव्हा तेथे शारीरिक शिक्षणापेक्षा मानसिक शिक्षणाचे अधिक उच्चप्रतीचे असे कर्तव्यकर्म तुम्हाला करावयाचें असते उच्चतर असे म्हणण्याचें कारण हे की, मन हें शरीरापेक्षा श्रेष्ठतर आहे कारण शरीर हे इहलोकचें म्हणजे नश्वर आहे, व मन हे अमर आत्म्याचा अश आहे असे आपण मानतो म्हणून शारीरिक शिक्षणापेक्षा मानसिक शिक्षण हें दिव्यतर आहे, हे लक्ष्यात ठेवा होईल तितका चागला अभ्यास करा, व ईश्वराजवळ त्याच्या सर्वज्ञतेची मदत मागा आपल्यातील अत्यत मद बुद्धीच्या विद्यार्थ्यांची सपादित उत्कंठा, म्हणजे दाडगा परिश्रम करण्याची संवय, ही त्याच्या

स्वाभाविक सामर्थ्याची उणीव किती चागली भरून काढीत असते हे पाहून आश्चर्य वाटते म्हणून तुम्ही जर हुशार नसला तर निराश होऊं नका ईश्वरावर मात्र भरवसा ठेवा त्याचे साहाय्य मागा व तुम्ही आपली शिकस्त करा **'उद्धरेदात्मनाऽऽत्मानं'** हे भगवंताचें वचन अगदी सत्य आहे चातकाला जर मेघोदक पाहिजे तर त्याने तोंड उघडले पाहिजे, एरवी ते प्राप्त व्हावयाचे नाही

हे वरील म्हणणें जसें आत्म्यासबंधी तसेंच देहासबंधीं व मनासबधी सत्य आहे पारमार्थिक गोष्टी, अमर आत्म्यासबंधी विचार व आचार हे सर्वांत अति महत्त्वाचे आहेत कारण, सर्वकालीं आपला सबध पोंहोंचणाऱ्या अशा ह्याच गोष्टी आहेत मानसिक अथवा शारीरिक अशा यच्चयावत् इतर गोष्टीच्या मुळाशीं त्याचा सबध असतो. त्याचा इहलोकींच केवळ सबंध होतो असें नव्हे, तर त्या नित्य आहेतच अतएव, माझ्या मित्रानो ! सर्वश्रेष्ठ व नित्य महत्त्वाच्या अशा पारमार्थिक बाबतीत आपण मन पूर्वक प्रयत्न करावा यांत सदेह नाही. आश्चर्य हे की, ऐहिक असारतेच्या तेजात, धंद्यात व स्वार्थांत गुरफटून गेल्यामुळे डोळे दिपून जाऊन हे महाप्रमाण सत्य आपल्या सहज दृष्टिआड होते म्हणून आपल्या हातून जी जीं कर्में घडतील त्या सर्व प्रसगी ईश्वराचे हृदयात स्मरण ठेवणे ही मुख्य उत्कंठा आपण अवश्य बाळगिली पाहिजे आणि मग कोणतेहि कर्म आपल्या हातून चागले व उत्कंठेनेच घडेल व ते ईश्वरार्पणबुद्धीनें घडेल ईश्वराचें साहाय्य मिळण्यासाठीं, वर सागितल्याप्रमाणे आपल्या हातून स्वत प्रयत्न घडून आपण आपल्यालाच साहाय्य करू. आणि मुख्यत ह्याच मार्गानें वेळेस एकच गोष्ट करून, आपलें सारें लक्ष्य त्यात घालून, तनमनधन अर्पण करून, आपणास आपल्या स्वत ला साहाय्य करता येते, आपल्यालाच आपला उद्धार करता येतो आपल्या मानवी प्रकृतीची घटनाच अशी काहीं आहे, कीं, एकसमयावच्छेदेंकरून, अनेक गोष्टी आपणास करताच येत नाहींत. म्हणून वेळेला जें काम करणे प्राप्त होईल, जें कर्तव्यकर्म पुढे येईल तेच एकटे तनमनधनेकरून ईश्वरार्पणबुद्धीने आपण करावें. म्हणून मी म्हणतों, प्रत्येक खेपेस एक एक कार्य आपण करावें. तात्कालिक जी गोष्ट आपल्यापुढें येईल तेवढीच आपण नीट करावी. त्या वेळेपुरतें तीच गोष्ट आपले क्रियमाण, प्रस्तुत कर्तव्यकर्म, होय असें जाणावे. कित्येकांची मागलापुढला विचार न करण्याकडेच फार

प्रवृत्ति असते व असें करण्यांत हातच्या कामाकडे दुर्लक्ष्य होतें "अ., हें करण्याचा प्रयत्न करून मला काय उपयोग? मला कितीदा तरी अपयश आलेलें आहे कालच तर हें माझे फसलें, व आज फिरून प्रयत्न करावयाचा म्हणजे खात्रीने अपयश हे ठेवलेलेच ! मला वाटते, त्यात काहीं आशा दिसत नसून त्याचा नाद सोडून देणे हेच बरे," असें म्हणण्याकडे कित्येकाची वाजवीपेक्षा फाजील प्रवृत्ति असते. अथवा मागे घडलेल्या दु खद प्रसगाचा आणि पापाचरणाचा, आलेल्या अपयशाचा व झालेल्या निराशाचाच ते एकसारखा विचार करीत राहतात व वर्तमानकाली धैर्यगलित होऊन बसतात आणि धैर्य खचल्यावर त्याचे सामर्थ्य व उत्साहहि नाहींसा होतो. असले सर्व भूतकालावलोकन अगदी निरर्थक व चुकीचे होते. त्यापासून काहींच फायदा होत नाहीं. तेणेकरून आपला उत्साह शिथिल होतो, आपली उत्कंठा कमी होते. तसेंच कित्येकाना उद्याचाच विचार करण्याची खोड असते, व तो 'उद्या' कधीहि येणारा नसतो; ते म्हणतात "उद्या कदाचित् ह्याला वेळ सापडेल व आजच्यापेक्षा अधिक चांगला वेळ सापडेल; आतातर ते आपल्याला मुळीच करावेसें वाटत नाहीं; मग कदाचित् अधिक प्रवृत्ति झाली तर पाहू" उद्या उजाडतो व फिरून त्याचे हेंच रडगाणे सुरू असते प्रत्येक क्षणी मनाचा कल कमी, उत्कठा कमी व कामहि कमी आणि अशा तऱ्हेनें वेळ निघून जातो, महिनेच्यामहिने व वर्षानुवर्षे लोटतात. हातून काम काहींहि होत नाहीं. प्रत्येक गोष्ट ही व्हावयाचीच असते. ते एथवर कीं, अखेरीस मृत्यूचे बोलावणें येऊन आयुष्याचे सारे नाटक कायमचे बंद पडते, मृत्यूच्या रात्रीची काळोखी पडून ससारकर्तव्याच्या लहानशा दिवसाचा कायमचा अस्त होतो. तेव्हा गतावलोकनाचा विचार करा. उत्कठेवाचून साऱ्या जन्माचे मातेरे होऊन अखेरीस तोहि आपण गमावतों.

म्हणून माझें तुम्हाला असें सागणे आहे, कीं, वर्तमानकालावर दृष्टी ठेवूनच तुम्ही वागा. तेजस्विता व आशा अगी असू द्या. परिश्रम करा. होऊन गेलेल्याचा विचार करू नका, गतकालाबरोबर गतकालच्या संधीहि गेल्या. भविष्यत्कालाचाहि विचार करूं नका; कारण, पुढे काय होईल हें कोणीं पाहिलें आहे! पण वर्तमानकालाचाच फक्त विचार करा. प्रस्तुत तुम्हापुढें जें काहीं असेल त्याचाच विचार करा. आजच्याच कर्तव्याचा

विचार करा, व तेंच अगदी मन पूर्वक करा. हीच खरी उत्कठा इहलोकी यच्चयावत् चागल्या व पवित्र कार्याचे खरें मर्म, रहस्य, हेच आहे कारण, उत्कठेवाचून कोणतेच कार्य चागले घडत नाहीं, व ईश्वराच्या कृपाप्रसादा-वाचून कोणतेहि कार्य खरोखर चागल्या रीतीने होतच नाहीं, अशी माझी समजूत आहे म्हणून ईश्वराने सदैव आपल्या सन्निध राहून आपणावर कृपा करावी एतदर्थ आपण त्याची करुणा भाकावी अशा रीतीने आपले इहलोकचे कार्य उदात्तपणे आपणास पार पाडता येईल, व ते सपल्यावरहि अधिक पूर्णार्थाने आपणास त्याच्याच सन्निध राहता येईल. आपण इहलोकीं ईश्वराची सेवा करून आपली ससारयात्रा सुखाने घालविली या आठवणीने आपणास धन्यता वाटेल परिश्रम, कष्ट करणें म्हणजे ईश्वराची प्रार्थना करणेंच होय, अशा अर्थाची इंग्रजीत एक म्हण आहे. कष्टमय जीवित हे एक नित्य स्तुतिपर लहानशा प्रार्थनेसारखेच आहे. कारण,

Life is real life is earnest,
And the grave is not its goal
Dust thou art to dust returnest,"
Was not written of the soul

" 'स्वप्नापरी मनुज जीवित हे असार!'
ऐसा विलापपर सागु नको विचार,
'नाहीं पहा मनुज जीवित हे असार,'
ऐसें कितीक वदले बुध थोर थोर.

कर्तव्य जो न करि तो नर भूमिभार,
राहे जिवंत, परि, तो मृत हेचि सार;
जैशी दिसे स्थिति तशी न तुवां गणावी,
हें सत्य पूर्ण अवघे नरजन्म दावी. "

# स्थित्यंतरें.

(उदयास्त.)

*अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते ।
इति मत्वा भजंते मां बुधा भावसमन्विताः ॥ १ ॥
मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयंतः परस्परम् ।
कथयंतश्च मां नित्यं तुष्यंति च रमंति च ॥ २ ॥
तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ।
ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयाति ते ॥ ३ ॥

भगवद्गीता, अ. १०

वस्तुजाताला उदयास्त हा लागलेला आहे. स्थित्यंतर हा सृष्टिनियम असून जो जन्माचाहि नियम आहे **'जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च'.** ह्या जगात अशी एकहि वस्तु नाही, की, जी सदासर्वकाल सारखी अविकार्य अशी राहते उदय आणि अस्त, येणे व जाणे, विरह व संगम, नफा व नुकसान अशा स्थित्यंतराच्या एकसारख्या कल्लोळातच आपण दिवसानुदिवस, घटिकानुघटिका वावरत आहोत, व ह्या येण्याजाण्याचा, नफानुकसानाचा आपणा मर्त्य मनुष्यावर हरतऱ्हेनें परिणाम होतो त्याचा आपल्या कर्मेंद्रियावर परिणाम घडतो, मनावर व अंतःकरणावरहि परिणाम घडतो.

मी काय म्हणतों याचा क्षणभर विचार करा या भूतलावर सतत एकसारखी राहणारी चिरस्थायी अशी एकहि वस्तु नाहीं. मी वर म्हटल्याप्रमाणें जन्मास येणे व जाणे, उगवणे व मावळणे हा प्रकार सर्वत्र सारखा

---

* मी सर्व स्थावर जंगम पदार्थमात्राचा उत्पादक आहे, सर्वांचा निर्वाह माझ्यापासून होतो, असे समजून घेऊन ज्ञानी लोक, श्रद्धायुक्त होत्साते, माझें आराधन करितात माझ्या ठिकाणीं ज्यांचे अंतःकरणसर्वस्व लागलेले आहे, माझ्या ठायीं ज्यानीं प्राण एकनिष्ठेनें अर्पण केले आहेत, जे एकमेकास ज्ञानोपदेश करीत असतात व परमेश्वरी लीलाचें कथन करीत असतात असे हे माझे भक्त श्रवणकीर्तनाने संतुष्ट असून माझ्या ठिकाणी नित्य रममाण होतात नित्य समाधिमग्न असणारे व प्रीतिपूर्वक माझे भजन करणारे भक्तास मी असा बुद्धियोग देतो, कीं, त्याच्या योगे ते मजकडेच येतील

चालू आहे रात्र संपते, दिवस उगवतो व फिरून दिवस बुडतो, रात्र होते हिवाळ्यातील थंडी सपत आली असता उन्हाळ्यातील उन्हाळा आपले प्रखर रूप प्रकट करू लागतो व उन्हाळा सपतो न सपतो तोंच पावसाळा आपलें ठाणें देण्याच्या तयारीस लागतो हे रहाटगाडे प्रतिवर्षी सारखे चालू असतें. प्रत्येक ऋतु पाळीपाळीनें आपला अमल गाजवीत असतो. ऋतूच्या फेरफाराबरोबरच हवेत थंडी, उष्णता व सरदी असे फेरबदल होत असतात व हेसुद्धा येतात व जातात, सतत असें कोणीच राहत नाहीं आपल्या येण्याजाण्याबरोबरच ते आपल्या तावडीत सापडणाऱ्या यच्चयावत् पदार्थांवर सुख अथवा दु ख, तेज अथवा विनाश असे परिणाम करीत असतात एकाकाली जी पुष्पे मोठ्या रमणीयतेनें प्रफुल्लित होतात तीच अन्यकाली कोमेजून गळून पडतात ग्रीष्मऋतूच्या प्रारभी जी कोमल पालवी अश्वत्थवृक्षाला नवीन हिरव्या शालून अलंकृत करीत असते तीच शरदृतूंत जीर्ण होऊन जमिनीवर मृतवत् गळून पडते, पण वसतसमयी फिरून नूतन पालवी फुटून वृक्षाच्या उघड्या पडलेल्या शाखावर पुन एकवार प्रावरण घालते

उन्हाळा आणि थंडी, दिवस आणि रात्र, स्वच्छ सूर्यप्रकाश आणि वादळ ह्या बाह्य सृष्टीतील चक्रनेमिक्रमाचे, आपल्या अतस्थ मनोवृत्तीशी सबध असणाऱ्या गोष्टींशी, आपणापैकी प्रत्येकाच्या स्वत च्या जन्मावर परिणाम करणाऱ्या अशाच विकृतींच्या अनुभवाशी, थोडें साम्य आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय दिसत नाहीं त्या विकृति, आपली इच्छा असो वा नसो, घटकेत आनद तर घटकेत दु:ख, आज आजार तर उद्या आरोग्य, कधी मित्र तर कधी शत्रु, केव्हा मृत्यु तर केव्हा जन्म अशा सुखदु खादि द्वंद्वाचा अनुभव आपणास देत असतात. आपल्या जन्मातील ह्या घडामोडींना आणि विकृतीनाच आपले नशीब असें म्हणण्याकडे आपली प्रवृत्ति असते. ज्या अर्थी ह्या विकृती आपल्या इच्छेवर सर्वांशी अवलंबून नसतात त्याअर्थी एखाद्याला आनद, आरोग्य आणि उत्कर्ष अथवा दुःख, यातना आणि व्याधि याचा अनुभव ज्या मानाने आलेला असेल, त्या मानानेच आपण त्याला भाग्यवान् अथवा हतभागी असें म्हणत असतों.

साराश, हा आपल्या जीवनदशेचा, मानवी वर्गाचा व विश्वाचा नियम

व यच्चयावत् वस्तुजात हीं सारखी येत व जात आहेत. सतत एकाच स्थितींत आपणास राहता येत नाहीं. ज्या परमाणूनी आपले देह तयार होतात ते परमाणुसुद्धा आपल्यापासून सारखे उडून जात आहेत, व त्याच्या जागी नवीन परमाणु तयार होत आहेत तेणेकरून आपले माससुद्धा जे आज असते ते उद्या नसते प्रत्यक्ष आपली शरीरेसुद्धा येतात व जातात आपल्या स्वत ची देखील तीच गोष्ट आहे. येणे व जाणे हे नरजन्माच्या भाग्यालाच आलेलें आहे एकाच स्थितीत त्याला राहताच येत नाहीं.

वासांसि जीर्णानि यथा विहाय
नवानि गृह्णाति नरोऽपराणि ।
तथा शरीराणि विहाय जीर्णा-
न्यन्यानि संयाति नवानि देही ॥ १ ॥

श्री भ गी.

आज घेतलेले धोतर चारसहा महिन्यानी जीर्ण होऊन फाटतांच ते टाकून जसे आपण नवीन घेतो तसेच हीं शरीरेसुद्धा जीर्ण झाल्यावर टाकून देऊन त्याच्या ऐवजी आपण नूतन शरीरे धारण करीत असतों.

हे मानवीवर्गाचे भाग्य आहे. हे भाग्य आनददायक आहे काय? माझ्या मित्रानों! हा प्रश्नच असा आहे, कीं, त्याचें उत्तर मला एकदाच देता येत नाहीं. कारण, प्रत्येक मनुष्याला कितीहि विकृति झाल्या तरी त्याच्या भाग्यातले सुख हें त्याच्या स्वत वरच अवलबित असते. कितीहि स्थित्यतरे होवोत, कालस्थलादि कितीहि विकृति होवोत, सुखदु खादि अनुभव कितीहि येवोत, प्रत्येक मनुष्याचे सुख ही त्याच्या स्वाधीनची गोष्ट असते मात्र त्याने स्वत शीं व परमेश्वराशीं सत्याचरणानेच वागले पाहिजे. 'स्वत शीं व देवाशी सत्याचरणाने वागणे' याचा अर्थ आपल्या अतर्यामीं वास करणाऱ्या सदसद्विवेकबुद्धीने वागणे हाच होय. कारण, आपल्या जन्माच्या यच्चयावत् विकृतीत व दैवगतींत अविकार्य असा जर कोणी असेल तर तो एकटा सर्वश्रेष्ठ परमेश्वरच होय, व तो जसा न्यायपूर्ण, दयाघन व शुद्ध आहे, तसेच आपण जर आचरणाने न्यायी, दयाळु व शुद्ध राहिलों, तर आपण खात्रीने सुखी झाल्यावाचून राहणारच नाही; ते चागलें

झालेच पाहिजे. सौख्य म्हणजे भौतिक संपत्ति, अथवा शारीरिक आरोग्य, किंवा लौकिक यश [illegible] मात्र मी त्याचा अर्थ घेत नाहीं ह्या गोष्टी केवळ जन्माच्या [illegible] गाचेच भाग आहेत. त्या सविकार्य आहेत त्या गोष्टी म्हणजे खरें सुख [illegible]हे. चांगुलपणा हेच खरें सुख आहे. कारण, अविकार्य व अनंतकाल [illegible]कणारी अशी जर कोणती वस्तु असेल तर ती एकटी चांगुलपणा होच हे. म्हणून मी म्हणतो, जर आपण चांगले असलो तर आपले नश्वर जीवित सुखाह होईल. कारण, आपल्याला कितीहि विकृती झाल्या तरी कधीहि विकार न पावणारी अशी वस्तु आपणाजवळ असतेच. यच्चयावत् हाल, अपेष्टा व [illegible] भोगणे प्राप्त होऊनहि आपल्या शेजाऱ्यावर परोपकार करण्यांत व ईश्वराचे [illegible] म्हणून त्याच्या इच्छेनें लोकात वागण्यात जो आनंद असतो तो आपल्या[illegible] असतोच.

सारांश, चांगुलपणाचे तेज, [illegible]यतेज, हीच ह्या विकार्य जगतात एक मोठी अविकार्य अशी वस्तु आहे तेवढी आपणाजवळ असली म्हणजे मग आपण निर्भय राहूं व ऐहिक दुःखे कितीहि प्राप्त झाली तरी आपल्या सुखात अंतर पडणार नाहीं अपले सुभाग्य अथवा दुर्भा[illegible] म्हणजे ज्याच्यापुढें आपला काहीं इलाज चालत नाही असा नशीबा[illegible] [illegible] आहे असे लोकानां म्हणताना आपण [illegible]नेकदा ऐकतो. [illegible] दैव [illegible] वर ओढवले आहे, मी लाचार आहे, [illegible] काय करावें? [illegible] व्हावा ही परमेश्वराचीच इच्छा दिसते, व [illegible] शरण [illegible] गत्यंतरच नाहीं, असें ते म्हणतात यावर माझे उत्तर एव[illegible], की, तुमचा नाश होण्याचें कारण नाहीं. तुमच्या हातून [illegible] होण्यासारखे आहे तुम्हाला शौर्य व चांगुलपणा अंगी आणता [illegible]. तुम्हाला आपले भाग्य आपल्या स्वाधीन ठेवता येईल, असें मी [illegible]त नाहीं. कारण, भाग्य तरी नश्वर जगातील स्थित्यंतराचा भरती [illegible] ओहटी, विकृति आणि दैवयोग ह्या चक्रनेमिक्रमाचा एक भागच हो[illegible] [illegible] माझ्या म्हणण्याचा आशय एवढाच, कीं, आत्मसंयमन करणे एवढी गोष्ट मात्र आपल्या स्वाधीनची आहे. तसेंच चांगले व वाईट हीं विशेषणे आपल्या भाग्याचीं नसून तीं आपल्या स्वतःला लागणारी आहेत. आपले भाग्य, मग ते चांगले असो वा वाईट असो, ते आपल्या स्वतःच्या करणीवर अवलंबून असते, अथवा काहीं अशीं, आपण आपल्या स्वतःला ज्या प्रकारचें वळण लावूं त्या प्रकारचें आपलें

भाग्य होते, असेहि म्हणता येईल आणि म्हण [illegible] कवी टेनिसनने अनेक स्थित्यंतरे घडवून आणण्यास कारण [illegible] दैवगति व तिचें चक्र ह्यांना उद्देशून पुढील उद्गार काढिले आहे[illegible]

"Turn, Fortune, turn thy wheel [illegible] the p[illegible]
Turn thy wild wheel thro' sun[illegible] and [illegible],
Thy wheel and thee we neither [illegible].

"Turn, Fortune, turn thy wh[illegible]
With that wild wheel we go n[illegible] down
Our hoard is little, but our [illegible] are great

"Smile and we smile, the [illegible] of many la[illegible]
Frown and we smile, the [illegible] own [illegible]
For man is man and master of [illegible]."

वरील उक्तीत कवीने एवढेच विचा[illegible] आहेत, [illegible], बा दैवा! तूं आपले चक्र खुशाल फिरवीत रहा [illegible] सूर्यप्रकाशा[illegible], [illegible]ढगात आणि मेघावडबरात तू आपले अनियंत्रित च[illegible] फिरवीत [illegible] गर्वाचे घर खालीं कर! तुझे चक्र व तू आम्हाला सारखा[illegible] आहे[illegible] आम्ही 'अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च' [illegible] स्थितीचाच अनुभव घेत राहूं बा दैवा! तूं आपले चक्र दया[illegible] फिरीव किंवा वक्रदृष्टीने फिरीव. तुझ्या या [illegible] दैवचक्रा[illegible] आम्ही वरहि जाणार नाहीं किंवा खाली[illegible] नाहीं अ[illegible] सं[illegible] संपत्ति अल्प असेल व आहेच, पण थोर मना[illegible] अपरपार आहे. तूं हास व अनेक भूमींच[illegible] आम्हीहि तुझ्याबरोबर हासू तूं वक्रदृष्टीने पाहिलेंस तरीसुद्धा [illegible] म्हणून आम्ही हासल्यावाचून राहणारच नाहीं कारण, [illegible] ठेव, कीं, किती झाला तरी मनुष्य तो मनुष्य व त्याचे आपल्या दैवा[illegible]पणी स्वामित्व असते.

होय. ईश्वरावर श्रद्धा ठेवून जो म[illegible]ष्य वागतो तोच खरा समर्थ असतो, कारण, चांगुलपणाचे सामर्थ्य ऐहिक [illegible]नीपेक्षा अधिक बलवत्तर असते म्हणून खरे सौख्य हे आपल्या हातीं अस[illegible] प्रत्येक मनुष्य शेणामेणाची बाहुली नसून मनुष्यच आहे, म्हणून आपल्या दै[illegible]वर व स्वतःवर त्याचें पूर्ण स्वामित्व असतें.

अतएव भगवंतानीहि हाच उपदेश केला आहे:—

उद्धरेदात्मनाऽऽत्मानं नात्मानमवसादयेत् ।
आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ॥
बंधुरात्माऽऽत्मनस्तस्य येनात्मैवात्मना जितः ।
अनात्मनस्तु शत्रुत्वे वर्तेतात्मैव शत्रुवत् ॥
जितात्मनः प्रशांतस्य परमात्मा समाहितः ।
शीतोष्णसुखदु.खेषु तथा मानापमानयो ॥

तसेंच पुढील आंग्लकवीचे उद्गारहि लक्ष्यात ठेवण्याजोगे आहेत —

" And still he 'Knows, in joys and woes
That saints will aid if men will call
For the blue sky bends over all' "*

"आणि असें असूनहि त्याला हे ठाऊक असते, की, सुखदु खाचे प्रसगी लोकाना गरज पडल्यास साधुसत परोपकारार्थ धावून आल्यावाचून राहत नाहींत कारण, नीलवर्ण नभाच्या एकाच छताच्या आश्रयाखाली आपण सर्वजण आहोत."

या कविकल्पनेचा आशय एवढाच, कीं, आपण फक्त ईश्वरावर श्रद्धा ठेवून वागावे. कारण, परमेश्वर सर्वश्रेष्ठ असून नित्य वत्सलपूर्ण असा आहे, व ससृतीच्या यातना अथवा ऐहिक स्थित्यंतरे कितीहि प्राप्त झाली तरी आपल्यावरील त्याच्या प्रेमात कधींहि अतर पडत नाहीं

आजच्याच प्रसगाला ह्या विषयाची निवड करण्याचे मुख्यत. कारण एवढेच की, सुट्टीमुळे झालेल्या परस्पर वियोगानतर आपण नुकतेच पुन एकत्र जमलो आहोत. सुट्टींत तुम्ही सर्वजण एकमेकापासून, व मी रजेवर गेल्यामुळें तुम्हा सर्वांपासून दूर झालों होतों. हा उल्लेख येथे करण्यात माझा हेतु एवढाच आहे, की, हे परस्परवियोग आणि सगमसुद्धा आपल्या जीवनदशेतील एक दशाच आहे, हें तुमच्या नजरेस आणावे आणि मला वाटते, एकदरीने पाहता, ही दशा सुखावहच आहे. वियोगामुळे होणारे दु ख समागमामुळे होणाऱ्या आनदाने निस्तरत अथवा भरून निघत असते औदासिन्याच्या रात्रीच्या पाठोपाठ आनदाचा अरुणोदय हा ठेवलेलाच असतो. जीवनदशा ही जर अखंड एकाच प्रकारची असती—अनिरुद्धयशपरंपराच असती (अशी गोष्ट तर कालत्रयींहि होणे नाहीं!)—तर ती

* Coleridge's " Christabel."—c m.

आपणांस प्रिय झाली असती किंवा नाहीं, याचा मला वानवाच आहे. नश्वर वस्तूंचा मनालाच सस्पर्श घडत असतो, व तदनुरूप परिश्रम, नैराश्य आणि कष्ट या स्थितीचा अनुभव मनुष्याला घेण्याचा प्रसंग आला असताहि—फार काय पण, जर पापाचरणाचा लवलेश नसेल तर, दु खद स्थितीत देखील—मनाचा थोरपणा आणि समाधान हे दोन उदात्त गुण मनुष्याचे सात्वन करण्यास सिद्ध असतात तसेच, एका गोष्टीतील कठोरता अन्य गोष्टीचे माधुर्य वाढवीत असते, हा प्रकार किती वारंवार आपल्या नजरेस पडतो वियोगदु ख म्हणजेच पुनरागमनामुळे होणारा आनद शेतकऱ्याचे पेरणीच्या वेळचे कष्ट म्हणजेच पीक हाती आल्यावर होणारा आनद. तुम्ही जोपर्यंत येथे विश्वविद्यालयात आहात तोपर्यंत तुमच्या घरच्या मडळीची व स्नेह्याची होणारी ताटातूट हीसुद्धा, तुम्ही सुट्टीत परत घरी गेल्यावर तुमच्या घरच्या जीवनचरिताला नूतन माधुर्य व आस्वाद देण्यास कारणीभूत होत असते. येणंप्रमाणे, जाणें आणि येणे, मित्राचा वियोग व फिरून समागम, ह्या गोष्टी नेहमी आपणास कल्याणप्रद होणाऱ्या आहेत, व दुःखापेक्षा त्याच्या योगे हितच अधिक होत असते एक दुसऱ्याची न्यूनता भरून काढते एवढेच केवळ नव्हे, तर एक प्रकारच्या जीवनदशेतून अन्य प्रकारच्या जीवनदशेत होणारी ही स्थित्यतरे, मागें आपल्या हातून काय घडले व पुढे आपणास काय करता येईल याचे मनन करण्यास आपणास नेहमी चागली सधि देत असतात. वस्तूपासून जेव्हा आपण दूर असतों तेव्हाच खरोखर तिच्या खऱ्या लक्षणाची किंमत कळण्याचा सभव असतो; आणि म्हणून कालावधीनें जी दशा फिरून प्राप्त होण्याची आशा असते त्या जीवनदशेत जेव्हा अतर पडते तेव्हा त्या अवकाशात आपल्या स्वत.चे चागले बारकाईने निरीक्षण आपणास करतां येतें. आपण कोणते प्रसग वाया घालविले, आपल्या हातून काय काय चुका घडल्या, याचा आपणास विचार करता येतो, व पुढच्या प्रसगीं मागे आपल्या हातून घडलेल्या प्रमादाची पुनरावृत्ति न होऊ देण्याचा निश्चय करता येतो. आज ह्या विश्वविद्यालयात आपली स्थिति अशीच असावी. विद्यालय सोडून घरीं गेलो असता, विद्यालयांत असतांना आपण ज्या रीतीनें वागावयास पाहिजे त्या रीतीनें आपण वागलों काय, या प्रश्नाचा फुरसतीअंतीं विचार करण्यास आपणापैकीं प्रत्येकास चागली संधि

साण्डते. तसेंच फिरून आता आपण ह्या विद्यालयात आलों आहोंत, व तेणेंकरून विद्यालयातील सुखसोयीचा अधिक चागल्या रीतीनें उपयोग करून घेण्यासाठीं, गुरु व सहाध्यायी या उभयतासबधी आजवर आपण जे कर्तव्य करीत आलों त्यापेक्षा अधिक चागल्या रीतीनें आपले कर्तव्यकर्म बजावण्यासाठीं, इतराशीं सौजन्यपूर्ण व स्वत शी अगदीं कडकडीतपणे आचरण ठेवण्यासाठीं, पूर्वीपेक्षा ह्या सहामाहींत आपले आचरण अधिक उदात्त ठेवण्याचा प्रयत्न करण्यासाठी, जे काहीं निश्चय आपण आपल्या गैरहजिरींत केले असतील ते आचरणात व्यक्त करून दाखविता येतील व अशा प्रकारचे निश्चय आपणापैकीं सर्वांनी केलेच असतील असा मला भरवसा आहे

साराश, आता आपण आपल्या ह्या विद्यालयीन आयुष्यक्रमाच्या इतिहासाचा द्वितीय भाग सुरू करण्यासाठी फिरून एकवार एकत्र जमलों आहोंत. स्वगृह ते स्वगृह व विद्यालय ते विद्यालय स्वगृह म्हणजे विद्यालय नाही व विद्यालय म्हणजे स्वगृह नाही! तरीपण प्रत्येक आपआपल्यापरी चागले व रमणीय आहेच, असें तुम्हाला वाटेल असें मला वाटते आपलें इंग्लंडातील स्वगृह सोडून फिरून राजकोटास कॉलेजातील आपल्या स्नेह्याच्या भेटीस परत येण्यात मला तर निदान अत्यानंद वाटला, असे मला सागितल्यावाचून राहवतच नाहीं! माझ्या कुटुंबासबंधीहि मला असेंच म्हणता येईल तुम्हीं जे इतक्या प्रेमाने आम्हा उभयताचे स्वागत केलेत तेणेकरून हें विद्यालय तर आम्हा उभयताना घराप्रमाणेंच वाटत आहे ह्या कॉलेजात ज्या प्रकारचा मनोभाव वास करीत आहे तो काहींसा कुटुबातील मनोभावासारखाच आहे, असे आम्हाला वाटते. आम्ही उभयता तुमचे फार मन पूर्वक आभार मानतो व तुमचे विशेष आभार मानण्याचे कारण हे कीं, आमच्याविषयीं तुमच्या मनात जी सदिच्छा वास करीत आहे ती पुढील गोष्टीचे द्योतक होय ती अशी कीं, आपल्या या विद्यालयावर तुमचेंहि प्रेम आहे व जरी तुम्हाला ते स्वगृह म्हणून मानता येत नाहीं, तरी तुमच्या कल्याणाकडे व उन्नतीकडे जेथे लक्ष्य पुरविण्यात येते असें हे एक स्थान आहे असें तुम्हाला मानता येईल असें आम्हाला खात्रीपूर्वक वाटते. ह्या विद्यालयाविषयीं तुमच्या मनात असा प्रेमळ विचार यावा, अशी माझी तर अत करणपूर्वक इच्छा आहे तसेंच आपली ही सस्था उदात्त व शुद्ध नमुनेदार करावी, ह्या विद्यालयातील आपल्या महत्त्वाकाक्षा

आजवर ज्या उच्च शिखराला पोहोंचल्या आहेत त्याहिपेक्षा त्यांनां वर नेऊन पोहोंचवाव्या, लोकनायक होण्याची आशा करण्याऱ्या राजकुमार या नावाला शोभेल इतकी थोरवी व सद्गुणसंपन्नता देता येईल असा तिचा उत्कर्ष करावा, एतदर्थ तुम्हीं सर्वांनी मजबरोबर एकत्र परिश्रम करावे अशीहि माझी फार मनापासून इच्छा आहे. ज्याला नायक व्हावे अशी इच्छा असते त्यानी अगोदर अनुकरण करण्यास शिकलेंच पाहिजे ह्या विद्यालयात तुमचे जे कर्तव्यकर्म आहे त्याप्रमाणें आपल्या पालकाच्या आणि गुरूंच्या उपदेशानुरूप वागण्यास तुम्हीं प्रथम शिकले पाहिजे. माझ्या मित्रानो ! तुमच्यापैकी प्रत्येकजण ह्या विद्यालयातील आपले अशा तऱ्हेचें कर्तव्यकर्म बजावण्याचा आजपासून निश्चय करील काय ? व नुसता तुम्ही आपल्यापुरताच निश्चय न करता त्याप्रमाणे आपल्या सहाध्यायानाहि वागण्यास मदत कराल काय ? तुमच्यापैकी प्रत्येक जण आपले कर्तव्यकर्म नीट बजावून इतरानाहि ते करण्यास साहाय्य करील काय ? सारा दिवस आपल्या वरिष्ठ अधिकाऱ्याच्या आज्ञेत दररोज वागण्याचा तुम्ही सर्वजण निश्चय कराल काय ? सर्वांशीं सौजन्यपूर्ण, प्रेमळ व निरभिमान निस्स्वार्थदृष्टीने आचरण ठेवाल काय ? आपण शाळेत असलो वा नसलो, सदासर्वकाळ ईश्वराचे दास म्हणून त्याच्याच इच्छेने वागून आपापल्या मगदुराप्रमाणे आपले कर्तव्यकर्म कराल काय ? अखिल जगत् हे स्वर्गाला जाण्याचे एक महान् विश्वविद्यालयच—शिक्षणभूमिच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं, व परलोकी शुद्ध व पवित्र परमेश्वरसान्निध्यात राहण्याची पात्रता आपल्या अंगी यावी अशी जर आपली इच्छा असेल तर इहलोकीं पवित्र व शुद्ध आचरणानें राहिल्यावाचून आपणास गत्यंतरच नाहीं हे नेहमी लक्ष्यात ठेवून आपण वागण्याचा प्रयत्न करावा हे मी तुम्हालाच सागतों असे नाहीं ते मलाहि सारखेच लागू आहे. म्हणून ईश्वराच्या पवित्र सान्निध्याचा वारंवार विचार करण्याचा व त्याच्याच साक्षित्वाने वागण्याचा तुम्ही निश्चय करा. इतरांनांहि असेच आचरण ठेवण्याचे कामी मदत करा. आपली जीवनयात्रा जेव्हा सपेल, ह्या जन्माची स्थित्यंतरे जेव्हा कायमची सपतील, **'यद्गत्वा न निवर्तंते'** याप्रमाणे एकदा गेल्यावर फिरून परतण्याची आशा नसते असें अखेरचें जाणे जेव्हा आपणास प्राप्त होईल, तेव्हा जेणेंकरून आपणांस आपल्या जीविताचा विचार करतां येईल, ह्या विश्वविद्यालयात व अन्यत्र आपण आपलें

आयुष्य कोणत्या रीतीने घालविले याचा दु ख अथवा पश्चात्ताप वाटण्याचें कारण न राहता विचार करता येईल, अशा तऱ्हेने आपण आपलें आचरण शुद्ध ठेवणे हीच आपणा सर्वांना महनीय अशी एक गोष्ट होय ह्या सहामाहींत अशा तऱ्हेने वागण्यास परमेश्वर आपणास साहाय्य करो सदैव आपल्या हातून शुद्ध आचरण घडण्यास ईश्वर आपणास साहाय्य करो

# वर्षाअखेर.

" Ring out the old ring in the new,
Ring, happy bells across the snow,
The year is going, let him go,
Ring out the false, ring in the true "

—Tennyson

गेल्या खेपेस 'जाणे व येणे' हीं स्थित्यंतरे, नश्वर जीविताच्या विकृति व दैवयोग यासबधी मी चार शब्द सागितले आज त्याच विषयावर आणखी बोलण्याची माझी इच्छा आहे अथवा काहीसा त्याचा पूर्वार्धच म्हणाना म्हणजे 'जाणे' 'वर्ष सपणे' याचेच येथे आपण विवेचन करू

आपणास एकत्र जमता येईल असा हा ह्या वर्षातील अखेरचाच आदित्यवार आहे पुढे ख्रिस्तमसच्या सुट्टीनंतर पुन जेव्हा आपण आदित्यवारी एकत्र भेटू तेव्हा आपणास सन १८८८ हे साल निघून गेल्याचे व १८८९ सालास प्रारभ झाल्याचे आढळून येईल. म्हणून आज वर्षाअखेर जे गंभीर विचार नेहमी मनात आल्यावाचून राहत नाहींत त्याचे क्षणभर आपण वर्णन केल्यास बरे, असे मला वाटते

मानवी ससार ही एक प्रवासयात्रा आहे निघून जाणारे प्रत्येक वर्ष हे जीवनमार्ग आक्रमून आपण किती पुढे आलो हे दर्शविणाऱ्या रस्त्यावरील मैलाच्या दगडाप्रमाणेच होय जसजसे प्रत्येक वर्ष निघून जाते, जीवनमार्गावरील प्रत्येक मैलाचा दगड जसजसा निघून जातो, तसतसें आपली जीवनयात्रा आपण कितीतरी आटोपली व आता पुढे पल्ला गाटावयाचा तो किती थोडा उरला आहे, असे वाटू लागते अर्थात्, हा विचार वर्षासबधी जितका खरा आहे तितकाच तो प्रत्येक दिवसासबधींहि खरा आहे. रोजचा एकेक दिवस निघून गेला म्हणजे आपणास असे म्हणता येईल, व अर्थात् असा विचार करणे हे आपलें कर्तव्य आहे, की, आपल्या आयुष्यातील बराच मोठा कार्यक्रम आपण आटोपला, आयुष्याचा आपण बराच उपभोग घेतला, पुढचा कार्यक्रम आता फारच थोडा आहे. पण वर्षाअखेर ज्या भूतभविष्य कालाचा आपण विचार करतो त्याच्या सयोगबिंदूत-संधिकालांत-विशेषत. गंभीर असें कांहींतरी असतेच.

अन्य प्रसगापेक्षा त्या काली आपले मन उदात्त विचारानी जेणेकरून अधिक उचबळून येत असते, असें काहींतरी असते. तेणेंकरून त्या मैलाच्या दगडाकडे टक लावून पहात आपण स्वत लाच प्रश्न विचारूं लागतों अरे आपण हें काय करीत आहो ? आपण चाललों कोठे ? आपली जीवन-यात्रा असावी तशी ती पवित्र आणि चागली आहे काय ? आज जें वर्ष सपणार त्या वर्षात आपली जीवयात्रा उज्ज्वल आणि सुखाची झाली आहे काय ?

असली चौकशी करणे हे आपणास कल्याणप्रद असते. कारण, अशा गतावलोकनानेच पुढचा काल आपणास अधिक सुखाने घालविता येईल. कोठेहि व केव्हाहि, याबावयाचे म्हणून नाहीं अथवा विचार म्हणून करावयाचा नाहीं, व कर्तव्य व ईश्वरपराङ्मुख करणाऱ्या ऐहिक लालसाना अधपरपरेने बळी पडत सरसकट मार्ग आक्रमीतच जर आपण राहिलो तर वाईटातून वर डोके निघण्याची आशा तर दूरच, उलट आपली अत्यंत दुर्दशा होण्याचाच सभव असतो. आणि म्हणून आज काहीं वेळ आपण येथेच मुक्काम करू, व गेल्या वर्षात आपणास काय नवीन प्राप्त झाले, त्याने आपणास शिक्षण कोणते दिले ह्याचा व त्या शिक्षणापासून पुढल्या वर्षी हितावह असे आपणास कोणते बोध घेण्याजोगे आहेत ह्याचाहि आपण सर्वजण मिळून विचार करूं या

प्रथमत जीविताच्या अल्पतेची आपणास आठवण होते, व ती आठवण हितावहच होते, असें मला वाटते. गेले वर्ष किती हा हा म्हणता निघून गेले ! जीवित आपणास मागे टाकीत किती झरझर पुढें पळत आहे ! गेल्या डिसेंबरची १६ तारीख—ज्या दिवसाचें स्मरण ह्या विश्वविद्यालयात तर सदैव राहिलेच पाहिजे—म्हणजे जणुं काय कालचाच दिवस असें वाटतें हे विश्वविद्यालय डिसेबरच्या १६ व्या तारखेसच प्रथमत उघडले त्या गोष्टीला आज अठरा वर्षे लोटली तरीपण एवढा कालावधि आपणापैकीं कित्येकांना खरोखर अगदी अत्यल्प असा वाटतो ! गेले वर्ष अगदी स्वप्नवत् निघून गेलें. तें होते कीं नव्हते याचीच शका वाटते आणि असें असूनहि जीवित हें असल्या क्षणभगुर मृगजलाचे, स्वप्नाभासाचे, बनलें आहे, व आपणापैकीं वयोवृद्ध माणसाचे दीर्घायुष्य आणखी फार झालेतर असलीच

कांहीं थोडीं वर्षें काढील. आणि नंतर त्याची जीवयात्रा सपून आपला इहलोकचा प्रवास ते अखेरचा आटोपतील.

माझ्या मित्रानों! जीवित हें अल्प आहे. तरीपण ईश्वरानें आपल्या सेवेसाठीं तें आपणांस दिलेलें आहे. आणि या आपल्या अत्यल्प जीविनाचा जर आपण सदुपयोग केला तर तें सुद्धां आपलें कर्तव्य योग्यपणें बजावण्यास अगदीं पुरेसें आहे. ईश्वराच्या इच्छेने आपण वर्तावे एतदर्थ त्यानें आपणास येथे जन्मास घातलें आहे, व आपलें अल्पजीवित ही एक नित्याची शिक्षण-संस्थाच होय नुकतेच निघून गेलेल्या वर्षांत आपण ही गोष्ट आपल्या दृष्टीसमोर ठेविली होती काय? निरभिमानवृत्तीनें स्वार्थत्याग करून व आपल्या बाधवांशीं प्रेमाने व परोपकाराने वागून ईश्वरेच्छा परिपूर्ण करण्याचा प्रयत्न आपण केला काय? जर तसें असेल, प्रामाणिकपणानें 'होय' म्हणून आपणास जर उत्तर देतां येईल, तरमग वाईट वाटण्याचे आपणास काहींच कारण नाहीं. गतवर्ष जरी झरझर निघून गेलें तरी त्याला चिरकाल टिकणारे असें मधुर फल लागले आहे असें जाणावे. आयुष्य वृथा गेले नाहीं असें समजावे.

दुसरी गोष्ट अशी. गतावलोकनामुळें जीवित अल्प आहे एवढेंच केवळ नव्हे तर ते क्षणभगुरहि असतें याची आपणास आठवण झाल्यावाचून राहत नाहीं. एवढा मोठा भाग मागे गेला, पुढचा पल्ला आता किती थोडा आहे तरी, मागे अमुक वर्षे लोटली हें जसे आपणास ठाऊक असतें, तसें पुढे आणखी किती वर्षे आपणास काढावयाचीं आहेत हे सागता येत नाहीं. ह्या बाबतींत जीवयात्रेची गोष्ट लौकिकयात्रेहून वेगळी असते. तुम्ही येथून द्वारकेस जावयास निघालात, तर साऱ्या रस्त्याभर ठिकठिकाणीं मैलाचे दगड व सोईस्कर सीमा-चिन्हे तुमच्या नजरेस पडतील. नक्की अतर किती हे तुम्हाला खात्रीपूर्वक माहीत असतें परमेश्वर-कृपेने तुम्ही जगला वाचलात तर आपला प्रवास केव्हा सपेल हें तुम्हाला नक्की दिवसवार सागतां येईल. पण जीवनयात्रेची गोष्ट मात्र निराळी. ती केव्हां व कोठे सपेल हे आपणांस माहीत नसतें. तें एका परमेश्वरासच ठाऊक असतें. आपल्या स्वाधीनची गोष्ट जर कोणती असेल तर ती, वाटेंत मार्गदर्शक म्हणून, सामर्थ्य देण्यासाटीं व आपल्या अडखळणाऱ्या लुल्या पायाना आधार देण्यासाठीं परमेश्वराची आराधना करीत कर्तव्याच्या सरळ मार्गानें आपली जीवनयात्रा सारखी चालू ठेवणें, एवढीच कायती होय.

आणि मग, आपला प्रवास आता सपला असें जेव्हा त्याला आढळून येईल, तेव्हा तो आपणास मुक्काम करण्यास आज्ञा करील, व तेथे आपली ससारयात्रा संपली ह्मणून समजावी. येथे बसलेल्या आपणापैकीं प्रत्येकाला त्याची ही सूचना केव्हां येईल हें आपणास सागता येणे कठीण आहे. समजा, आज परमेश्वराची सूचना आली तर आपण तयार आहोत काय ?

ह्या प्रश्न मोठा गहन आहे तो तितकाच व्यावहारिकहि आहे. कारण, जरी आपण आपल्या ज्ञानानुरूप सदैव आचरण ठेवतोंच असें नाही, तथापि आपणापैकीं प्रत्येकाला एवढी गोष्ट पक्केपणीं ठाऊक असते, की, केव्हाना केव्हातरी देवाच्या येथील बोलावणें अकस्मात् आपणास येणार आपल्या जीविताची शाश्वती आपणास एक घटकाभरसुद्धा देता येत नाहीं. आज, उद्या अथवा परवा आपण केव्हा इहलोक सोडून जाऊ हें कोणालाच सागता यावयाचे नाहीं हे सत्य मात्र आपण आपल्या दृष्टीसमोर सदैव ठेविले पाहिजे. कारण, त्याचा अनुभव आपणा सर्वांना आहेच प्रत्येक वर्षी आपणास नवीन नवीन उपदेश मिळत असतात, नवीन नवीन गोष्टी अनुभवास येत असतात. नुकतेच एका वर्षापूर्वी जेव्हा आपला एक स्नेही ऐन तारुण्याच्या भरात, पोलोचा खेळ खेळत असता एकाएकीं इहलोक सोडून गेला त्या विशेष प्रसगाची आपणा सर्वांना आठवण आहेच.

अशाच प्रकारचे अनुभव ह्या वर्षीहि आपणास आलेले आहेत, व ते आपल्याशी अत्यत निकट सबध असलेल्या लोकाविषयीच होत. एके दिवशी प्रात.काळी जेव्हा आपल्या एका पहारेकऱ्याचा आदल्या रात्री झालेला खून उघडकीस येऊन त्याचा निचेष्ट देह आपल्या क्रीडाभूमीवर पडलेला आढळला तेव्हा आपल्या विद्यालयात सर्वत्र भयरोमाच कसे उठले होते हे तुम्हा सर्वांना आठवत असेलच. माझ्यापेक्षा तुम्हाला तो प्रसग अधिक आठवत असेल कारण, मी त्या वेळी येथे नव्हतों. आपलें कर्तव्य करीत असता एकाएकीं देवाधीन झालेल्या त्या बिचाऱ्या पहारेकऱ्याविषयी थोडा विचार मनात आणा! त्याचा विचार करा व तुम्ही आपल्या स्वत चाहि विचार करा. कारण, जो प्रसग त्याच्यावर गुदरला तोच केव्हातरी आपणापैकीं प्रत्येकावर गुदरणार आहेच. त्याचा अत झाला तसा कोणी एखादा मत्सरी शत्रु आपल्यालाहि यमसदनाची वाट दाखवील असें मी म्हणत नाहीं,—ईश्वर करो व तसा प्रसग न येवो!—पण मी जें काय म्हणतों तें एवढेच, कीं,

त्याला जसें मृत्यूनें एकाएकीं गांठलें तसेंच आपणापैकीं प्रत्येकाला मृत्यूचे निमंत्रण अकस्मात् येण्याचा संभव आहे.

त्याचप्रमाणे गेल्या एप्रिल महिन्यांत, आपणा सर्वांना पूज्य अशा आपल्या बाबामिया कोतवालाला अपमृत्यूने ज्या करुणावह परिस्थितींत गाठलें— त्याला एका आततायी घातकानें दुपारी भरबाजारात, आपल्या तरवारीने छाटून काढले होते—ती गोष्ट तुम्हाला स्मरत असेलच. त्या वेळी जर तुम्ही तेथे असतां तर कदाचित् तुमच्यावर कोणता प्रसंग गुदरला असता याचा विचार करा.

लांब कशाला ? ह्या विद्यालयांतच आपणाबरोबर विद्यार्थी म्हणून जे राहिले आहेत त्यांच्यामध्येहि [illegible] वर्षी मृत्यु झाले [illegible] आहेत, नाहीं असें नाही येथे ज्याने आठ वर्ष [illegible] घालविलीं तो बाबीगाझनफर[illegible]ान हें विद्यालय सोडून परलोकीं गेला तो १८८१ च्या हेमंत[illegible]ऋतूतच. [illegible]च्याचबरोबर त्याचा सहाध्यायी आमडावाला ह्यानेंहि [illegible] [illegible]र्ग [illegible]रिला. दोघेहि मोठे होतकरू व तरतरीत दिसत होते. दोघेहि [illegible] नाहीत. [illegible]ांना सारखेच प्रिय होते त्या आपल्या दोन्ही स्नेह्यापैकी आज एकहि हयात नाहीं. आमडावाला हा क्षयरोगाने मृत्युमुखीं पडला त्या समयी त्याचें वय अवघे २४ वर्षांचेच होते गाझनफरखान हा गेल्या वर्षी महाराणीच्या ज्युबिलीला हजर होता त्याची प्रकृति सुदृढ व वृत्ति आनंदित आणि पाणीदार होती, तरी ऐन २५ शीच्या सुमारास गेल्या मार्च अखेरच त्यानें इहलोक सोडला. तो किती चपळ आणि सशक्त होता, घोड्यावर बसणारा किती कसलेला होता हें तुम्हाला आठवत असेल. त्याचा आत्मा हल्लीं निरंतर विश्रांतिसुखाचा अनुभव घेत आहे. या गोष्टीचें प्रत्यंतर येणे हें फारच कठिण काम आहे. जन्मत. जो एवढा ऐश्वर्यशाली दिसत होता तो इतक्या अल्प कालावधीतच इहलोकची यात्रा संपवून आपले भरभराटीस येणारें संस्थान उघडे पाडून चालता झाला.

आता ह्या सर्व गोष्टी म्हणजे आपल्याला सूचनात्मकच होत. बाबानों ! जीवित क्षणभंगुर आहे, चिरकाल टिकणारा असा जर कोणी असेल तर तो एकटा परमेश्वरच. **तो व त्याचा** चांगुलपणा हे कानउघाडणी करून सांगणारे ईश्वराचे निरोपच होत. मृत्यु हा आज ना उद्या केव्हातरी

येणारच असे त्या गोष्टी आपणास बजावीत आहेत. मृत्यु हा नेहमी एकाएकीं व अकस्मात् झडप घालण्यास टपलेला असतो. मृत्यु हा भेदाभेद पाहत नाहीं त्याची झडप सर्वांवर सारखीच मग तो आपली रात्रींची पहाऱ्याची कामगिरी करीत असता एकाएकीं ज्याला यमसदनाची वाट दाखविली तो गरीब बिचारा पहारेकरी असो, वा सार्वजनिक शांततेचा संरक्षक म्हणून ज्याला काळानें खड्यासारखा टिपून घेतला तो सन्माननीय कामगार असो, वा तो आपल्या तारुण्याच्या ऐन बहारीत राज्यपदारूढ झालेला तरुण संस्थानाधिपति असो त्या गोष्टी आपणास असे बजावून सांगत आहेत, कीं, आज ना उद्या केव्हांतरी आपणालाहि त्याच वाटेनें गेल्यावाचून गत्यंतरच नाही ते केव्हा हे मात्र आपणास ठाऊक नाहीं आपली तयारी असावी असे त्या निक्षून सांगत जीवितावधि अल्प आहे, आयुष्यात प्राप्त होणाऱ्या सुसंधीचा आपण ... तऱ्हेने उपयोग करून घेतलाच पाहिजे, व मानवाविषयी व ईश्वराविषयी आपलें कर्तव्य आपण करीत राहावे असेंहि त्या गोष्टी सांगत आहेत.

अद्यैव वा मरणमस्तु युगान्तरे वा ।
न्यायात्पथः प्रविचलन्ति पदं न धीराः ॥

—भर्तृहरि

**आपलें कर्तव्य करणें** म्हणजे काय, हे आपणा सर्वांना ठाऊक आहेच. प्रेमळ, दयाळु, निस्स्वार्थी, निष्कपटी व शुद्ध आचरण ठेवणे, परमेश्वराचे सदैव स्मरण करीत राहिले असता तो जें सामर्थ्य आपणास देत असतो त्या सामर्थ्याने वागणे, हेंच तुमचे व माझे कर्तव्य आहे हेच खरे जीवित, हेच खरे सौख्य. मृत्यूचा अथवा विनाशाचा ज्याला कधींहि संपर्क होत नाही असे जीवित हेंच होय कारण, आपल्या जडदेहाशीं त्याचा काहींच संबंध नसतो हेच स्वर्गीय जीवनसुख होय.

जे ईश्वरावर प्रेम करितात व त्याच्या सन्निध वास करितात त्याना ह्या स्वर्गसुखाचा अनुभव इहलोकींच घेता येतो. कारण, ईश्वरावर प्रेम करणारावर ईश्वराचेंहि प्रेम असतें, व सुख होवो वा दुःख होवो, जन्म येवो वा मृत्यु येवो, त्याच्या संगोपनात, कृपाछत्राखालीं त्याच्या अपत्यास भिण्याचे कारणच उरत नाहीं; तीं निर्भय असतात.

"God is love" ईश्वर म्हणजे प्रेम हें वचन आदर्शरूप म्हणून आपले स्नेही अखेरोंजी यानी आपल्यापुढे ठेविले आहे याहून अधिक गंभीर अर्थाचे असें दुसरे वचन त्याना घेता आलें नाहीं. त्या वचनावर आपण भरंवसा ठेवून जर चाललों, तर बाकीच्या सर्व गोष्टी त्याच्या पाठोपाठ आपोआप येतील तें वचन आपण जर सदैव ध्यानात ठेवलें तर तेणेकरून आपणा सर्वांचेंच खरोखर कल्याण होईल ईश्वर प्रेममय आहे **तो** प्रेमाचा अमर्याद सागर आहे. पण ईश्वर सद्गुणनिधी आहे. त्याचे ठायी अमर्याद चागुलपणा आहे व वाईट गोष्ट अशी त्याला रुचत नाहीं आपल्या हातून जेव्हा पापाचरण घडते तेव्हा आपण आपल्या स्वत.ला **त्याच्या**पासून विभक्त करीत असतों कारण पाप्याच्या सन्निध **त्याला** वास करावासा वाटत नाहीं. सदाचरणानें जर आ वागू लागलो तर आपणास **तो** केव्हाहि अतर देणार नाहीं व आपल्या पक्षाला परमेश्वराचें साहाय्य असल्यावर मग आपणास भिण्याचे कारण नाही. कारण, सदैव **त्याच्या** कृपाछत्राखालीच आपण राहत अ"

"ईश्वराच्या दयेचा विस्तार समुद्रविस्ताराप्रमाणे असून त्याच्या समताबुद्धीत प्रेमळपणा एवढा आहे, कीं, त्याची किमत स्वातंत्र्याहूनहि शतपटीने अधिक आहे. इहलोकच्या दु खाची भावना स्वर्गात जेवढी होते तेवढी अन्यत्र कोठेहि होत नाहीं. मानवी अपराधाचा इतका प्रेमळ विचार होण्याला अन्य ठिकाणच नाहीं. मानवी मनाला मोजदाद करिता येत नाहीं इतके ईश्वरी प्रेमाचे क्षेत्र विस्तीर्ण आहे, व त्या नित्य दयाघनप्रभूचे अत करण इतके प्रेमपूर्ण आहे, कीं, त्याचे खरोखर अत्यत आश्चर्य वाटते" —फेबर

१ राजकोट कॉलेजातील एक माजी विद्यार्थी व वाल्याच्या ठाकूरसाहेबाचे बधु

# वर्षप्रतिपदा.

## A PSALM OF LIFE

Tell me not, in mournful numbers
" Life is but an empty dream ! "
For the soul is dead that slumbers,
And things are not what they seem.

Life is real ! Life is earnest !
And the grave is not its goal

" Dust thou art, to dust returnest, "
Was not spoken of the soul

Not enjoyment, and not sorrow
Is our destined end or way,
But to act, that each tomorrow
Find us further than to day

Art is long, and Time is fleeting,
And our hearts, though stout and brave,

## जीवित-स्तोत्र.*

'स्वप्नापरी मनुजजीवित हें असार,'
ऐसा विलापपर सांगुं नको विचार,
'नाहीं पहा मनुजजीवित हें असार,'
ऐसें कितीक वदले बुध थोर थोर. १

कर्तव्य जो न करि तो नर भूमिभार,
राहे जिवत, परि, तो मृत हेचि सार.
जैशी दिसे स्थिति तशी न तुवा गणावी,
हे सत्य-पूर्ण अवघें नरजन्म दावी. २

आहे पहा मनुजजीवित सत्य सत्य.
खाणें, पिणे, मरण हेचि न जीवनथ्य,
कर्तव्यकर्म करणे, मन ईशपादीं
ठेवूनि नित्य असणें, तरि जीवसिद्धि ३

'भूतेचि पाच मिळता तुज जन्म येई,
अंतीं उरे न किमपी, तव भस्म होई,
हें जे तुला वदति केवळ सत्य देहीं,
आत्मा अखंड अविनाशि अनंत पाहीं.

खाणे पिणे अनुदिनीं, सुखदु खभोग,
हा जीवहेतु समजे बुध कोण साग ?
कर्तव्यकर्म करिं, जें करिता जनाची
होई उद्या प्रगति, जी नच आजि साची

---

* ही कविता अमेरिकन कवि 'लॉगफेलो' याच्या पुढे दिलेल्या कवितेचें मराठी रूपातर आहे हे रूपान्तर माझे परमपूज्य उपदेशक प वा श्रीयुत म ख चिटणीस ह्यानीं माझ्या 'ब्रह्मचर्य व गृहस्थाश्रम' निबधात देण्यासाठीं म्हणून प्रथमतः केले ते त्या निबधाबरोबर ग्रथमालेतून १९०३ सालीं प्रसिद्ध झाले पुढे त्यानीं जी अत्यत सुवासिक व रमणीय अशी 'नवकुसुममाला' 'मनोरजक ग्रथप्रसारक मडळी' कडून प्रसिद्ध करविली त्यातहि हें विराजत आहेच, व त्याचाच आज मीं येथे प्रसगानुरूप फिरून उपयोग केला आहे

Still, like muffled drums are beating
Funeral marches to the grave

शास्त्रे अपार, नरजीवित अल्प आहे,
तेही किती झरझरा बघ जात राहे !
गाजे पराक्रम तुझा जरिही दिगती,
हा चोर काळ तुजला गिळणार अती! ६

In the world's broad field of battle,
In the bivouac of Life,
Be not like dumb, driven cattle !
Be a hero in the strife

ससारघोरसमरी करिं जन्म सार्थ,
धैर्यें पराक्रम करी जनताहितार्थ,
नि सत्व-मूक-पशुवृत्ति न आदरावी,
वीरत्व पावुनि जना हितमार्ग दावी ७

Trust no Future, howe'er pleasant !
Let the dead Past bury its dead !
Act—Act in the living Present !
*Heart within, and God o'er head*

येईल काळ बरवा पळही न मानी,
गेलाचि काळ विसरे, मनिं तो न आणी,
जो चालला क्षण खरा अपुला गणावा,
कर्तव्य त्यात करुनी प्रभु आळवावा ८

Lives of great men all remind us
We can make our lives sublime,
And, departing, leave behind us
Footprints on the sands of time,

जे थोर सत्पुरुष तच्चरिते पहावी,
का तत्समान अपुली चरिते न व्हावी?
या कालसागरतिरी निज पावले ती
वाळूवरी उमटवू, जइं जाउ अर्ती, ९

Footprints that perhaps another,
Sailing o'er life's solemn main,
A forlorn and shipwrecked brother,
Seeing, shall take heart again

ती पावले सहज दैववशात् दिसोनी
ससारसागरनिमग्नहि दीन कोणी
जो बंधु, त्यास मग येइल काहि धैर्य,
काहीं कदाचित घडेलहि थोर कार्य १०

Let us, then be up and doing,
With a heart for any fate,
Still achieving, still pursueing,
Learn to labour and to wait

सोडोनि आळस तरी करि उद्यमाते,
जें जें घडे सहनही करि सर्व ते ते,
साधी समीहित सदा, करिं यत्न थोर,
होवोनि कार्यरत चित्तिं धरींहि धीर ११

जीवित अल्प व क्षणभंगुर आहे हें आपणास मागे कळून आलेंच आहे. पुढें आपणास आणखी किती आयुष्य कंठावयाचें आहे हें कोणाला ठाऊक. मनुष्याच्या अत्यत दीर्घायुष्याची जरी गोष्ट घेतली तरी त्याचाहि काल सावलीप्रमाणें झरझरा निघून जात असतो. तेव्हां राहिलेल्या काळाचा

अप्रतिम असा उपयोग आपणास कोणत्या तऱ्हेने करून घेता येईल? ह्या जन्मात लाभणाऱ्या सुसधींचा अत्युत्तम उपयोग आपणास कसा करून घेता येईल? नूतनवर्षाच्या ह्या पहिल्या आदित्यवारी विचार करण्यास हा विषय चागला आहे

प्रत्येक देशात व सर्व लोकात, मग ते हिदु असोत वा मुसलमान असोत, पारशी असोत वा ख्रिश्चन असोत, नूतन वर्षारभाचा दिवस–वर्षप्रतिपदेचा दिवस म्हणजे आनंदाचा व आशेचा एक महोत्सवच असतो असा महोत्सव आपल्या दिवाळीला असतो, तर ख्रिश्चन लोकात तो ज्यानुआरीच्या पहिल्या तारखेस असतो. आपली दीपपक्ति हे, ज्या प्रभेने व आनंदाने आपली मने उल्लसित होत असतात त्याचे द्योतक असें बाह्य चिन्ह होय, व राजेलोक आणि मंत्रिमंडळ, शेटसावकार व गुमास्ते, मालक आणि नोकर तसेच इष्टमित्र याच परस्पर सम्मेलन व अभिनदन हीसुद्धा त्याचेच द्योतक आहेत नवे वर्ष म्हणजे नूतन प्रारभ व प्रत्येक गोष्टीच्या प्रारभात आशा ही असतेच. नव्या वर्षाबरोबर नूतन आशा ही उत्पन्न होत असते. ती आशा एवढीच की, आपले जीवित ह्या वर्षी अधिक सुखावह, मागे झाले त्याहून अधिक चागले व्हावें 'नूतन वर्ष सुखाचे जावो' अशी परस्पर सदिच्छा दर्शविण्याचा खरोखर अर्थ तोच आहे सौख्य या शब्दाचा जो अप्रतिम व अत्यत पूर्ण अर्थ आहे त्या अर्थानेच नूतन वर्ष तुम्हा सर्वांना सुखाचे जावो, अशी मी इच्छा करितो या सदिच्छेबरोबरच कोणता सदुपदेश तुम्हाला मला देता येईल याचा मी विचार करीत आहे

माझ्या मते अप्रतिम असा उपदेश थोडक्या शब्दात मी तुम्हाला सागतो. मी तुम्हाला दोन अगदी साधे नियम सागतो (१) नियमनिष्ठ व्हा, नियमितपणाने वागा (२) एकाग्र चित्त व्हा, प्रत्येक गोष्ट मन पूर्वक कळकळीने करा. नियमाने आणि सवयीने आचरण करा, व तुमच्याने होईल तेवढी शिकस्त करीत जा.

(१) नियमनिष्ठ व्हा. नियमाने व सवयीने वागा. नियमितपणापासून व आपल्या काळाचे काळजीपूर्वक विभाग पाडण्यापासून सामान्यत फायदे कोणते आहेत याचें विस्तारपूर्वक विवेचन पुढें मी एखादे प्रसगीं करीन. मला वाटतें, येथें ह्या विद्यालयांत तुमचा अभ्यासक्रम व अन्य गोष्टी

यांत जो नियमितपणा लावून दिलेला आहे तेणेंकरून तुम्हांला जी नियमितपणाने वागण्याची संवय झाली आहे तिचे फायदे तुमच्या लक्ष्यांत आलेच असतील. आज मी एवढ्याच मुद्याचें विवेचन करणार आहे अन्यथा तुमच्या हातून जें झाले असते त्यापेक्षा एक ठराविक वेळ ठरवून प्रत्येक गोष्ट करीत आल्यामुळे तुमच्या हातून किती अधिक काम झाले आहे हें तुम्हाला कळून आलेच असलें पाहिजे. अशा रीतीने घालविलेला काळ किती झरझरा व सहज निघून गेला, हेहि तुम्हीं पाहिलेच असेल. सतत कार्यव्यापृत राहणें कोणीकडे व तुमच्यापैकीं काहींजण सुट्टीच्या दिवसात सारखा आलस्यात काळ घालवितात तेणेकरून येणारी विषण्णता कोणीकडे? दोहोंत केवढें अतर आहे! आठवड्यातून केवळ दोन अथवा तीनच तास का होईना, योग्यपणे करावी लागणारी कवाईत, कसरत व अन्य खेळ यासारख्या शारीरिक व्यायामातील नियमितपणाचें सामर्थ्य केवढे आहे हें तुमच्या लक्ष्यात आलेच असेल आणि खरोखर शारीरिक व मानसिक दोन्ही रीतीनें अप्रतिम असे शिक्षण जर कोणते देता येण्याजोगे असेल तर तुम्हीं जें ह्या विद्यालयात व्यवस्थित व नियमित आचरण ठेवीत आहात तेच होय तेणेंकरून तुम्हाला व्यवस्थितपणाची व टापटीपीनें काम करण्याची हातोटी लागत आहे कालातराने ती तुमच्या अगदीं अगभूत होऊन आजन्म तुम्हाला ती सवय लागेल असा मला पूर्ण भरवसा आहे. एवढेंच नव्हे, तर त्याहूनहि अधिक कामगिरी ती करीत आहे. त्याच्यामुळें तुमच्या शरीराला व मनाला एक प्रकारचे सामर्थ्य व केवळ सवयीनें व अभ्यासानेंच प्राप्त होणारी नम्रता येत आहे साराश, सस्कृत देह व संस्कृत मन (ज्याचा अर्थ सवयीच्या नित्य आचरणाला आधीन झालेलें शरीर अथवा मन एवढाच काय तो) हे शब्द म्हणजे आरोग्यपूर्ण, कार्यक्षम असें सुदृढ शरीर, व सुविचारपरिप्लुत उद्योगी असें सुदृढ मन याचेच पर्यायशब्द अथवा समानार्थक होत तसेंच शरीर आणि मन या दोहोंहूनहि जें उच्चतर, जें आपले नैतिक जीवित, जेणेकरून आपलें शील तयार होत असतें, त्याच्या बाबतींतहि हीच गोष्ट लागू आहे. आपलें नैतिक शील, अथवा सद्वर्तनसुद्धा आपल्या अगच्या सवयीवरच अवलंबून असतें. आणि येथेहि कडकडीत नियमितपणाने व काळजीनें अभ्यास करणें अवश्य असतें. कवाईतींत जो कडकपणा लागतो त्याहूनहि अधिक काटकपणाची सवय

अंगीं यावी लागते. क्रिकेटला जो कणखरपणा लागतो त्याहूनहि अधिक कणखरपणाचा अभ्यास लागतो. आपल्या प्रत्यहींच्या आचरणाशीं सबध येणाऱ्या नीतीच्या, पावित्र्याच्या, शुद्धतेच्या व धर्माच्या बाबतींत आपण अशा तऱ्हेची शिक्षा आपल्या स्वत स लावून घेत आहों काय ? अशा तऱ्हेनें वारंवार आपण अभ्यास करीत आहो काय ? ठराविक वेळी नियमितपणाने ईश्वराविषयी विचार करण्याची दक्षता आपण ठेवीत आहो काय? आपल्या प्रत्यहीं आचरणाचा भाग म्हणून सुविचार मनात आणणे, उत्तम ग्रंथावलोकन करणे, सुसगतीची निवड करणे, अनर्थावह मोहपाशाचा दृढतेने प्रतिकार करणे, चागल्या गोष्टीची संवय लावून घेणें, वाईटाचा ससर्ग अगदी निष्ठुरतेने टाळणें, ह्या गोष्टी करण्यात आपण सदा दक्ष आहोंत काय ? त्याचा क्षणभर विचार करा. कारण, त्या सवयी सर्वात अत्यंत महत्त्वाच्या आहेत. त्या आत्म्याच्या सवयी असून स्वर्गातील पुण्यलोकाप्रत नेऊन पोहोचविणाऱ्या अशा आत्मोन्नतिकारक आहेत आणि असें असूनहि त्या सर्वोत्कृष्ट सवयींची ह्या विद्यालयात आपल्याकडून उपेक्षा होण्याचा फारकरून सभव आहे असें मला वाटते कारण, ह्या विद्यालयातील नियमानुरूप शारीरिक व मानसिक सवयी, खेळातील व शाळेंतील शिस्त हीं तुम्हीं अत्यंत कल्याणप्रद रीतीनें जरी स्वत साठीं रेखाटून ठेविलीं आहेत, तरी तुम्हाला अप्रतिम तऱ्हेचे नैतिक शिक्षण आम्हाला देताच येत नाहीं. ती गोष्ट शक्य नाहीं त्याच्याविषयी गोष्टीच फक्त आम्हाला सागता येतील, व तदनुरूप तुम्हीं स्वतः तसें शिक्षण घेऊन आपले आचरण ठेवा, एवढाच उपदेश आम्हाला करता येईल करणें ही गोष्ट तुमची आहे. हे नियम शिकण्यास सोपे आहेत असें नाहीं कारण इहलोकीं ऐहिक वस्तूंत, लौकिक गोष्टींतच मन गुरफटून घेऊन आचरण करण्याकडे फारकरून आपली प्रवृत्ति असते व जीवात्म्याशीं सबध असणाऱ्या अदृश्य सद्वस्तूची आपणास विस्मृति होते.

(२) माझा तुम्हाला दुसरा उपदेश हा आहे, कीं, तुम्हीं प्रत्येक गोष्ट एकाग्र चित्ताने, मन लावून व आपली शिकस्त करून करीत असावे नेहमीं आपली पराकाष्ठा करीत जा. नुसत्या नियमितपणाने काम भागत नाहीं. जी जी गोष्ट आपण करतों, त्या प्रत्येकीच्या बाबतींत आपल्या ठायीं कार्यक्षमता, तत्परता व कळकळ हे गुणहि अवश्य असावे लागतात. परिश्रम घेतल्यावाचून, कष्ट केल्यावाचून कोणतीहि गोष्ट आपणास चागली

करताच येत नाहीं विद्यालयातील आपल्या अनुभवावरून हें ओळखण्यास आपण सर्वजण शिकलो आहोंत. आपले खेळ व व्यायाम, तसेंच शाळेंतील अभ्यासक्रम या गोष्टींवरूनहि आपणास अनुभव आलेलाच आहे क्रिकेट खेळण्यात पटाईत अथवा कवाईतीत निष्णात जरी असला तरी खेळतांना आळसाने दुर्लक्ष्य करण्यात अथवा हुकुमाकडे लक्ष्य न देता निष्काळजीपणानें घोड्यावर बसण्यांत काहींच अर्थ नसतो, हे आपणा सर्वांना ठाऊक आहेच.

हे सर्व शाळेंतील अभ्यासक्रमालाहि अर्थात् लागू आहेच. मन लावून होईल तितका चागला अभ्यास केल्यावाचून तासानतास, दिवसानुदिवस जरी वर्गात काढले तरी त्यापासून यत्किंचित्हि हित होणे नाहीं. प्रत्येक धडा, मग तो लहानसाच का असेना, आपण जर नीट मन लावून शिकलों, तर तेवढ्यानेंच आपल्या ज्ञानात अल्प भर पडत असते. ही अल्प भरच पुढें कालावधीने आपणास निष्णात करीत असते 'थेबे थेबें तळे साचते' 'दगडावर दगड ठेवीत गेले असता बुरुज तयार होतो' अल्पप्रमाणानेंच का होईना, पण प्रामाणिकपणे जर आपण सतत प्रयत्न करीत राहिलो, तर अतीं सर्व अडचणी दूर होतात व अत्यंत दुर्घट विषयातहि पारंगतता सपादिता येते. फक्त प्रयत्नच काय तो अवश्य आहे इच्छापूर्वक व उत्कंठेनें काम केल्यावाचून तुम्हाला गत्यतरच नाहीं काम करीत राहिले पाहिजे हताश होता कामा नये धिमेपणाने अत्युत्साहपूर्वक सतत प्रयत्न करीत राहिलें असता जगाला थक्क करून सोडणारी कामें करून दाखविता येतात ती इतकीं, कीं, कल्पनाशक्ति म्हणून आपण जिला म्हणतो ती केवळ "परिश्रम करण्यास लागणारी धारणाशक्ति" होय, अशी तिची व्याख्या होऊन बसली आहे.* साराश, शारीरिक म्हणा अथवा मानसिक म्हणा जे जें काही आपणास करावयाचें असते ते ते आपल्याकडून होईल तेवढेकरून करीत राहावे, आणि असें झाल्यावर ते चागलें झालेंच पाहिजे. इहलोकीं

* When the great Sir Isaac Newton was asked how he had been able to achieve his discoveries, he answered, "By always intending my mind"

Emerson's 'Conduct of life'

१ "कायहो तुम्हाला हे आपले शोध लावता तरी कसे आले ?" असे जेव्हा सर ऐझॅक् न्यूटन ह्यास विचारण्यात आले, तेव्हा त्यानीं उत्तर दिले, "काहीं नाहीं, नुसता मनाचा कलच त्या त्या गोष्टीकडे नेहमीं ठेवीत गेलो."

इमर्सनकृत 'जीवित-आचार'

ईश्वराचे दास म्हणून आपण जन्मास आलों आहोंत. **त्याच्याच** इच्छेनें वागण्यासाठी आपला जन्म आहे, एवढी गोष्ट जें जें कार्य आपण करतों त्या सर्व प्रसगीं ध्यानात ठेवून कार्यक्षमता, एकाग्रता व उद्योगशीलता हे गुण अगी आणावेत. परमेश्वरी इच्छा अशी आहे, की, जे काहीं आपण करतो तें सर्व मन.पूर्वक सामर्थ्याने करीत राहावें.

हे अन्य शब्दानी सागावयाचें म्हणजे **त्याच्याच**साठीं आपण आपले कार्य करीत असावे.

नेहमींप्रमाणे मी ईश्वरी विचारावरच तुम्हाला अखेरीस आणून सोडले, हे तुमच्या ध्यानात आलेंच असेल कारण, कोणतेहि कार्य चागल्या रीतीने करावयाचें झाल्यास परमेश्वरी कृपाच व्हावी लागते, व त्याचे साहाय्य मिळावे लागतें. ईश्वर, **त्याचा** चागुलपणा, **त्याचें** चातुर्य, **त्याचें** पावित्र्य, **त्याचे** प्रेम ह्या विषयींचाच तो विचार आहे तेणेंकरून श्रमभार हलका होतो व काबाडकष्टात थोरवी वाटू लागते प्राचीनकाव्यातून हेच सत्य प्रतिबिंबित झालेले आहे यच्चयावत् विभूतीना काबाडकष्ट करणें व धिमेपणानें सहनशीलता ठेवणे यावाचून गत्यंतर नसते, हेच तें सत्य आणि परमेश्वरावर जर त्याचा विश्वास असेल तर अती त्याचा जय झाल्यावाचून राहणार नाही. रामायणात हेच सांगितले आहे. पाडवाचा इतिहासहि तेच सागत आहे. त्यानी प्रयत्न केला, विश्वास ठेवला व अखेरीस त्याचाच जय झाला. मृत्युलोकातील त्याचीं एकंदर दु खे व क्लेश याचा शाति, आनद व अक्षय स्वर्गसुख यात लय झाला. "The Heroes" म्हणजे 'विभूती' नामक किंग्स्लेकृत सुंदर पुस्तक तुम्ही वाचले आहे त्यातहि हेच सागितले आहे आणि हे जितके प्राचीनलोकाविषयी, प्राचीन आर्याविषयी, व प्राचीन ग्रीक लोकाविषयी खरें आहे तितकेच ते आपणासारख्या अर्वाचीन काळच्या लोकाविषयीहि खरें आहे त्या थोर विभूतीप्रमाणे आपणहि उदात्त आचरणानें राहावे. कारण, आपणहि त्याच्याचसारखीं माणसें आहोंत मुकीं जनावरे नाहीत.

परलोकीं आपणास ईश्वरासन्निध राहता यावें, त्याच्यासारखे पावित्र्य अगीं यावें, असें आपणां सर्वांस वाटते. तेव्हा इहलोकीं पवित्राचरणानें राहण्याचा आपणास प्रयत्न करावयास नको काय? व आपल्या प्रत्येक प्रयत्नात परमेश्वराचें साहाय्य घेणें जरूर नाहीं काय? परमेश्वराचे ठायी भरंवसा जर आपण ठेवूं तर तो आपणांस सामर्थ्य देईल. हेच आपल्या धर्माचें सार आहे.

# सहकारिता.

## 'संहतिः कार्यसाधिका'.

*" Many hands make music "
" Two hearts becoming one break up a mountain,
They bring dispersion to the mobs."
Persian Couplet

मागल्या खेपेस स्वतः आपला उद्धार आपणास कसा करिता येईल याविषयी तुम्हाला उपदेशपर चार शब्द सागण्याचा मी प्रयत्न केला. प्रस्तुत परस्पर साहाय्य कसें करावे यावर चार शब्द सागण्याचा माझा विचार आहे

एकत्र मिळून आपणास कितीतरी अनेक गोष्टी करता येतात. त्याच एकट्याने करूं म्हटले तर, जरी त्या सर्व आपल्या हातून होण्याजोग्या असल्या तरी तितक्या चांगल्या होत नाहींत तुम्हीं सुट्टींत जेव्हा घरीं जाता, तेव्हा तुमच्यापैकीं कित्येकाना ह्या गोष्टीचा अनुभव आला असेल, असें मला वाटतें. येथे ह्या विद्यालयात तुम्ही जसे कार्यव्यापृत असता त्याप्रमाणे स्वगृहीं जेव्हा एखाद्या धंद्यात अथवा व्यासगात तुम्ही गुंतलेले असता तेव्हा आपल्या कालेजातील स्नेह्याचा सहवास, परस्पर साहाय्य व पाठिंबा नसल्यामुळें तुम्हाला चुकल्यासारखें वाटत असेल. तसेच आपल्या अगच्या तरतरीतपणाला व भावनाना अनुरूप अशा इतर वृत्ति ज्याच्या ठायी वास करीत असतात अशाच्या सहवासापासून आपल्या व्यवसायाना स्वभावत च जे सामर्थ्य व जो उल्लसितपणा येत असतो त्याबद्दलहि तुम्हाला चुकल्यासारखे वाटत असेल. मला तर असे वाटते, कीं, तुम्हीं आपआपल्या घरी असलात म्हणजे असे काहींतरी तुम्हाला वाटत असलेंच पाहिजे. एकात वेळीं तुमच्या मातोश्रीना, भगिनींना अथवा वडिलानासुद्धा कधींहि न रुचणारे असे पोरकट विचार तुमच्या मनात येऊन आपण आता अगदी एकटे आहोंत असेंहि तुम्हाला वाटलें असेल. अथवा, कालेजात जे खेळ तुम्ही खेळता ते घरीं खेळण्याचा तुम्हीं प्रयत्न करीत असताना आपले सोबती असते तर बरें होतें, असें वाटलें असेल. ज्या सोबत्याबरोबर ते खेळ खेळण्याची

---

* "दोन मने एकत्र मिळाल्यावर गिरि दुभग करण्याचे सामर्थ्य प्राप्त होते ते जनतेची दाणादाण करण्यास पुरेसे होतात ''

ावय लागलेली असते त्याच्यावाचून त्या खेळाना निराळेच स्वरूप व हुरूप ाल्याचें दिसत असतें तीच गोष्ट एकटें गाडींत अथवा घोड्यावर फरावयास जाण्याची किंवा एकटे अभ्यास करण्याची असते एकत्र सहवासाची ोष्टच निराळी. तेणेकरून एकप्रकारचा तरतरीतपणा, उत्साह व प्रवृत्ति त्पन्न होत असते प्रत्येकाच्या मनाचे कार्य दुसऱ्याचा मनावर होत असतें, प्रत्येकजण आपल्या स्वत च्या जीविताचा काहींतरी भाग दुसऱ्याचा मनात रवीत असतो. ही गोष्ट केवळ लोकसघाचे बाबतीतच नव्हे तर कनिष्ठ कोटींतील ाण्याचे बाबतीतहि एक विशिष्ट लक्षण होऊन बसली आहे. हे सघसुद्धा ापापल्या कंपूंतील प्रत्येक व्यक्तीच्या ठायी आपल्या उत्साहाचा काहीं भाग रवीत असतात.

शाळेंतील अथवा विश्वविद्यालयातील (tone) 'बल' अथवा 'तेज', शाळेची ोर्ति ज्याला आपण म्हणतों त्याचा तरी अर्थ हाच आहे सैन्यदलाचा ाणीदारपणा' ह्याच अर्थाचा असतो. जे निरनिराळे सूर एकत्र करून ाजाची पेटी तयार केलेली असते, तिचा आवाज त्या सुरावरच अवलबित ासतो. ह्याचप्रमाणे एखाद्या शाळेचे अथवा विश्वविद्यालयाचे, अथवा सस्थेचें tone) नाव, त्या त्या सस्थेतील सभासदाच्या एकत्र उत्साहाच्या उच्च नीच ारूपावर अवलबून असते. तसेंच सैन्यातील सैनिकाना आपल्या एकंदर न्याबद्दल जो माननीय अभिमान वाटत असतो तो सयुक्त लोकसमूहातच, ानतेच्या कल्याणाच्या सद्धेतूने प्रेरित होऊन जेथे अनेक लोकाचें एकत्र ाहचर्य असते अशा मडळीत नावारूपास येत असतो. प्रख्यात फौजेवरील रिष्ठ कामगार, सेनाधिपति, अथवा प्रसिद्ध युनिव्हर्सिटीचे, लोकप्रिय क्लबाचे कंवा मोठ्या मानपदास चढलेल्या एखाद्या शिक्षणसस्थेचे सभासद या सर्वांना ापापल्या निरनिराळ्या सस्थेबद्दल जो अभिमान वाटत असतो त्याचप्रमाणे ानिकाचा अभिमान असतो. कारण, चोर, लुटारू, दरोडेखोर किंवा ाततेचा भंग करणारे राजद्रोही लोक ह्याच्यासारखीं दुष्कर्मे करण्यासाठीं े लोक एकत्र जमत असतात त्याना आपल्या विश्वासघातकी कृत्याबद्दल ाघड अभिमान कधींहि दाखविता येतच नाहीं. तरी त्याच्यातसुद्धां ाहबधनें जीं असतात त्यांत सामर्थ्य व प्रभाव नसतो, अशातला प्रकार नाहीं. कारण, प्रत्येकजण आपल्या सोबत्याला पापाचरणाचे कामीं जातीने ुद्द सामर्थ्य आणि साहाय्य देत असतो. तें इतकें कीं, चोराच्याठायी देखील

मान म्हणून आहेच असें म्हणण्याचा प्रघात पडला आहे. त्याचा अर्थ एवढाच असतो, कीं, अप्रामाणिक बंधनानी एकत्र सलग्न होणाऱ्या चोरांनासुद्धां कांहीं विवक्षित नियम हे पाळावे लागतातच त्याचा असा अनुभव आहे, की, मंडळीच्या अस्तित्वाला उपकारक असे काहीं नियम असावे लागतात. मग ते कितीहि हलकटपणाचे किंवा काळिमा आणणारे का असेनात

शिल्पकर्म, शेतकी आणि व्यापार ह्यात साहचर्याने व संहतीने केवढे कार्य होत असते, ह्याविषयी तुम्हीं आपल्या अर्थशास्त्रावरील ग्रथात वाचलेच आहे. जेव्हा एकजुटीने काम करण्यास लोक एकत्र जमतात तेव्हा सर्व-सामान्य मोठ्या कार्याला, प्रत्येकजण आपापल्या परीने हातभार लावीत असल्या-मुळे–मग ते हातभार लावणे कितीहि अल्प का असेना–माल किती चागला, किती स्वस्त व किती झपाट्याने तयार करता येऊन, काम कसें पार पडते, व दूर दूरच्या अडचणी कशा नाहींशा होतात!

साराश, आपल्याला एवढे कळून येते, कीं, ससारातील प्रत्येक व्यापारात सत्कर्मासाठी म्हणा वा दुष्कर्मासाठी म्हणा एकट्याने कार्य करण्यापेक्षा चार लोक एकत्र मिळून काम केले असता किती तरी अधिक कार्य करता येते

ह्या विश्वविद्यालयात परस्पर साहाय्य करून कार्य करीत राहिले असता आपले केवढे हित होईल याचा तुम्ही आज विचार करा. तुमच्यापैकीं प्रत्येकजण आपल्या सहकारित्वाचा नुसता वाटा जर देत राहील तर सर्वांचे कल्याण व्हावे हा जो कलेजाचा मूळ हेतु त्या सर्वसामान्य अति मोठ्या हेतूच्या दृष्टीने केवढे हित होईल!

आमचा अमुक मंडळीचा क्लब अशा नुसत्या सख्यात्मक सोबत्याच्या साहचर्याच्या दृष्टीने ह्या विद्यालयात आपणास जी मदत मिळते त्याचा मीं उल्लेख केलेलाच आहे आपण यथे इतकेजण आहोंत एवढीच गोष्ट आपणास खेळाचा व करमणुकीच्या साधनाचा उपभोग घेण्यास किती सामर्थ्य देत आहे तेच आपण दोनचार जणच असतो तर तितका उपभोग आपणांला घेताच आला नसता. आपल्या वर्गात मी हुषार कीं तूं हुषार अशा तऱ्हेची तुलना, चढाओढ व प्रतिस्पर्धा ह्याच्यामुळें येणाऱ्या प्रोत्साहनाचा फायदा घेण्यास सहतिहि आपणास समर्थ करीत असते. सामान्यतः बधुत्वामुळे व कीर्तिकर प्रतिस्पर्धेमुळें जें एक उत्तेजन येत असते त्याची

आपल्या यच्चयावत् व्यवसायांत भर पडत असते. पण हा फायदा कितीहि मोठा असला तरी तो तेवढाच एक मुख्य फायदा आपल्या संख्येनें आपल्या शाळेंतील मडळीला होतो, असें नाही ह्याला नुसते सख्यात्मक सामर्थ्य म्हणता येईल. पण आणखी एक सामर्थ्य आहे. त्याला पारमार्थिक अथवा आध्यात्मिक सामर्थ्य असें म्हणण्यास काहीं प्रत्यवाय दिसत नाहीं. ह्या सामर्थ्याचा प्रभाव तर त्याहूनहि अधिक आहे एकाच्या सद्वर्तनाचा अथवा शीलसामर्थ्याचा पगडा दुसऱ्याच्या शीलावर, एकाच्या मनाचा पगडा दुसऱ्याच्या मनावर, होत असतो "ज्याची जशी संगति असेल तसा त्याच्यावर परिणाम होत असतो," ही सर्वसाधारण म्हण खरी असल्याचे आपण सर्वजण कबूल करतों, व त्याचा तरी अर्थ, एका मनाचें कार्य दुसऱ्या मनावर घडणे हाच होतो आता येथे आपली इतकीं मने एकत्र जमली आहेत. आपण एकमेकावर आपले कार्य कसें करीत आहो? आज ज्या प्रश्नाचा विचार तुम्हीं करावा व उत्तर द्यावे असें मी म्हणतों तो हाच. जेव्हा पुष्कळ लोक एकत्र असतात तेव्हा आपण पाहतों, कीं, प्रत्येक व्यक्तीला साहाय्य करावे लागते सर्व समूहातील प्रत्येक व्यक्तीला, सामान्य हिताला काहींना काहींतरी हातभार लावावा लागतो. ह्या विद्यालयाच्या सामान्य हिताचे बाबतींत तुम्हापैकी प्रत्येकजणाने अशा तऱ्हेचे काहीं साहाय्य केलेलें आहे काय? जेव्हा अनेकजण एकत्र जमतात तेव्हां एकमेकाच्या मनाचे कार्य परस्पर मनावर घडत असतें, एकाच्या अगच्या तेजाचें कार्य दुसऱ्यावर घडत असते, असें वर आपण म्हटले. पण माझ्या मित्रानों! आपली मनें, आपले उत्साह याचे कार्य सामान्यहित साधण्यासाठीं आपल्या सभोंवतालच्या इतर मडळीच्या मनावर व उत्साहावर अशा तऱ्हेने घडल्याची आपणांला जाणीव आहे काय?

आपणांपैकीं प्रत्येकजणाला, बऱ्यासाठीं म्हणा अथवा वाईटासाठीं म्हणा आपल्या शेजाऱ्याना प्रोत्साहन देण्याच्या हेतूनें त्याच्यावर आपला पगडा बसविण्याच्या कामी व एकदर विद्यालयावर आपले वजन राखण्याचे बाबतीत, आपल्या नुसत्या सद्वर्तनाने, शीलाने केवढी थोरली कामगिरी करिता येण्याजोगी आहे, हे पाहून खरोखर आश्चर्य वाटते. ही गोष्ट जितकी वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध अशा बुद्धिमान् लोकाना शक्य असते तितकीच ती अल्पवयस्क व बुद्धिमद मुलांनांहि बहुतेक शक्य आहे. मी तर म्हणतों कीं, ह्या विद्यालयात प्रत्येकासंबधीं, मग तो लहान असो मोठा असो, ही गोष्ट अगदीं खरी आहे.

प्रत्येकाला आपणापैकी बाकीच्या मडळीची स्थिति अधिक चागली करण्यासाठीं पुष्कळ करतां येण्याजोगे आहे हें सर्व मुलासंबंधीं जरी खरे आहे, तरी विशेषत वरच्या वर्गातील वयस्क मुलांच्या सबधी ही गोष्ट अधिक खरी आहे. आणि म्हणून ज्यांना मी हें उद्देशून बोलत आहें त्या तुम्हा सर्वासबधीं तर हे विशेषेंकरून खरे आहे. वरच्या तीन वर्गातील माझ्या मित्रानो! ह्या सर्व कालेजाला अधिक सुस्थितिसपन्न करण्यासाठी साहाय्य करण्याचे बाबतीत तुम्हा प्रत्येकावर जी मोठी जबाबदारी आहे तिचा तुम्ही विचार करा तुम्ही कसे वागत आहा ह्याचें उदाहरण घेण्यासाठी लहान मुले तुमच्याकडे पहात असतात हे पक्के लक्ष्यात ठेवा. फिरून पूर्वीच्याच उपमेचा आधार घेऊन बोलावयाचें म्हणजे, आपल्या एकंदर विद्यालयाची कीर्ति (tone) म्हणजे तुम्हां सर्वांच्या कीर्तिदुंदुभीचाच प्रतिध्वनि होईल. तुम्ही नेते आहात, पुरस्कर्ते आहात, ते तुमचे अनुयायी आहेत. म्हणून तुम्ही त्याना सन्मार्गाने नेण्यासाठीं सदैव दक्ष असा

आता ह्या हेतूच्या सिद्ध्यर्थ तुम्ही एकजुटीने एकत्र कार्य करा, असा माझा तुम्हांला उपदेश आहे वरच्या वर्गातील वयस्क मुलानों! तुम्ही तर विशेषेकरून परस्पर अत्यंत स्नेहभावाने वागा, व उपयुक्त कामासाठी एकत्र सहतीने, जुटीने कार्य करण्याचा प्रयत्न करा. तेणेकरून जे तुमच्या तोंडाकडे अनुवर्तनाच्या दृष्टीनें साहाय्यार्थ बघत असतात त्याच्यावर तुमचे वजन पडण्यास, वर्चस्व बसण्यास, तुमच्या एकीमुळे तुमच्या ठायी अधिक सामर्थ्य येईल. पहिल्या तीन वर्गातील प्रत्येक राजकुमार जर ईश्वराच्या साक्षित्वाने आपलें अखिलकर्तव्य करण्याचा नुसता मन पूर्वक प्रयत्न करील, स्वतः चागले आचरण ठेवील, व सामान्यहितार्थ सर्वांशी स्नेहपूर्ण प्रेमभावाने वागू लागेल, तर त्याचे चागले वजन पडेल व तेणेकरून जे हित होईल त्याचा अदाजहि करवणार नाहीं! सर्व शाळेंत एक जरी चागला कुमार असला तरी त्याचें वजन बाकीच्या इतर सर्वांवर मोठे ठळकपणें व उदात्तपणे पडत असते, ही गोष्ट तुमच्यापैकीं कांहींजणांच्या लक्ष्यांत आलेलीच आहे, तेव्हा सर्वांच्या सामान्यहितासाठी वरच्या तिन्ही वर्गातील पंधरासोळा कुमार एकत्र संहतीनें कार्य करू लागले तर त्याचे वजन केवढे पडेल याचा क्षणभर विचार करा.

म्हणून, माझ्या मित्रानों! सर्वांच्या कल्याणासाठी तुम्ही एकत्र सहतीने कार्य करा, असा उपदेश मी तुम्हांला फिरून करतों ज्या गोष्टींत कॉलेजाचें

हित नाहीं हें तुम्हांला ठाऊक असतें तिचा कॉलेजात शिरकाव न होऊं देण्यासाठी तुम्ही परस्पर साहाय्य करण्यास कबूल व्हाल काय ? हलकट व उद्धट शब्द कोणाच्या तोंडावाटे निघाल्यास, अश्लील व अमगळ संभाषण कोणी करीत असल्यास, अथवा वाणीनें अगर कृतीनें जी गोष्ट मनुष्याच्या चारित्र्यास मलीनता आणण्यास कारणीभूत होते हे तुम्हाला ठाऊक आहे असली कोणतीहि गोष्ट कोणी करूं लागल्यास, तिचा तेथल्यातेथे प्रतिकार करण्यास तुम्ही तयार व्हाल काय ? कॉलेजातील नियमानुरूप चालण्यास, होईल तितके करून चागला अभ्यास करण्यास, परस्पर प्रेमाने आणि सौजन्यानें वागण्यास व राजकुमार कॉलेजातील राजकुमाराना शोभेल अशा तऱ्हेने विचार, उच्चार व आचार या त्रयीनें शुद्ध आचरण ठेवण्यास लहान मुलाना उपदेश करण्याच्या कामी तुम्ही आपल्या शिक्षकानाहि मदत कराल काय ?

तुम्ही सहतीनें कार्य करण्यासाठीं आपले एकीकरण कसे करावे, हे सागण्याची माझी इच्छा नाही ते काम माझ्यापेक्षा तुमचे तुम्हालाच अधिक चागले करिता येईल पण मला एवढे सागणे जरूर वाटते, कीं, चागल्याचा कधीहि प्रतिकार करावयाचा नाहीं, वाईटाचा मात्र नेहमी प्रतिकार करीत राहावयाचे एवढ्या बाबतीत तरी निदान तुम्हा सर्वांचे सामान्यत एकमत होऊं द्या कीर्तिकर व शातिदायक असा जर कोणता मार्ग असेल, तर तो खरोखर हाच आहे ! पण तो मार्ग परमेश्वराचे साहाय्य मागितल्यावाचून व त्याचें साहाय्य असल्यावाचून तुम्हाला सापडणें शक्य नाहीं, अशी माझी समजूत आहे

कारण, जसे लहान मुलाचे तुम्ही पुरस्कर्ते व्हा म्हणून मी तुम्हांला सागतो, तसेच तुम्ही हेंहि लक्ष्यात ठेवा, की, तुम्हालासुद्धा नेता म्हणून आहे; व सदाचारानें वागावे अशी जर तुमची खरोखर इच्छा असेल तर तुम्हालाहि त्याचे अनुयायी झाल्यावाचून गत्यतरच नाहीं. तो नेता परमेश्वरच होय ! परमेश्वर व आपली सदसद्विवेकबुद्धि याना अनुसरून जर आपण वागूं लागलो, तर आपले पाऊल वाकडे पडण्याची, आपण मार्गभ्रष्ट होण्याची, भीति राहणार नाही ह्या उच्चतर गोष्टींची नित्य आठवण करून देण्यास, जेणेकरून ईश्वराविषयीच्या व मानवाविषयीच्या आपल्या कर्तव्याची व ईश्वराच्या पवित्र सान्निध्याची सदैव आपणास आठवण राहील अशा तऱ्हेनें वागण्यास, तुम्हाला परस्पर साहाय्य करता येणार नाहीं काय ? तुम्ही

सर्वजण एकाच धर्माचे आहात. तरमग आपल्या सर्वांवर व आपल्या एकदर कॉलेजावर परमेश्वरी कृपा व्हावी एतदर्थ केव्हातरी तुम्हाला एकत्र जुटीने कार्य करता येणार नाहीं काय ? पण ह्या बाबतीतहि काय करावयाचे हे सागण्याची माझी इच्छा नाहीं माझे काम नुसते सुचविण्याचे आहे मला जे काहीं तुम्हाला सांगावयाचें ते एवढेच, कीं, एकमेकाना साहाय्य करण्यासाठी, आपणा सर्वांना मदत करण्यासाठीं, सर्वांच्याच कल्याणासाठीं सहतीने व सहकारित्वाने तुम्ही रहावे

मला स्वत लाहि तुम्ही मदत करा, असे मी म्हणतो. तुम्हाला ठाऊक आहेच, कीं, ह्या कॅालेजाच्या उत्कर्षासाठी आमरण कार्य करणे हे माझे पुण्यकर्तव्य असून माझ्या शिरावर ती एक फारच मोठी जबाबदारी आहे त्यातून मुक्त होण्यास परमेश्वराची जर मजवर कृपा झाली तर जे येथे राहत आहेत त्याची स्थिति अन्यथा अन्यत्र जी झाली असती त्याहून खात्रीने अधिक चांगली होऊन ते अधिक ज्ञानसपन्न होतीलच माझ्या सहकारी मंडळीबरोबर सामान्येकरून मला जे कार्य करावयाचे आहे ते हेंच होय, व तें नीट रीतीने बजाविण्यास परमेश्वर मला साहाय्य करील, असा मला पूर्ण भरवसा आहे. पण माझ्या एकट्याकडून म्हणाल तर फारच थोडे काम होईल मदतीला तुम्ही असल्यावर मात्र पुष्कळ काम होईल म्हणून तुमच्याकडून होईल तितकी मदत मला तुम्ही करा, असे तुम्हाला माझे सागणें आहे ह्या कॉलेजांतील नियमाबद्दल कीर्तिकर अभिमान व आदर सर्वांना वाटावयास लावण्यासाठी तुम्ही आपली शिकस्त करा एखादी गैरवाजवी गोष्ट जर तुमच्या नजरेस पडली, व तुम्हाला स्वत ला जर तिला आळा घालता आला नाहीं, तर अपराध्याची चागली कानउघाडणी करा, व नंतर ती गोष्ट माझ्या कानावर घाला पण जी जी गोष्ट तुम्ही कराल ती सारी उघड उघड, मोकळेपणाने व निष्कपटपणाने मात्र करीत रहा. जी गोष्ट लोकाच्या तोंडावर बोलण्याची तुमची छाती होणार नाही, ती त्याच्या पाठीमागे कधींहि तुम्ही बोलूं नका ! कारण, निंद्यरीतीने गुप्त बातम्या पोहोंचविणें, उठलीसुटली गोष्ट वरिष्ठाना सागत सुटणे, अथवा कोणत्याहि प्रकारचें नीच व अकीर्तिकर असें काम करणे, ह्या गोष्टींनां उत्तेजन देण्याची माझी इच्छा नाहीं, मला ते मुळींच आवडत नाहीं, हे परमेश्वर जाणत आहे. चांगलें तेवढेंच करण्याला प्रोत्साहन देण्याची माझी

# वेळ.

"आपल्याजवळची सर्व पुंजी संपेतोपर्यंत द्रव्याच्या महत्त्वाचा कसा तो विचारसुद्धां कित्येकांच्या मनाला शिवत नसतो! आपल्या वेळाच्या महत्त्वाविषयीहि पुष्कळांची हीच गोष्ट असते. ते तासन्तास रिकामपणांत वाया घालवीत असतात, आणि मग आयुष्य झपाट्यानें क्षीण होत होत वय जेव्हां निघून जातें तेव्हां कोठें ते जागे होतात. आणि आपल्या आयुष्याचा चांगल्या तऱ्हेनें उपयोग करून घेण्याचा मग ते विचार करूं लागतात. पण उपयोग काय? निरुत्साह आणि आळस यांच्या सवयीचा पगडा त्यांच्या मनावर अगोदरच कायमचा बसलेला असतो, व आपण होऊन ज्यांना आपल्या घरांत खुशाल बिऱ्हाड करूं दिलेलें असतें त्यांना, ते डोईजड झाल्यावर, घराबाहेर घालवून देणें हें काम मोठें दुरापास्त असतें. गेलेली संपत्ति उद्योगानें पुनः मिळवितां येते, विसरलेलें ज्ञान पुनरध्ययनानें प्राप्त करून घेतां येतें, क्षीण झालेलें आरोग्य संयमनानें अथवा औषधोपचारानें पुनः प्राप्त होतें, पण वेळेची गोष्ट मात्र तशी नाहीं! ती एकदां गेली, की, जन्माची गेली म्हणून समजावें! ती फिरून कधींहि व कशानेंहि परत येत नाहीं!"

Smiles's 'Self help

आयुष्यांत मिळणाऱ्या सुसंधीचा अप्रतिम उपयोग आपणास कोणत्या तऱ्हेनें करून घेतां येईल, तसेंच पद्धतशीरपणा व कळकळीचा प्रयत्न ह्या दोन गोष्टी कार्यसिद्धीस किती आवश्यक असतात, ह्याचें विवेचन मागें एक वार झालें आहे. प्रस्तुत, आयुष्यातील कांहीं सर्वसाधारण प्रसंगाच्या उपयुक्ततेवर व विशेषेंकरून (१) वेळ, (२) द्रव्य, (३) आरोग्य, (४) उपभोग व (५) ध्यान या पांच गोष्टींच्या उपयुक्ततेवर विस्तृत विवेचन करण्याचें मीं योजिलें आहे. त्यांपैकीं प्रथम वेळेच्या उपयोगाचा आपण विचार करूं.

वेळ ही फक्त ह्या जगाकरितांच आहे, हें आपणास ठाऊक आहेच. 'वेळ' या शब्दानें इहलोकच्या अंतवंत प्राण्याच्या सांत व्यापाराचें आपण दिग्दर्शन करीत असतो. आपल्या जीवनक्रमाची नियमितपणें, व्यवस्थित रीतीनें विरचना करण्याचे कामीं आपणास साहाय्य करणारी अशी ती निसर्गसिद्ध यथाक्रम व्यवस्थाच होय. पण आपल्या नाशिवंत स्थितीला मर्यादित करणाऱ्या अवस्थांच्या द्वाराच स्थल व काल यांच्या मर्यादा आपणास प्राप्त होत असतात. जेथें—उदाहरणार्थ परमेश्वराच्या ठिकाणीं—मर्यादा म्हणून नाहीं, जेथें अंत नाहीं व आदिहि नाहीं अशा ठिकाणीं कालाची कल्पनाच संभवत नाहीं, तिला तेथें अस्तित्वच नसतें. कारण, हें जग अंतवंत आहे

व परमेश्वर मात्र अनंत असा आहे काल हा ह्या एकट्या जगाकरिताच आहे ज्याप्रमाणें आपली पृथ्वी ही अमर्याद व अनंत स्थलाकाशात केवळ ठिपक्याप्रमाणे आहे, तद्वतच काल हाहि अनत अशा नित्य सागरावरील एका मंडलाकार अल्प बिंदुप्रमाणे आहे आणि हाच विचार, आर्यांच्या प्राक्कालीन पुराणलेखातून प्रतिबिंबित झाला आहे, असें मला वाटते. महाकालाची प्रचंड व बहुतेक अगम्य अशी युगात[1] विभागणी केलेली आहे कृत अथवा सत्ययुगाची वर्षे १७,२८,०००, त्रेतायुगाची वर्षे १२,९६,०००, द्वापरयुगाची वर्षे ८,६४,००० व कलियुगाचीं वर्षे ४,३२,००० आहेत प्रस्तुत कलीचे ५००० वे वर्ष चालू आहे, असें म्हणतात विस्ताराने जवळ जवळ ब्रह्मदेवाच्या आद्यकालापर्यंत जाणारा एवढा प्रचंड कालविभाग जो करण्यात आला, त्याचे कारण परमेश्वराच्या बाबतीत काळाला अर्थच नाहीं या विषयीचे सत्यज्ञान हेच होय ईश्वराच्या घरी हजार वर्षाचा एक दिवस व एक दिवस म्हणजे हजार वर्षे[2]

परमेश्वराच्या ठिकाणी जरी कालकल्पना संभवत नसली, तरी आपल्या दृष्टीने काळाला अर्थ हा आहेच, व तो फार महत्त्वाचा आहे काल म्हणजे जेथे काळाचा संसर्ग राहत नाही अशा अन्य जन्माप्रत नेऊन पोहोचविणारे इहजन्मातील माप व सामर्थ्य होय. काल म्हणजे जीवनक्रमाची–जीवितावस्थाची व आयुष्यातील सवींची–विरचना व विभागणी होय. आयुष्यातील सुसवींचा जर आपण सदुपयोग करून घेतला, तर जन्मास येऊन जी कर्तव्ये आपल्या सर्वांच्या शिरावर येत असतात ती पूर्णपणे बजावण्यास आपणास साहाय्य होते. तेव्हा, आपण आपल्या वेळेचा उपयोग यथार्थरीतीने करीत आहो काय? विचारपूर्वक व काळजीने तो आपण खर्च करीत आहो काय? मानवजातीविषयीचे व ईश्वराविषयीचे आपले कर्तव्य पूर्णपणे करण्याकडे आपण त्याचा उपयोग करीत आहो काय? हे प्रश्न महत्त्वाचे आणि गहन आहेत. त्याचीं उत्तरे देण्यात विलंब करिता कामा नये. उत्तर देतानाच कित्येक क्षण

---

१ युरोपिअन लोकातहि आपल्याचसारखे कालाचे चार युगात विभाग पाडलेले आहेत आपले सत्ययुग–त्याचे गोल्डन (सुवर्ण) युग, आपले त्रेतायुग–त्याचे सिल्व्हर (रौप्य) युग; आपले द्वापर युग तर त्याचे ब्रेझन् (पित्तलमय) युग, आपले कलियुग तर त्याचे आयर्न (लोह) युग

२. १०००० कलियुगे अथवा ४,३२०,०००,००० वर्षे म्हणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस होतो.

निघून जातात, व अशा रीतीनें हितावह कार्याचा वेळ निघून जातो प्रत्येक पल हा आपणापासून, आपल्या आयुष्यातून, आपल्या सधीतून, काहींतरी हिरावून नेत असतोच व नित्य शाश्वत कालाच्या मार्गाकडे आपणास पुढे पुढें झरझर ओढीत असतो

माझ्या मित्रानों! आपल्या काळाच्या उपयोगाच्या अत्यत व नित्य महत्त्वाच्या दृष्टीनें पाहिलें असता, दररोज अथरुणावरून उठल्यावर प्रातःकाळच्या शात वेळी 'आजचा दिवस अप्रतिम रीतीने मला कसा घालविता येईल?' याबद्दल ज्याचा त्यानें आपल्या मनाशीच अत करणपूर्वक विचार करण्यात चार मिनिटे घालविण्याहून अधिक चागल्या तऱ्हेनें आपणास त्याचा उपयोग करता येत नाहीं.

प्रत्येक क्षण हा मौल्यवान् आहे, व प्रत्येक क्षणी कर्तव्य हे आहेच. प्रत्येक क्षणाला नवीन सुसधी प्राप्त होत असते. वाया दवडलेला प्रत्येक क्षण म्हणजे आपले काहींतरी हरवले आहे, असें होते, व ती हानि अपूरणीय असते. याचें कारण, एकदा सधि गेली म्हणजे ती फिरून कधीहि परत येत नाहीं. म्हणून, वेळ ही एक मोठी जबाबदारी आपल्या शिरावर असते, तिचा जाब आपणास परमेश्वरापाशी दिल्यावाचून गत्यतर नाहीं. हे जाणून, जोपर्यंत आपल्या स्वाधीन वेळ आहे तोपर्यंत आपण कार्यक्षम व कार्यव्यापृत राहिलेंच पाहिजे पूर्णता ही गोष्ट मनुष्याच्या आटोक्याच्या बाहेरची आहे, व एकसुद्धा क्षण कधीहि वाया न जाऊ देणे—आपली निद्रा, आपली जागृतावस्था, आपला प्रवास, आपले भोजन, आपले कामकाज व आपली विश्राति ह्या प्रत्येक गोष्टीसाठी आपला वेळ आपण अशा रीतीनें ठरवून टाकावा, की, आपला एकहि क्षण वाया जाणार नाहीं. अशा रीतीने वागणे म्हणजे निष्पाप आचरणानें राहण्यासारखेच होईल. जरी ही गोष्ट मानवजातीला अशक्य आहे, तरी पण ते आपले प्रयत्नाचे ध्येय असावे हे उचित. हा अतिम हेतु साध्य करण्यासाठीच आपण प्रयत्न करीत राहावे व ह्या अतिम हेतूच्या अत्यत सन्निध जो जाऊन ठेपेल त्याची सर्व ठिकाणी व सर्वकाली श्रेष्ठ म्हणून गणना होईल

तर मग ह्या अतिम ध्येयाला अनुरूप असें वर्तन ठेवण्यास आपणांला काय करावें लागेल? हे करा, अथवा तें करा, असे सागून उत्तर देतां येण्याजोगा तो प्रश्न सोपा नाहीं. पूर्णतेप्रत जाऊन पोहोंचण्यास राजमार्ग

तर मुळीच नाहीं, पण सर्वसामान्य असा उपमार्गहि नाहीं एकच मार्ग सर्वांना सदोदित सारखा हितावह होईल असें नाहीं. पुष्कळशा गोष्टी ज्याच्या त्याच्या परिस्थितीवरच अवलंबून राहतील मला फक्त सर्वसाधारण असा एक उपदेश तुम्हाला सागता येईल आणि तो उपदेश म्हटला म्हणजे मी आपल्या पहिल्या व्याख्यानात जे तुम्हाला सागितले तेंच होय. परमेश्वराच्या पवित्र सान्निध्याची प्रचीति घेण्याचा नेहमी प्रयत्न करा. त्याला साक्षी ठेवून आचरण करा व त्याचेच कार्य करीत रहा आणि ह्या प्रयत्नात ज्या मानाने तुम्हाला यश येईल, त्या मानाने तुम्ही आपल्या आयुष्याचा यथार्थतया उपयोग केला असे होईल, ही खात्री ठेवा.

आणखी काही थोडे व्यावहारिक विचारहि मला तुम्हाला सागता येतील. तेसुद्धा जो पद्धतशीरपणा अगीं असावा म्हणून मी तुम्हाला मागें एक वार सागितले त्याचेच भाग आहेत

तुम्ही आपल्या दिवसाचे भाग पाडा, आणि होईल तितके करून अधिक नियमितपणा ठेवा ज्याने आपले चरित्र स्वत लिहून ठेवले आहे अशा एका थोर गृहस्थाचेच उदाहरण तुमच्यापुढे ठेवल्यास तुम्हाला माझें म्हणणे नीट समजण्यास बरीच मदत होईल, असें मला वाटते.

ते आत्मचरित्र बेंजामिन् फ्रँकलीन् ह्याचे होय वय अवघे १७ वर्षांचे, जवळ खिशात सारे तीन रुपये, कोणाची ओळख नाही देख नाही, अशा निराश्रित स्थितीत ह्यानीं आपल्या सस्रतीची फिलाडेल्फिआ येथे मुहूर्तमेढ रोविली पण ते स्वत च्या बुद्धिमत्तेच्या व उद्योगाच्या जोरावर इतके उदयास आले, कीं, त्याच्या वेळच्या अत्यत विख्यात सपादक, राजनीति-कुशल, मुत्सद्दी व तत्त्वमीमासक अशा मंडळीत त्याची गणना झाली. वयाच्या ८४ व्या वर्षी जेव्हा त्यानी आपली इहलोकची यात्रा आटोपिली, तेव्हा तर त्याची कीर्ति जगाच्या कानाकोपऱ्यापर्यंत पसरली व अमेरिकन लोकापैकी एक अत्यत श्रेष्ठ पुरुष, अशी त्याची चोहोंकडे ख्याती झाली.

एवढी कीर्ति होण्यास त्याचे तेच कारण झाले! आपल्या साऱ्या यशाबद्दल ते स्वत चेच ऋणी आहेत. ते १७९० सालीं मृत्यु पावले. त्या गोष्टीस आज एक शतकाहूनहि अधिक कालावधि लोटला. तरीपण त्यांच्या हयातीप्रमाणेंच त्या वेळेपासून आज तागाईत त्याची कीर्ति सारखी

वाढतच आहे आपल्या देशबाधवाकडून इतका बहुविध प्रकारें व अतिशय आदर आजपर्यंत कोणत्याहि अमेरिकन गृहस्थाचा झालेला नाहीं ! साऱ्या युनायटेड स्टेट्स्‌मध्ये असे एकहि सस्थान नाही, की, जेथे फ्रॅंकलिन नावाचे गाव नाहीं,–अगोदर अगले प्रातच थोडे आहेत खुद्द ओहिओ प्रातात ह्या नावाची १९ गावे आहेत. फ्रॅंकलीन स्ट्रीट (रस्ता), फ्रॅंकलीन चौक, फ्रॅंकलीन हॉटेल, फ्रॅंकलीन बॅंक, अथवा फ्रॅंकलीन इन्शुअरन्स कपनी, व अशाच तऱ्हेच्या आणखी इतर सस्थानी जेथे फ्रॅंकलीनच्या नावाचा गौरव केलेला नाहीं, असे शहर क्वचितच असेल ! त्याचे बस्ट् (छातीपर्यंत तयार केलेले पुतळे) व तसबिरी ह्या तर सर्वत्र दृष्टीस पडतात बहुतेक प्रत्येक मोठाल्या शहरातून ज्या चित्ताकर्षक वस्तु दृष्टीस पडतात त्यात फ्रॅंकलीनचें कोणत्या ना कोणत्यातरी रूपाने स्मारकचिन्ह हे आहेच !

तो मोठा अलौलिक सामर्थ्याचा व बुद्धिमत्तेचा पुरुष होऊन गेला, ह्यात सदेह नाही स्वभावसामर्थ्यहि त्याच्या ठायीं फार मोठे होते. पण अन्य कोणत्याहि गुणापेक्षा विशिष्टलक्षणयुक्त असा अधिक गुण जर त्याच्या ठायी कोणता असेल तर ते आपल्या वेळेचा काळजीपूर्वक उपयोग करीत होते, हाच होय. त्यानी आपल्या आत्मचरित्रात म्हटले आहे, की, एके काळी तर वाचन हेच आपले करमणुकीचे साधन होऊन बसले होते. पथिकाश्रमात जाणे, खेळ खेळणे, अथवा कोणत्याहि प्रकारच्या विलासात मन घालणे, ह्या गोष्टीत तर आपण आपला वेळ मुळीसुद्धा घालविला नाहीं मुद्रणालयातील आपल्या व्यवसायात त्याचा उद्योग अगदी अश्रात होता त्यानी सद्गुणाची एक यादी तयार केली होती, व तिजवरून ते नेहमी आत्मनिरीक्षण करीत असत. त्या सद्गुणात ‘क्रम’ हा एक असून आपल्या स्वत साठी त्यानी चोविस तासाचाहि कार्यक्रम ठरवून टाकिला होता. असें करण्यात त्याचा हेतु हा होता, की, आपल्या व्यवसायाच्या प्रत्येक भागाला ठराविक वेळ सापडावा. तो कार्यक्रम पुढीलप्रमाणें आहे. आपणापैकीं प्रत्येकानें आपल्या स्वत साठीं त्यासारखा काहींतरी कार्यक्रम ठरवून टाकावा.

| सकाळ. | तास. | |
|---|---|---|
| प्रश्न आज आपण कोणते चागलें काम करावे ? | ५ | निजून उठणें. तोंड धुणे, व ईश्वराचे स्मरण करणे. |
| | ६ | आजच्या कामाची योजना करून त्याप्रमाणे निश्चय करणे |
| | ७ | प्रस्तुत व्यासंग पुढे चालू ठेवणे. न्याहारी करणे |
| | ८ ९ १० ११ | काम करणे |
| दुपार. | १२ १ | वाचन, हिशेब तपासणे व भोजन करणे |
| तिसरा प्रहर. | २ ३ ४ ५ | काम |
| संध्याकाळ. प्रश्न आज आपल्या हातून कोणते सत्कर्म घडले ? | ६ | जेथल्या तेथे वस्तु ठेवणे. |
| | ७ | रात्रीचे जेवण, गायन, वादन, |
| | ८ | मनोरंजन अथवा संभाषण. |
| | ९ | साऱ्या दिवसाचा आढावा |
| रात्र. | १० ११ १२ १ २ ३ ४ | निद्रा. |

हा कार्यक्रम अमेरिकेंतला. पण जेथे निरनिराळ्या धंद्यासाठी निरनिराळ्या भागात दिवसाच्या तासाची स्वाभाविकपणेंच विभागणी झालेली आहे अशा या हिंदुस्थानात आपल्याला तर तो अगदीं उपयुक्त होईल, इतकेच नव्हे, तर तो कदाचित् त्याहूनहि अधिक सुकर होईल! आपल्या या आर्यभूमीत, लवकर निजण्यास व लवकर उठण्यास हवा आणि सप्रदाय हे दोन्ही फार अनुकूल आहेत. म्हणून उन्हाळा असो वा हिंवाळा असो, लवकर निजून सूर्योदयाला उठणे, ही गोष्ट तुम्हाला हितावह होईल. आणि वास्तविक पाहिले असता अवश्य त्यापेक्षा अधिक निद्रा आपण घेताच कामा नये! आपल्या प्रकृतीला आणि शक्तीला जितकी जरूर असेल (किती ते ज्याचे त्याला ठरविता येईल ) तितकीच आपण प्रत्येकाने झोंप घेतली पाहिजे आणि साधारणपणे आपणास असे म्हणता येईल, की, तरुण व वृद्ध माणसाना मध्यमवयाच्या माणसापेक्षा विश्रातीची जरूर थोडी अधिक लागते तसेंच मध्यरात्रीच्या पूर्वी एक तास झोप, मध्यरात्रीच्या नंतर दोन तास झोपेच्या बरोबर असते, या म्हणण्यातहि काहीं सत्याश आहे. साराश, या दृष्टीने पाहिले असता जितके लवकर आपण निजू ( अर्थात् लवकर निजण्यालाहि योग्य मर्यादा आहे ) तितके अधिक चागलें कारण, ह्या दृष्टीने विचार केला असता लवकर निजण्यामुळे शारीरिक तेज व बल वाढते, इतकेंच नव्हे, तर त्याहूनहि अधिक असा काहीतरी फायदा होतोच. तेणेकरून आपला वेळहि वाचतो चिंतन व ध्यान करण्यास अत्यंत योग्य अशी आपल्या मनाची स्थिती जर कोणत्या वेळी होत असेल तर ती प्रभाताच्या निवात वेळीच होय! या बाबतीत कोणाचाहि मतभेद होणार नाहीं, अशी माझी समजूत आहे म्हणून दररोज प्रात कालीं लवकर उठून आपण प्रथमतः ईश्वराविषयी विचार केल्यास बरे. आपल्या हिदुस्थानची हवा ही अशी आहे, की, उघड्या हवेत व्यायाम जो घ्यावयाचा तो सकाळी व सध्याकाळीच आपणास घेता येतो. तेव्हा दररोज प्रातःकाळी तुम्हाला जो आवडेल तो—घोड्यावर बसून सहल करणे, फिरावयास जाणे, धावणे, क्रिकेट खेळणें, लॉनटेनिस खेळणे अथवा शिकार करणे—व्यायाम तुम्हीं घेत जावा. सकाळीं इतक्या लवकर व्यायाम घेत गेल्यास सारा दिवसभर तुमचीं मनें प्रसन्न राहून अगीं तरतरीतपणा अधिक येईल, व शरीरप्रकृतिहि तेणेकरून चागली कायम राहील. पुढे दुपारच्या वेळीं उन्हांत जेव्हा आपणास बाहेर

जाववत नाहीं, म्हणजे १० वाजल्यापासून ते सायंकाळी ४ अथवा ५ वाजेपावेतों, वाचन, लेखन व इतर धंदा या प्रत्येकासाठी निरनिराळा वेळ नेमून ठेवावा दिवसा झोप कधींहि घेऊं नये अशा रीतीने आयुष्याचा बराच काळ वाया न घालवूनसुद्धा जीवितावधि अगदी अल्पशी वाटते आणि दिवसा झोप घेण्यामुळे शरीराला फायदा न होता उलट अपाय मात्र होत असतो १० पासून ४ अथवा ५ वाजेपर्यंत सात तास होतात. एवढा काळ, निदान त्यापैकी बराच भाग आपले मुख्य काम जो अभ्यास त्याकडे आपण खर्च करावा तुमच्यापैकी ज्याना पुढे मोठमोठ्या इस्टेटी साभाळावयाची कामे करावी लागतील, त्याचा त्या वेळी नित्य धंदा साधा, परिश्रमाचा व तितकाच मानाचा असा होईल. ज्यानां असले काम अथवा एखादे कचेरींतील वा सार्वजनिक कर्तव्य करण्याची पाळीच येणार नाहीं, त्यानी तर जेणेकरून बुद्धीचा विकास होऊन ती अधिक प्रभावशाली होईल असला एखादा व्यासग नियमितपणे करीत राहावे, व तिकडेच आपले सारे लक्ष्य अर्पण करावे. वाटेल तो विषय निवडण्याची जर तुम्हाला मोकळिक असेल तर ज्या विषयाची तुम्हाला विशिष्ट आवड असेल, ज्या ज्ञानप्राप्तीची तुम्हाला अत्यंत जिज्ञासा असेल, त्याच विषयाचे अध्ययन करा. न्याचरल हिस्टरी (पदार्थविज्ञानशास्त्र)ची तुम्हाला अभिरुचि आहे काय ? असेल तर तिकडेच तुम्ही सारें लक्ष्य घाला इतिहासाची गोडी असेल तर त्याचेच वाचन ठेवा. भूगर्भशास्त्राची आवड असेल तर त्याचाच व्यासग चालू ठेवा. गायनशास्त्र पसत असेल तर त्याचा अभ्यास करीत रहा अथवा वनस्पतिशास्त्र व उद्यानविद्या यांची अभिरुचि असेल तर त्या शास्त्राचे वाचन करा. भूगोलाची आवड असेल तर साहसवर्णनाचीं व प्रवासवर्णनाची शास्त्रीय माहितीने भरलेली पुस्तके वाचा इतर विषयाप्रमाणे ह्या सर्व विषयावर शेकडो ग्रंथ आहेत. त्याच्या वाचनात तुमचा वेळ चागला निघून जाईल, तुमची कल्पनाशक्ति वृद्धिंगत होईल, विचार उन्नत होतील, शीलसामर्थ्य वाढेल, व आपल्या बाधवाना साहाय्य करण्यास तुम्हाला सामर्थ्य प्राप्त होईल

तसेच सर्व कामें अगदी तनुमनाने करावींत असा जो उपदेश मीं तुह्माला मागें एकदा केला, तो ह्या व्यवसायानाहि लागू आहेच. सामान्यत ज्याची आपणास स्वाभाविक आवड व अंगीं पात्रता असते तीं आपण आपली पराकाष्ठा करून करूंच.

सारांश, वाचनाला व लिहिण्याला कोणतातरी एक वेळ ठरवून टाका. आणि तीं कामे त्या त्या वेळीं नियमितपणे होतील अशी खबरदारी घ्या चागलें काम अविचारानें कधीं कोणी करीत नाहीं. उलट जे नेहमीं कार्यव्यापृत असतात त्याना आपली कामे उरकून शिवाय दुसरे काम करण्यास वेळ सापडतोच. आणि ह्यावरूनच अशी सामान्य ह्मण पडली आहे, कीं, उद्योगी लोकानाच खरी फुरसत सापडते !

लेखन आणि वाचन ही दोन्हीं कामे झाली पाहिजेत सरकारी असोत वा खाजगी असोत, पत्राची उत्तरे द्यावयाचीं ती फार काळजीपूर्वक देत जा, असा माझा तुह्माला उपदेश आहे. आणि दिवसातून अमुक वेळी हे काम करावयाचे, असें ठरवून टाका कोणी आपणाशीं बोलावयास आले असता आपण जर त्याला उत्तर दिले नाही तर त्याला आपण उद्धटपणा असे ह्मणतों तसेंच कोणी आपणास पत्र पाठविले असता त्याचे जर आपण उत्तर दिले नाहीं तर तोहि तितकाच उद्धटपणा होणार नाहीं काय ?

तुह्मी रोजनिशी ठेवीत जा तीत रोज आपण काय केले ह्याची थोडक्यात हकीगत लिहून ठेवीत जा. तेणेकरून आपण आपले आयुष्य कशा रीतीने घालवीत आलो आहोंत हे पाहण्याच्या उद्देशाने आपण केलेल्या कामाची तपासणी करण्यास बरीच मदत होईल. प्रथमत तुह्माला वाटेल तितके तुह्मी अगदी थोडे लिहीत चला. पण रोज काहीतरी लिहिल्यावाचून राहूं नका पुढे तुमची तुह्माला लिहिण्याची गोडी अधिक लागेल व कालावधीने तुह्मी अधिक लिहूं लागाल जे जे तुह्मी कराल तेवढ्याचीच केवळ नव्हे, तर जी जी मौजेची गोष्ट तुमच्या नजरेस पडेल अथवा कानी येईल त्याची सुद्धा नोंद करून ठेवा. तुमच्या सभोंवार असणारे पक्षी, वनस्पति व इतर जनावरे तुह्माला पहावयास सापडतील. कोणते पक्षी कोणत्या ऋतूंत येतात व जातात, कोणत्या वृक्षाची पाने केव्हा गळून पडतात, व अशाच तऱ्हेच्या तुह्माला कौतुक वाटणाऱ्या गोष्टी तुह्मी लिहून ठेवा. अशा प्रकारच्या रोजनिशीपासून गतकालचा वृत्तात ह्मणून पुढे मोठा आनंद वाटेल तेणेकरून प्रस्तुतसुद्धा तुमचा थोडा फायदा झाल्यावाचून राहणार नाहीं, व आपलें आयुष्य अधिक शहाणपणाने घालविण्याचे कामीं तुह्माला बरीच मदत होईल.

सरतेशेवटी तुह्माला सांगावयाचें ते असें, की, सर्व गोष्टी यथाक्रम कराव्या; एवढेच केवळ नव्हे, तर त्यांची मांडणीहि क्रमवार व व्यवस्थित असावी. वर दिलेल्या बेंजामिन फ्रॅंकलिनच्या कार्यक्रमांत एक गोष्ट त्यानें विशेषत. घेतली होती ती ही की, वस्तु जेथल्या तेथे व्यवस्थितपणे ठेवावयाच्या, हें लक्ष्यांत असूं द्या. ही फार महत्त्वाची बाब आहे कारण, ह्या टापटीपीमुळें आपला पुष्कळ वेळ वाचतो जेथें हात घालूं तेथेंच ती नेमकी सांपडेल अशा रीतीनें प्रत्येक वस्तु ठेवा. कांहीं पुस्तकें कोठे पडलेली आहेत हे धुंडून काढण्यांत माझा वेळ किती गेला असेल याची माझी मलाच शंका आहे

ह्मणून जोंपर्यंत काळ आपल्या स्वाधीन आहे, आपल्याला वेळ आहे, तोपर्यंत आपण त्याचा उपयोग करीत रहावें कारण, तो केव्हां आणि कसा निघून जाईल, याचा नेम नाहीं जोपर्यंत आपले दिवस आहेत, जोंपर्यंत जीवनप्रकाशाचा उजेड आपणास मिळत आहे, तोंपर्यंतच फक्त आपणास कार्य करितां येते एकदां रात्र पडली–मृत्यूची काळोखी आली– ह्मणजे आपले काम करण्याचे दिवस गेले ह्मणून समजावें आपली जीवनयात्रा संपुष्टांत आली असतां आपण अमुक रीतीनें राहिलो असतो तर बरें झालें असतें असें आपणास वाटेल, त्याच तऱ्हेनें आजपासूनच राहण्याचा आपण सतत प्रयत्न करावा माझ्या मित्रांनो! एवढी गोष्ट अत्यंत गौरवपूर्वक लक्ष्यांत ठेवा जेव्हां आपणास इहलोक सोडून जाण्याची पाळी येईल तेव्हां आपण आपला वेळ वायां दवडिला नाहीं, आपले कर्तव्य करण्यांतच आपण आपलें आयुष्य घालविलें, असें जर आपणास वाटेल तर तेवढ्या आठवणीनें आपणास किती आनंद होईल ह्मणून सांगूं! उलट पक्षीं, ज्या संधी आपण हातच्या घालविल्या, जे दिवस आणि जी वर्षे वृथा जाऊं दिलीं, जेथें लोककल्याणाची कामें करितां आली असती असे जे प्रसंग स्वार्थैकदृष्टीनेंच आपण साधले, जेव्हां खरोखर ईश्वरभक्ति व ईश्वराचेंच कार्य करण्यांत वेळ घालवितां आला असता तेव्हां जो वेळ आपण आपल्या स्वार्थांत व पापाचरणांत घालविला, त्या सर्व काळाकडे व प्रसंगाकडे जर आपण नजर फेंकली, तर तें गतकालावलोकन किती दु खद होईल याचा विचार करा! आपल्या हातून घडलेल्या प्रमादाची दुरुस्ती करण्यास मग वेळ मिळत नाहीं तो विचार फार उशिरानें

मनांत येतो, तेव्हां त्याचा कांहींच उपयोग होत नाहीं. मग आपणांस पुढील कवीचे उद्गार खरे वाटूं लागतील व निरंतर खेद वाटेल.

"Of all sad words of tongue or pen,
The saddest are these: It might have been".

—Whittier's "Mand Muller".

चित्तीं उपजविती खेद । बोलतां लिहितां जे जे शब्द ।
तयांमाजि अत्यंत दुःखप्रद । 'असें झालें असतें' हें ॥ १ ॥

# द्रव्य.

"द्रव्याचा सदुपयोग करणे व त्याची खरी योग्यता जाणणे या दोन गोष्टींवरच सारे समाज-चक्र फिरत असते"

"द्रव्य मिळविता येणे, अथवा तेवढे न झाले तर असलेले द्रव्य कसे राखावे हे ठाऊक असणे, व त्याचा शहाणपणाने व नीट उपयोग करता येणे, हा गुण ह्मटला ह्मणजे मानवी वर्गाला मिळणाऱ्या अप्रतिम देणग्यांपैकीच एक होय ज्याच्याजवळ पैसा असतो त्याच्या हाती आपल्या सभोवतालच्या लोकांचे कल्याण करण्याचें सामर्थ्य असते हेच अत्यंत श्रेष्ठप्रतीचे दिव्य सामर्थ्य होय"

(Adapted from the Authoress of "John Halifax, Gentleman")

अर्थशास्त्रावरील ग्रंथातून द्रव्याची जी व्याख्या दिलेली आहे ती अशी — 'द्रव्य ह्मणजे किंमत मोजण्याचे परिमाण व विनिमयाचे साधन'

द्रव्यानें मोजता येणारी किंमत कोणती ? असा जर एखाद्यानें प्रश्न केला तर सामान्यतः द्रव्याने मानवी सामर्थ्याची किंमत मोजता येते, त्याच्या गुणाचे परिमाण करता येते, असे उत्तर देता येईल असें मला वाटते. जगातील सगळा पैसा व सारी संपत्ति ह्मटली ह्मणजे भूमीतील स्वाभाविक उत्पन्नासाठी खर्ची पडलेल्या मानवी परिश्रमाचा व बुद्धिचातुर्याचा एक प्रचंड साठाच होय

कारण, द्रव्याला प्रथमतः सुरुवात कशी झाली याचा विचार करा. प्रस्तुत आपण समजतों त्याप्रमाणे मानवजातीबरोबर काहीं त्याचा प्रारंभ झालेला नाहीं एके काळी लोक अगदी रानटी स्थितीत असून द्रव्याच्या उपयुक्ततेविषयी त्याच्या ठायी अज्ञान वास करीत होते असा काळ प्रत्येक राष्ट्रात व प्रत्येक देशात येऊन गेलेला आहे तोच इतिहासाच्या सुरुवातीचा काळ होय कित्येक रानटी देशात अजूनसुद्धा तसा प्रकार आढळतो. त्या देशात लोकांची राहणी रानटी तऱ्हेची, प्रत्येक-जण आपल्या स्वतःच्या रानटीपणाच्या अभिमानात स्वतःकरताच राहत असतो प्रत्येकजण आपापल्या रानटी गरजा भागवीत असतो आपले अन्न आपणच मिळवतो, आपला कपडालत्ता आपणच पैदा करतो, व निवाऱ्याला जागा पण तो आपली आपणच बांधतो पण त्याचे सहचारी जे वन्य पशु त्याच्याप्रमाणेच त्याच्या गरजाहि फार थोड्या असतात, व त्याचा पुरवठाहि कसाबसाच होत असतो. सुखाचे त्याच्याजवळ

नाव नसते व पैसाहि त्याला ठाऊक नसतो पण जरी सर्व माणसे [illegible] व रानटी असली, तरी ती सारीच एकसारखी असतात असे [illegible] एकाच्या अंगी शिकार करण्याचें चातुर्य अधिक असले, तर दुसरा कपडा करण्यात कुशल असतो, तिसरा झोंपड्या बांधण्यात कुशल [illegible] चौथा जमीन नागरण्यांत हुशार असेल येणेप्रमाणे, पारधी आपल्या शिकारीतला काही वाटा विणकऱ्याला देऊन त्याच्याजवळून कपडा घेतो, [illegible] आपल्याजवळचे अन्न देऊन त्याच्या मोबदला झोंपडी बा[illegible] झोंपडी बांधवून घेतो आपण अद्याप द्रव्यापर्यंत येऊन ठेपलो नाही [illegible] द्रव्याच्या कल्पनेला जो प्रारंभ होतो तो येथूनच कारण विनिमय-एक वस्तु मोबदला देऊन दुसरी वस्तु घेणे—ह्मणतात [illegible]च. आणि द्रव्य हे विनिमयाचे साधन आहे

मोबदल्यात दिलेल्या वस्तु ह्या मानवी वर्ग स्व-सामर्थ्याने स्वत करितां आपला आपणच संपादन करीत आलेला आहे, हे आता तुमच्या लक्ष्यांत आलेंच असेल पण मला जे विशेषत सांगावयाचे ते हे की, अदलाबदल करण्यास सर्वात अतिशय मालमत्ता जर कोणाजवळ असेल तर ती सामर्थ्याने व बुद्धिमत्तेने सर्वश्रेष्ठ अशा लोकाजवळच असते, मग ते शिकार करण्यात श्रेष्ठ असोत वा कपडे विणण्यात श्रेष्ठ असोत, किंवा घरे बांधण्यात वा शेते नांगरण्यांत श्रेष्ठ असोत जीविताला लागणाऱ्या आवश्यक अशा बहुतेक वस्तु व सुखाचीं साधने हीं सारी त्यानीच आपल्या परिश्रमाने व चातुर्याने उत्पन्न केलेली आहेत. हा प्रकार यच्चयावत् राष्ट्राच्या प्रारंभाला होता व तो आजहि तसाच चालू आहे.

पण एवढें पक्के लक्ष्यात ठेवा कीं, असली मालमत्ता ज्याच्याजवळ असेल त्याला ती राखता आल्यावाचून तिला मालमत्ता असें म्हणता येणार नाहीं. आपल्या श्रमाच्या फळाचा उपभोग जर आपणाला घेता येणार नाहीं तर श्रम करण्यात हाशील ते कोणते? एखाद्या वाटेतल्या चोराने येऊन खुशाल उद्योगाचे फळ लुटून घेऊन जावे एवढ्याकरतां काहीं कोणीहि उद्योगी मनुष्य खचित उद्योग करणार नाहीं आणि म्हणूनच ज्यानी जी आपल्याखाली मालमत्ता तयार केली असेल ती त्याची त्याच्याजवळ सुरक्षित राहावी, न्यायाने त्यांचाच तिच्यावर हक्क असावा, असे कायदे करण्यासाठीं सर्वत्र प्रयत्न

केलेला आहे जेव्हा अशा प्रकारचे कायदे होतात, मालमत्तेवरील हक्क अशा तऱ्हेने पाळण्यांत येतात, तेव्हाच मालमत्तेला काही किंमत प्राप्त होते, अथवा वस्तूंची अदलाबदल करता यावी म्हणून लोक वस्तु संपादन करण्याची पर्वा करूं लागतात येथूनच सर्व समाजाला व सर्व सुधारणेला प्रारंभ होतो

येथेहि फिरून लक्ष्यात ठेवा की, अशा रीतीने सुरक्षित ठेवलेली ही सारी संपत्ति म्हणजे मानवीपरिश्रमाचेच कार्य होय शिकारीत मिळविलेले अन्न असो, कपडा असो, घरदार असो किंवा शेतीचे उत्पन्न असो, ती प्रत्येक वस्तु उत्पन्न करावयासाठी किंवा मिळविण्यासाठी कोणाला तरी उद्योग हा करावाच लागला असेल. अन्यथा, त्या वस्तु आपण होऊन प्राप्त झाल्या नसत्या

आता प्रत्येकाजवळची मालमत्ता ही ज्याची त्यानेच आपली स्वकष्टाने मिळविलेली असते असें मी म्हणत नाहीं ती कदाचित् त्याच्या पूर्वजानीहि मिळविलेली असेल–आणि असा प्रकार बहुधा नेहमी दृष्टीस पडतो–पूर्वजानीं म्हणा, वडिलानी म्हणा, नातलगापैकी कोणीतरी म्हणा किंवा दुसऱ्याने कोणींतरी ती मिळविलेली असेल, पण माझ्या म्हणण्याचा आशय एवढाच की, मालमत्ता जर कोठे असली, मग ती कोणाची का असेना, ती मानवी कष्टानेच मिळविलेली असते, आणि म्हणून मालमत्ता ही मनुष्याचे कष्ट कमी अधिक प्रमाणाने मोजण्याचें माप अथवा साधन असते.

मला वाटते, तुम्हाला हें विवरण कदाचित फार नीरस वाटेल. कारण आतापर्यंत मी जे काहीं सागितले ते वर्गात वाचावे लागणाऱ्या पुस्तकातलाच थोडासा भाग आहे. पण माझा उद्देश एवढाच की, द्रव्य म्हणजे काय हें तुमच्या नीट लक्ष्यांत यावे. द्रव्याच्या अर्थाकडे आपण आता वळूं.

विनिमय करण्यासाठी ज्याच्याजवळ माल असतो, त्याना त्या मालाची सौकर्याने अदलाबदल करता यावी ह्यासाठी सर्वसाधारण व ज्यानां कायमची किंमत असते अशा काहींतरी वस्तु असाव्या लागतात, नाहींतर त्याची मोठी गैरसोय होते असली सर्वसाधारण वस्तु म्हटली म्हणजे द्रव्य हीच होय. प्रख्यात आर्चबिशप व्हेटले यानी लिहिलेले "Money Matters" नावाचें जे एक लहानसें अतिसुंदर पुस्तक आहे त्यातूनच मी पुढील उतारा घेतों. "जगांत जर पैशासारखी वस्तुच नसती तर आपणाला

वाटेल ती वस्तु मिळविण्याला मोठी पंचाईत पडली असती उदाहरणार्थ चाभार घ्या. त्याला आपल्या कुटुंबाच्या पोषणासाठी भाकरीची ( अथवा इतर एखाद्या अन्नाची ) गरज असते पण त्याच्याजवळ मोबदला देण्यासाठी जोड्यावाचून काहींच राहिले नसते. त्याला रोटीवाल्याकडे तर गेलेंच पाहिजे, व भाकरीच्या किमतीचा जोड्याचा जोड काढून दिला पाहिजे. इतर कोणतेहि अन्न त्याला घ्यावयाचे झालें तरी असें केल्यावाचून त्याला गत्यतरच नसते

"पण कल्पना करा कीं, त्यावेळेला कदाचित रोटीवाल्याला जोड्याची गरज नसून टोपीचीच अधिक आवश्यकता असेल तेव्हा त्या बिचाऱ्या चाभाराला ज्याला जोड्याची गरज आहे असा टोपीवाला शोधून काढल्या-वाचून इलाज नसतो जोडा देऊन त्याच्या जवळून टोपी घ्यावी आणि मग रोटीवाल्याला टोपी देऊन त्याच्याजवळून आपल्याला गरज असलेला भाकरीचा तुकडा मिळवावा

"असाच जर प्रकार असता, तर हें सारे किती त्रासाचे व दगदगीचें झाले असतें ! पण द्रव्याच्या उपयोगानें ही सारी दगदग वाचली आहे. ज्याच्याजवळ पैसा असेल त्याला काय पाहिजेल ती वस्तु वाटेल त्यावेळीं आणता येईल."

द्रव्य म्हणजे सोनें, रुपे, अथवा तांबेंच असलें पाहिजे, किंवा अन्य एकादी कोणती धातु असली पाहिजे, अशातला मुळीच प्रकार नाहीं. सामान्यत लोकाना आपल्याजवळ असावेसें वाटतें असें काहींतरी सोईवार ते असलें पाहिजे, एवढी गोष्ट मात्र खरी ते दूध असू शकेल वा फळें असतील, अथवा मौल्यवान् दगडहि असतील पण दूध आणि फळें ह्या जिनसा फार वेळ नीट टिकणाऱ्या नाहींत व मौल्यवान् दगड सहज हरवण्याचा संभव असतो काहीं भागात कवड्यांचा उपयोग करीत असतात, हें तुम्हाला ठाऊक आहेच कवड्या म्हणजे हिंदुस्थानच्या समुद्रकिनाऱ्यावर सापडणाऱ्या लहान लहान शिंपल्या असतात पण द्रव्यासाठीं अत्यंत योग्य अशा धातु म्हटल्या म्हणजे सोनें, रुपें आणि तांबें ह्याच होत, असें फार दिवसापासून सर्व सुधारलेल्या राष्ट्रांचे एकमत झालेले आहे. कारण इतर सर्व वस्तूंपेक्षा ह्या धातु किमतीनें, व आकारानें फारच सोइस्कर

असतात. सोनें आणि रुपे ह्या धातु जात्याच मौल्यवान आहेत. कारण त्या सहज सापडणाऱ्या नसून त्याचे मौल्यवान दगडाप्रमाणें–हिऱ्या माणकाप्रमाणे–अनेक सुंदर अलकार घडवितां येतात. आता जगात जेवढे म्हणून सोनें आणि रुपें आहे तेवढे सारें, इतर वस्तूप्रमाणें, मनुष्यानें आपल्या साहसानें, कष्टानें आणि चातुर्यानें उत्पन्न केलेले आहे. आणि म्हणूनच जेव्हा आपण रुपये देऊन तादुळ घेतों तेव्हा आपण एकप्रकारें पैशाच्यारूपानें मानवी कष्टाचें फळ देऊन अन्यप्रकारचें तादुळाच्या रूपानें मानवी कष्टाचे फळ घेत असतों मानवी कष्टाचे तादळात किंवा रुपयात रूपांतर झालेले असते असें ह्मटले असता चालेल आपल्याजवळ कोणत्याहि रूपाने असणारा सारा पैसा म्हणजे त्या त्या मानाने मानवी सामर्थ्याची मोजदाद करण्याचें साधन होय, असें जें मी वर प्रारंभीं म्हटलें, त्याचा तरी अर्थ हाच. आणि ज्याप्रमाणें द्रव्यावरून गतकाली सामर्थ्याची गणना होत होती त्याचप्रमाणे प्रस्तुतहि द्रव्याच्याठायी सामर्थ्याला बराच आदर आहे. कारण मानवी कष्टाने, चातुर्याने व शहाणपणाने उत्पन्न होणाऱ्या वस्तूंचा विनिमय–अदलाबदल–त्याला नेहमीं करता येतो. साराश, तुमच्या हे लक्ष्यात येईल कीं, द्रव्य ही सद्वस्तु आहे, तोच खरा गुण आहे, जिवत राहून चिरकाळ टिकणारी ती वस्तु आहे. आता, अर्थात् ज्याप्रमाणें इतर सर्व चागल्या वस्तूंचा दुरुपयोग होण्याचा सभव असतो, तद्वत् त्याचाहि दुरुपयोग होण्याचा सभव आहे, नाहीं असे नाहीं. वाईट कामाकडेहि त्याचा उपयोग करता येईल किंवा अविचाराने अथवा पापाचरणानेहि ते उधळून टाकता येईल. पण खुद्द द्रव्य ही जात्या वस्तु मोठी चागली आहे. या भूतलावर ते एक मोठें व चागले असें सामर्थ्य आहे. आणि ज्याने तो पैसा मिळविलेला असतो त्याच्या बाबतींत तर सामान्यत तो गुण म्हणून समजतात. ह्यावरून इंग्रजीतील जुनी म्हण 'Money makes the man' म्हणजे मनुष्याच्या मोठेपणाला द्रव्य हेच एक कारण आहे. (सर्वे गुणाः काचनमाश्रयंति) ही जितकी खरी आहे तितकीच 'Man makes the money' म्हणजे मनुष्य आहे तर द्रव्य आहे, द्रव्य हें मनुष्याच्याच सामर्थ्याचें फळ आहे, ही म्हणसुद्धा खरी आहे.

A man of money म्हणजे पैसेवाला मनुष्य. ज्याच्या जवळ संपत्ति आहे, मालमत्ता आहे असा मनुष्य. नुसतें द्रव्यालाच सपत्ति म्हणून

म्हणता येणार नाहीं कारण द्रव्याचा विनिमय जर आपणाला करता आला नसता तर नुसत्या एकट्या द्रव्यानेंच आपल्या सुखात अथवा सोईत भर पडली नसती पण ज्या अर्थी, सामान्यपरिस्थितीत, संपत्तीसाठी अथवा मालमत्तेसाठीं—अर्थात जीवाच्या सौख्यासाठीं, सोईसाठी अथवा ऐषआरामा-साठी—द्रव्याचा विनिमय आपणाला अगदी सहजरीत्या करता येतो, त्याअर्थी सामान्य भाषेंत द्रव्याला संपत्ति हेंच नाव पडत आले आहे. म्हणून संपत्तीच्या उपयोगाविषयी—अन्य शब्दानी सांगावयाचें म्हणजे पैसा खर्च कसा करावा—याविषयी विचार करणें अवश्य आहे द्रव्य जवळ आलें म्हणजे त्याच्याबरोबरच आपल्या शिरावर जी मोठी जबाबदारी येत असते, तसेंच आपणास जे सुख प्राप्त होत असते, त्याचाहि आपण उल्लेख करूं

आज मी ज्याच्याशीं बोलत आहे त्या तुम्हां सर्वांच्या हाती पुढें कमी अधिक प्रमाणानें पैसा हा यावयाचाच. आता त्यात तुमच्यापैकीं कित्येकजण पुष्कळ श्रीमंत होतील. कित्येकाच्या जवळ हल्लींच पैसा पुष्कळ आहे. आपला पैसा शहाणपणानें खर्च करण्याची दक्षता ठेवा तुमच्या शिरावर हा भार तर सर्वांपेक्षा अधिक मोठा आहे. याचें कारण तुमचा पैसा तुम्हीं काहीं स्वकष्टाने व स्वसामर्थ्याने मिळविलेला नाहीं. ज्या इस्टेटींचे तुमच्यापैकीं कित्येकजण मालक अथवा कारभारी आहेत त्या तुमच्या पूर्वजानी आपल्या चातुर्याने व शौर्याने मिळविलेल्या आहेत. त्याच्या-विषयीं तुम्हाला योग्य अभिमानच वाटला पाहिजे कारण सामान्य जनतेपेक्षा तीं माणसें खरोखरच अधिक श्रेष्ठप्रतीचीं असलीं पाहिजेत तुम्हाला आज जो उपभोग घ्यावयास सापडतो ती त्याच्या गुणाचीं व वैभवाचीच फळें होत. आणि त्याच्या श्रमाचीं फळे जशी तुम्हाला परंपरेनें प्राप्त झालेली आहेत, त्याचप्रमाणे वैभवाबरोबर नेहमीं येणाऱ्या जबाबदाऱ्याहि तुमच्या शिरावर परंपरेनें आल्या आहेत त्याचा भार सहन करण्याची तुमच्याठायी पात्रता आहे हें जगाच्या निदर्शनास आणून देणे हे तुमचें कर्तव्य आहे पूर्वजाप्रमाणें तुम्हींहि वैभवशाली व्हा. आपल्या पैशाचा योग्यरीतीनें खर्च करणे हा आपला मोठेपणा दाखविण्याचा एक मार्ग आहे. योग्यरीतीनें खर्च करणे म्हणजे तो स्वतःच्यासाठीं खर्च न करितां इतरासाठी व विशेषेकरून ज्याच्या कष्टावरच बहुतेक हल्लीं सारी पैदास्त आहे त्या आपल्या रयतेच्या कल्याणासाठीं खर्च करणें होय.

खुद्द पैसा म्हणजे कांहीं सुख नाहीं; तरीपण द्रव्य गोळा करणे एवढाच जीवितहेतु मानून राहणारे लोक पुष्कळ आहेत. आणि म्हणूनच जोंपर्यंत कोणत्याना कोणत्यातरी मार्गाने, न्यायाने असो वा अन्यायाने असो, पैसा मिळत असतो तोपर्यंत तो मिळविण्यासाठीं कित्येक लोक आमरण व्यर्थ प्रयत्न करीत असतात असले दरिद्री लोक–कारण पैसा मिळूनहि ते खरोखर दरिद्रीच म्हणावयाचे–मोठे आत्मवंचक असतात. ते वस्तूला सोडून वस्तूच्या छायेलाच भुलतात. निवळ एकटा पैसा म्हणजे कांहीं सुख नाहीं. आणि त्याच्यासाठी सारखी हाव धरणे यालाच निकृष्टविपत्ति म्हणतात. द्रव्याला जेव्हा समाधानाची जोड असते तेव्हाच ते सौख्यावह असते. म्हणून आपल्या स्वाभाविक गरजा भागून थोडासा अधिक उरणारा पैसा असला म्हणजे तेवढ्यातच समाधान माना, व लोकांकरितां राहा, पैशाकरिता राहूं नका.

ज्याप्रमाणे पैसा मिळविण्यात स्वत करिता न राहता लोकाकरिता राहावयाचे, त्याचप्रमाणे पैसा खर्च करण्याचे कामीहि आपण राहिले पाहिजे. अर्थात ज्याना मोठ्या हुद्याच्या अथवा अधिकाराच्या जागा असतात त्याना आपल्या योग्यतेच्या मानाने राहण्यासाठी थोडा अधिक खर्च करावा लागतो, हे कबूल आहे तो खर्च अगदी योग्य आणि न्याय्य असतो ज्या पैशाबद्दल ते जबाबदार असतात त्याच्या उपयोगाचा तो एक आवश्यक भाग आहे, असेंहि म्हणता येईल. पण तुम्ही आपल्या स्वत साठी अमुक एक खर्च करावयाचा एवढे अगोदर ठरवून टाकले, म्हणजे त्याच्या बाहेर तुमचा खर्च जाणार नाहीं. त्याच्यापेक्षा जो अधिक पैसा असेल तो तुमचा नसून तुम्ही ज्याचे अधिपति आहांत त्याचा आहे.

द्रव्यामुळें सुद्धा सकटे येतात. एक मोठें सकट म्हटलें म्हणजे गर्व हे होय. पैशामुळें लोकाना नेहमी गर्व होत असतो. द्रव्यामुळे जे एक सामर्थ्य प्राप्त होत असते त्यावाचून दुसरे गुण जरी खरोखर कांहीं अगी नसले, तरी आपण आपल्या बाधवापेक्षा अधिक चागल्या स्थितीत आहोंत असा त्याना अभिमान वाटत असतो. केव्हा केव्हा तर लोक श्रीमंतीमुळे आपल्या स्वत.च्या महत्त्वातच इतके फुगून जातात, इतका ताठा त्यांनां चढतो कीं, आपल्या अगचे दुर्गुण हेच त्याना सद्गुण वाटूं

लागतात, व आपल्या मूर्खपणाला ते शहाणपणा मानूं लागतात ! कायदा आणि धर्म त्याना तुच्छ वाटून त्याना ते गुंडाळून ठेवतात. **'आढ्योऽभिजनवानस्मि कोन्योऽस्ति सदृशो मया'** असा त्यानां अभिमान वाटत असतो. असल्या निकृष्ट अहमन्य लोकाना काय म्हणावें? असल्या ह्या केविलवाण्या दारिद्र्यस्थितींत राहण्याबद्दल व खऱ्या सपत्तीचा कसा तो लवलेशहि त्याच्याजवळ नसतो म्हणून ते सर्वांच्या तिरस्कारास पात्र होतात.

दुसरे सकट म्हटले म्हणजे खुशामत हे होय. या खुशामतीमुळें अर्थात् मनुष्याला गर्व आणि वृथा डौल येत असतो. आणि याची बाधा झाली म्हणजे मनुष्य स्वार्थपरायण बनून त्याचे सारे लक्ष्य आपल्या नीच वासनाच्या सतृप्तीकडेच लागून राहतें द्रव्यामुळे जर आपल्या स्वत विषयीच विचार आपल्या मनात अधिक येऊ लागले तरमग आपल्या जवळ जितका कमी पैसा असेल तितके चागले प्रख्यात रोमन तत्ववेत्ता एपिक्टेटस् ह्याविषयीं काय म्हणतो ते पहा. "मला जर कोणी असा मार्ग दाखवील कीं पैसा मिळविता येऊन विनयशीलता, विश्वासुपणा व औदार्य हे गुणहि अगी राखता येतील, तर मी पैसा मिळविल्यावाचून राहणार नाहीं पण तुम्हाला देण्यासाठीं मजजवळ पैसा व्हावा म्हणजे ज्या वाईट वस्तु त्या तुम्हाला मिळाव्यात या हेतूने जर माझ्या स्वत.चे चागले सद्गुण सोडून देण्यास तुम्हीं मला सागत असाल, तर ते किती अन्यायाचें व मूर्खपणाचे आहे याचा तुम्हींच विचार *करा." त्याचे असेहि म्हणणें आहे की "सपत्तीची गणना चागल्या वस्तूत होत नाहीं. अतिशय उधळपट्टी करणें ही वाईट गोष्टीपैकीं एक आहे बेताबातानें राहणे ही मात्र चागल्या गोष्टींपैकी एक आहे आणि बेताबाताने राहणे म्हणजेच काटकसर व अनेक सद्गुण याच्या प्राप्तीसाठीं प्रयत्न करणे होय. पण सपत्ति ही उधळपट्टीला निमंत्रण देत असते, व अल्प संतोषापासून आपणास अलिप्त ठेवित असते. सारांश, श्रीमंताला अल्प सतोषी होणें, व अल्प सतोषी माणसाला श्रीमंत होणे, या गोष्टी कठीण असतात. दु खाला कारण दारिद्र्य हें नसून वासना ह्याच असतात. तसेंच भयमुक्त होण्याचे सामर्थ्य सपत्तीत नसून पोक्त विचारात असतें. आणि हे विवेकसामर्थ्य जर तुम्ही सपादन कराल, तर मग

* Long's Translation of "Epictetus" p 388

संपत्तीची वासनाहि तुम्हांला होणार नाहीं किंवा दारिद्र्याबद्दल गाऱ्हाणें करण्यासहि जागा राहणार नाहीं."

असो. वरील विवेचनावरून तुमच्या एवढे लक्ष्यांत येईल कीं, श्रीमंताच्या पाठीमागें संकटाची किती लचाडें असतात व त्या मानानें गरीब मनुष्य किती स्वतंत्र असतो दोहोंमध्ये गरीब मनुष्यच अधिक सुखी असतो, हें कोणी नाकबूल करील असें मला वाटत नाहीं.

तथापि, द्रव्याचा जर सदुपयोग झाला तर ते सुखावह असते. अडचण काय ती सदुपयोग करण्यातच आहे. पण अगीं मोठेपणा असला म्हणजे अडचणीतून पार पडता येते व श्रीमंत असून जो थोर व सद्वर्तनी असतो त्याची योग्यता गरीब स्थितीतल्या थोर व सद्वर्तनी माणसापेक्षा खरोखरच अधिक असते, यात संदेह नाहीं.

तुमच्या जवळ पैसा आहे. तुम्ही दयाळु व उदार व्हा तुमच्या सभोंवतीं चोहोंकडे ज्या विपत्ती तुम्हाला दृष्टीस पडतात त्या घालविण्याचा होईल तितका तुम्ही प्रयत्न करा गरजवताना, सत्पात्री, मदत करा. आजारी माणसांना सुख द्या व गरीबाना त्याच्या विपत्तींतून सोडवा अशा आचरणानें जर तुम्ही राहिलात तर खरोखरच तुम्ही श्रीमंत व्हाल. हेच श्रीमंतीचे खरे वैभव आणि भूषण आहे

प्रारंभीं ज्या एका विदुषी स्त्रीच्या ग्रंथातून मीं अवतरण दिलेलें आहे तिच्या लेखातून पुढील आणखी एक उपदेशपर उतारा मला येथे घ्यावासा वाटतो. "†लाछनास्पद कजूसपणा, तसाच उदार खर्चीकपणा, ह्याहि गोष्टी जगात आहेत जो मनुष्य आपल्या गड्यामाणसाना मजुरी देण्यात अथवा पोटाला पोटभर घालण्यांत कद्रुपणा दाखवितो, जेथे आपल्या योग्यतेच्या व ऐपतीच्या मानाने लोकाच्या व कुटुंबाच्या सतोषासाठी चागला सभाविता-सारखा पोषाख करण्याची गरज असते तेथे जो गबाळ्यासारखा गलिच्छ पोषाख करतो, जेथें खर्च करण्याची ऐपत असूनहि पैशाला गाठ बाधण्याचाच नेहमी प्रयत्न करून स्वत चे व कुटुंबाचे हाल करतो, तो मनुष्य अत्यंत दोषास पात्र असतो पैसा हा साठविण्याकरता नसून त्याचा

† Long's "Epictetus" p p 409, 411.

उपयोग करण्यासाठी तो असतो. त्याचा सन्मार्गानें उपयोग करणें हा जीवितहेतु असावा स्वत.साठी व इतरांसाठीं जितका कांहीं न्यायानें खर्च करावा लागेल तितकाच करीत असावे. आणि कित्येकदां, जेव्हां पैशाचा सदुपयोग होत आहे हे आपणास कळून येते, तेव्हा आपल्या पश्चात् दुसऱ्यांनां तो उधळून टाकण्याची संधी देण्यापेक्षा आपल्या आयुष्यात तो आपला आपणच खर्च करणे हे अधिक श्रेयस्कर होय एकपक्षी निव्वळ हालअपेष्टेत अपकर्ष पावणारी दूरदृष्टिहि नको व अन्यपक्षीं सदोष दैन्यावस्था आणणारी काटकसरहि नको. दोन्ही गोष्टींविषयी आपण सावध राहावें."

शेवटी सादीच्या वाणीनेच हें विवरण मी पुरें करतों.—

"तुला तुझ्या ऐहिक संपत्तीचा खरा उपभोग घ्यावयाची जर इच्छा असेल, तर परमेश्वराने जसे तुझे कल्याण केले आहे तसेच तूहि लोकांचे कल्याण कर." "गुलिस्तान ८–२

# आरोग्य.

" *Orandum est ut sit mens sana in corpore Sano* "
( " Pray for a healthy body, and a healthy mind "
Juvenal " Sat, " X 356

**शरीरमाद्यं खलु धर्म साधनम्**

—कालिदास

इंग्रेजीतील वरील प्रसिद्ध उद्गार रोमन कवि ज्युव्हेनल याचे असून ते त्यानी लिहून ठेवल्याला आज सुमारे अठरा शतकाचा कालावधि लोटला आहे. त्याचा अर्थ हाच कीं, या मर्त्यलोकीं मनुष्याला स्पृहणीय वाटणारी जी काहीं अप्रतिम सुखे आहेत त्यापैकीच आरोग्य हे एक होय. आणि खरोखर पाहिले असतां आरोग्याची बाब म्हणजे अत्यंत महत्त्वाची होय. कारण, शारीरिक व्याधी व दौर्बल्य यांच्यामुळें आपल्या प्रयत्नांना जितका कांहीं अडथळा येत असतो तितका अन्य कोणत्याहि गोष्टीमुळे येत नाहीं, व आपला बौद्धिक उत्साहच केवळ नव्हे तर धैर्य, शांति, समता, व स्वभावमाधुर्य ह्यासारखे अनेक नैतिक सद्गुण देखील शारीरिक आरोग्यावरच फार करून अवलंबून असतात. ईश्वराने मनुष्याला दिलेल्या अप्रतिम देणग्यापैकींच आरोग्य ही एक होय आणि असे असूनहि, ज्याना ह्या अप्रतिम देणगीची खरी योग्यता लक्ष्यात येऊन त्याच्याविषयीं कौतुक वाटत आहे, शारीरिक आरोग्य आणि सामर्थ्य ह्या अमोल देणगीवरच कितीतरी पुष्कळ गोष्टी अवलंबून असतात ह्याचा प्रत्यय त्याना येतो, अशी माणसें आपणामध्ये व विशेषतः तरुणमंडळींत तर किती थोडी सापडतात ! प्रख्यात उपदेशक कार्लाइल ह्यानीं सन १८६६ सालीं एडिंबरो युनिव्हर्सिटीच्या विद्यार्थ्यांना ह्या विषयावर जो उपदेश केला होता तो मोठा मनन करण्याजोगा आहे. तो मी त्याच्याच शब्दानीं येथें देतों —

" सभ्य गृहस्थहो, अखेरीस मला तुम्हांला एक उपदेश कर ाचा आहे. तो अगदीं नम्र जरी असला तरी व्यावहारिकदृष्ट्या तो फारच महत्त्वाचा

आहे. तुम्ही आपल्या उत्कंठेच्या आणि उत्साहाच्या भरात आरोग्याची अवहेलना होऊ देणार नाहीं, एवढी गोष्ट पक्की लक्ष्यात ठेवा. कारण उत्कंठा आणि उत्साह हे गुणच असे आहेत कीं, त्याच्या बाबतीत नेमस्त-पणाने रहा असा कितीहि जरी तुम्हाला उपदेश केला तरी त्याच्या भराच्या उंच गेल्यावाचून कधींहि राहणार नाहींत, हे भविष्य आज मला दिसत आहे. श्रेष्ठप्रतीच्या उद्दिष्टकार्यांत लौकिक मिळविण्याच्या सद्धेतूने जीवाची विशेष पर्वाहि न बाळगण्याइतकी उत्कंठित अशी काहीं तरुणमंडळी तुमच्यात आहेत, याबद्दल मला मुळीच शंका नाहीं. पण आरोग्याची गोष्ट अशी आहे कीं, तिच्याकडे सारखे लक्ष्य असलेंच पाहिजे, व याचा विचार हल्ली करीत आहात त्यापेक्षा कितीतरी पटीने अधिक व पूर्णपणें तुम्हाला अद्याप करावयाचा आहे. मला जर हा विचार वेळीच सुचला असता तर माझे आज केवढे हित झाले असते. आरोग्य हें आपल्या यच्चयावत् ऐहिक गोष्टींत अत्यंत श्रेष्ठप्रतीचे आहे असें मानणे हें तुमचे कर्तव्य आहे पूर्ण आरोग्याची बरोबरी करणारा असा साऱ्या दुनियेत एकहि पराक्रम नाहीं. सोन्याच्या लगडीची रास व कोट्यवधि रुपये हीं त्याच्यापुढें अगदी तुच्छ आहेत! आरोग्यापुढे त्यांची काय कथा! एका फ्रेंच खजिनदाराने एकदा विचारिले होते, 'कायहो, निद्रा ही वस्तु बाजारात विकत मिळणारी नाहीं काय?' पावड्याने जरी पैसा ओतलात तरी निद्रा ही वस्तु बाजारात विकत मिळत नाहीं.

"एक विलक्षण गोष्ट आहे ती मागे एकदा बरेच दिवसांपूर्वीं मीं सांगितली होती व ती वारंवार माझ्या डोक्यात घोळत आहे ट्युटॉनिक भाषेंत Holy म्हणजे पवित्र या शब्दाला फार प्राचीन शब्द *heilig*, असा आहे. त्याचाहि अर्थ आरोग्य हाच होतो. पवित्रता म्हणजे आरोग्य, याहून अधिक चांगली अशी पवित्र शब्दाची व्याख्या अन्यत्र कोठें तुम्हाला आढळेल असे निदान मला वाटत नाहीं. पूर्ण आरोग्य-सौख्य, *Mens sana in corpore sano* सुदृढ शरीर व सुदृढ मन. शरीर सुदृढ तर मन सुदृढ. सर्वांग उज्वलकांति आणि समतोलपणा हे गुण ज्याच्याठायीं वास करीत असतात त्याची बुद्धि स्फटिकाप्रमाणें स्वच्छ, भूमितीच्या रेखाकृतिप्रमाणें सरळ, पदार्थमात्राचें व सत्काराचें ग्रहण कर-

ण्यास समर्थ इतकी स्पष्ट व तेजस्वी असते. आणि चागल्या बिल्लोरी आरशांत यच्चयावत् वस्तूचें प्रतिरूप जसें अगदीं तंतोतंत प्रमाणानें उमटतें तद्वत त्याच्या बुद्धीला प्रत्येक वस्तु अगदीं स्पष्टपणे दिसत असते.

"काचा वांकड्यातिकड्या असून समपातळींत नसल्या म्हणजे त्यांत वस्तूचे प्रतिबिंब विद्रुप दिसते ज्या आरशाचें भिंग मध्येच खोलगट व कडेने जाड अथवा मध्ये जाड व कडेनें पातळ असते त्यात चेहरे कसे दिसतात याचा अनुभव बहुतेकाना आहेच हीच गोष्ट बुद्धीरूपी दर्पणालाहि लागू आहे अंधारात एखादी वस्तु शोधून काढावयाची झाली म्हणजे मनुष्याला जसें चाचपून व पुढे काहीं आड आहे कीं काय हे पाहण्यासाठी हात हालवून पहावे लागते, तद्वत् सामान्यबुद्धीच्या माणसाला अविरत अन्वेषण व हस्तव्यापार केल्यावाचून पदार्थांचे सत्यस्वरूपच कळत नाहीं. शिवाय अशा प्रयत्नानें घोटाळा उडून प्रत्येक वस्तूला अगदीं कुरूपता येण्याइतकी त्याला ती छिन्नविच्छिन्न करावी लागते अशी गोष्ट आरोग्यपूर्ण माणसाच्या बुद्धीची नसते. उलट ती सुविचारकारक, निर्मल आणि स्वतंत्र असून सभोंतालच्या पदार्थांचें यथातथ्य निरीक्षण करण्याइतकी, सत्यस्वरूप ओळखण्याइतकी, तीव्र असते. असली स्थिति प्राप्त होणें आपणाला कधीं मुळींच शक्य नाहीं. वस्तुत आपल्या पाठीमागे जे व्यवसाय लागलेले आहेत तेच त्या बुद्धीला विघातक आहेत चिरकाल टिकणारें असें एखादें निवळ बौद्धिक काम जर तुम्हीं करूं म्हटले तर तुमच्यानें ते होणारच नाहीं उदाहरणार्थ, समजा कीं, तुम्हीं एखादा ग्रंथ लिहावयाचें मनांत आणलेत, तर तेणेकरून खात्रीने तुम्हीं आजारी पडल्यावाचून ते तुमच्याने झेपावयाचेंच नाहीं ( निदान मला तरी ते कधीच साधलें नसते ) आणि काहीं झाले तरी, असले काम करणारा मनुष्य आजारी पडलाच पाहिजे. धंदाच जर तो असला तर अगीकृत कार्य केल्यावाचून सोयच नसते व ते जीवाचीहि पर्वा न करिता करावे लागते. पण सदासर्वकाल लक्ष्यात ठेवावयाचें ते एवढेच कीं, ते होईल तितके लवकर आटोपून फिरून प्रकृति पूर्ववत् सुधारण्याकडे लागावे, व आरोग्य हाच खरा समतोलपणा व वस्तूंचें केंद्र एवढे महत्व त्याला द्यावें. Heilig शब्दाकडे तुमची नेहमी दृष्टी असू द्या. त्याचे पावित्र्य व आरोग्य असे दोन्ही अर्थ होतात."

हा उतारा, हें अवतरण, जरा लांबलचक झालें खरें, पण याहून अधिक सुंदर उतारा मला देताच आला नसता. कार्लाईलच्या ह्या वरील उद्गारांचे जितके कळकळीने तुम्ही मनन कराल तितके थोडेंच होईल. बौद्धिक-व्यासंग, उदाहरणार्थ ग्रंथलेखन, ह्याविषयीं त्याने जें काहीं सांगितले आहे त्यांत आणखी एका गोष्टीची विशेष सावधगिरी तुम्हीं ठेवावी. ती अशी. तुम्ही आपल्या डोळ्याची फार काळजी घ्या तुम्ही आपल्या मेंदूला वाजवीपेक्षां फाजील शीण द्याल याबद्दल मला फारशी भीति वाटत नाहीं; पण विशेषत रात्री वाचनाचें काम करून तुम्ही आपल्या डोळ्याना जास्त ताण देण्याचा मात्र संभव आहे अगदी मंद उजेडात असो किंवा अगदी तेजस्वी प्रकाशांत असो, रात्रीचे वाचन म्हटले म्हणजे तेणेंकरून हिंदुस्थानातील विद्यार्थ्यांच्या नेत्रावर फार अपायकारक परिणाम झाल्या-वांचून राहत नाहीं, असा अनुभव आलेला आहे हिंदुस्थानातील खरखरीत उन्हानेंच अगोदर दृष्टि मंद होण्याकडे नेत्राची पूर्व प्रवृत्ति असण्याचा संभव असतो, व त्यात दृष्टीच्याठायी मंदत्व जर मूळचेच असलें तरमग वाईट उजेडात वाचण्याने खात्रीने अधिकच नेत्र बिघडतात या बाबतीत मुंबई येथे काही दिवसपूर्वीं चौकशी झाली होती; तिजवरून सरकारी विश्वविद्यालयातील तरुणमंडळीत दूरचें न दिसणाराचीच संख्या फार जास्त प्रमाणावर दिसून आली. ह्याचें मुख्यत कारण असें देण्यात आले होते की, विद्यार्थी रात्रीं अधुक उजेडात अभ्यास करीत असतात व तेणेकरून त्याना आपली पुस्तके फार डोळ्याजवळ धरावी लागतात साधल्यास उजेड भरपूर मिळेल अशी व्यवस्था नेहमी असावी अतिशय उजेडहि कामाचा नाहीं. तो सुद्धा अपायकारक असतो अलीकडे कित्येक विद्यार्थी केरोसिनचे फार तेजस्वी दिवे अगदीं आपल्या समोर ठेवून आपले डोळे बिघडवून घेत आहेत. दिव्याची उत्कृष्ट जागा म्हटली म्हणजे विद्यार्थ्यांच्या डाव्या बाजूने थोड्या वरल्या अंगाला दिवा ठेवणें ही होय."

आपल्या ह्या विश्वविद्यालयांतहि कित्येक राजकुमाराचे डोळे अधुपणामुळें बिघडलेले होते हे तुम्हाला ठाऊक आहेच. म्हणून मी तुम्हाला असा उपदेश करतों कीं, रात्रीं वाचनाचें काम न करिता होता होईल तों दिवसा

1 From Murdoch's "Indian Student's Manual," Published at Madras, 1887.

वाचन करावे, आणि रात्रीं वाचलेंच पाहिजे असे जें कांहीं असेल ते पूर्ण पण सौम्य उजेडाच्या साहाय्यानेच वाचावे

चागली प्रकृति ठेवणे हे जसे कर्तव्य आहे तद्वतच चांगली प्रकृति असणें हा एक आनद आहे. कर्तव्य म्हणण्याचे कारण असें कीं, आरोग्य हे पुष्कळ अशीं आपल्या स्वत च्या इच्छेवर व आवडी निवडीवर अवलंबून असते आणि असें असूनहि ते फार आनदावह आहे आपण मात्र नेहमी आधळ्यासारखे वागून आपण होऊनच त्या आनदाला झिडकारीत असतों. तुम्हीच पहा, आपण आपल्या निष्काळजीपणामुळें व अविचारामुळे कसे वारंवार आजारी पडत असतों! अमुक एखादा पदार्थ खाल्ला असता आपणास अपाय होईल हे ठाऊक असताहि केवळ जिभेला गोड लागतो म्हणून अधाशीपणाने खाऊन आपल्या वासना सतृप्त करून घेण्यात आपण किती मूर्खपणा दाखवीत असतों!

हीच गोष्ट देहाच्या इतर सर्व वासनासबधी होय. त्या वाईट असतात हे जरी आपणाला कळत असते तरी आपण त्या मनसोक्त सतृप्त करीत असतों. वासनातृप्ति ही आपली प्रकृति बिघडविण्यास कारण होते व तेणेंकरून आपल्या ओजाचा व सामर्थ्याचा सचय बराच कमी होतो अशा तऱ्हेने आपलें जन्मत चें आरोग्य क्षीण करून आपण आपलें आयुष्य कमी करून घेतों व लाबचें मरण जवळ बोलावतों—उद्याचे मरण आजच आणतों. हा विचार फार महत्त्वाचा आहे. ह्या गोष्टीकडे सर्वांत अधिक लक्ष्य देणें जरूर आहे. खरोखर ती अत्यंत महत्त्वाची बाब आहे. व तिच्या मानाने वासनेच्या सतृप्तीपासून होणारें क्षणिक सुख म्हणजे किती य·कश्चित असते याचा विचार केला असतां, त्या क्षणिक सुखासाठी आरोग्याच्या अमोल देणगीची आपण वारंवार आहुति देत असतों हें आश्चर्य नव्हे काय ?

मोठ्याच्या म्हणा अथवा लहानांच्या म्हणा सर्वच अवस्थांविषयी कांहीं मी आज बोलत नाहीं कित्येक जन्मत च नाजुक आणि अशक्त असतात, व कित्येकांचे दैवयोगाने अथवा जेथे त्यांचा काहीं इलाजच चालत नाहीं अशा परिस्थितीमुळे आरोग्य नष्ट झालेले असते असल्या लोकाचे जीवित, कितीहि दुर्बळ असले, तरी ते अत्यत उपयुक्त व आनदमय असतें.

स्वसामर्थ्य ज्याला म्हणतात–म्हणजे अशक्त माणसाच्या अगीं जन्मत सिद्ध असणारें नैतिकसामर्थ्य व परमेश्वरीइच्छेला अनुसरून वागण्याची क्षमायुक्त सहिष्णुता–तेंहि त्याच्याठायी असतेच.

पण आज मी जे काहीं सागत आहे ते तुमच्या व बहुतेक तरुण मंडळीच्याठायी असणारे आरोग्यसौख्य व ते काळजीपूर्वक राखण्याचा धर्म व शहाणपणा ह्याविषयीच होय आयुष्यात प्राप्त होणाऱ्या मोठ्या सुसधीपैकींच ही एक होय. तिच्या बऱ्यावाईट उपयोगाबद्दल तुम्ही जबाबदार आहात. ह्या जबाबदारीची तुम्हांला जाणीव आहे काय ? ती योग्यरीतीनें बजावण्याची तुम्ही दक्षता ठेवीत आहा काय ?

आरोग्याच्या बाबतीत दक्षता अथवा सावधगिरी ठेवावयाची ती दोन मुख्य गोष्टींत असते एक मिताहार व दुसरी पवित्रता

युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु ।
युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥

या भगवदुक्तीत जो अप्रतिम आदेश आहे तोच वरील दोन शब्दात ऐ अनियमितपणानें म्हणजे अयुक्त आहार विहार करण्यात केवढी चूक होते–शारीरिक लालसांचे कोड अतिशयत्वानें पुरविल्यामुळे किती दुःख व अपेष्टा भोगाव्या लागतात हे तुम्हाला ठाऊकच आहे. मनसोक्त मादक द्रव्यांचें सेवन व मदिरापान करण्याचे परिणाम काय होतात हेंहि तुम्हांला माहीत आहे मादकद्रव्ये आणि मदिरा हीं सर्व धर्मात व व्यवहारात सारखींच सर्वथैव त्याज्य मानलेलीं आहेत. मनुष्याचे नुसते आयुष्य कमी करण्याकडेच त्याची प्रवृत्ति असते एवढेच केवळ नव्हे, तर ती त्याचें जीवित देखील आमरण निकृष्ट व तिरस्करणीय करून सोडतात.

खुद्द काठेवाडातच अफूचे किती विघातक दुष्परिणाम होत आहेत हें आपण सर्वजण पाहतच आहोंत प्रत्यहीं पैशापायीं पैसा खर्च करून व जीवाचीहि हानि करून घेऊन ह्या द्रव्याचें सेवन करण्याच्या नादी लागलेल्या लोकसख्येचा विचार मनात आला असता अगावर नुसते शहारे उभे राहतात मुबईच्या एका वर्तमानपत्रांत ह्या विषयासंबधी एक चर्चात्मक लेख प्रसिद्ध झाला होता तो मी तुम्हाला येथे वाचून दाखवितों. त्यांत ह्या दुष्परिणामाचे काहीं अतिशयोक्तीचें वर्णन आहे असें मला

वाटत नाहीं. "मुबईइलाख्यात अफू खाण्याचा विशेष प्रघात म्हटला म्हणजे गुजराथेत व काठेवाडात होय गुजराथेत तर बोरी जातीचे शेतकरी खेरीज करून हा प्रघात सार्वत्रिक आहे असें आम्हाला वाटते" "कुणवी, धिसाडी, रजपुत, कोळी हे सारे कमी अधिक प्रमाणाने अफूचे सेवन करणारे आहेत" "गुजराथेत सर्वच जरी नाहीं तरी बहुतेक खेड्यापाड्यातून हिदुलोकात अफू खाणाऱ्याची निरुत्साही राहणी व तारवटलेले डोळे हे पाहावयास सापडतात." "ह्या लोकाना अन्नाची फारच थोडी गरज लागते. त्याची भूक मेलेली असते अफू मिळण्यापुरते पैसे मिळविण्यासाठी जेवढे काम करावे लागेल तेवढेच ते करतील तुमची शेते पडित किंवा अर्धीमुर्धीच नागरलेलीं का आहेत असें तुम्ही त्याना विचारा आणि ते 'आमच्यानें मोलमजुरी फार होत नाही' असे उत्तर देतील एक एक पाय ओढीत रेगाळत चालणे, कधी मुखावाटे शब्द निघावयाचा नाही, आणि सदा गुगलेले, ही तर त्याची लक्षणे. एकदा एकानें एका खेड्यातील मनुष्याला विचारिले 'कायरे तुमची स्थिति बरी आहेना? खाऊन पिऊन सुखी आहात ना?' त्यावर त्याने उत्तर दिले 'अहो सुख कसचे, अफू किती महाग आहे ती पहा!' तरतरीत व बाणेदार मराठ्याना आपला सचार ह्या भागातून करता आला याचे मोठेसें आश्चर्य नाहीं ह्या प्रातातील अन्यां अधिक बेबदशाहीला कारण अफूचे व्यसन व त्याचा चोरटा व्यापार हेच होय. अफूच्या व्यसनपिशाचिकेपासून काहीसे अलिप्त राहण्याची जेव्हा शेतकऱ्याना व्यवस्था करता आली, तेव्हा कोठे आता ते जरा सुखी आहेत. तथापि अजून सुद्धा असें एकहि खेडे सापडणार नाही कीं जेथे अफूच्या व्यसनाला आधीन झालेले लोक नाहींत, व व्यसनी लोकाची सख्या इतकी आहे कीं त्याच्यात अफूला न शिवणारे लोक ह्मणजे अपवादच ह्मणावयाचे. लोक ह्या घातुक सवयीचे दुष्परिणाम कबूल करतात, पण नित्य दारु पिणाराचे जसें दारूवाचून चालत नाही तसे ह्याचेहि अफू घेतल्यावाचून चालत नाहीं" "फार काय पण त्याचे सारे जीवित ह्या अफूवर अवलंबून असतें. उजाडल्यापासून तों रात्र पडे तोंपर्यंत अफूचा अमल त्याच्यावर असतो. अफू जर मिळाली नाही तर आता प्राण जातो असें त्याना होते. त्याचा जीवनव्यापार अफू मिळाल्या घटकाच चालतो. विष पोटात घातल्यावाचून त्याना जिवतच राहता

येत नाहीं. अफूचे मक्ते सरकाराने आपल्या ताब्यात घेतल्यामुळे अफूल अतोनात कृत्रिम किमत चढली आहे. तरी पण लोकाचे व्यसन कमं होण्याकडे त्याचा काहीच उपयोग होत नाही." "दारूच्या पायी जश शरीराची माती होते तशी अफूने होत नाही अफूचा मनावर, बुद्धीवर आणि आत्म्यावर परिणाम होऊन त्यामुळे शरीर निरर्थक होते"[१]

काटेवाडात मोलमजुरीवर राहणाऱ्या बऱ्याच मोठ्या लोकसख्येचे-विशेषत रजपूत व काठी लोकाचे हे वरील वर्णन ह्मणजे अगदी खरे चित्र आहे असें मला वाटते. तथापि सुखवस्तु उच्च वर्गातील लोकात पूर्वीइतक अफूचा प्रघात आता नाही, अशी माझी समजूत आहे. असें जरी आहे तरी उच्च वर्णात व सुशिक्षितवर्गात अफू आणि दारु ठाऊक नाह असे मात्र नाही. हे दोन्ही पदार्थ नित्य अधिक प्रमाणाने घेत गेले असत ते प्राणनाशक विषाची बरोबरी करतात व सेवन करणाराचे आरोग्य आणि ओज सारे नष्ट करीत असतात. असे सागतात, व ते कदाचित खरेहि असेल, कीं, जरी अलीकडे हिंदुस्थानात लोकाची अफू खाण्याची सवय काही अंशीं कमी झालेली आहे, तरी अन्यपक्षी लोकात तितकीच आरोग्य विघातक दारु पिण्याची सवय अधिक वाढत्या प्रमाणावर आहे. ह्या बाबतीत खात्रीपूर्वक असे काही सागता येत नाही. दारूचे दुष्परिणाम घडलेले उदाहरणे आपण सर्वांनी पाहिलेली आहेतच. पण हे दुष्कर्म अलीकडचे आ असें मात्र म्हणता येत नाही. तुम्ही आपल्या स्वत बद्दल काळजी घ्या म्हणजे झाले तुम्हीं खरोखरच फार दक्षता ठेविली पाहिजे, व तुमच्यापैकं अनेकजण तर पुढें मानाच्या व अधिकाराच्या पदवीला चढतील. तेव्हा तुम्हाला माझी अशी विनंति आहे कीं, तुमच्या स्वत च्या बाबतींतच केवळ नव्हे तर आपल्या सभोतालच्या गच्चयावत् लोकाच्या बाबतीतसुद्धा जर जर कोठे अनियमितपणा दृष्टीस पडला तर त्यावर तुम्हीं होता होईल तो प्रयत्न करून दाब ठेवावा. कोणत्याहि प्रकारची मदिरा सेवन करावयाची नाही असा निश्चय करा तुम्हाला तिची सवय नसल्यामुळे ती न घेण्यानेच तुमची प्रकृति अधिक चागली राहील. "नेमस्तपणाने शुद्ध आसवाचा उपयोग केल्यास अपायकारक होत नाही हे जरी कबूल केलें—" पूर्वीप्रमाणेच

१ सन १८८८, १० डिसेबरचा टाइम्स ऑफ् इडियाचा अक पहा.

हे मी मद्रासच्या पुस्तकातून अवतरण घेत आहे—"तरी हिंदुस्थानातील तरुण मंडळींनी आपल्या पूर्वजानी घालून दिलेला कित्ता गिरवून जर ते नुसत्या पाण्यावरच सतुष्ट राहतील तर तो मार्ग अधिक शहाणपणाचा व निर्भय होईल. असे पुष्कळ आहेत की, ज्यानी प्रथमत अगदी बेताबातानेच पिण्याचा निश्चय केला होता तेच पुढे अनियमितपणाला बळी पडले आहेत पण जो दारूला मुळीच शिवणार नाहीं त्याचे बाबतीत असला प्रकार कधीच होण्याचे कारण नाहीं. सवय म्हणून कधी लावून घेऊ नका, म्हणजे त्याची तुह्माला गरजच भासणार नाहीं"

आसव आणि मदिरा याच्यासबधी हे अगदी खरे आहे अफूसबधीहि ते तितकेच खरे आहे. सवयच कधी जर लागू दिली नाही तर गरज लागेल कशाला ?

अनियमितपणाच्या ह्याच प्रकारावर मीं फार विस्ताराने ऊहापोह केला, याचे कारण असें कीं, आरोग्याची खराबी करणारे सर्वसाधारण मार्ग म्हटले म्हणजे हीं मादकउत्तेजक द्रव्येच होत. शरीर आणि मन या दोहोचाहि समतोलपणा घालवून बिघाड करणारी सर्व साधारण कारणे अशी हींच होत आणि अतिरेकाच्या व दौर्बल्याच्या शृखळानी शरीर आणि मन अशा तऱ्हेने लोकानी अगदी जखडून टाकावे हा वेडेपणा व जाणूनबुजून बुद्धिभ्रंश नव्हे काय ? दारुबाज मनुष्य—मग तो दारु पिणारा असो किंवा अफू खाणारा असो–जिवत असून नसून सारखाच नाहीं काय ? कर्तव्याला, जगाला व प्रत्येक उपयुक्त कामाला तो मेलेलाच असतो आणि शुद्धीवर असून जो मनुष्य आपण होऊन दारूचा अथवा अफूचा अमल चढवतो तो भयकर पातक करीत नाही काय ? खखुषीने आत्महत्येचे पातक त्याच्या माथी लागत नाहीं काय ?

माझ्या मित्रानों ! ह्या देशात दारूचे म्हणा अथवा अफूचे म्हणा जे दुष्परिणाम होत आहेत, अतिरेकामुळे व अमली पदार्थांच्या सेवनामुळे शरीराची, पैशाची आणि काळाची जी खराबी आजवर झाली आहे व होत आहे, ह्याचा विचार आपण जेव्हा करतों, तेव्हा आपल्याला असें वाटल्यावाचून राहत नाहीं, कीं जर ह्या प्रातात प्रत्येकाने वैद्याच्या सल्ल्या-वाचून अफूचा एक कण किंवा दारूचा एक थेबसुद्धा घ्यावयाचा नाहीं

अशी जर शपथ वाहिली तर केवढें हित होईल! सर्वांचेंच किती कल्याण होईल! व इंग्लंडात ज्याप्रमाणें 'टेम्परन्स सोसाएटीज्' निघाल्या आहेत, व जी अहमदाबादेसहि नुकतीच स्थापन झाली आहे त्याप्रमाणें काठेवाडात व अन्यत्र त्या निघाल्या तर तेणेंकरून लोकाचे कल्याण व राष्ट्राचें हित होणार नाहीं काय? असली सोसाएटी जर राजवाड्यात स्थापन करिता आली व खुद्द राजवाड्यातले अधिपतिच जर तिचे सभासद व आश्रयदाते झाले तर तिचे केवढें दाडगे वजन पडेल! ह्या माझ्या सूचनेचा तुम्हीं विचार कराल काय? ती अमलात आणण्यास काहीं प्रत्यवाय आहेत असें मला तर वाटत नाहीं.

पण पिण्याच्या बाबतींत जसा नेमस्तपणा लागतो तसा तो आहारातहि लागतो. चागली प्रकृति राहावी अशी जर आपली इच्छा असेल तर त्याहि गोष्टीचा आपण अवश्य विचार केला पाहिजे बेंजामिन् फ्रँकलीन् यानी आखून दिलेल्या आचारनियमाचा उल्लेख मीं मागे केलेलाच आहे. त्याचे ह्या बाबतीत म्हणणे असे आहे कीं, "जडत्व येईल इतके खाऊ नये, तसेंच मद चढेल इतके पिऊ नये" मध्यमप्रतीचे, साधें, व शुद्ध अशा अन्नानेच शरीराचे पोषण उत्तम होऊन प्रकृति अगदी छान राहते. नेमस्तपणानेंहि पोषण चांगलें होते.

आपले स्नेही श्रीयुत माणेकलाल ह्यानीं मोठ्या प्रेमानें मला ह्या विषयावर एक श्लोक सागितला होता त्याचा आशय एवढाच की, "मनुष्याने मोजके अन्न सेवन करावे. तेणेकरून भूक चागली लागते. अन्नाचे पचन सहज व्हावे असेच त्याचे माप शहाण्या लोकानी घालून दिलेले आहे. आणि त्यालाच मोजके अन्न म्हणतात."

हिंदुलोकात अशी म्हण आहे कीं जेवढी भूक असेल त्याच्या तीन चतुर्थांश जर आपण खाल्लें तर ते फार पथ्यकर अथवा हितावह होते. ह्याच म्हणींत 'गुलिस्तान'मधली एक मुसलमानी आख्यायिकेची मी भर घालतों. आर्देशीर बाबूकन हा पर्शियातील अत्यत विद्वान् बादशहापैकींच एक होऊन गेला. त्याच्याविषयींची ती आख्याइका आहे. दिवसातून रोज किती खावे असा प्रश्न एकदा त्याने एका अरेबिअन वैद्याला विचारिला. त्यावर त्याला उत्तर मिळालें कीं, शभर 'डायरेम' भार अन्न खाल्ले असता

१, गुलिस्तान, भाग ३ ते ६

पुरे होईल. बादशहाने विचारिले "अहो एवढ्याशा अन्नाने आमचे पोषण तरी कसें व्हावें?" त्यावर वैद्य ह्मणाला "जीविताला आधार होण्यास तेवढें अन्न पुरे. त्याहून तुम्हीं कितीहि अधिक खाल्ले तर तें तुम्हाला सोसले पाहिजेना! जीवंत राहून परमेश्वराची स्तुति गाता यावी एवढ्यासाठीं आम्ही खात असतो, अशी आमची समजूत आहे. पण तुमची समजूत अशी आहे की, खाण्यासाठीच आपला जन्म आहे."

प्रसिद्ध अकबर बादशहाविषयींहि असाच उल्लेख आढळतो. त्याच्या ठायीं शारीरिक व मानसिक उत्साह अतोनात होता. "विचारी व मिताहारी" ह्मणून तर त्याची फार ख्याती होती. तो चार दिवसातून एक दिवस मासान्न वर्ज करीत असे

प्रकृति चागली ठेवण्याला हितावह अशी दुसरी गोष्ट ह्मटली ह्मणजे शारीरिक व्यायाम ही होय हिंदुस्थानात तर ती विशेषेकरून हितावह आहे, असें माझे मत आहे कारण, हिंदुस्थानच्या हवेत असा काहींएक गुण आहे की, तेणेकरून लोकाना सुस्ती आल्यावाचून राहत नाही. हिंदुस्थानात राहणाऱ्या प्रत्येक इसमाला भर बारा वाजता जेव्हा सारे वातावरण अग्नीच्या ज्वालानी थरथर हादरत असल्याचा भास होतो तेव्हाच्या रखरखीत उन्हाचे परिणाम काय होतात हे ठाऊक आहेच. त्या माध्यान्हीच्या उन्हाच्या वेळी मनाचा कल, जरा आपण आळसावर नेऊन त्याच्याप्रमाणेच वागू लागलो, तर असा काही चमत्कारिक होत असतो की, उत्साह ह्मणून कसा तो वाटत नाहीं तरतरीतपणा सर्वांशी नाहीसा होतो व अगदी नरमल्यासारखे होऊन औदासीन्याची घोरपड येऊन अगावर पडते; वाटेल तो विचार मनात येऊन त्याचेच ध्यान करीत, एकाच गोष्टीचा नाद घेऊन पुनः पुन त्याचेच आलोचन करीत व फिरून इकडली तिकडली आठवण करीत मनुष्य वेळ काढीत असतो. अशा तऱ्हेची प्रवृत्ति हिंदुस्थानातील रहिवाशाची नेहमी दृष्टीस पडते.

पण मला वाटते, अशी प्रवृत्ति ज्याना काबाडकष्ट व शारीरिक परिश्रम केल्यावाचून सोयच नसते अशाच्यापेक्षा ज्याना कधी दारचा उमरठा ओलाडण्याचें कारण पडत नाही अशाच्याच ठायी जास्त दिसून येते. मजुरदार लोकात बहुतेक शरीरानें चपळ, निरोगी आणि धट्टेकट्टे असे सापडतात. तेव्हा जर उद्योगशीलतेनें व व्यायामाने ग्लानीकडे होणारी

प्रवृत्ति आपण आवरून धरण्याचे कामी दक्षता ठेविली, तर हिंदुस्थानातील उष्णता बाधक आहे असें काही म्हणता येणार नाहीं. इग्लंडातील विद्यार्थ्यांना उद्देशून लॉर्ड डर्बीनीं जी टीका केलेली आहे ती हिदुस्थानातील विद्यार्थ्यांनाहि तितकीच लागू आहे ती अशी की "ज्याना उघड्या हवेत व्यायाम घेण्याला वेळ सापडत नाही त्याना आजारी पडण्याला वेळ काढावाच लागेल !"

ज्यात दक्षता ठेवावयाची अशी दुसरी गोष्ट ह्मणजे पवित्रता ही होय. पवित्रतेचा आणि नेमस्तपणाचा फार निकट सबध आहे. नेमस्तपणावाचून पवित्रता राहूंच शकत नाहीं शारीरिक व मानसिक पवित्रता—नित्य स्नान व निर्मलता—हे आरोग्याचे आनुषंगिक गुण आहेत पवित्रतेहून अधिक विमल आणि आरोग्यदायक असें अन्य काहीं साऱ्या दुनियेंत सापडावयाचे नाही, उलटपक्षीं शरीराला व मनाला अधिक अपायकारक असें अपवित्रतेहून दुसरे काही नाहीं, एवढे तुह्मी पक्के लक्ष्यात ठेवा. अपवित्रतेचे प्रकार वर्णन करताना मनूने म्हटले आहे की, इह्लोकीं मनुष्याचे अल्पायु होण्याला अन्य कोणत्याहि गोष्टीपेक्षा अपवित्रताच अधिक कारणीभूत होते"

अनारोग्यमनायुष्यमस्वर्ग्यं चातिभोजनं ।
अपुण्य लोकविद्विष्टं तस्मात्तत्परिवर्जयेत् ॥

—मनु.

# उपभोग.

"How Good is man's life, the mere living! How fit to employ
All the heart and his soul and his senses for ever in joy!"
Browning's "Soul"

मानवी जीविन, नुसते जगणे हे किती रमणीय असते! सारे अंतःकरण, मन आणि इंद्रिये ही सदैव आनंदनिमग्न ठेवणे किती योग्य असते!'

**धन्य धन्य हा नरदेहो। एथील अपूर्वता पहाहो॥**
**जो जो कीजे परमार्थलाहो। तो तो पावे सिद्धीतें॥ १॥**

—रामदास.

ज्यांना जीविताचा उपभोग घ्यावासा वाटतो त्यांना जीवित हे कष्टमय व दुःखमय असे वाटत नाहीं. तर उलट काहींसे **'सर्वाः सुखमया दिशाः'** असेच वाटत असते. सभोंतालच्या यच्चयावत् वस्तु सर्वत्र त्यांना सतेज व रमणीय दिसतात. आपण आनंद मानून उपभोगच घेण्याचें मनात आणलें तर जग हे खरोखरच आनंदमय आहे, आपण पाहूं तर मनोरंजक असें काहींना काहींतरी जगात सदैव असतेंच. आपणाला परीक्षा मात्र करता आली पाहिजे, मग प्रशंसा वाटण्याजोगें काहीतरी नेहमी सापडतेंच. आपण आपली अंतःकरणाची द्वारें उघडी करून स्नेह आणि अनुकंपा, दया आणि प्रेम ह्या उच्चतर गुणांना आंत रिघाव होऊं दिला, तर ते येण्यास अगदी तत्पर असतात. अर्थात्, हें कबूल आहे की, दुःखे हीं सर्वांनाच लागलेलीं आहेत. पण त्याचप्रमाणे आनंद हासुद्धा सर्वांना आहेच. आणि जो धैर्यानें दुःख सहन करतो, व जीवितसौख्याचा पूर्णपणें व कृतज्ञतया उपभोग घेतो तोच आपल्या आयुष्यातील सुसंधींचा अप्रतिम उपयोग करून घेतो. आणि म्हणूनच सर जॉन लबक् ह्यांनी आपल्या 'संसारसुख'

---

१ "He that is of a merry heart hath a continual feast."
ज्याचे अंतःकरण आनंदित असते त्याला काय रोज दिवाळी.
Proverbs of Solomon XV 15

ह्या म्हणीवरून पुढील सुभाषितातल्या श्लोकाची आठवण होते.
**सर्वत्र संपदस्तस्य संतुष्टं यस्य मानसं॥ उपानद्गूढपादस्य ननु चर्मावृतैव भूः॥ १॥**

नामक ग्रंथात म्हटले आहे कीं, "जसे सुखात कर्तव्य असते तसेच कर्तव्यातहि सुख असते!" म्हणजे ज्याच्या प्रारंभी कर्तव्य नाही असें एकहि सुख नाहीं, व ज्याच्या शेवटी सुखप्राप्ति नाही असे एकहि कर्तव्य नाही!

आपल्याला घेता येण्याजोगे असे जे काही अनेक उपभोग आहेत त्यातच आपण अत्यंत सुख मानणे हे आपले कर्तव्य आहे आणि असें असूनहि हेच कर्तव्य करावयास आम्ही वारवार चुकत असतो मला वाटते आपणापैकी बहुतेकजणाना उगीच कुरकूर करण्याची सवय लागलेली असून ते दु खालाच महत्त्व अविक देत असतात, किरकोळ अडचणीस मोठ्या सकटाचे स्वरूप देतात क्वचित् प्रसगी त्याचे वाजवीपेक्षा फाजील स्तोमहि ते माजवितात. पण आनदाच्या प्रसगाचा मात्र आपण घ्यावा तेवढा फायदा करून घेत नाही. फार काय, पण आपणाला आनद देण्यास अगदी एका पायावर तयार अशी जी आपल्या स्वाधीनची सुखे त्याची आपणाला कल्पनासुद्धा होत नाही, मग ती ओळखण्याची तर गोष्टच बोलावयास नको! खरोखर पाहता ही आपली फारच मोठी चूक होते केवळ आपण आपल्या प्रत्यहीच्या आचरणात सुखाचा अनुभव घेत नाही एवढ्याचमुळे आपण जाणूनवुजून ज्याच्यावर पाणी सोडतो अशी सुखे कितीतरी अनेक असतात! जीवित सुखमय अथवा दु खमय होण्याला आनददायक अथवा दु खद असे मोठमोठालेच प्रसग कारणीभूत होतात असे नाहीं रोजच्या व्यवहारातले सामान्य प्रतीचेच आनद अथवा दु खे जीवनदशेला तेजस्विता अथवा औदासीन्य आणण्यास कारणीभूत होत असतात. आणि ह्या रोजच्या आनदाचा आपण ज्या दृष्टीने वस्तूचे अवलोकन करीत असतो तिच्याशी अत्यंत निकट सबध असतो. अन्य शब्दानी सागावयाचे म्हणजे, त्याचा आपल्या दानतीशी अथवा वर्तनक्रमाशी अत्यत जवळचा सबध असतो. सुखी, आनदप्रद आणि आरोग्यपूर्ण चारित्र्यामुळे स्वत लाच केवळ आनद होत असतो असें नव्हे तर, ते चारित्र्य पाहणारालाहि आनदवीत असते. आरोग्यपूर्ण म्हणण्याचे कारण असे की, मागे सागितल्या-प्रमाणे उपभोगाचे हे सामर्थ्य पुष्कळ अशी आरोग्यावरच अवलबून असते. 'पवित्र' हा शब्द तरी अर्थाच्या दृष्टीने आरोग्याच्या जवळचा आहे. त्याच्या अर्थासवधी कार्लाईलचे ह्मणणे मागे जे काही मी सागितले त्याच्याच पुढें तो आणखी म्हणतो – "जणु काय हे सारे जग अगदी

उदास व दुःखमय आहे असे मानून जे कोणी उदासी, तापसी व यती आपलीं घरेंदारें सोडून अरण्यात भटकत असतील त्यांनीं घेण्याजोगा हा केवढा बोध आहे! जगात काहीं निंद्य गोष्टी खरोखर आहेत हे आम्ही कबूल करतो, पण त्याच जगावर नित्य आकाशाचे छत्र आहेना? यच्चयावत् वस्तुजाताला प्रफुल्लता आणणारा सूर्यप्रकाश, भाविसौख्याचा सूचक असा जो वसतकाल त्यातला नेत्राला रिझविणारा हिरवेपणा व पुढे उत्पन्न होणारी पिकें ही तर जगात आहेत ना? धर्मनिष्ठेचा अथवा ईश्वरभक्तीचा अर्थ असा नाही की, मनुष्यानें वस्तूकडे पाहून आपले तोंड आंबट करावे व विधात्यानें आपल्यासाठीं ज्या वस्तु निर्माण करून ठेवल्या आहेत त्याचा शहाणपणानें उपभोग घेण्याचे त्यानें नाकारावे"

आयझॅक वॉलटन हा एक प्रसिद्ध लेखक होऊन गेला त्याचें म्हणणें असे आहे की "प्रत्यहीं आपणाला ज्या ईश्वरी देणग्या मिळत असतात त्या सामान्य असतात म्हणून त्यामुळे परमेश्वराची किंमत कमी करण्यास वा त्याला दोष लावण्यास आपण प्रवृत्त होता कामा नये. आज आपण येथे एकत्र जमलो आहो तेणेकरून आपणा सर्वांना जो एक शुद्ध आनंद होत आहे त्याबद्दल ईश्वराची प्रशंसा करण्यास आपण विसरता कामा नये नद्यांच्या निर्मलोदकाचे शांत व रमणीय प्रवाह, नेत्रांना आल्हादकारक अशी हिरवी गार कुरणे, चित्रविचित्र रंगांनी शोभायमान व मधुर परिमलानी कोंदाटलेले पुष्पाचे ताटवे, स्फटिकाप्रमाणे स्वच्छ उदकानी भरलेले झरे, ही सृष्टिसौंदर्याची शोभा अवलोकन करण्यास बिचाऱ्या अंध मनुष्याजवळ काय असते? पण त्याचाच व त्यासारख्या इतर अनेक देणग्यांचा आपण प्रत्यही उपभोग घेत आहोत"

साराश, 'मन सुप्रसन्न ठेवून शहाणपणाने वागावे' ह्या म्हणीप्रमाणे वर्तन ठेवण्यातच आपले हित आहे. जेथे परमेश्वराने आपणाकरितां सुखोपभोगाची असंख्य साधने निर्माण करून ठेविली आहेत अशा ह्या रमणीय जगतात परमेश्वरकृपेनें आपणास जन्म लाभलेला असूनहि आपणास आनंदी वृत्ति कां ठेवता येऊ नये ह्याला खरोखर काहीएक कारण नाहीं. दुःखे ही अर्थात् यावयाचीच. पण वस्तूच्या आल्हादकारक व उज्ज्वलतर स्वरूपाचें अवलोकन करणे, त्याच्यापासून मिळेल तेवढे सुख मानून घेणे

व स्वतः आनदी वृत्ति ठेवून इतरानाहि आनद देणें ह्यातच खरा पुरुषार्थ आहे. एपिक्टेटस हा एक प्राचीन तत्ववेत्ता होऊन गेला. तो म्हणतो "सर्वांनी सुखी व्हावें एतदर्थ परमेश्वरानें मनुष्यास निर्माण करून त्याना बुद्धि दिली आहे. म्हणून जर कोणी या जगात दु खी असेल तर तो सर्वांशी त्याचाच दोष आहे असें समजावे."

भगवद्गीतेंतहि म्हटले आहे—

**आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मन ।**

अमेरिकन महर्षी इमर्सन् म्हणतो " अतरिक्षात सूर्यप्रकाशामधून आणि चित्रविचित्र वर्णांच्या मेघातून वर येणारा कृष्णताराच ज्याच्या नेहमी दृष्टीस पडतो असे काही विपद्ग्रस्त लोक जगतात असतात. प्रकाशलहरी त्याच्या-वरून जातात व तो क्षणमात्र दृष्टीआड होतो खरा पण तो स्वस्वस्तिकातच नेहमी स्थिर असतो. मनुष्याने आपले आचरण आणि स्वभाव जेणेंकरून आपणाला अधिक आनददायक होतील असे ठेवण्याचा प्रयत्न करावा. नाहींपेक्षा तो जन्मासच न आलेला बरा."

एका फ्रेंच कवीची कल्पना येणेंप्रमाणे आहे:—

"काहीं दु खे तुम्हीं सहन करून त्यातून पार पडलेले आहात व अत्यंत भयकर स्वरूपाचीं दु खे तुम्हाला अजून सहन करावयाची आहेत. पण जी सकटे आजवर आलेलीं नाहीत त्याच्यामुळे दु खाच्या वेदना तुम्हीं कोणत्या सहन केल्या आहेत."

मला अशी खात्री वाटते की, आपली जीवनदशा व आपला स्वभाव ही होईल तितके करून आनददायक ठेवणे हे आपल्या स्वत.विषयीचे व शेजाऱ्याविषयीचे जें कर्तव्य त्याचाच एक भाग आहे, ही गोष्ट इमर्सनप्रमाणे आपण सर्वजण कबूलच करूं तसेंच, आपलीं पुष्कळ दु खे निवळ काल्पनिक असतात. त्याना आपल्या भ्रातिकृत कल्पनातरगावाचून अन्यत्र अस्तित्वच नसतें. आणि खरोखर जरी ते असले अथवा नसले, तरी काळ्याकुट मेघांच्या आड सूर्याचा प्रकाश हा असतोच. दुःखरूपी मेघाची कितीहि काळोखी पडली तरी त्याच्या आड ईश्वरी साहाय्याचा आणि प्रेमाचा सूर्य विराजतच असतो. एवढा विचार जर आपल्या मनात सदैव जागृत राहील तर आपली जीवनदशा अधिक सुखावह आणि आनदी झाल्यावाचून खचित राहणार नाहीं!

कर्तव्याची गोष्ट जरी घटकाभर बाजूला ठेविली तरी इतराना आनद देण्यात, त्याना सुखी करण्यात केवढा आनद असतो ! अशा तऱ्हेने सुखोपभोगात गेलेला वेळ आळसात गेला असें समजू नये तो कधीहि वाया जात नाहीं. उलट तो दुहेरी फलप्रद होतो म्हणजे तेणेकरून केवळ आपणालाच आनद होतो असें नाही, तर इतरानाहि आनद होतोच आणि दुहेरीच केवळ नव्हे तर सहस्रपटीने हितावह अशी, सुखोपभोग घेण्याची विशिष्ट सधी तुमच्यापैकी कित्येकाच्या भावी उत्कर्षात कितीदा तरी येईल ! परमेश्वरकृपेने ज्याना चार माणसं पदरी टेवून आपल्या बाबवावर अधिकार गाजविता येतो अशा श्रेष्ठ कुलात जन्म लाभलेला आहे त्याना ह्या जगात सुखोपभोगाच्या लोककल्याणाच्या जितक्या सधी मिळत असतात तितक्या फारच थोड्याना सापडतात म्हणून हा जो उच्चप्रतीचा हक्क तुम्हाला प्राप्त झालेला आहे तो बजावण्यास तुम्ही कधीहि चुकू नका विशेषत आपला वेळ व्यर्थ न दवडण्याची खबरदारी घ्या. तुम्हाला अनेक सधी आहेत म्हणून तुमचा वेळ बहुजनसमाजापेक्षा अधिक मौल्यवान् आहे जोपर्यंत आपण एखादे लोककल्याणाचे काम करीत आहो तोंपर्यंत त्यात कितीहि दगदग सोसावी लागली, केवढेहि परिश्रम करावे लागले तरी ते कधीहि मनावर घेऊ नये. कारण, असले परिश्रम हे जात्याच आनददायक असतात व तेणेकरून मनाला अत्यत समाधान वाटत असते. दुसऱ्याना सुखी करण्यात जे सुख असते त्यासारखे मोठे सुख दुसरे कोणतेच नाहीं हे पक्के लक्ष्यात ठेवा. ज्याचे अत:करण थोर, मन उदार व दयाळु प्रवृत्ति तृप्त करून घेण्याचे प्रसंग व साधनेहि अने  असतात त्याला जितका आपल्या जीविताचा उपभोग घेता येतो तितका दुसऱ्या कोणालाच घेता येत नाही

शरीरसपत्तीसारखी सपत्ति नाहीं, व हृदयाच्या आनदासारखा दुसरा आनद नाहीं ! आयुष्यात जसे मस्तकाला तसेच हृदयालाहि उपभोग हे आहेतच. पण आपल्या हलगर्जीपणामुळे ह्या दोन्हीच्या स्वास्थ्याला आपण नेहमी मुकत असतों. उदाहरणार्थ, अध्ययनाचे बाबतींत हयगय झाली कीं डोक्याला जे उपभोग मिळावयाचे असतात ते मिळत नाहींत. कारण उघडच आहे. ज्याला ज्ञान अधिक असतें त्यालाच उपभोग अधिक घेता येतो वाचनात, ग्रथात उपभोग घेण्याला केवढे अमर्याद क्षेत्र आपल्यापुढे आहे याचा जरा क्षणभर विचार करा ! आणि असे असूनहि त्या मानानें सौख्याच्या

ह्या विस्तृत प्रांताचें आपणाला किती अल्पज्ञान असते. साधारणपणें लोक फार थोडी पुस्तके वाचतात व आयुष्यात मिळणाऱ्या ज्या काही अत्युत्तम संधी आहेत त्याना मुकतात ही गोष्ट विशेषत हिंदुस्थानासंबधी तर अगदी अक्षरश: खरी आहे, असें मला वाटते सामान्यत: पुस्तकाचें महत्त्व लोकाना खरोखर जितके वाटावयास पाहिजे तितके ते हिंदुस्थानातील लोकाना वाटत नाहीं, हे खरे आहे. तरीपण पुस्तकाच्या योगे आपणाला किती आनंद व सुख होते याचा विचार करा भूतकाली व वर्तमानकाली मनुष्याना जे जे अनुभव संपादन करता आले व येत आहेत, त्यातील अत्यंत महत्त्वाचे व अप्रतिम असे सारे ग्रंथांतरी साठविलेले असून त्याच्या वाचनाने आपले केवढे हित होते! पुस्तकें ही घरबसल्या, अनायासें व विनखर्चानें आपणास जगातील एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंतची अत्यंत रमणीय स्थलें दाखवीत असतात. ती सृष्टीतील सर्व सुंदर व अद्भुत वस्तूंची हुबेहुब चित्रे आपल्या डोळ्यासमोर काढीत असतात. जगातील अत्यंत विख्यात असे जे उपदेशक, तत्ववेत्ते, कवि, योद्धे, मुत्सद्दी ह्या सर्वांशी अगदी समोरासमोर व निमुटपणे संभाषण करण्याची तीं आपणाला संधी देत असतात. त्याच्या अनुभवाचे शिक्षण आपणास घेता येते, व त्याच्या वैभवाने आपणास उन्नतपदाला जाता येते पुस्तकें ही जगातील अत्यंत थोर व उदार-चरित्राच्या विभूतींचा परिचय आपणास करून देऊन त्याच्याशी आपला स्नेह जोडीत असतात. पुस्तकाना उत्तम मित्राची उपमा देण्याची वहिवाट आहे. तेव्हा आपल्या नित्य सहवासाचे व अत्यंत भरवशाचे स्नेही ह्मणून असले मित्र आपण जवळ का ठेवूं नयेत? मेकॉलेचे ग्रंथ तुम्ही वाचले असतील किंवा ते पुढेमागे वाचाल. पुस्तकाची योग्यता त्याला केवढी वाटत होती याची साक्ष त्यानें आपल्या एका लहान मुलीस लिहिलेले पत्रच देत आहे. त्यात तो म्हणतो—"पुस्तकाची योग्यता अधिक आहे. मला जर कोणी सार्वभौम राजाचे पद दिलें व त्याबरोबरच अशी अट घातली कीं मी पुस्तकाला मात्र शिवता कामा नये, तर ते राज्यपद मी साफ नाकारीन! वाचनसौख्याचा जेथे गंधसुद्धा नाही अशा राजवाड्यात राहण्यापेक्षा नानाप्रकारच्या ग्रंथानी परिपूर्ण अशा पर्णकुटिकेंत गरीबींत राहणेच मला अधिक श्रेयस्कर वाटेल"

पेट्रार्क हा एक नामांकित इटालिअन कवि होऊन गेला. तो ह्मणतो:—

"माझे स्नेही असे आहेत की, त्याच्या सगतींत मला अप्रतिम सुख वाटतें. ते स्नेही सर्वकाळातले आणि प्रत्येक देशातले आहेत मंत्रिमडळ व समर-भूमि अशा दोन्ही ठिकाणीं ते चागले नांवारूपास आलेले आहेत, व भौतिक-शास्त्राच्या ज्ञानाबद्दल त्याचा अत्यत लौकिक होऊन कीर्ति दिगतरी पसरलेली आहे. त्याची भेट घेणे म्हणजे मला काहींच वाटत नाहीं कारण, ते पाहिजे त्यावेळी माझ्या साहाय्याला सदैव तत्पर असतात. मला पाहिजे तेव्हा त्याच्या संगतींत राहता येतें व नको असेल तेव्हा त्याना दूर करतां येते. त्याच्यापासून मला कधीहि जरासुद्धा त्रास होत नाहीं. उलट, त्याना मीं कोणताहि प्रश्न विचारिला तरी ते ताबडतोब त्याचे उत्तर देतात. कित्येक मला गतकालच्या गोष्टी सागतात, तर कित्येक मला सृष्टिसौंदर्याचे रहस्य उकलून सागतात जगात कीर्तिरूपानें कसें राहावे हे कित्येक सागतात, तर कित्येक कीर्तिरूपानें कसें मरावे हे सागत असतात. कित्येक आपल्या उल्लसित वृत्तीने माझी चिता दूर करून मला आनद देत असतात, तर कित्येक माझ्या मनाला धीर देऊन वासना आपल्या ताब्यात कशा ठेवाव्यात व सर्वांशी स्वावलबनानें कसे वागावे हा महत्त्वाचा बोध मला शिकवीत असतात. साराश, यच्चयावत् विद्या आणि कलामदिराची नानाविधद्वारें ते माझ्यासाठी उघडी करून ठेवतात, व सर्व अडचणीच्या प्रसगीं त्याच्या ज्ञानावर मला निर्भयपणे विसवून राहता येतें. त्याच्या साऱ्या उपकाराची फेड म्हणून, जेथे त्याना शाततेने विश्रातिसुखाचा अनुभव घेता येईल अशा माझ्या गरीबीच्या झोपडीत कोणत्यातरी एका कोपऱ्यातील सोईवार खोलीत त्याना राहण्यास जागा द्यावी एवढेच कायते ते मला मागत असतात. कारण, त्या स्नेह्याना समाजातील कलकलाटात राहण्यापेक्षा एकातात शातपणे राहण्यातच अधिक आनद वाटत असतो"

एखादें लहानसें सुंदर पुस्तक जें सहजरीतीने खिशात ठेवता येते त्यापासून आपलें केवढे हित व किती उच्चप्रतीचा आनद होतो याचा विचार करूं लागलो असता मन अगदी आश्चर्यभरित होते. रामदास स्वामींनी ग्रंथाची व कवींची थोरवी वर्णिली आहे ती अगदी यथार्थ आहे.

**कीं हे अमृताचे मेघ वोळले। कीं हे नवरसांचे ओघ लोटले॥**
**नाना सुखांचें उचंबळलें। सरोवर हें॥ १॥**

की ही विवेकनिधीची भांडारें । प्रकट जाहलीं मनुष्याकारें ॥
नाना वस्तूचेनि विचारें । कोंदाटिले हे ॥ २ ॥
की ही सुखाची तारवें लोटली । अक्षय आनंदें उतटली ॥
विश्वजनांसी उपयोगा आली । नाना प्रयोगांकारणें ॥ ३ ॥

ग्रथवाचनापासून जे काही सौख्य मिळते तसे सुसस्कृतता आणणारे व श्रीमताना व गरीबाना सारखाच उपभोग घेता येणारे अन्य सुखच कदाचित् नसेल देशी भाषेत अनेक चागली पुस्तकें आहेत तरी पण इग्रजीत ग्रथभाडार फारच अपरपार आहे आणि हिदुस्थानातील लोकानी इग्रजी का शिकावे ह्याचे मुख्यत. कारण असे की, एकतर तेणेकरून जीवितोपभोगाच्या साधनात अधिक भर पडेल व दुसरे जगातील अत्युदात्त वाङ्मयाचा परिचय होऊन मनाला सुसस्कृतता येईल तुम्हाला तुमचे इग्रजीचे धडे जर त्रासदायक वाटत असतील तर एवढे लक्ष्यात ठेवा की, पुढे जो काहीं ज्ञानाचा अगणित ठेवा तुमच्या हाती लागेल त्याच्यासाठी आज द्यावी लागणारी ही अल्पशी किमत आहे वेळेसबधी बोलताना वाचन म्हणजे नियमित व्यवसाय असावा असे मी म्हणालो. त्यातून ज्याचा व्यवसायच अत्युच्चप्रतीचा मनोरजक व आनदप्रद आहे तो खरोखरच सुखी होय

प्रस्तुत विषयाचा हा भाग मेकॉलेच्या चरित्रातून एक अवतरण देऊन मी सपवितो. इग्लंडचा इतिहास, एसेज् ( निबंध ), 'लेज् ऑफ् दि एन्शन्ट रोम्' व आपला 'हिदुस्थानचा पिनल कोड' हे मेकालेनें केलेले ग्रंथ प्रख्यात आहेत

"गतकाळच्या थोर विभूतीविषयीं त्याच्या ठायी जो आदरभाव वास करीत होता त्याचे वर्णन त्यानेच करावे ते इतराचें काम नाहीं. त्याच्यावर त्याचे अगणित उपकार कसे झाले, त्यानी त्याला सत्याचा मार्ग कसा दाखविला, थोर व रमणीय प्रतिमानी त्याचे मन त्यानी कसे भरून काढिलें, यच्चयावत् सुखदु:खाचे प्रसगीं त्यानी त्याला सहाय्य कसे केले,—दु:खप्रसगी सात्वन करून, रुग्णावस्थेत शुश्रूषा करून, एकातवासात सोबती होऊन, जुन्या मित्रानी आपला स्नेह कायम ठेवला, आपल्यात कधीहि बदल होऊ दिला नाही, श्रीमतींत व गरीबीत, वैभवात व विपत्तीत त्यानी आपलेपणा न सोडता सारखीच मदत कशी केली, ह्याचें हृदयगम चित्र त्यानेच आपणासाठीं रेखाटून ठेविले आहे मेकॉलेने आपल्या लेखणीच्या जोरावर

कीर्ति आणि सपत्ति ही जरी पुष्कळ सपादन केली होती, तरी इतराच्या ग्रथापासून त्याला जो काहीं आनद व जे सौख्य वाटत असे त्या मानाने स्वत च्या ग्रथाबद्दल मिळालेल्या पदव्या आणि पारितोषके हीं त्याला सारी तुच्छ वाटत, ही गोष्ट मेकॉलेचा परिचय ज्याना होता ते सर्वजण पूर्णपणे जाणून होते. भूत व वर्तमानकाळचे ग्रथ, इतिहास आणि राजनीति ह्यावरील ज्याच्या विचारात आणि मेकॉलेच्या स्वत च्या विचारात जमीन-अस्मानाचे अतर होते त्या लेखकानी मेकॉलेची जी मार्दवतेने सभावना केलेली आहे, तिचे कारण पुष्कळ अशी मेकॉलेच्या अगची विद्वत्ता हेच होय असे सागतात, व ते अगदी रास्त दिसते, की, वाङ्मयासबधी मेकॉलेच्या ठायी जे आश्चर्यकारक प्रेम वसत होते त्यामुळे त्याच्या टीकाकारापैकी अत्यत प्रतिकूल टीकाकारानासुद्धा त्याच्याविषयी आदर व दया वाटल्यावाचून राहत नसे, व औत्सुक्यपूर्ण व कळकळयुक्त असा जो पत्रलेखनाचा छंद त्याच्या ठायी होता तो एकपक्षी त्याच्या स्मृतिसरक्षणाचे कामी उपयोगी पडला, तर तोच अन्यपक्षी त्याच्या स्वभावाबद्दल व वर्तनक्रमाबद्दल लोकप्रशसेला पुष्कळ अशी साधनीभूत झाला आपल्या धंद्यासाठी व करमणुकीच्या साधनासाठी बुद्धिविषयक व्यासगावर तो ज्या भरवशाने विसबून राहत असे, त्याचे, जेणेकरून आपल्या सार्वजनिक वर्तनक्रमातील स्थित्यतराना तोड देता आले ते मनाचे गंभीर स्थैर्य व प्रकृतीच्या बिघडलेल्या स्थितीत व जबरीच्या एकातवासात ज्याच्यायोगे त्याला वर्षानुवर्षे काढिता आली ती आनदी वृत्ति आणि धैर्ययुक्त सहनशीलता ही कायम ठेवण्याचे कामी थोडेथोडके सहाय्य झाले, असे नाहीं. अत्यत सुंदर उपभोगाचें अक्षय्य असें भाडार घरीच भरलेले असल्यामुळे देशातरावर लोकांच्या मनात आपल्याविषयी खळबळ आणि वाहवा उत्पन्न करण्यासाठी प्रयत्न करण्याची त्याला आवश्यकताच नव्हती. एक वाचनसौख्य असल्यावर हिदुस्थानचा सारा खजिना जरी माझ्यापुढें आणून ठेविला तरी तो मला नको असे उघडपणे म्हणण्याइतके 'वाचनाचे अजिक्य प्रेम गिबनच्या ठायी वसत होतें, व आजवर ज्या थोर व सुखी विभूतीचीं चरित्रे लिहिण्याचे काम ज्या चरित्रकाराच्या भाग्याला आलें त्या सर्वांत मेकॉलेच्या सौख्याचे मुख्य साधन ह्मटलें ह्मणजे हेच 'वाचनाचे अजिक्य प्रेम होते'[1]

१. ट्रेव्हेलिअनकृत 'मेकॉलेचे चरित्र'

खरें ह्मटले तर जीवितोपभोगाचे ह्या जगात अनेक प्रकार आहेत. ते सर्वत्र आहेत व सज्जनाना त्याचे मार्ग अनेक आहेत. त्या सर्वांची गणती करणे देखील अशक्य आहे त्यातल्या त्यात आणखी एका प्रकाराचा मी येथे उल्लेख करितो. सृष्टपदार्थाच्या इतिहासाच्या अध्ययनाचा जरा विचार करा. ज्याला त्या विषयाची अभिरुचि असते त्याला त्याच एकट्या विषयाच्या अध्ययनापासून किती अमर्याद आनद होत असतो ह्मणून सागावे! तो पृथ्वीवर, समुद्रात आणि वातावरणात सर्वत्र भरलेला आहे. व्यवस्था, रमणीयता व नानाविधता या बाबतीत तर तो अमर्याद आहे. डार्विनूसारख्या विद्वान् प्रोफेसराप्रमाणे अनेक माणसे पशु, पक्षी, कृमी व वनस्पति ह्याचे निसर्गसिद्ध व्यापार कसे चालतात ह्याचे काळजीपूर्वक अध्ययन करण्यात आपल्या आयुष्याचे काहीं दिवस मोठ्या आनदाने व फायदेशीर रीतीनें घालवीत असतात पुष्कळ लोक भूगर्भविद्येचेंहि अध्ययन करितात. कित्येक लोक पक्षी आणि त्याची अडी, वनस्पति, समुद्रातले गवत, शिंपा, शिलाजीत, चित्रपतग, कृमी अथवा सृष्टीच्या प्रचड पोषणोदरातून निर्माण होणाऱ्या इतर अनेक सृष्टपदार्थांचा सग्रह करितात. आणि असा [illegible] सग्रह त्या मानाने किती अल्पावकाशात केवढा करिता [illegible] आहे हे तुम्हीं मुंबई येथील फिप्सनचे सृष्टपदार्थसग्रहालय पाहिले [illegible] तुमच्या सहज लक्ष्यात येईल.

हे सारे सृष्टचमत्कार आपल्या अगदी सभोताल असतात व त्याच्या अगावरून आपण किती वारवार जात येत असतों, तरी आपले लक्ष्य तिकडे जात नाहीं! व ह्या दुर्लक्ष्यामुळे आपल्या मार्गांत जागोजाग विपुल असलेले अनेक उपभोग आपले चुकतात. ह्मणून ह्या सुदर सृष्टींतील अत्यत रमणीय देखावे व मधुरालाप, डोळे आणि कान उघडे ठेवून पहावेत व ऐकावेत, व इद्रियाच्या द्वारा जे सस्कार होत असतात ते मनावर नीट उमटावेत एतदर्थ आपण आपली मनोमंदिराची द्वारेंहि खुली करून ठेवावीत. 'इव्हिनिंग्ज ॲट होम्' नामक मुलानी अवश्य वाचण्याजोगें असें एक इग्रजींत सुदर पुस्तक आहे. त्यात 'डोळस व डोळे असून आधळा' याची एक प्राचीन गोष्ट आहे ती अशी. रॉबर्ट व वुइल्यम ही दोन मुलें एकदा फिरावयास निघालीं. दोघेहि बरोबरच निघाले. ते दोघे 'ब्रूम हीथ'ला गेले व पवनचक्कीला वळसा घेऊन कॅम्प मॉउंटवर जाऊन परत फिरले.

ते कुरणांतून नदीच्या बाजूनें परत आले. पण राबर्ट हा जसा गेला तसाच कोरडा परत आला. त्यानें कांहींच पाहिलें नाहीं उलट ते फिरणे त्याला अगदीं निरुत्साही वाटलें. त्याला एक चिटपाखरूसुद्धा कोणी रस्त्याने दिसले नाहीं. मोठ्या हमरस्त्याने आपण निघालों असतों तर बरे झालें असते, असें त्याला वाटलें सुरुवातीलाच वुइल्यम हा जरा त्याच्या मागे राहिला होता. कारण, हें पहा ते पहा करीत मागे रेंगाळण्याची त्याला नेहमींची सवय होती वुइल्यमने आपला वेळ व्यर्थ घालविला, असें राबर्टला वाटले असेल, पण वुइल्यमने फिरता फिरताच आपला केवढा फायदा करून घेतला पहा. त्याने आपल्या हातरुमालात मावतील इतके कौतुक वाटणारे पदार्थ बाधून घरीं आणले, व तो म्हणाला, 'प्रत्येक पाउला-गणिक मला अशी एकहि वस्तु आढळली नाहीं, कीं, जेणेंकरून मला आनद वाटला नाहीं' शेतातून व नदीच्या बाजूने ज्या वनस्पति आणि जे पक्षी त्याच्या दृष्टीस पडले ते त्याने मोठ्या कौतुकाने अवलोकन केले, व विशेषतः पाणकावळा पाहून तर त्याला फारच आनद वाटला 'व्हायपर' (एक सर्पाच्या जातीचा प्राणी) हा प्राणी त्याला प्रथमत.च पहावयास मिळाला. पवनचक्कीच्या शिखरावर तो चढला व तेथून खाली दिसणारा गादाचा रमणीय देखावा त्याने पाहिला आणि नंतर कॅम्प मॉउंटवर किल्ल्याच्या प्रतिकूपासारखे कांहींसें त्याला आढळले. एक मनुष्य वाम पकडण्यासाठी नदीत गळ टाकीत असता त्यानें ते लक्ष्यपूर्वक पाहिले. घरीं परत येताना त्याला कांही शिंपा आढळल्या, आणि समुद्र तर किती लाब राहिला—येथे समुद्रातल्या शिंपा आल्या कोठून, याचेंच त्याला भारी आश्चर्य वाटलें. घरी येऊन पोहोंचतो ना पोहोंचतो तोंच क्षितिजाकडे त्याची नजर गेली, व जेथे नीलवर्ण हळुहळू वितळत जाऊन हिरवा रंग येत चालला आहे अशा आकाशात किरमिजी व सुवर्णरगाच्या मेघातून अस्ताचली जाणाऱ्या सहस्ररश्मीची तो प्रशसा करू लागला. मला वाटते, अशी प्रशसा आपणसुद्धा किती वारंवार करीत असतों. क्षितिजावर जाऊन टेंकला असता सूर्य केवढा मोठा दिसतो हेहि त्याने पाहिले.

सारांश, डोळ्याना कितीतरी गोष्टी पाहता आल्या त्यानी जें काही पाहिलें त्यामुळें त्याला किती अधिक आनद वाटला व किती अधिक ज्ञान प्राप्त झालें!

व ज्यानें डोळे असून त्याचा उपयोग केला नाही त्याला कांहींच दिसलें नाहीं, व आपल्या संधी त्यानें गमावल्या, हें तुमच्या लक्ष्यात येईलच त्या मुलाच्या शिक्षकानें त्यानां सांगितलें, कीं "जगात एक मनुष्य डोळे उघडे ठेवून चालतो, तर दुसरा डोळे मिटून चालत असतो, एकाला दुसऱ्यापेक्षा जे श्रेष्ठ प्रतीचें ज्ञान प्राप्त होतें तें सर्वस्वी यावरच अवलंबून असतें" मला वाटतें श्रेष्ठप्रतीची सुखप्राप्तिहि यावरच अवलंबून असते, असेंहि त्याला म्हणता आलें असतें. एक आपल्या सौख्याच्या साधनाचा उपभोग घेतो व दुसरा घेत नाही. याचे कारण, टेनिसन कवीनें जे दिलें आहे ते अगदी यथार्थ आहे.

'For 'any man who walks the mead
In bud or blade or bloom may find
According as his humours lead,
A meaning suited to his mind'"

'कारण, कुरणांतून जाणाऱ्या माणसाच्या मनोवृत्ति जशा त्याला सांगतील त्या मानानें मनाला वाटेल तो अर्थ त्याला कळींत अथवा गवताच्या पात्यांत, अथवा प्रफुल्ल पुष्पांत आढळेल' तात्पर्य सर्व गोष्टी मानसिक प्रवृत्तीवरच अवलंबून असतात ज्याला जग हें अर्थपूर्ण वाटत असते, त्याला सुखाची व मनोरंजनाची साधनें सर्वत्र भरपूर दिसत असतात

# ध्यान.

"जगात आजवर जीं मोटमोटालीं युगे होऊन गेलीं, ता सारी श्रद्धेचा युगे होऊन गेलीं म्हणजे त्या त्या काळा अचाट कामे करण्याचे लोकोत्तर सामर्थ्य लोकाच्या ठाया होते, मोटमोठ्या राष्ट्रीय चळवळींना प्रारभ झाला, नाना तऱ्हेच्या विद्या निघाल्या, अनेक वीर विभूति जन्मास आल्या, काव्ये निर्माण झाला जीवात्मे एकाग्रचित्त होते व आपले सारे विचार त्याना अध्यात्मिक सत्यसशोधन करण्याकडेच लावलेले होते, तर ही सारी कामे तरवार अथवा लेखणी अथवा कर्णा ह्याच्या मुठी जितक्या एकाग्रचित्ताने आपण धरीत असतो तितक्याच एकाग्रचित्ताने होत होता"

—Emerson's 'Conduct of Life'

मानवी समाजात नेहमी दोन वर्ग असतात एक कार्यकारी माणसाचा व दुसरा विचारी माणसाचा कार्यकारी माणसे ह्मटली ह्मणजे सार्वजनिक कामात जे लोकधुरीण असतात—उदाहणार्थ मुत्सद्दी, योद्धे, राज्यसूत्रे चालविणारे, कायदेपंडित अथवा व्यापारउदीम करणारे व्यवहारी लोक—हे खरोखर लोकोत्तर बुद्धिमत्तेचे असतात आपल्या अगच्या कर्तृत्वशक्तीने व सार्वजनिक आचरणाने ते आपल्या देशबाधवाना उदाहरण घालून देत असतात.

अन्य पक्षी, विचारी लोक ह्मणजे अध्ययनासाठी व तत्वज्ञानप्राप्तीसाठीं विश्वनियमाचा—मानवी कर्माला आधारभूत तत्वाचा व जीवशिवस्वरूपाचा शातपणे विचार करण्यासाठी आपणा स्वत:ला वाहून घेणारे होत बहुतेक अंशीं असले लोक तत्वमीमासक, विद्याव्यासगी, शास्त्रवेत्ते, कवि आणि धर्मोपदेशक असतात

प्लेटोने आपल्या एका ग्रंथात वकील आणि मीमासक (तत्वज्ञानी) अशीं दोन पात्रें घेऊन त्या उभयताचा संवाद दिला आहे, व त्यात समाजातील कार्यकारी व विचारी वर्गातील परस्परविरोध मोठ्या हृदयंगम रीतीने वर्णन केला आहे वकील हा अर्थात् कार्यकारी वर्गाचा, व तत्वज्ञानी विचारी वर्गाचा दर्शक होय, हें सागावयास नकोच. प्लेटो हा स्वत:च तत्ववेत्ता असल्यामुळें तत्वज्ञान्याची बाजू त्यानें अधिक उचलून धरावी, हें स्वाभाविक आहे. तथापि त्याने त्याची वाजवीपेक्षां फाजील स्तुति केलेली आहे असें नाहीं. तरी पण उज्वल विरोध दर्शविण्याच्या हेतूनें वकीलाची बाजू त्यानें खरोखर फारच अन्यायानें वर्णन केलेली आहे, यात शंका नाहीं. आपला पूज्य गु:

जो सॉक्रेटिस त्याच्या तोंडी आपली प्रमेये त्याने घातली आहेत भूमितिशास्त्रवेत्ता थिओडोरस याच्याशीं सॉक्रेटिस हा सवाद करीत आहे. थिओडोरस ह्मणतो "ह्या लोकाना किती तरी फुरसत असते" त्यावर सॉक्रेटिस ह्मणतो "तुमच्या ह्या टीकेवरून वकीलासारख्या व्यवसायी माणसाहून तत्वज्ञान्याची गोष्ट वेगळी असते, याची मला आठवण झाल्यावांचून राहत नाहीं. वकील आणि तत्वज्ञानी ह्या दोहोंतील विशेष ह्मटला ह्मणजे एक बंदा गुलाम असतो, तर दुसरा अगदीं स्वच्छदानुवर्ती स्वतत्र असतो, व जो रिकामपणाचा वेळ आपल्या स्वाधीन ठेवण्याचे सामर्थ्य तत्वज्ञान्याच्या अगीं असतें त्यावरूनच हा विशेष दर्शविण्यात येत असतो" "पण वकील ह्मटला ह्मणजे त्याची सदाच धादल. घंटियत्रातले[1] पाणी त्याला सारखे पुढे लोटीत असते, व दुसरीकडे प्रतिपक्षाचा वकील आपले हक्क प्रतिपादन करीत छातीवर उभाच असतो" "तो स्वत सेवक असून आपल्या सेवकबधूच्या वतीने न्यायासनावर अधिष्ठित असणाऱ्या आपल्या धन्यापुढं वाद करीत असतो व त्याचा पक्ष त्याच्या हाती असतो" "या धंद्याचा परिणाम असा झाला कीं, वकीलाला मर्म ओळखता येऊन त्याच्या अंगीं धूर्तता आली. शब्दानीं आपल्या धन्याची हाजी हाजी कशी करावी, व कृतीनी त्याच्या मनाप्रमाणे कसें वागावे, हे त्याला शिकता आलें. पण मनाने मात्र तो आकुंचित व अन्यायपरायण असा राहिला. त्याच्या दास्यवृत्तीनें त्याच्या मानसिक सरलतेची आणि स्वातत्र्याची वाढ मात्र अजिबात खुंटली. जीं त्याच्या अंगच्या सत्यतेच्या व प्रामाणिकपणाच्या मानाने फारच मोठी, ती संकटे आणि भीति अशा अल्पवयात त्याच्या अगावर येऊन कोसळलीं, कीं, त्याच्या तारुण्यातील कोमळपणाला त्याचा भार झेपेनासा होऊन कुटिल मार्गाचा अवलब केल्यावाचून त्याला गत्यतरच उरलें नाहीं. फसवेगिरी व सूड उगविणें ह्या गोष्टी तो पहिल्यापासूनच करीत आला, व त्यामुळें त्याच्या मनाची वाढ खुटून तो सकुचित वृत्तीचा झाला अशा रीतीने तारुण्य जाऊन मनुष्यपण त्याच्या ठायी

---

१ ह्या यत्राला Clepsydra असे म्हणतात घड्याळे निघण्यापूर्वीं, आपल्या इकडे जसा घटकापात्राचा उपयोग करीत असत, लग्नमुजीसारख्या मगल प्रसगीं ग्रामजोशी घगाळात पाणी घेऊन घटका मोजीत असतात तें सर्वांनीं पाहिलेले आहेच, तसा तिकडेहि ग्रीक लोक वक्त्याला दिलेला वेळ मोजण्याचे कामीं, घटकायत्राचा उपयोग करीत असत या वरून पाणी मनुष्याला पुढें कसें लोटीत असते या म्हणण्याचा भावार्थ लक्ष्यात येईल भा कर्ता.

आर्ले, पण गांभीर्याचें अथवा पोक्तपणाचे एकहि लक्षण अगीं आलें नाहीं, व प्रस्तुत त्याला चातुर्यात माझ्यासारखा कोणी शहाणा नाहीं असें वाटते" वकीलाची स्थिति ही अशी असते.

"आतां ह्याच्या जोडीचें दुसरें मीमासकाचें चित्र पहा. सरकारचे नियम अथवा मते लेखी असोत वा तोंडी उच्चारलेली असोत, तीं मीमासकाला दिसत नाहींत व ऐकूंहि येत नाहींत. मोठमोठाल्या मानाच्या जागा मिळविणे व मंडळ्या काढणे, मेजवान्या झोडणें व निर्भर पानसुख घेणें, आणि गाणाऱ्या वारांगनाचे गाणे करणें, ह्या बाबतींत राजकीय समाजात जी उत्कंठा दृष्टीस पडत असते ती या मीमासकाच्या मनाला स्वप्नातसुद्धा कधी शिवत नाहीं शहरात एकादी बरीवाईट गोष्ट घडली आहे कीं काय, एकाद्या स्त्रियेला अथवा पुरुषाला आपल्या घराण्यामुळे कोणता कलंक लागला आहे, ह्या गोष्टी मीमासकाला कळत नसतात. त्याला कदाचित्, लोक ह्मणतात त्याप्रमाणे, समुद्रात पाणी किती पाइन्ट भरलेलें आहे हे सांगता येईल! त्याला आपल्या अज्ञानाची जाणीवहि नसते. कारण, जगात तो जो फटकून वागतो तो काहीं कीर्ति मिळविण्यासाठीं ह्मणून नव्हे. तर वास्तविक प्रकार हा की, शहरात त्याचे नुमते बाह्य स्वरूप ह्मणजे देहच वावरत असतो, मन मात्र मानवी वस्तूच्या क्षुद्रतेबद्दल व असारतेबद्दल तिरस्कार दर्शवीत सर्वत्र भराऱ्या मारीत असते. पिंडार ह्मणतो त्याप्रमाणें, तो पृथ्वीच्या उदरात व पाठीवर आणि वर आकाशात असणाऱ्या यच्चयावत् पदार्थांची, प्रत्येकाला त्याच्या अखिलस्वरूपाची विचारपूस करीत, रूळाने रेषा आखून जणुकाय मोजमाप करीत असतो. पण आपल्या आटोक्यात असणाऱ्या एकाहि वस्तूची तो पर्वा करीत नसतो!

"अमक्या एकाद्या अत्यंत श्रीमान् गृहस्थाजवळ दहा हजार एकरहूनहि अधिक जमीन आहे असें जरी मीमांसकाच्या कानी आले, तरी त्याला तो अगदीं यःकश्चित् वाटत असतो. याचे कारण, त्याला साऱ्या दुनियेचा विचार करण्याची संवय झालेली असते आणि जेव्हा लोक एकाद्या घराण्याची स्तुति गातात, व ह्मणतात कीं, अमका एक फार सभ्य गृहस्थ आहे, त्याच्या घराण्यात आज सात पिढ्या सारखी लक्ष्मी नांदत आहे,

† Jowett's 'Dialogues of Plato' Vol III.

तेव्हा मीमासकाला असें वाटते, कीं, हे त्याचे विचार ह्मणजे स्वत च्या बुद्धिमाद्याचे व दृष्टीच्या कोतेपणाचेच प्रदर्शक होत. त्याना सूक्ष्मवलोकन करण्याइतके, किंवा प्रत्येक मनुष्याला हजारों पूर्वज होऊन गेलेले असून त्याच्यात कोणी श्रीमंत तर कोणी गरीब, कोणी राज्यपद भोगलेले तर कोणी बद्या गुलामगिरींत दिवस काढलेले, कोणी सुधारलेले तर कोणी रानटी झालेले, अशी केवढी परपरा लागलेली असते, याचा विचार करण्याइतके पुरेसें शिक्षणच मिळालेलें नसते.

"आता या सर्व गोष्टीत ग्राम्यलोक मीमासकाची थट्टा करीत असतात. त्याचे अशत कारण असे की, एक तर त्याची योग्यता त्याच्याहून फार श्रेष्ट प्रतीची असते, तो त्याच्यात कधी मिसळत नसतो व आपल्या समोर काय आहे हे त्याला कळत नसते आणि दुसरें नेहमी कसे असावे ह्याची त्याला मोठी भ्राति असते.

"पण तो जेव्हा वकीलाला उच्चतर वातावरणात खेचतो, व आपल्या पक्षाचीं कारणें व पुरावे देऊन वाद करण्याच्या भानगडीतून काढून प्रत्यक्ष न्याय आणि अन्याय कशाला ह्मणतात, त्याचें स्वरूप काय, त्याच्या परस्परातील व इतर सर्व गोष्टीतील विशेष कोणता, यांचा विचार करावयास लावतो; अथवा राज्यपदसुखाच्या उथ्या गोष्टी बाजूला सारून खरे राज्यसूत्र चालविणे केवढे जबाबदारीचे असते, जनतेची सामान्यत सुखदुःखे कोणती, मनुष्याने सुख कसे मिळवावे व दुःख कसें टाळावे, या सर्व गोष्टीचा जाब देण्याची जेव्हा त्या आकुंचित, तीव्र आणि क्षुद्र अशा कायदेपंडिताला पाळी येते; तेव्हा मीमासकाला आपला सूड पुरा उगवून घेण्याची पूर्ण मुभा दिल्यावाचून त्याला अन्य गतिच नसते. कारण, विचाराच्या ज्या उच्चस्थानावर त्याला लोंबत रहावे लागतें, व जेथून त्याला खाली स्थलकाशाचें अवलोकन करावे लागते, ते ठिकाण इतके उंच असते कीं, खाली पाहताना त्याला घेरी येते हा सारा अनुभव विलक्षणच असे त्याला वाटतें. त्याला मोठा अचबा वाटून त्याची मति कुंठित होते व तोंडातून शब्द स्पष्ट निघेनासे होतात. या प्रकारामुळें त्याचा प्रत्येक मीमासक उपहास करू लागतो. कारण, मीमासकाचें सर्व शिक्षण स्वतंत्र स्थितीत मिळालेलें असते, त्याला गुलामगिरी ह्मणून ठाऊक नसते."

येणेंप्रमाणे प्लेटोनें ह्या दोन भूमिकेतील विरोध वर्णन केला आहे. हे वर्णन सवादरूपाने असल्याचे मी वर सागितलेंच आहे. सॉक्रेटिसाच्या तोंडची ही मीमासकाची स्तुति ऐकून थिओडोरस त्याला ह्मणाला "सॉक्रेटीस, तुझाला माझे मन जसें वळवता आलें तसे जर प्रत्येकाचे मन वळवता येईल, तर लोकात पापाचरण फारच कमी होऊन सर्वत्र शातिसुखाचाच अधिक पाऊस पडेल"

त्यावर सॉक्रेटीस ह्मणाला "थिओडर, जगातून पाप हे कधीहि नाहींसें होणार नाही! कारण, पुण्याला विरोधात्मक असें कांहीं तरी जगात नेहमीं राहिलेच पाहिजे स्वर्गात देवलोकामध्ये त्याना कोठेच थारा नसल्यामुळे या नश्वर जगात ससारिक लोकाभोवतीं तीं पापे सारखी घिरट्या घालीत असतात, दुसरा त्याना मार्गच नसतो ह्मणून आपणहि पुण्यलोकाप्रत जाणें हे आपले कर्तव्य आहे. आणि पुण्यलोकाप्रत जावयाचे ह्मणजे होता होईल तितके करून आपण आचरणाने ईश्वरतुल्य झालें पाहिजे आणि ईश्वरतुल्य होण्यास आपण आपले आचरण पवित्र, न्यायी आणि विवेकपूर्ण ठेवलेच पाहिजे. पण मित्रा! लोकानी सद्गुणाच्या नादी का लागावे, अथवा दुर्गुण का टाळावेत, याविषयी त्याची सहज खात्री करून देता येत नाहीं कित्येक लोक याचें कारण असे सागतात, की, अमका एक मनुष्य चागला आहे असें लोकांना वाटावे; पण वास्तविक ते काही त्याचे खरें कारण नव्हे लोक नेहमी हेच सागतात, हे खरें, पण माझ्या मते ती वृद्ध आजीबाईचीच आख्यायिका होय! त्यातले सत्य पहावयाचे झाल्यास असे आहे परमेश्वराच्या ठायीं दुराचाराला कसा तो थारा नसतो. सर्वांशी तो पुण्यशील व सदाचारी असतो, व आपल्यामध्ये जो कोणी अत्यंत सदाचारी असतो त्याच्याहून अधिक श्रेष्ठ ईश्वरतुल्य असें कांहींहि नसतें, व लोकाचें खरें ज्ञान, आणि त्याची शून्यता व भीरुता, ह्याचा ह्या गोष्टींशीं बहुतेक सबंध पोहोंचतो. कारण, हें ज्ञान म्हणजेच खरें ज्ञान व खरा मनुष्यपणा होय, व या गोष्टीचें अज्ञान ह्मणजे अगदीं उघड उघड मूर्खपणा व दुर्गुण होय, हें सागण्याची आवश्यकताच नाहीं. इतर सर्व प्रकारचें ज्ञान अथवा अज्ञान, उदाहरणार्थ राजकार्यधुरंधराचें ज्ञान, अथवा कलाकौशल्याचें ज्ञान,

हीं अगदीं स्थूल व ग्राम्य होत. दुराचारी मनुष्य, अथवा तोंडानें आणि हातानें जो अपवित्र गोष्टीचा उच्चार व आचार करितो तो मनुष्य, आपलें शाठ्य हा शहाणपणा अथवा चातुर्य आहे असें मानण्याच्या माया-पाशात जर पडणार नाहीं, तर फार बरें होईल. कारण, लोक आपल्या दुष्कीर्तीतच भूषण मानीत असतात 'हे लोक ह्मणजे अगदीच निरर्थक, भूभार माणसें आहेत, असें नाहीं तर राज्यात निर्भयपणे राहण्याचा ज्याचा हेतु असतो अशी माणसें जशी असावींत तसेच आपण आहोंत, असें आपल्याविषयी लोक ह्मणतात, अशी त्याची कल्पना असते. आमचे त्याना एवढेच सागणें आहे कीं, बाबानों! तुम्ही पापी आहांत हें तुमचें तुम्हाला जरी ठाऊक नसले, तरी तुम्ही सर्वांशीं खरोखरच तसे आहात यात शंका नाहीं कारण, अन्यायाचरणाचा भूर्दंड काय भरावा लागतो हें त्याना ठाऊक नसते हें तर इतर सर्व गोष्टीपेक्षा मुख्यत त्याना आधीं कळावयास पाहिजे. त्याना वाटत असते, कीं, फटक्याचा मार आणि देहदड दिला ह्मणजे झाले. पण हा भूर्दंड नव्हे! कारण, दुराचारी लोक ह्याच्या तडाक्यातूनहि नेहमीं निसटत असतात पण अन्यायाचा भूर्दंडच असा असतो कीं, तो कधींहि चुकत नाहीं. तो भरल्या-वाचून गत्यंतरच नसते."

हा उतारा जरासा लाबलचक झाला खरा, तरी पण प्लेटोचे हे सुंदर उद्गार तुम्हाला सागावेत, अशी माझी फार इच्छा होती कारण, याहून अधिक सुदर उतारा अन्यत्र जर कोठे असेल तर तो निदान मला तरी ठाऊक नाहीं तुम्हाला प्लेटोचे म्हणणे प्रस्तुत जरी पूर्णपणें कळणार नाहीं, तरी तुम्ही ते समजून घेण्यासाठीं प्रयत्न कराल, अशी मला आशा आहे कारण, प्लेटोचे ग्रंथ अवश्य वाचण्याजोगे आहेत.

तुलना करून तलगीमासकाची स्तुति अधिक करता यावी एतदर्थच वकीलाच्या भूमिकेची योजना केली आहे, हे तुमच्या लक्ष्यात आलेच असेल. निदान हल्लीच्या दिवसात तरी वकीलाना मान किती आहे, हें आपणा सर्वांना ठाऊक आहेच. हल्लीं अनेक वकील गुलामगिरी, अनुदारता, मनाचा आकुंचितपणा व दुराचार याहून फारच निराळ्या स्थितींत असून अत्यंत न्यायपूर्ण व उदात्त स्वभावाचे असे आहेत, व त्याच्या वर्तनक्रमाकडे,

चारित्र्याकडे, जर पाहिले तर प्लेटोच्या वकीलापेक्षा मीमांसकाचीच अधिक आठवण होऊन त्याचे चित्र डोळ्यापुढे उभे राहिल्यावाचून रहात नाहीं !

मीमासकसुद्धा स्वत. थोड्या सौम्य टीकेला पात्र आहेच, नाहीं असें नाही. कारण, त्याची वागणुक विभिन्न आणि ग्राम्य असते उच्च व श्रेष्ठ वस्तूविषयीं त्याच्या ठायीं इतकीं एकनिष्ठ आसक्ति असते की "खुद्द आपल्या पायाखाली व समोर काय आहे हे त्याला कळत नाहीं." माझ्या-प्रमाणे, आपणा सर्वांनाहि असेच वाटत असेल की, तत्वमीमासक हा जोंपर्यंत शहरात बाह्य रूपाने वावरत असतो, तोपर्यंत तरी निदान आपल्या आटोक्यातील वस्तूची काळजी घेणे, हे त्याचे कर्तव्य आहे, व मानव-जातीच्या, इहलोकच्या क्षुद्रतेबद्दल व असारतेबद्दल तिटकारा दाखवीत, त्याना तुच्छ मानीत, त्याने सदोदित आपल्या मनाला वाटेल तिकडे उच्च प्रदेशात भ्रमण करूं देऊ नये.

पण, अन्य पक्षीं, आपणाला हे कबूलच करावे लागेल, की, प्लेटोने वर्णन केलेल्या तत्वमीमासकाप्रमाणे, सर्वांनी ऐहिक वस्तूचा मायापाश घटकाभर बाजूला ठेवून उच्चतर वातावरणात जाण्याचा, न्याय कोणता, अन्याय कोणता, त्याचें स्वरूप काय, परस्परात विशेष कोणता, त्याच्यात व इतर सर्व वस्तूत भेद कोणता, राज्यपदसुखाऱ्या क्षुल्लक गोष्टी बाजूला सारून राज्यसूत्रे चालविण्याचीं जबाबदारीचीं धोरणे कोणतीं, सर्वसाधारण अशी मानवसुखदुःखें कोणतीं, या सर्व गोष्टीचा विचार करण्याचा कधीं कधीं प्रयत्न करणें हें उचित होय. कारण, ह्या रीतीने आचरण करीत गेल्यास लौकिक वस्तूंना दिव्यतर स्वरूप प्राप्त होईल व मनुष्याला जगात राहूनहि 'स्वर्गस्थ पुण्य लोकाच्या खऱ्या जीवनचरित्राची कल्पना होऊन त्याचें स्तुतिस्तोत्र गावयास सापडेल'

आज तुम्हाला विशेषत जी गोष्ट मला सागावयाची आहे ती याच मुद्यावर. अत्यत व्यवसायपूर्ण माणसाना एकाद्या गोष्टीचे चिंतन आणि तिचा विचार करण्यास थोडी तरी फुरसत असणें जरूर असते असला फुरसदीचा वेळ म्हणजे सर्व आरोग्यप्रद कर्मांचे अन्न व पोषक साधनच असते, व जगात जीं आजवर सुदृढ मनाचीं माणसें होऊन गेलीं त्याना असल्या फुरसदीची आवश्यकता अत्यत भासली होती. प्रथम विचार आणि

नंतर आचार अशी परपरा आहे खरे विचार आपल्या मनात आल्यावाचून खऱ्या आचरणानें आपणास वागताच येणार नाहीं सत्याचें सशोधन एकातवासातच झाले पाहिजे, असा जगातील साऱ्या महान् उपदेशकानी उपदेश केलेला आहे. ते शहरातील व्यापाराच्या दगलीत अथवा लोकव्यवहाराच्या बजबजपुरीत सापडणारे नसते. उलट, आपल्या सदसद्विवेकबुद्धीचा आदेश अत्यत स्पष्टपणे मनुष्याला जो ऐकावयास सापडतो तो काहींसा निर्जन व शात स्थलीच येत असतो. साराश, मनुष्य जेव्हा आपला आपणच एकटा असतो तेव्हाच कायते आपण कोण, आपले कर्तव्य काय, ह्याचा धडा त्याला शिकता येतो. अशा तऱ्हेने एकातवासात विचार करण्यात घालविलेला काळ कधीहि वाया जात नाहीं त्यापासून हित हें झालेंच पाहिजे. जेव्हा तुम्ही आपल्या दौर्बल्याविषयी विचार करीत रहाल तेव्हाच अगी सामर्थ्य कसे येते हे तुम्हाला समजेल आत्मनिरीक्षणाच्या व आत्मविचाराच्या प्रसगी जेव्हा आपण ससार–उपप्लवातून जरा एकीकडे होतो, तेव्हा आपण जणू काय ईश्वराच्या अगदी समोरासमोर उभे आहोत असें वाटते, व परमेश्वरच आपणास सामर्थ्य देत असतो. (काव्यासबधी जसे ह्मटले आहे तसेच) या प्रशात ध्यानासंबधी असे ह्मणता येईल, की, तेणेकरून "नीरसपणा, काबाडकष्ट व प्रत्यहीच्या दारुण प्रापचिक उपाधि यांच्या कचाटीतून मनुष्याला आपले डोके वर काढता येते, व आपल्या स्थितीचा त्याला क्षणभर विसर पडून अधिक उच्च, शात आणि शुद्ध वातावरणातील श्वासोच्छ्वासाने मन प्रसन्न करता येते." पुढे तोच लेखक आणखी असें ह्मणतो "अत करणावरील हिमबिदूची, अत करणातील ओलाव्याची आपणास जितकी गरज अगते तितकी बुद्धीच्या विकासासाठी प्रकाशाची गरज नसते आपल्या अतरात्म्याची उन्नति करण्यासाठी काल व फुरसद ही जरूर लागते" लौकिक व्यवहाराने आपणास ज्ञान प्राप्त होईल, पण ध्यानाने अगीं शहाणपणा येईल, व तो त्याहूनहि अधिक श्रेयस्कर असतो

**ध्यान आणि एकात विचार ह्याची महती सर्व धर्मांतून वर्णन केली आहे; पण आपल्या आर्य धर्मग्रंथांत त्याची जितकी जोरदार वाखाणणी सापडते, तितकी अन्यत्र कोठेंहि आढळत नाहीं. उदाहरणार्थ 'अनुगीताच' पहा काय सागते:—**

"ज्याना प्रज्ञा ह्मणजे काय हे जाणता येते, ज्याना आपलें अंतःकरण सदोदित प्रसन्न ठेवता येतें, ज्याना ध्यानमग्न राहता येते, ज्याना नित्य चित्त एकाग्र करता येते, वचनसत्यता ज्याना पाळता येते, इंद्रियदमन ज्याना साधलेलें आहे, जे ज्ञानसपन्न असतात, जे रागलोभरहित असतात, ज्याची मने स्वच्छ असतात, जे बुद्धिमंत असतात, (हे माझे ते माझे असा) ममत्वाचा विचार ज्याच्याठायी नसतो, जे अहंकारविरहित व निरभिमान असतात तेच मुक्त होऊन परमपदाला पावतात

"शुद्ध एकाग्र चित्ताने ध्यान करून ज्याच्या ममत्वाचा (हे माझे, ते माझे असा) विचार निमालेला असतो, अहंकार गळालेला असतो, अशा उन्नत आत्म्यानाच परमोच्चपदाचा लाभ घडतो. ज्याना श्रेष्ठ प्रतीचे आत्मज्ञान होते, ध्यानमग्न रहाण्यास चित्त एकाग्र करता येतें, व मन सदा प्रशात स्थितीत ठेवता येते, त्यानाच अकल्पित अशा अमर्याद सुखसागरात यथेच्छ पोहता येते"

श्रीमद्भगवद्गीतेतहि म्हटलें आहेः—

"शत्रुमित्राचे ठायी, साधुअसाधूचे ठायी ज्याची बुद्धि समान असते, असे योगी सर्वश्रेष्ठ असतात ज्याला हे फळ पाहिजे असेल त्याने एकात स्थली एकटे रहावे, देह, मन इत्यादिकास स्ववश करावे, आशाशून्य व्हावे, आपल्या मागच्या सर्व उपाधि नष्ट कराव्या आणि सदैव आपले चित्त परब्रह्मी राहील असे करावे. एकात पण रमणीय व तीर्थोपमस्थळी, फार उच्च नाही व फार नीचहि नाहीं, सभोवतालची जागा स्वच्छ, असे वस्त्राचे अथवा मृगचर्माचे अथवा दर्भाचे आसन मांडून त्यावर बसावे, व सर्व इंद्रियाचे व्यापार व मनाच्या वृत्ति स्तब्ध करून आत्मशुद्धीसाठी एकाग्र मन करावे आणि ते ब्रह्मी लावून त्याच स्थितीत काही कालपर्यंत असावें"

"अभ्यासापेक्षा ज्ञान श्रेष्ठ आहे, ज्ञानापेक्षा ध्यानाची योग्यता विशेष आहे, ध्यानापेक्षा कर्मफलत्याग हा विशेष आहे हा त्याग पूर्ण झाला ह्मणजे उत्तम प्रकारची शांति प्राप्त होते."

**आता पाश्चात्य तत्ववेत्त्याचाहि उपदेश ऐका. एपिक्टेटस् ह्मणतो, "ज्याप्रमाणें झ्यूस हा आपल्या स्वतःवरच आश्रित असतो, स्वतःच शांत असतो, आपल्या स्वतःच्या कारभाराचा व त्याच्या स्वरूपाचाच विचार करतो, आणि स्वतःला अनुरूप अशा विचारात गर्क असतो, तद्वतच आपणहि आपल्या स्वतःशीच बोलत असावे, इतराची उणीव भासू देऊं नये, काळ**

घालविण्याचीं उपयुक्त साधनें योजून ठेवावीं, ईश्वरी योजनेचें व अन्य प्रत्येक वस्तूशीं आपला सबंध कोणत्या तऱ्हेचा आहे याचे नीट निरीक्षण करावे, ज्या गोष्टी नित्य घडतात त्याचा आपल्यावर परिणाम पूर्वी कसा घडत होता व हल्ली कसा घडत आहे, अजूनहि आपणास दु खद अशा कोणत्या गोष्टी आहेत, त्याची स्थिति सुधारून तीं दुःखे नाहींशी कशी करावी, या सर्वांचा विचार करावा, जेथे सुधारणा करण्यास जागा असेल तेथे ती बुद्धि आणि विवेक याना अनुरूप अशी घडवून आणावी, हीं सर्व आपली कर्तव्ये होत."

पुढे आणखी तो ह्मणतो "बादशहा **सीझर** याच्या छत्राखालीं रोमन-लोकाना शातीचे आणि सरक्षणाचें सौख्य फार चागले मिळत होते, हें खरें, पण ज्वर, गलबत फुटणे, समुद्रावरील तुफान, अग्निप्रलय, धरणीकंप, अथवा विद्युल्लतेचें कोसळणें यासारख्या आध्यात्मिक व आधिदैविक दु खापासून प्रजेचे सरक्षण सीझरला करता येईल काय ? तसेच प्रेमाविषयी त्याला अभय-वचन देता येईल काय ? मुळींच नाहीं ! दु खाविषयी व मत्सराविषयीं त्याला अभयवचन मुळींच देता येणार नाहीं. साराश, यापैकीं एकाहि बाबतीत त्याला आपलें सरक्षण करता येणार नाहीं. पण तत्वमीमासकाची मते या सर्व बाबतीत आपणास अभय वचनें देत असतात खऱ्या शातीचा मार्ग ते दाखवीत असतात. आणि ते काय ह्मणतात ? **'मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु'** या भगवदुक्तीप्रमाणें, जर तुह्मी मी सागतों त्याप्रमाणे वागाल तर, तुह्मी कोठेहि असा, वाटेल ते करीत रहा, तुह्माला दु.ख, राग, साहस अथवा प्रतिकार ह्याचें भय बाळगण्याचें कारण मुळीच उरणार नाहीं उलट चित्त-क्षोभ न होता अगदी स्वतंत्रतेत तुह्माला आपला काळ सुखाने घालविता येईल हा शातिसुखाचा मार्ग सीझरला कसा सागता यावा ? तो आपल्या सद-सद्विवेकबुद्धीच्या द्वारा परमेश्वरच दाखवीत असतो. अशी शाति जेव्हा मनुष्याला प्राप्त होते, त्याता आपल्याला कोणत्याहि दु खाची बाधा होणार नाहीं, कोणत्याहि लुटारूला आपल्याला त्रास देता येणार नाहीं, धरणीकंपाचे भय नाहीं, प्रत्येक वस्तु अगदीं शातिमयच आहे, प्रत्येक मार्ग, प्रत्येक शहर, प्रत्येक सभा, प्रत्येक शेजारी, प्रत्येक सोबती अगदीं निरुपद्रवीच आहे असें जेव्हा त्याच्या दृष्टोत्पत्तीस येऊन तो विचार करूं लागतो, तेव्हा तो एकटा असल्यावर त्याला समाधान का वाटणार नाहीं बरें ?"

जीवित ह्मणजे सर्वथैव माया व असारता आहे असें नाहीं. उलट कवि लॉंगफेलोनें ह्मटल्याप्रमाणे ते काहींसें सत्य आहे, पण ते सत्य आहे हे तरी कशावरून? त्याचें कारण असें, की, नुसत्या डोळ्यानी आपणाला ज्या वस्तु दिसत असतात त्याच्या पलीकडे, ह्या मायापसाऱ्याच्या पलीकडे,ह्या क्षणभंगुर व मृगजलछायेच्या आड सद्वस्तु वास करीत असतात. त्या आपणास नुसत्या चर्मचक्षूंनी दिसत नाहींत. त्या सत्य आहेत एवढेच केवळ नव्हे, तर त्या नित्यहि आहेत असलीं सत्यें ह्मटलीं ह्मणजे पावित्र्य, शुचिता, सत्य, न्याय, दया, आणि अखिल मानवजातीने चागले ह्मणून मानिलेले इतर सर्व गुण हींच होत. ते गुण पूर्णांशाने ईश्वरी गुणच होत. ह्याच वस्तूंचे आपण ध्यान करावें, व ते होईल तितके करून नेहमी करीत असावे अशा रीतीने ध्यान करणे ह्मणजे आळसात काळ घालविणे नव्हे. तो खरोखर एक तपश्चरणाचाच प्रकार होय. जीवात्म्याला करता येणारे असें ते अत्यंत कडक तपश्चरण होय असले तपश्चरण हे अगी कार्यक्षमता आणण्यास कारणीभूत होते, एवढेच केवळ नव्हे, तर ते जीवात्म्याला पोषकहि होते. तेणेंकरून आध्यात्मिक आचरण करण्यास साहाय्य होऊन आपणास सामर्थ्य येते. जसें मन अधिक सुविचारानें भरून काढण्यास समर्थ होईल तसेंच शरीरालाहि अधिक सत्कर्मे करण्याचें सामर्थ्य येईल. जे अत्यंत गहन विषयाचा विचार करितात त्याचेच आचरण अत्यत प्रवृत्तिमार्गाने होते. सत्कर्मे करणारी माणसें सद्विचाराची असलीच पाहिजेत जनरल लॉर्ड वूल्स्ले हा ब्रिटिश सैन्यात एक अत्यंत तरतरीत सेनापति होऊन गेला तो असे ह्मणत असे कीं, ज्या ज्या वेळी मी कामावर जाई त्या त्या वेळी ( Soldier's pocket book) शिपायाचे खिशातले पुस्तक याशिवाय आणखी (Thomas à Kempis) थॉमस अकेंपिस व (Book of Common-Prayer) स्तोत्रगाथा हीं दोन पुस्तके मी आपल्या जवळ ठेवीत असें तीं इंग्रेजीतील कोणत्याहि दोन ग्रंथाइतकींच शात ध्यान करण्याचे कामीं मला साधनीभूत होत असत तिसरे एक त्याच्या आवडीचे पुस्तक ह्मणून तो जें सागत असे ते मार्कस आरेलियानें केलेले 'ध्यान' ( Meditations of Marcus Aurelius ) हें होय मार्कस आरेलिया हा रोमन बादशहापैकीं एक अत्यंत प्रसिद्ध बादशहा होऊन गेला, आणि त्याचा ग्रथ कधींना कधी तरी तुमच्या अवलोकानांत येईलच.

केव्हां केव्हां लोक असें ह्मणतात, की, काय बोवा, जगात अलीकडे काम इतकें वाढले आहे, कीं, विचारावयास नको! मानवी जीवितयात्रा इतकी झपाट्याने चालली असते, की, विचार करण्यास लोक पूर्वी जितका वेळ देत असत त्याहून आतां त्याना फारच कमी वेळ द्यावा लागतो नुकतेच इहलोक सोडून गेलेल्या एका इंग्रज कवीनें असे उद्गार काढिले आहेत कीं, अलीकडचे इंग्रज लोक "अविरत प्रयत्नानें आपला उद्योगधंदा करीत आहेत. अत्यंत काळजीनें मेडिटरेनियन समुद्र, नाईल नदी ओलाडून पूर्वेकडे त्याच्या झुंडीच्या झुंडी हिंडतात, व ध्रुवाच्या एका टोंकापासून ते दुसऱ्या टोंकापर्यंत यच्चयावत् रमणीय स्थलें पाहून कौतुकभरानें त्याचे अवलोकन करितात व कार्यव्यापृतत्वानें सारखे इतस्तत. भ्रमण करीत असतान आणि मरणापूर्वी विश्रांति ह्मणून कशी ती एकदासुद्धा घेत नाहींत."

प्रख्यात इंग्रज मुत्सद्दी ग्लॅडस्टन यानी नुकतेंच आपलें मत प्रदर्शित केलें होतें ते असें.—"व्यापार आणि नवीन नवीन शोध ह्याच्या उत्कर्षामुळे उपभोगाच्या साधनात प्रत्यहीं सारखी भर पडत आहे, व तेणेकरून जीवाची अनात्मवादावरील प्रवृत्तिच वृद्धिंगत होत आहे. दृश्य जगताची मगरमिठी जी आपल्या गळ्याला बसलेली आहे ती सवयीच्या सामर्थ्यानें अधिकाधिक दृढ होत आहे, व त्या बरोबरच अदृश्य जगाचा विचार करण्यास अवश्य लागणारें मेंदूचें व मनाचें सामर्थ्य क्षीण होत आहे." असं असेल कदाचित् ही स्थिति जशी इंग्लंडात तशीच येथे हिंदुस्थानातहि असण्याचा संभव आहे. तसें जर खरोखरच असेल तर त्याबद्दल आपणास वाईट वाटल्यावाचून राहणारच नाहीं

ह्मणून माझें तुम्हाला असें सांगणें आहे कीं, विवेकपूर्ण व काळजीयुक्त ध्यान करण्यास तुम्हीं कोणता तरी वेळ ठरवून ठेवावा, व ते ध्यान मनुष्याच्या कर्तव्याशीं व अध्यात्म जीवनचरित्राशीं ज्याचा संबध पोहोंचतो अशा सत्य वस्तूंचेच करीत असावें. असा वेळ तुमचा तुम्हालाच ठरवितां येईल. दररोज सकाळसंध्याकाळ जेव्हा तुम्ही अगदीं एकांतात एकटे असाल तेव्हा म्हणा, अथवा दिवसा केव्हाहि शांत फुरसदीच्या वेळीं म्हणा, अथवा तुमच्या जन्मदिवशीं, अथवा सार्वजनिक महोत्सवाचे दिवशीं, अथवा एकादशी

सारख्या उपवासदिनीं[1], अथवा कोणत्याहि प्रकारच्या विश्रांतीसाठी तुम्ही जे दिवस वेगळे काढून ठेवले असतील त्या दिवशी म्हणा, पण केव्हातरी असा वेळ काढाच! प्रत्येक दिवशी काहीं क्षणच का होईना पण ते ठरवून टाका, व त्या नेमक्या वेळी शातपणें ध्यान करण्याची नियमित सवय करा. ते क्षण ह्मणजे ह्या कष्टमय जीवितयात्रेत विश्राति घेण्यास मुक्कामाचीं ठिकाणेच होत, असें तुम्हाला वाटेल. त्या ठिकाणी मुक्काम केला असता त्रस्त झालेल्या मनाला विश्राति देता येईल व पुढे जो मार्ग आक्रमण करावयाचा असेल तो करण्यास तुम्हाला सामर्थ्य प्राप्त होईल ते जीवन-दशेतील अंधकाराला घालविणाऱ्या प्रज्वलित दीपाप्रमाणेच तुम्हाला वाटतील, व ते घोटाळ्यात पडणाऱ्या काळोखीत तुम्हाला मार्गदर्शक होतील. मॅथ्यू आरनॉल्ड म्हणतो "आपल्या अंत:करणांतील ज्ञानरूप ज्योत आपणास वाटेल तेव्हा प्रज्वलित करता येत नाहीं अंत करणस्फूर्ति विकास पावत असते व शातहि असते. जीवात्मा हा अंधारात नेहमी चाचपडत असतो पण ज्ञानाच्या उजेडात ज्या गोष्टी करण्याचा आपण निर्धार करूं त्या संकटाच्या अंधारातहि तडीस नेता येतात"

अतएव सत्कर्माचरणाचे रहस्य ह्मटले ह्मणजे धार्मिक ध्यान, विवेक आणि भक्ति हें होय

ध्यान, विवेक आणि भक्ति हीं सोपी नाहींत यच्चयावत् तपाचरणात ती अत्यंत कष्टप्रद आहेत. अदृश्य सद्वस्तूवर विचार स्थिर करणे कठीण आहे, व एकाग्र चित्तानें त्याचें चिंतन करणें हे तर त्याहूनहि कठीण आहे प्रत्यक्ष अर्जुनालाच ही अडचण भासली होती तो ह्मणतो —

**'चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद्दृढम् ।**
**तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ॥'**

"मन हे अत्यंत चंचल, उच्छृंखल, अति बळवत आणि फार हट्टी आहे. त्याला आटोक्यात ठेवणे हे वायूची मोट बांधण्यासारखेंच दुष्कर आहे असें

---

१ उपवास (उप+वस्) ह्याचा मूळ अर्थ ईश्वरासन्निध राहून काळ घालविणे असा आहे, पण तो एकीकडेच राहून प्रस्तुत लोकांत दिसून येणारा नित्याच्या आहारात बदल एवढाच त्याचा अर्थ सार्वत्रिक होऊन बसला आहे —भा क

मला वाटते." यावर भगवत ह्मणतात "अर्जुना! मन हें अति चंचल व दुर्निवार आहे, यांत संशयच नाहीं, परंतु योग्य अभ्यास व योग्य वैराग्य ह्याचा अगिकार केला असता तें मन आपल्या स्वाधीन होते. ज्याचे मन अनावर आहे त्याला योगसिद्धि होणें जरी असभवनीय आहे तरी दीर्घश्रम करून ज्यानें आपलें अत करण आत्मवश केलें, तो योग्य मार्गाने गेल्यास त्याला मात्र निश्चयाने योगसिद्धि प्राप्त होईल[१]"

ध्यानाचे बाबतींत आपणास मिळेल तेवढे साहाय्य आवश्यकच असते, व ग्रंथे[२] आपणास अमुप साहाय्य देण्यास तयार आहेतच. दररोज भगवद्गीतेचे पठण करून त्यातील श्लोक पाठ करण्याचा क्रम ठेवला तर तेणेकरून विचार-स्थिरता साधण्यास बरीच मदत होईल, व सदाशाहि वाढतील आत्मसयमन व आत्मनिरीक्षण याचीहि फार हितावह मदत मिळते. वेळेसंबधीं बोलताना मी बेंजामिन फ्रॅंकलीनचा उल्लेख केलाच होता. आत्मशिक्षणासाठीं त्याने जी सद्गुणाची यादी तयार केली होती ह्मणून मीं तुह्माला सागितलें होते, ती यादी येणेप्रमाणे आहे प्रत्येक सद्गुणापुढें नियमहि दिलेले आहेत.

१ **नेमस्तपणा.** जडत्व येईपर्यंत खाऊ नये उन्मत्तता येईपर्यंत पिऊं नये.

२. **मौन.** इतराचे अथवा स्वत.चें हित ज्यात होण्याचा सभव असेल तेवढेच बोलावे, जास्त बोलू नये, क्षुल्लक संभाषण नेहमी टाळावे.

३. **व्यवस्था.** आपल्या सर्व वस्तूंना नेमलेली जागा असावी, व आपल्या उद्योगाच्या प्रत्येक भागाला नेमलेला वेळ असावा.

४. **निश्चय.** आपलें कर्तव्य करण्याचा निश्चय करा, व जो निश्चय कराल तो शेवटास नेण्यास चुकू नका.

५. **काटकसर.** स्वत चें अथवा लोकांचें हित साधण्यापलीकडे खर्च करू नका, म्हणजे व्यर्थ पैसा मुळींच खर्च करू नका

६. **उद्योग.** वेळ कसा तो गमवू नका. कांहींना कांहीं उपयुक्त काम सदा करीत रहा. अनवश्यक अशा सर्व कृत्यानां फांटा द्या.

---

१. श्री भ गीता अ ६, श्लोक ३५ ३६.

२ गीता, ज्ञानेश्वरी, योगवासिष्ठ, अध्यात्मरामायण इत्याद्यनेक

७. **निष्कापट्य**. फसवणूक ही नेहमी अपायकारक असते, तिचा कधी उपयोग करू नका सरळपणानें व न्यायाने विचार करा व बोलावयाचें झाल्यास त्याचप्रमाणें बोला.

८. **न्याय**. कोणाला दुखवून अथवा जें हित करणें तुमचें कर्तव्य असेल तें करावयाचें सोडून कोणाला अपकार करू नका.

९. **संयम**. 'अति सर्वत्र वर्जयेत्' ही म्हण लक्ष्यात ठेवा. अपकार ज्या मानानें क्षम्य असतील त्या मानानें त्याबद्दल तुम्ही राग मानू नका. सहनशीलता ठेवा.

१०. **स्वच्छता**. शरीर, वस्त्रे अथवा राहण्याचे ठिकाण यापैकीं कोठेहि जरा सुद्धां अमंगळपणा सहन करू नका.

११. **शांतपणा**. क्षुल्लक गोष्टींनी, अथवा सामान्य किंवा अपरिहार्य अपघाता-मुळे मनस्वास्थ्य बिघडू देऊं नका.

१२. **पावित्र्य**[1]. हे कायिक, वाचिक आणि मानसिक असावें, देह, वाणी आणि मन हीं सदा शुद्ध ठेवावीत.

१३. **नम्रता**. अत्यत थोर सत्पुरुषाच्या चरितांचें अनुकरण करा.

बेंजामिन फ्रँकलीन यानें एक वही तयार केली होती व तीत प्रत्येक सद्गुणासाठी एक एक पान सोडलें होते. क्रमाक्रमाने प्रत्येक सद्गुणाकडे एक एक आठवडाभर अत्यत काळजीपूर्वक लक्ष्य पोंहचविण्याचा त्याने निर्धार केला होता. तो म्हणतो "अशा रीतीने पहिल्या आठवड्यात नेमस्तपणाची मर्यादा जरासुद्धा ओलाडावयाची नाहीं, इकडेच सारे लक्ष्य मी दिलें होतें. इतर सद्गुण ओघाने येतील तसे येतील, त्याचा फारसा विचार न करिता, आज आपल्या हातून किती अपराध घडले एवढेच फक्त दररोज सध्याकाळी टिपून ठेवीत गेलों." असा क्रम त्याने अव्याहत तेरा आठवडेपर्यंत चालू ठेवला होता. प्रत्येक आठवड्याला एक एक सद्गुण घेऊन रोज आपल्या हातून तद्विरुद्ध आचरण कितीदा घडले हे दररोज सायकाळीं तो टिपून ठेवीत असे अशा रीतीनें वर्षातून चार आठवडे प्रत्येक सद्गुणाचे बाबतींत त्याला मोठ्या काळजी-

---

१ याचा अर्थ पातिव्रत्य व एकपत्नीव्रतापासून स्त्रीपुरुषाना प्राप्त होणारी ओजस्विता असा घेणे —भा क

एक आत्मपरीक्षण करता आलें आत्मपरीक्षणाचा हा क्रम त्यानें कित्येक वर्षें चालू ठेवला तो म्हणतो "मी ज्या अपराधांची अटकळ केली होती ते अप[illegible] माझ्याठायीं [illegible] भर[illegible] आढळून आ[illegible], त्याबद्दल मला फार [illegible] आश्चर्य [illegible] समाधानाची गोष्ट एवढीच, की, ते बऱ्याच अशा[illegible] मला [illegible]न आलें" बेंजामिन फ्रॅंकलीनची ही योजना व अनुभव याची काही अशी आपणा सर्वांना मदत होईल असें मला वाटते

वरील तेराहि सद्गुणाचा सदुपदेश भगवतानी आपल्या एका श्लोकात मोठ्या मार्मिकतेने केलेला आहे. तो असा —

युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु ।
युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥

"जो पुरुष युक्त म्हणजे योग्य आहारविहार घेतो, कर्म करीत असता ज्याचे व्यापार योग्य तऱ्हेने चालतात, ज्याची निद्रा व जागृति या प्रमाणास धरून असतात, त्याचा योगाभ्यास दुःखाचा नाश करितो"

चित्त उल्लसित असून प्रसन्न राहील व एकाग्र करिता येईल या बेताने आहारविहाराची योजना ज्याची त्याने ठरवावी हल्लीच्या विद्यार्थिवर्गाने एवढा श्लोक नीट ध्यानात ठेवून तो नेहमी डोळ्यापुढे ठेविला तर बेंजामिनचें अनुकरण करणे त्याना फार सोपे जाईल, हें सागावयास नकोच.

अखेरीस, अत्युच्च व अत्यत पवित्र भक्तियोगाचा केवढा आदर होतो याचा विचार करावयाचा झाल्यास सर आर्थर हेल्प्स, याचे पुढील उद्गार मनन करण्याजोगे आहेत. "भक्ति हा आत्मदमनाचे तेज वृद्धिंगत करणारा नित्य झरा आहे मात्र ती भक्ति अलीकडे लोकात जो प्रघात पडला आहे त्याप्रमाणे विवेकरहित नसावी. उलट, ती निष्कपट, मनोभाव, अत्यत पराकाष्ठेने व सावधानतया करीत असावे. ज्या वस्तुलाभासाठीं आपण प्रार्थना करीत असतो ती प्राप्त व्हावी अशी खरोखर आपली इच्छा आहे काय ? असा प्रश्न अगोदर आपल्या स्वतःला आपण विचारावा. माझ्याठायीं क्षमाबुद्धि असावी अशी प्रार्थना करीत असता, कांहीं [illegible] राग येणार नाहीं अशी मनाची प्रवृत्ति ठेवण्यास आपण तयार आहोंत काय ? असा प्रश्न आपल्या मनाला ज्याचा त्याने अगोदर करावा असे जर घडणार नाहीं, तर ती भक्तीची

भयंकर विटंबना होईल. विधात्याच्या समोर भाराभर शब्द ओतण्यापेक्षा अन्य अधिक चांगले कृत्य मनुष्याला करण्यासारखें काहीं नाहीं असें वाटणे, ईश्वरासन्निध एकटें उभें राहून अज्ञान मुलाप्रमाणें आपला पाठ नुसता म्हणून टाकणें, त्यातून आपण केव्हा एकदाचे मोकळे होतों एवढीच इच्छा करणें, आणि आपण काय म्हणतों व काय मागतों त्याच्या अर्थाविषयी बेपर्वा राहणें, म्हणजे भक्तीची जाणूनबुजून थट्टा करण्यासारखेंच आहे.[1]"

साराश, भक्ति ही भावशुद्ध असावी

तुका ह्मणे नको वरपंग देवा । घेई माझी सेवा भावशुद्ध

1. " Essays Written in the Intervals of Business " p 23

# आपलें वजन अथवा वर्चस्व.

" The witnesses that God has set before the eyes of men are twofold, the witness of greatness and the witness of goodness, the witness of the hero and the witness of the saint "

Gicat Men Temple's " Rugby Sermons, " p 60

"परमेश्वराने जगापुढे ज्या दोन साक्षी उभ्या केल्या आहेत त्या अशा एक वैभव आणि दुसरी चांगुलपणा, एक वीर आणि दुसरी सत ह्याची"

प्रथमत उच्च दर्जाचे लोक आपल्या देशबांधवावर आपलें वजन कशा रीतीने पाडतात व असल्या लोकांच्या वचनाचा कल्याणासाठी म्हणा, अकल्याणासाठीं म्हणा, लोकावर केवढा जबरदस्त पगडा बसत असतो, याविषयीं येथें थोडें विवेचन करू

प्रत्येक अधिकारसपन्न माणसाचें उदाहरण—मग त्याची ती सत्ता आपल्या स्वत च्या घरावर असो, एकाद्या गावावर असो, अथवा सस्थानावर असो—त्याच्या हाताखालची सर्व माणसें मोठ्या लक्ष्यपूर्वक बारकाईने पहात असतात, व त्याप्रमाणें तीं अनुकरण करीत असतात. "जसा धनी, तसा चाकर; जसा गुरु तसा भक्त," या म्हणीचा दृष्टात सार्वत्रिक आहे. त्या सर्वत्र लागू आहेत. त्याचा अर्थ असा, कीं, नेता अथवा पुढारी जें काहीं करतो त्याचेंच सर्वजण —सामान्य लोक—अनुकरण करीत असतात. यातच पुढाऱ्याचे स्वतःचे सामर्थ्य असतें मग तो पुढारी कितीहि गरीब अथवा हलक्या स्थितींतला असेना का ही बाब म्हणजे खरोखर फार मोठ्या सार्वजनिक महत्त्वाची आहे कारण, हें अगदी स्पष्ट आहे, कीं, त्याच्याच वर्तनक्रमावर इतराचा वर्तनक्रम बऱ्याच अशी अवलंबून असतो. स्वत सबंधी व इतरासबधीं त्याच्यावर फारच मोठी जबाबदारी असते. प्रत्येक सदाचारी मनुष्याला आपल्या बाधवाला साह्याय्य करता येईल, पण श्रेष्ठ दर्जाच्या माणसाना आपल्या हाताखालच्या लोकाना जें सौख्य देता येण्याजोगें असते ते अगणित असते. त्याचप्रमाणें प्रत्येक दुराचारी मनुष्याला आपल्या शेजाऱ्याला भ्रष्ट करतां येतें. तरी पण सत्ताधीश माणसानीं आपल्या हाताखालच्या लोकाचें अकल्याणच करावयाचें मनांत आणल्यास त्याच्या हातून

जें अकल्याण होण्याजोगे असतें तें फारच अगणित असतें. सारांश, मोठेपणीं ज्यांनां लोकात पुढारीपणानें वागण्याचा प्रसग येणार आहे त्यानीं आपल्या आयुष्यातील मुख्य कर्तव्यापैकीं एका गोष्टीचा अवश्य विचार केला पाहिजे. ती अशी मला इतराना सन्मार्गानें कसें नेता येईल ? लोक दुर्मार्गानें जाणार नाहींत एतदर्थं मला कसें वागावे लागेल ?

लोकनायक आपल्या हाताखालच्या लोकावर जें बरेंवाईट वर्चस्व गाजवीत असतात, त्याचीं उदाहरणें इतिहासात जागोजागी विपुल आढळतात. उदाहरणार्थ, आपण मेवाडचाच इतिहास घेऊ तो तुम्हीं सर्वांनी वाचलाच आहे. राणा संग याच्या कारकीर्दीपासून अलीकडचा इतिहास पहा. इग्लडच्या आल्फ्रेड राजाप्रमाणेच राणा संग याचें सगोपन विपत्तीत व हाल-अपेष्टेंत झालें होते, व त्याचे भाग्य जरी राज्यपदारूढ होण्याइतके थोर होतें, तरी स्वपराक्रमानेंच त्याला कीर्ति सपादन करावी लागली. उच्च नीच सर्व अवस्थात त्याने खऱ्या वीराला—खऱ्या क्षत्रियाला—साजेल असेंच आपलें वर्तन ठेवलें. शौर्याच्या कामातहि तो आपला बधु महातेजस्वी पृथ्वीराज यासारखाच होता. फरक एवढाच, कीं, त्याच्या अगीं विवेकयुक्त धैर्य होते. विचाराची जोड मिळाल्यामुळे त्याच्या धैर्याला एक प्रकारें मार्दव आलें होते. म्हणूनच त्याच्या कारकीर्दींत मेवाड हें उत्कर्षाच्या उच्च शिखराला पोहोंचून त्याचे नाव सर्वत्र दुमदुमत होते. मेवाड कीर्ति-मदिराच्या अत्युच्च शिखरावर जें विराजत होते त्याला कारण सर्वस्वीं तोच एकटा होता. राज्यपदारूढ झाल्यावर, आपल्या विपत्तीत ज्यानीं आपणास साहाय्य केलें होते, त्याचे उपकार तो विसरला नाहीं. ज्याने राजस्थानचा बराच मोठा भाग हस्तगत केला होता, व ज्या गुणाबद्दल रजपूत लोकाना मोठा आदर वाटत असे ते गुण त्याच्या अगीं असल्यामुळें जो त्यानां पूज्य होऊन बसला होता, त्या राणा संगाला, हिंदुस्थानच्या मैदानावर उस्बेक व तार्तर याच्यासह बाबरासारखा पराक्रमी सिंह आडवा आला नसता, तर दिल्लीचें तक्तहि काबीज करून सार्वभौम राज्यपद प्राप्त करून घेता आलें असतें. तो इतका लोकप्रिय व सामर्थ्यवान् होता, कीं, तो जेव्हा समरागणावर निघाला तेव्हा त्याचेबरोबर ऐशीं हजार घोडेस्वार, महान् वैभवशाली सात राजे, नऊ राव, 'रावल आणि राउत'या नावाखाली निघालेले एकशेचार मुख्य सेनापति, आणि पाचशें हत्ती, इतका जमाव होता. आग्र्यापासून दहा कोसांवर शिक्री म्हणून

ठिकाण आहे, तेथे बाबराचा व त्याचा मोठा निकराचा संग्राम झाला, व त्यांत जरी विश्वासघातामुळे त्याला अपयश आले तरी त्याच्या कीर्तीस यत्किंचित्‌हि धक्का पोहोचला नाही.

कोठे पित्याचे वैभव, व कोठे त्याचा मुलगा विक्रमाजित याची निरानंद कारकीर्द ! विक्रमाजिताची कारकीर्द स्वतःला व त्याच्या प्रजेला–उभयतानां, मोठी हालाची होऊन गेली औद्धत्य, विषयलंपटता व खुनशीपणा हे दुर्गुण विक्रमाजिताच्या ठायी होते शिवाय, आपल्या मानी सरदाराचा जेथे योग्य आदर ठेवावयाचा तेथे त्याच्या अवमानाची इतकी परमावधि झाली होती, कीं, शेवटी तेच सरदार त्याच्याविरुद्ध उठून त्याला आपल्या प्राणास मुकावे लागलें ! कर्नल टॉड याचे कारण असें सांगतात.—"राजा म्हणजे ईश्वरी अंश असे रजपूत लोक मानतात, व निश्चळपणे त्याच्या आज्ञेत रहावे अशी त्याच्या धर्माचीहि आज्ञा आहे याचे फळ त्याना परलोकीं मिळते. तथापि प्रत्येक गोष्टीला मर्यादा म्हणून असते, त्याप्रमाणे या समजुतीलाहि मर्यादा ही आहेच. जेथे राजे आपल्या दुष्कर्मांनी राज्याला संकटात घालीत असतात तेथे त्याना पदच्युत होण्याची पाळी आलेली उदाहरणे इतिहासात विपुल आढळतात. पण त्याना आवरून धरणारा प्रेमाचा तसाच दराऱ्याचा एक पाश असतो; तो पितृत्वाच्या नात्याने आपल्या प्रजेवर जो अमल गाजवीत असतो, त्यातील कडकपणाला थोडे मार्दव आणीत असतो कारण, या राजाचे आपल्या प्रजेशी पिता आणि राजा असें उभयविध नाते असते. हे काल्पनिक नाते नसून अगदी यथार्थ आहे कारण, राजा हा शिष्टजनसत्ताक राज्याच्या सामान्य पूर्वजाचाच प्रतिनिधि असतो तोच एकटा अखिल राजस्थानचा न्यायप्रवर्तक असतो."

"उदेसिंग हा विक्रमाजिताचा मुलगा असून तो पुढे मेवाडच्या गादीवर बसला. त्याची व त्याचा समकालीन बादशहा अकबर याची परस्पर तुलना करून पहा. दोघेहि एकाच वर्षी जन्मास आले बाळपणी दोघानाहि हाल अपेष्टा भोगाव्या लागल्या. तेजोहीनता व हद्दपारी यातच दोघेहि लहानाचे मोठे झाले पण उदेसिंगाच्या अंगी खऱ्या राजाचा एकहि गुण झळकला नाहीं, उलट अकबराने हिंदुस्थानात जे आजवर अत्यंत थोर राजपुरुष होऊन गेले त्यात आपली गणना करून घेतली" "अकबर हा दिल्लीच्या गादीवर व उदेसिंग हा मेवाडच्या गादीवर एकाच वेळीं बसले अकबर हा त्या वेळीं उदेसिंगाहून वयाने मोठा होता असे नाहीं." "तरीपण रजपूत व

मोगल याच्यातील परस्पर विरोध दाखवून तुलना करणे न्यायाचें मुळीच होणार नाही, असें कदाचित् लोक म्हणतील दैवदुर्विलसिताच्या अनुभवामुळें एकाला मानवी स्वभाव तंतोतंत ओळखण्याचे शिक्षण मिळाले, तर दुसऱ्याला बाळपणापासूनच आपल्या जन्मभूमीतील दऱ्यात कोंडून रहावे लागले. कोठे जन्मास आला याचा पत्ताहि नाही, व शिक्षण कसें ते मिळाले नाहीं" "मेवाडच्या राजाच्या ठायी असलेल्या राजसद्गुणाच्या अभावामुळें त्याचा दैवदुर्विपाकाच्या विषाचा पेला अगदी काठोकाठ भरून निघाला" "उदेसिंग हा मरण पावला त्या वेळी त्याचे वय सारे बेचाळीस वर्षांचे होते. तरीपण देशकीर्तीच्या व लोककल्याणाच्या दृष्टीनें त्याची कारकीर्द कधी सरते असे लोकाना झाले होते" त्याच्या कारकीर्दीत मेवाडची राजधानी चितोड ही हातातून गेली, व त्याने त्या गडावर एक नवीन राजवाडा बांधला. त्याच्या सभोवती लवकरच एक शहर वसलें. तेथे त्याचा दुर्लौकिक आजच्या घडीलाहि कायम आहे!

ही इतिहासातील स्थित्यतरे, आज चांगली तर उद्या वाईट कशीं असतात, हे लक्ष्यात ठेवण्याजोगे आहे. "उदेसिंगाच्या पाठीमागून त्याचा मुलगा प्रताप याला त्या प्रसिद्ध घराण्यातील पदव्याचा आणि कीर्तीचा मान मिळाला खरा, पण राजधानी नाही, संपत्ति नाही, सारे नातलग व वंशातले लोक अपयशानें अगदी हताश झालेले, अशी त्याची स्थिति होती. तरी त्याच्या वंशाचे थोर पाणी त्याच्या अंगात होते" आणि त्याच्या वंशात त्याच्या इतका पाणीदार पुरुष दुसरा कोणीहि झाला नाहीं, ही गोष्ट काही खोटी नाहीं. त्याच्या महत्त्वाकांक्षा फार मोठ्या होत्या व त्याने आपली सारी भिस्त बहुतेक स्वतःवरच ठेविली होती "कपटी मोगलाने त्याच्या धर्मातील व घराण्यातील संबंधी पुरुषाना चिथावून त्याच्या विरुद्ध उठविले होते. मारवाड, अंबर, बिकानेर व बुंदी येथील राजे अकबराला मिळाले होते, व तेहि त्याच्या मोंगलाईला हातभार लावीत होते फार काय, पण त्याचा प्रत्यक्ष सहोदर बंधु सागरजी हाहि त्याला सोडून गेला होता, व आपल्या घराण्यातील प्राचीन राजधानी व तदनुषंगिक मान एवढ्यावरच संतुष्ट होऊन त्यानें आपल्या भावाशीं अधम विश्वासघात करण्यास मागेपुढे पाहिलें नव्हते. हिंदुस्थानचा सारा इतिहास जरी धुंडाळून पाहिला, तरी त्यात प्रतापसिंहासारखा कीर्तिमान् राजपुरुष अन्य कोणीहि होऊन गेल्याचे सापडणार नाहीं. खुद्द अकबरालाहि त्यान

इतका मान नव्हता. खऱ्या वीराचीं व सताचीं लक्षणें त्याच्याठायीं जशीं मूर्तिमंत एकवटलेलीं होतीं, तशी तीं अन्य कोणत्याहि राजपुरुषाच्या ठायीं नव्हतीं; व तो सन्माननीय होता म्हणूनच त्याचा सन्मान झाला. स्वत थोर असल्यामुळेंच त्याला आश्रयहि थोर मिळाला." "त्याच्या सरदाराची त्याच्यावर जी निष्ठा होती तींत अतर पाडण्यासाठीं सपत्तीची व ऐश्वर्याची लालूच दाखविली असताहि त्याचा पक्ष सोडून जाण्याइतका अधमपणा करण्यास एकहि तयार झाला नाहीं!" देशकल्याणासाठीं स्वत ला व आपल्या प्रजेला केवढी कडक शिस्त त्यानें लावून दिली होती, हें तुम्हाला ठाऊक आहेच, व त्याची प्रजा आपल्या धन्याच्या "स्वदेशाभिमानयुक्त जाज्वल्यतेला" किती आनंदानें मान तुकवीत होती, देशाचें स्वातन्त्र्यरक्षण करण्यासाठीं व रजपूत घराण्याचें रक्त शुद्ध ठेवण्यासाठीं त्याने मुसलमानाविरुद्ध आमरण कसें निकरानें युद्ध केलें, हा सर्व वृत्तात तुम्हाला ठाऊक आहेच. त्या धुमश्चक्रींत त्याला अकबराच्या 'दे माय धरणी ठाय' करून सोडणाऱ्या सामर्थ्यालाच नुसतें तोंड द्यावें लागले एवढेंच केवळ नव्हे, तर स्वधर्मीय जातभाई धर्मांतर करून अकबराच्या पक्षाला जाऊन मिळण्यात जें उदाहरण घालून देत होते, त्यावरहि त्याला मनोजय मिळवावा लागला. शरण जावे तर धर्मांतर केल्यावांचून गति नाहीं, व न जावें तर जबरदस्त शत्रूशीं तोंड देऊन सामना करावयाचा. एकीकडे जातभाई अन्यधर्मीयाशीं शरीरसबंध करण्याचें उदाहरण घालून देत आहेत, तर दुसरीकडे स्वामिनिष्ठ सरदार नावासाठी लढण्यास उत्तेजन देत आहेत, असा एकीकडे आड व एकीकडे विहीर याच्या 'भयकर कचाटींत' सापडला असताहि त्याने आपल्या अगचे धैर्य रतिभरसुद्धां ढळूं दिलें नाहीं! बेइमान लोकात तोच एकटा विश्वासू होता. आपल्या पूर्वजाचा थोर लौकिक, स्वत ची कीर्ति व सत्कर्तव्यजागृति, या सर्वांच्या नावाला तोच एकटा जागला. जवळ अडका नाहीं, शत्रु आणि सकटे हात धुवून पाठीस लागलेली, अशी जरी त्याची स्थिति होती, तरी त्यानें आमरण थोरपणाला व वैभवाला साजेल असाच आपला बाणा ठेविला होता. त्याचा जन्म जसा दारिद्र्यात झाला होता तसेंच त्याला मरणहि दारिद्र्यात आलें. निकृष्टदशेला ऊर्जितावस्था आणण्यास झंजावे ...णाराला हीच स्थिति अगदीं योग्य, अशी त्याची भावना होती. ...्या झोंपडींत बिछान्यावर आसन्नमरण होऊन पडला असता, आपल्या ...ारिद्र्यावस्थेपेक्षा ऐषारामात आयुष्य घालविणें अधिक पसंत वाटेल काय,

## आपलें वजन अथवा वर्चस्व.

झोपडींत राहण्यापेक्षां राजमदिरातील विलासात राहणें त्याला अ... पसत वाटेल काय, असे दु:खोद्गार त्याने आपल्या मुखावाटे काढि... सरदाराना उद्देशून तो म्हणाला "या झोंपड्या जाऊन येथे मोठमो... राजमंदिरे उभारण्यांत येतील, अशा रीतीने सौख्यासक्तीचा उदय होईल ऐष आराम व तदनुषगिक दुर्गुण वाढीस लागतील, आणि या सर्व ... जें मेवाडचे स्वातंत्र्य कायम राखण्यास आज आपणास रक्त ... लागलें ते पुढे बळी पडल्यावाचून राहणार नाहीं माझ्या सरदारांनों ! ... कित्ता तुम्हीहि कदाचित् गिरवाल" येथे एक गोष्ट तुमच्या ल... आलीच असेल. ती ही, कीं, आपणास जसें वाटतें तसेंच त्यालाहि वाट... होतें, कीं, प्रत्येक गोष्ट राज्यकर्त्यांच्या स्वत:च्या इभ्रतीवर व उदाहरणावरच अवलंबून असते. पण त्याच्या सरदारानीं त्याला उत्तर दिलें "बापा रावळ... शपथ घेऊन आम्ही असें अभिवचन देतों व हमी घेतों, कीं, ... स्वातंत्र्य पुनः परत मिळेपर्यंत येथे एकहि राजवाडा आम्ही उठू देण... हें ऐकून प्रतापाच्या आत्म्याला अत्यंत समाधान वाटलें व ... त्याने शेवटचा सुस्कारा टाकून सर्वांचा अखेरचा निरोप ... प्रतापसिंह इहलोक सोडून गेला आहे खरा, तरी पण खनिर... महत्त्व्याप्रमाणें त्याच्या थोर नावाची कीर्ति अजरामर होऊन ... त्याचे इतके

1. टॉड्कृत राजस्थानचा इतिहास, भाग 11 या सालवार ... गीतून, दिल्लीचा आद्य सम्राट खनिखानन याने आपल्या मातृभाषेत केलेल्या का... मिळतात या थोर रजपुताच्या पराक्रमाची प्रशसा करण्याच्या व त्याच्या दीर्घोद्... हेतूने त्याला उद्देशून म्हटलेल्या आहेत "या जगातील यच्चयावत् ... भूमि आणि संपत्ति हीं नाहींशीं होतील, पण मोठ्या नावाची कीर्ति मात्र अजरामर ... राहील। पुट्टोने (प्रतापानें) संपत्तीवर व भूमीवर तिलाजलि सोडला, पण आपले ... म्हणून त्यानें कधींहि वाकविले नाही। हिंदच्या यच्चयावत् राजपुरुषात ज्यानें आपल्या वंशाच... आपला बाणा कायम ठेविला असा तोच एकटा होय !"

प्राचीन मेक्सीकोच्या राजान आपल्या एका कवितेत यासारखेच उद्गार काढिलेले आहेत त्याची येथें आठवण झाल्यावाचून राहत नाहीं ज्या वेळी दिल्लीच्या तक्तावर लोदी घराणे राज्य करीत होतें त्याच वेळीं हा राजा मेक्सीकोच्या प्राचीन राजधानीच्या शहरीं राज्य करीत होता त्याने उद्गार येणेप्रमाणे:—

"... आठवण राष्ट्रातून कधींहि बुजली जाणार नाहीं, व तुझ्या हातून जीं सत्कर्में घडलीं आहेत त्याबद्दल तुझी कीर्ति दिगतरीं अजरामर होईल"

म होते ते जावत्कालपर्यंत कायम राहतील तावत्कालपर्यंत गजोचित गोष्टींचे, अचलवृत्तीचे, व खऱ्या बाणेदारपणाचें लक्षण नाव चिरंतन राहील

त त्या प्रतापाचें व इतर सर्व लोकांचे वैभव आज आपल्याला

३८. आहे, तोच इतिहासाचा खरा उपयोग होय इतर लोकांचा

अनुभव म इतिहासात वाचावयास सापडतो तो आपल्या स्वत च्या आयुष्यातील ला मार्ग दाखवीत असतो जे मागे होऊन गेलें तेच पुढें होण्याचा आहे, व होईलहि आणि मागे लोकांच्या हातून जे घडलें तेच ल गातून पुढेहि होण्याचा संभव आहे मागची कामे करणारी माणसेच पुढेहि माणसेच कामे करतील इतिहासातील परमोच्च ध्येय आपण अ ठेवावे ज्याचे आपणास अनुकरण करिता येईल व ज्याची प्रशंसा गाता असें प्रतापासारखे अनुकरणार्ह व प्रशंसार्ह एकादे थोर उदाहरण आपल्या दृष्टीसमोर ठेवावे बहुतकरून प्रत्येक मनूत व प्रत्येक विभूति जन्मास येऊन गेलेल्या आहेत; पण इतिहासाचा मुख्य म्हणजे एवढाच, कीं, तो सर्व काळच्या व सर्व ठिकाणच्या वीरपुरुषांचे आपणास करून देत असतो साराश, अखिल जगाच्या अनुभ हजारो वर्षांत ज्या अत्यंत श्रेष्ठ, थोर व कित्ता घेण्या विभूती उदय पावून गेल्या, त्यांपैकी आपल्याला अनुकरणार्ह अ आपण निवडून घ्यावे. जेव्हा तुम्ही इतिहासाचे कराल तेव्हा या गोष्टीचा अवश्य विचार करा. ज्या वैभवाविषयी तुम्हाला सापडेल तिचें अनुकरण कर करा जे थोर पुरुषांनी आजवर केलें तेच तुम्हालाहि करता येईल.

हि त्यांच्याप्रमाणेच माणसे आहात विशेषकरून थोर पुरुषांचे वर्तन अनुकरणार्ह असते, व त्यांनी आपल्या नैतिक वर्तनाने लोकांवर वर्चस्व बसविलें होतें तसें त्यांच्याप्रमाणेच वर्तन ठेवून तुम्हालाहि इतर लोकांवर आपले वजन पाडता येईल.

तुम्हालाहि पुढे मोठेपणी सत्ता चालविण्याचा प्रसंग येईल, व वयाच्या मानाने हल्लीहि तुमचे वजन फार आहे म्हणून महत्पदास चढण्याचा व आपल्या वजनाचा अत्यंत श्रेष्ठ व उदात्त रीतीनें उपयोग करण्याचा तुम्ही

प्रयत्न करा. लोकाची स्थिति सुधार० पलें वजन चागल्या रीतीने ठेवणे, हाच वैभवाचा खरा अर्थ आहे रुग्बी येथील पूर्वीचे हेड-मास्तर डाक्तर टेंपल् याच्याच लेखातील अवतरण मी मथाळयावर दिलें आहे, व हे पुढील उद्गारहि त्याचेच आहेत —"कोणत्या प्रकारच्या मनुष्याला आपण थोर म्हणतों याचें जर आपण बारकाईने परीक्षण केले, तर जगात जे लोकनायक असतात, स्वदेशबाधवाना सन्मार्गाने जे नेत असतात, तेच थोर पुरुष होत, अशी त्याची व्याख्या आपल्या नजरेस आल्यावाचून राहणार नाहीं केवळ हुशारीबद्दल अथवा हुशारीचे फळ जें लौकिक, यश तेवढ्यावरूनच आपण एकाद्याला थोर अशी सज्ञा काहीं देत नाही. तसेंच, एकाद्याच्या ठायी नुसता अतिशय चागुलपणा असून लोकाना मार्गदर्शक असा एकहि गुण त्याच्या अगी नसेल, व त्या चागुलपणाबद्दल लोकाना नुसते आदरयुक्त आश्चर्य वाटेल, तर त्यालाहि थोर पुरुष असें आपणास म्हणता येणार नाहीं. उलट ज्याच्या अगी सामान्य जनतेपेक्षा असा काहींतरी विशेष गुण असतो, की, त्या गुणावर लोक लुब्ध होऊन तो नेईल त्या मार्गाने जाण्यास, त्याचे सामर्थ्य कबूल करण्यास, उपदेशानुसार वागण्यास व त्याने घालून दिलेल्या मार्गाची प्रशंसा क ते अगदी तयार असतात, त्यालाच थोर पुरुष म्हणावे. अशा थोर पुरुषाच्या ठायी हे गुण खात्रीने आढळल्यावाचून राहत नाहींत. मनाचा मोठेपणा, स्वमताविषयी दृढाभिमान व अढळ निश्चय, हे गुणहि त्याच्या ठायी दृष्टीस पडतात."

लोकनायक होण्याचा जन्मत.च हक्क जरी तुम्हाला मिळाला तरी थोर निपजण्याचा तुम्ही प्रयत्न अवश्य करावा इतराना श व सन्मार्गाने नेता येईल अशा रीतीने तुम्ही आपल्या वजनाचा डाक्तर टेंपल ह्यानी केलेल्या उपदेशाप्रमाणे मानसिक औद व अढळ निश्चय हे गुण अगी आणण्याचा तुम्हीं प्रयत्न थोर पुरुषाची चरित्रें तुम्ही अत्यत काळजीपूर्वक अव अध्ययन करा, व आत्मनिरीक्षणहि करा. जर ज्ञान नसेल, स्वत लाच जर तुम्हाला तर दुसऱ्याला उपदेश तो तुम्ही काय ते कसे नेणार? पुढारीपणातहि वा मुळीच म्हणत नाहींत. याचा

विक्रमाजित, बुनवीर आणि उदेसिंग यांच्या निकृष्ट व विपद्ग्रस्त चरित्रात आपणास पहावयास सांपडतो. अशीं करुणार्ह उदाहरणें—यांना उदाहरणें म्हणण्याऐवजीं कानउघाडणी करणारे उपदेश हेच नांव अधिक शोभतें— इतिहासातजागोजाग विपुल आढळतात. तीं आपणास कानउघाडणी करून सागत आहेत, कीं, बाबानों, मोठमोठ्या प्रसगींहि मनुष्याच्या हातून किती अधमपणाचें व लज्जास्पद वर्तन घडत असतें. प्राचीन व अर्वाचीन इतिहासात असल्या गोष्टीचीं उदाहरणें अद्वितीय झालीं आहेत असें नाहीं; पण आपण नेहमीं चागलें असेल तेच पहात असावे. प्रताप व अकबर यांच्यासारख्या वीर विभूतींचीच चरित्रें आपण अवलोकन करावींत, व असलीं चरित्रें आपणास उपलब्ध करून दिल्याबद्दल इतिहासकाराचे आभार मानावेत असलीं उदात्त उदाहरणे जरी फार नसलीं, तरी जीं काहीं थोडीशी आहेत तींच इतिहासातरिक्षात नक्षत्राप्रमाणे विशेष तेजाने एकसारखीं झळकत आहेत. मनुष्याने आपल्या वजनाचा जर योग्यपणें उपयोग केला, तर त्याला काय करिता येईल हें तीं स्पष्टपणें आपणास दाखवीत आहेत. विशेषेंकरून तीं आपणास असें सागत आहेत, कीं, ज्या थोर व सुशील विभूतीला लोकना .. . काम करावयाचें असतें त्याला नेहमीं स्वावलंबनाने, लोकमताची पर्वा न करिता व आपल्या स्वत:च्याच ठाम मतानुरूप ...न केल्यावाचून गत्यंतरच नसते अशा तऱ्हेचें वर्तन करण्यास निश्चयाचें ... मोठे जबर असावे लागतें सौख्यावर तिलाजलि सोडून कर्तव्य-...अढळतेने चिकटून रहावे लागतें इतर रजपूत घराण्यातील लोक ...गाळून देत होते त्याची पर्वा न करिता, व स्वत एवढी मोठी ... सोसून, स्वत च्या दृष्टीने जो योग्य मार्ग वाटला ... प्रतापसिंहानें जें स्वावलबन दाखविलें ते उदाहरण ... सर्व राजस्थानातून असा घोष निघत आहे, ...ल्या घराण्याचा बाणा कायम राखला, असा ... सारे हिंदुलोक त्याला संत व वीर ... आहेत.

---

...गर केल्यावर उदेसिंग हा मेवाडच्या

जी गोष्ट तुमच्या मनावर बिंबवावी अशी माझी इच्छा आहे ती हीच होय. प्रतापानें आपल्या सामर्थ्याचा व वजनाचा ज्याप्रमाणें उपयोग केला, त्याप्रमाणे तुम्हीहि करा. अमुक एकादा मार्ग अगदी योग्य आहे अशी तुमच्या मनाची खात्री झाल्यावर मग इतर लोक काय म्हणतील याची मुळींच पर्वा न करिता, कितीहि अडथळे आले तरी त्याना न जुमानता, अढळ निश्चयाने त्याचाच अवलंब करा; काहींहि झालें त्याची चिकाटी सोडू नका! हें करणे सोपे काम नाहीं, ते नेहमी फार जड जाते. लोकाचार जरी योग्य नसला, तरी लोकाचारापेक्षा योग्य गोष्ट करणेच अधिक कठीण असतें तथापि तुम्हाला जर खरे लोकनायक होण्याची इच्छा असेल, खऱ्या महत्पदाला चढावे असें वाटत असेल, तर अमुक एकादी गोष्ट सत्य आहे अशी मनाची एकदा खात्री झाल्यावर, काहीं झालें तरी ती करण्यास चुकू नका. प्रत्यक्ष पचप्राण जरी खर्ची घालावे लागले, तरी तुम्ही कर्तव्य करण्यात मागें सरू नका! कोणतीहि गोष्ट वाईट आहे अशी तुमच्या मनाची पक्की खातरी झाली असतां, लोकांत जरी ती सामान्यत्वेकरून प्रचारात असली तरीसुद्धा ती करावयाची नाही असा अगदी दृढ निश्चय करा, व लोकानाहि तिच्यापासून परावृत्त करण्याचे कामी तुम्ही आपलें सारे वजन खर्च करा। लोकाना परावृत्त करण्याचे अगोदर तुमच्या ठायी मात्र ती गोष्ट न करण्याबद्दल अगदीं अढळ निश्चय असला पाहिजे. सागण्यास फार वाईट वाटते, कीं, अशा तऱ्हेचे वर्तन तर दूरच राहिले, पण केव्हा केव्हा असा प्रकार नजरेस पडतो, कीं, जी गोष्ट लोकानीं करूं नये अशी ज्या सस्थानाधिपतीची इच्छा असते ती तो स्वत च करीत असतो! आपल्याहून कनिष्ठ लोकानी जी गोष्ट करू नये ती करणें त्या काहीं मोठें जड नसते! त्याचे वर्तन कितीहि अपवित्र व स्वच्छदानुरोधी तरी त्याबद्दल त्याची निर्भर्त्सना करण्याची कोणाचीहि छाती नसते इच्छेला अनुसरून चागुलपणाच्या आणि सत्याच्या मार्गाने मान मिळविण्याऐवजी स्वत च्या हलकट छदानी तो म्हणून तोंडावर स्पष्टपणें सागण्यास कोणीहि पुढे येत नसतो.

मनुस्मृतीत सागितलेली क्षत्रियाचीं पाच मुग ध्यानात ठेवाल तर तुम्हालाहि प्रतापसिंहा राहणार नाहीं.

**प्रजानां रक्षणं दानमिज्याध्ययनमेव च ।**
**विषयेष्वप्रसक्तिश्च क्षत्रियस्य समासतः ॥**

—मनुस्मृति, अ. १ ला, श्लो. ८९.

स्वतःला जसें सुख मिळतें तसेंच आपल्या सभोंवतालच्या सर्व लोकांनां आपल्या वजनानें ज्याला सुखी करतां येतें, अशा अधिकारपदसंपन्न सज्जन माणसाच्या जीविताहून अधिक थोर व उदात्त अशी अन्य जीवनदशा साऱ्या जगांत सांपडणें शक्य नाहीं. उलटपक्षीं, अधिकार प्राप्त होऊन जो आपल्या वजनाचा दुरुपयोग करीत असतो, अशा दुराचारी माणसाच्या निकृष्ट जीवनदशेहून अधिक निकृष्ट अशी अन्य जीवनदशाहि सांपडणार नाहीं. निष्काळजीपणानें असली जीवनदशा विपत्तिसंचयाला जी कारणीभूत होत असते, तिचा विचार करणें देखील मोठें भयप्रद आहे. असला मनुष्य स्वतःच पापाचरणाचा धनी होत असतो, एवढेंच केवळ नव्हे, तर आपल्या अंगच्या वजनामुळें लोकांनांहि तो पापाच्या खड्डयांत ढकलीत असतो. आपला आपणच तो घात करीत असतो, असें केवळ नसून आपल्या शेजाऱ्याचाहि तो घात करीत असतो. भगवद्गीतेंत म्हटलें आहे:—

**समं सर्वेषु भूतेषु तिष्ठंतं परमेश्वरं ।**
**विनश्यत्स्वविनश्यंतं यः पश्यति स पश्यति ॥ १ ॥**

वार्थ:— अ. १३-२७.

**'देह त्यागितां कीर्ति मागें उरावी'**

अमरत्व होय.

# रीतभात—सभ्यपणा.

मनसि वचसि काये पुण्यपीयूषपूर्णा-
स्त्रिभुवनमुपकारश्रेणिभि प्रीणयन्त ।
परगुणपरमाणून्पर्वतीकृत्य नित्य
निजहृदि विकसन्तः सन्ति सन्त' कियन्तः ॥

—भर्तृहरि.

"मन, वाणी आणि देह याच्या पुण्यामृताने भरलेले अनेक उपकार करून त्रिभुवनाला सुखी करणारे, व दुसऱ्याच्या परमाणुतुल्य गुणास पर्वताप्रमाणे लेखून मनात हर्ष पावणारे सत किती निघतील बरे?"

"सुनीति आणि सुरीति हे आयुष्याला शोभा देणारे दोन अलकार आहेत त्याचे माहात्म्य स्मृतीहूनहि अधिक श्रेष्ठ आहे स्मृति या केवळ त्याच्या रूपाचे आविष्करण होत कायद्याचा आपल्याशी सबध अधूनमधून येतो, पण रीतीभातीचा सबध मात्र हरघडी व सर्वत्र येतो प्राणवायूप्रमाणे रीतीभातीने सर्व समाजाला व्यापून टाकले आहे ज्याला आपण चागली रीतभात म्हणून म्हणतो ती चागल्या वागणुकीपेक्षा अधिकहि नसते अथवा कमीहि नसते सभ्यपणा व दयालुत्व याचा त्यात समावेश होतो मनुष्यामनुष्यातील परस्पर हितावह व आनददायक असे दळणवळणाचे जेवढे म्हणून प्रकार आहेत त्या सर्वात परोपकार हे एक प्रधान तत्व आहे लेडी मोटेग याना म्हटले आहे, सभ्यपणाला कवडीहि खर्चावी लागत नाही, असे असूनहि वाटेल ती वस्तु आपल्या जवळ करण्याचे त्याच्याठायी सामर्थ्य असते"

—Smiles's "Self—Help"

"Manners are not idle, but the Fruit
Of noble nature and of loyal mind"

—Tennyson.

"स्वभावात थोरपणा व मनाच्या ठायी सभ्यपणा नसून नुसत्या बाह्य बसण्याउठण्य व वस्त्रपात्राची टाकठिकी करून सभ्यपणाचे सोग आणणे व्यर्थ आहे"

चागल्या रीतीभातींसबधीं तुम्हाला काहीं थोडे सागावे, अशी म
फार दिवसापासून इच्छा होती. हा विषयच असा आहे, कीं
दररोज प्रत्येक घटकेस त्याचे महत्त्व आहे, ई तुम्ही च
रीतीभाती व वाईट रीतीभाती, दाडगेपणाच्या सव
याचा परस्परांतील भेद आपणा सर्वांना ठाऊक
मानापमान वाढण्यास त्या कशा कारणीभू
आहेच. तुम्हालाहि समाजात राहा

पुढारी म्हणून वागावयाचें आहे, तुम्ही सर्वांच्या नजरेस पडणार आहांत, तुम्हांला सर्वांकडून आदर करून घ्यावयाचा आहे. तेव्हा तुमच्यासारख्यांच्या दृष्टीनें सभ्यपणाच्या उत्कर्षाची बाब ही खरोखर अत्यंत महत्त्वाची होय. कारण, येथून पुढें लोकात जी तुमची योग्यता व मान्यता होणार व त्याच्यांवर तुमचें जें वजन पडणार, तें सर्व तुमच्या अगच्या रीतीभातीवरच बहुतेक अशीं अवलंबून राहील. ग्राम्य मनुष्यासारखें जर तुम्ही आपलें वर्तन ठेवू लागाल, तर लोकात तुमची किमत तितकीच होईल व तेहि तुम्हाला त्याच्यासारखेच वागवितील. तुम्ही जर सभ्यपणानें वागाल तर लोक तुम्हाला सभ्यपणाने वागवितील. कोठेहि गेलात तरी सभ्यपणाला जो लौकिक व मान आहे तो तुम्हाला मिळाल्यावाचून राहणार नाहीं.

सभ्यपणा म्हणजे काय? सभ्य कोणाला म्हणावें? याचा उल्लेख मागे एक वार झालेलाच आहे. नुसत्या बाह्य आचरणातील चागल्या रीतीभातींवरून जरी कदाचित् एकाद्याला सभ्य म्हणून म्हणता येणार नाहीं, तरीपण एकदरीनें सभ्यपणाचे जे गुण आहेत त्यापैकींच रीतीभाती हा एक भाग आहे हें खचित. मनाचा सभ्यपणा नसून केवळ बाह्य आचरणांतील रीतीभातींचा व्यर्थ डौल एकाद्याच्या ठायीं असण्याचा फार सभव आहे, नाहीं असें नाहीं. तरीपण ज्याच्या रीतीभातीत सभ्यपणा नसतो त्याला पूर्णार्थानें सभ्य असें खरोखर म्हणताच येणार नाहीं कारण, सभ्यपणा हा मनुष्याच्या बाह्य गुणापैकीं एक अलकार होय. आणि तुम्हाला तर जन्मत', शिक्षणाने व अनेक तऱ्हेच्या सस्काराने अप्रतिम सभ्यपणाचे यच्चयावत् लाभ झालेले आहेत. तेव्हा तुम्हीं ...भात आचारसौष्ठवाची आणखी भर घालण्याची खरोखर फारच दक्षता ...हिजे

...ाणीने आणि कृतीनें, अभिनयानें आणि मुद्रेनें आपण आपल्या ...ुखावह होऊं अशा तऱ्हेचे आचरण नित्य ठेवणे, यालाच ...ण्यास हरकत नाहीं.

...ास तीन वर्ग करिता येतील:—

...रीतीभाती.

... दिसून येणाऱ्या रीतीभाती.

[illegible]

**(१) बोलण्याचालण्यांत दिसून येणाऱ्या चांगल्या रीतिभाती.** आपल्या मुखावाटे निघणारे शब्द हे अर्थात्च अत्यंत महत्त्वाचे असतात. शब्दांनी आपण आपल्या मनातील विचार व्यक्त करून दाखवीत असतो. आपल्या सभोंतालचे लोक आपल्या खऱ्या योग्यतेची जी परीक्षा करीत असतात, ती अन्य कोणत्याहि साधनापेक्षा आपल्या वाणीवरूनच अधिक करीत असतात आता, आपली वाणी इतराना प्रिय वाटण्यास ती सौजन्य-युक्त, प्रेमळ, मृदु, कर्णमधुर व अर्थमधुर–ऐकणाराच्या कानाला तसेंच मनाला आनंद वाटेल इतक्या कोमलतेने उच्चारिलेली–अशी अवश्य असावी लागते. कठोर आणि दाडगेपणाची भाषा लोकाना अतिशय त्रासदायक वाटते, हे तुम्हा सर्वांना ठाऊक आहेच,—खालच्या वर्गातील अडाणी लोकाची नेहमीची भाषासुद्धा किती उद्धट आणि ग्राम्य असते—तसेच हलकट लोकाच्या तोंडी जी नेहमी अमंगल भाषा भरलेली असते तिच्यापासून लोकाना किती त्रास होतो शपथ घेण्याचा प्रकारहि अर्थात् याच वर्गातला. मला वाटते, देवाच्या आणि पवित्र वस्तूच्या नावाचा निष्काळजीपणानें उपयोग करणें हेसुद्धा तितकेंच त्रासदायक असतें. देवाधर्मादिकाची गंभीर नावें इतकीं पवित्र असतात, कीं, ती व्यावहारिक भाषणाच्या सामान्य ओघात वाटेल तशी अविचारानें वापरता येत नाहींत.

शब्दाची निवड, कोणाजवळ कोणती भाषा वापरावयाची हा विचार, अत्यंत महत्त्वाचा आहे, हे लक्ष्यात ठेवा. कारण, बोलणाराचे शब्द आपल्या मनात अगदी खोल शिरत असतात उच्चार हे केवळ विचार व्यक्त करून दाखविणारे शब्दप्रयोग होत, व जर आपले विचार चागले असतील तर ते व्यक्त करून दाखविणारे उच्चारसुद्धा चागले निघतील हृदय उचंबळून येऊन विचार जेव्हा आत राहीनातसे होतात, तेव्हाच उच्चार मुखावाटे बाहेर पडतात, व हृदयातील विचारात–मनाचे ठायी- सभ्यपणा असला म्हणजे मुखावाटे निघणारे उच्चारहि सभ्यपणाचे निघतात. अर्थात्, आपल्या वाणीत सौजन्य दिसावें म्हणून आपल्या विचारात सभ्यपणा आपणास ठेवलाच पाहिजे.

आपण जी भाषा वापरतों अथवा ज्या रीतीनें, ज्या स्वरानें आपण बोलतो, त्यावरच केवळ चागल्या रीतीभाती अवलबून असतात असें नव्हे तर त्या आपण जे काहीं म्हणतो त्याच्या अर्थावर अधिक अवलंबून असतात. **आपल्या बोलण्याच्या अर्थानें लोकांनां आनंद वाटेल अशी**

**तुम्हीं खबरदारी घ्या.** अप्रस्तुत काळी, भलत्या वेळी, भलतेच शब्द उच्चारण्याची कित्येक लोकाना मोठी वाईट खोड असते प्रत्यक्ष शब्द जात्या वावगे नसतात पण ज्या वेळी अथवा ज्या ठिकाणी ते बोलण्यात येतात, त्या काळाला अथवा त्या स्थळाला ते अगदीच अप्रस्तुत व मनाला आनद न वाटणारे असे असतात. कित्येकाना अशी सवय असते, कीं, एकादी नवी वस्तु दृष्टीस पडली म्हणजे 'काय हो याला काय पडले ?' असें विचारिल्यावाचून त्याना ती पाहताच येत नाहीं ! असा प्रश्न करणे हे फारच वाईट चालीरीतीचे लक्षण आहे त्यासारखा असभ्यपणा नाही कित्येक तर असे असतात, की, त्याच्या आवडीची अशी एकादी वस्तु त्याच्या नजरेस पडावयाचाच उशीर, कीं 'आम्हाला ही एवढी द्या बोवा,' असे म्हणण्यास ते मागेपुढे पाहत नाहींत ! हाहि असभ्यपणातलाच प्रकार आहे कित्येक अन्नाच्या अथवा द्रव्याच्याच गोष्टी बोलतील, तर कित्येक कंटाळवाण्या व्याधीच्या अथवा कौटुंबिक हालअपेष्टाच्या अथवा एकाद्या त्रासदायक विषयाच्या गोष्टीचा अशा रीतीने उल्लेख करीत असतात, की, तेणेकरून ऐकणाराच्या मनाला सताप आल्यावाचून राहत नाही हे सारे प्रश्न आणि या टीका वाईट रीतीभातीचे द्योतक होत त्याच्यामुळे बोलणाऱ्याच्या मनाच्या वाईट आणि हलकट सवयींची परीक्षा होते. म्हणून या गोष्टी जितक्या टाळता येतील तितक्या टाळण्याची तुम्ही खबरदारी घ्या

उगीच वाजवीपेक्षा फाजील कधी बोलू नये. असे बोलणे नेहमी टाळावे. तुम्हाला जे काही सागावयाचे असेल ते नीट सभ्यपणाने सागा. फाजील स्तुति करू नका हिंदुस्थानातील लोकात अतिशयोक्तीनें बोलण्याचा फार प्रघात आहे याचे उदाहरण मी एक तुह्माला सागतो मी जेव्हा इग्लंडात होतों, तेव्हा माझ्या एका स्नेह्याने मला पत्र लिहून कळविले, कीं, 'तुमच्या कृपेमुळे मला टेनिस् मॅच् जिंकता आली.' यावरून मला एका गोष्टीची आठवण होते, ती अशी. बंगालचे लेफ्टनंट गव्हर्नर हे एकदा तेथील एका शाळेची तपासणी करण्यासाठी गेले होते. त्या वेळीं त्यानी मुलाना असा प्रश्न विचारला "जगात कसें काय चाललें आहे ?" त्यावर "आपल्या उदार आश्रयाने ठीक आहे!" असें उत्तर मिळाले. ही भाषा जितकी मूर्खपणाची, तितकीच ती खोटी असून तिच्यामुळें प्रश्नाच्या मूळ हेतूचाच बिघाड होतो.

अतिशयोक्तीचें आणखी एक उदाहरण येथे सागण्यासारखें आहे. त्यात घरच्याघरीच दिवे ओवाळून घेण्याचा प्रकार आहे ते तुम्ही विशेषेकरून लक्ष्यात ठेवा ज्या पदव्या आपल्याला नसतात, त्याचा नसता डौल मिरविणे अथवा अगी लावून घेणे, हेसुद्धा चागल्या रीतीभातात मोडत नाही हे वाईट अभिरुचीचे व वाईट चालीरीतीचे लक्षण आहे, असेच नेहमीं समजावे 'हिज हायनेस,' 'महाराजा,' 'राजा,' 'कुमार,' 'एस्कायर्' व अशाच इतर मानाच्या पदव्या आपल्या नावाना लावण्याची कित्येकाना हौस असते अशा पदव्या लावण्याचा त्याना हक्क नसतो, एवढेच नव्हे, तर हक्काची छायासुद्धा नसते. पण आपण होऊन त्या कित्येक घेत असतात व दुसऱ्यांनी दिल्या असता त्याना डोलावीत असतात नसत्या पदव्या धारण करणे म्हणजे स्वत चा उपहास करून घेण्यासारखे होय अशान लोकात आपल्या पोकळ डौलाची व ग्राम्यपणाची परीक्षा झाल्यावाचून राहत नाहीं आत्मश्लाघा ही शिफारस नव्हे, तर उलट ती त्याच्या अगदीं विरुद्ध आहे तुमचे जे नाव असेल, तुमची जी योग्यता असेल, त्या नावानेच तुम्ही लोकात वागा त्यात किंचित्हि कमीजास्ती होऊं देऊ नका तेच तुमचे खरे वैभव म्हणून समजा खोटेपणा कधीहि वैभवास चढत नाहीं मनुष्याच्या अगी प्रामाणिकपणा पाहिजे त्याच्यावाचून नुसता दिखाऊ सभ्यपणा हा मुलाम्यासारखा असतो.

लोकावर टीका करावयाची झाल्यास ती विनयपूर्वक करा. आपल्याहून जे वयाने व ज्ञानाने थोर आहेत त्याच्याशी वितडवाद करूं नये मत देण्याचाच प्रसग आला तर ते सभ्यपणाने व नम्रतेने द्यावे

अन्य ठिकाणच्यापेक्षा फार करून येथे हिंदुस्थानातच आपल्या नेहमी असे ऐकिवात येते, की, जे कोणी सत्ताधारी असतील, त्याच्यावर लोक फार घाईने व अज्ञानाने तोडसुख घेत असतात. फार काय, पण आपण असेहि ऐकतो, कीं, ज्याचें शिक्षण बेताबाताचें व वस्तुस्थितीचे ज्ञानहि बहुतेक शून्यच असते, असली माणसे सरकारच्या कृत्याचा दोषैकदृष्टीने निषेध करीत असतात असली टीका फारच त्रासदायक असते. ते अज्ञानाचे उद्धट अपत्यच नव्हे काय ?

साराश, आपल्या वरिष्ठ अधिकाऱ्यासबंधीं व विशेषत सरकारी अधिकाऱ्या-विषयीं आपण आदरानें बोलण्याची खबरदारी घ्यावी. जे कोणी सत्ताधारी

असतात ते ईश्वरी योजनेनें असतात, हे मी मागे एकदा सागितलेंच आहे. आपण असे कोण आहोंत, कीं, त्याचा आपण निषेध करावा ?

अखेरीस तुम्हाला एवढेच सागावयाचे आहे, की, धर्माच्या बाबतीत वाद म्हणून कधींहि करू नका धर्म म्हणजे तर्कशास्त्राची काहीं बाब नव्हे. ती श्रद्धेचीच बाब आहे धार्मिक वादविवाद नेहमी विकोपास जात असतात. बोलण्याच्या भरात मनुष्य आपला सभ्यपणा विसरून बेसुमार होतो आणि त्याचा शेवट तंट्यात होतो.

**(२) वर्तणुकींत दिसून येणाऱ्या चांगल्या चालीरीति.** आपल्या वाणीप्रमाणे आपली कृति हीसुद्धा आनंदकारक असली पाहिजे. तुम्ही जे काहीं कराल, त्या सर्वांत, सर्व काळी, सर्व ठिकाणी, शाळेत, खेळण्याच्या ठिकाणी, घोड्यावर बसून सहल अथवा शिकार करावयास गेला असता, अथवा तुमच्या बसावयाच्या खोलीत, तुम्ही आपले वर्तन सौजन्ययुक्त व सभ्यपणाला साजेल असे ठेवा तेणेकरून तुमच्या रीतीभातीचा सर्वांना मोठा आनंद वाटेल –मग ते तुमच्याहून वरिष्ठ असोत, कनिष्ट असोत अथवा तुमच्या बरोबरीचे असोत. ज्याच्या रीतिभाती चागल्या असतात त्याला अतिशय सभ्यपणा अथवा मानसिक औदार्य दाखविण्याला मुळीच भय वाटत नसते. मात्र सर्वांशी सौजन्यानें वागण्याची इच्छा अंतःकरणपूर्वक असली पाहिजे. खऱ्या सभ्यपणाचा उदय प्रामाणिकपणापासून व निष्कपट वासनेपासून होत असतो. प्रामाणिकपणाशिवाय खरा सभ्यपणा यावयाचाच नाहीं. आणि तसें जर नसेल, तर वर्तनात अत्यंत विनय आणि आदर हे दिसणारच नाहीत. काही झाले तरी, अत्यंत उद्धटपणापेक्षा फाजील सभ्यपणा हा पुष्कळ पटीने श्रेष्ठ ठरतो. मनुष्य कुलीन घराण्यातला जरी असला, तरी आपल्याहून जे कनिष्ठ लोक आहेत त्याच्याशी विनयाने वागल्यामुळे अथवा त्याची सगति धरल्यामुळे आपली योग्यता लोकात कमी होईल अशी भीति बाळगण्याचे त्याला कारण नाही. म्हणून मी म्हणतो, चागल्या रीतिभाती आपल्या अगीं याव्यात अशी जर तुमची इच्छा असल, तर सर्वांशी तुम्ही विनयानें, सरलतेने, आदरानें, निष्कपटपणे, मोकळेपणानें आणि आनदानें वागा वाटेनें कोणी परिचयाचा भेटल्यास त्याला नमस्कार करण्यास चुकू नका परिचय जरी थोडा असला, तरी मुकाट्यान अगावरून मनुष्याला जाऊ देण्याऐवजी

नमस्कार करून आदरयु॰ ओ॰ ॰ ॰ असे जर दाखविलेत, तर मला वाटते, त्याच्यापेक्षा तुह्मी आपल्या स्वत ॰ ॰ मान अधिक ठेवाल तेणेकरून तुमचीच योग्यता अधिक दिसून ॰ ॰ जे ॰ ॰ तुमच्या परिचयाचे असतील, मग ते तुमचे वरिष्ठ असोत वा नसोत, त्य॰ ॰ काना नमस्कार केल्यावाचून राहू नका. त्यात तुमचा थोरपणा ॰ ॰ हो॰ , सर्वांशी मन मिळून व सलोख्याने वागण्यात आपण स्वत च ॰ ॰ मान राखीत असतो मला आदर कमी दाखविता येईल हा विचार म॰ ॰ न आणता, उलट लोकाना प्रिय व प्रेमळ वाटेल असे आचरण मला कसे ठवता येईल, हा विचार आपल्या यच्चयावत् गोष्टीच्या मुळाशी असला पाहिजे एवढा विचार करून जर तुम्हीं वागू लागलात, तर तुमची योग्यता आपण होऊन लोकाच्या नजरेस पडेल.

विनय हा गुणच असा आहे, कीं, प्रत्येक जण त्याची प्रशंसा करतो व प्रत्येकाला तो आवडतो आश्चर्य मात्र एवढेच, की, तो फार दुर्मिळ असतो. तो अन्यत्र अधिक सापडतो व हिंदुस्थानातच काय तो दुर्मिळ आहे, अशातला जरी प्रकार नसला, तरी पण हिंदुस्थानातील तरुण मुलावर तो एक सामान्य आरोप आहे आणि विशेषेकरून ज्याना थोडे शिक्षण मिळालेले असते, त्याच्यावर आरोप असा आहे, की, विनय तर एकीकडेच राहिला, पण उलट त्याना आपल्या स्वत विषयीच फार घमेंड वाटत असते, स्वत ला ते फार हुशार समजत असतात. आपले ज्ञान किती अल्प आहे व अतएव विनम्रता आपल्या अगीं आणली पाहिजे हे ज्या शिक्षणाने खरोखर आपणास कळावयास पाहिजे, त्याच शिक्षणाचे हे फळ मिळालेले पाहून खरोखर कोणाला वाईट वाटणार नाहीं? पण सर्वस्वी हे शिक्षणाचे फळ नसून, उलट तरुणाच्या अगची उल्लसित वृत्ति व हुरळवून सोडणारा तरतरीतपणा याच्यामुळेच वारवार त्याच्याठायी वाजवीपेक्षा फाजील विश्वास उत्पन्न होण्याचा सभव असतो, व बहुतेक ही प्रवृत्ति अलीकडील परिस्थितीत अतिशयत्वाने दृष्टीस पडते असें जर खरोखर असेल, तर मात्र आपणास विशेष सावधगिरी व खबरदारी बाळगिली पाहिजे. हिंदुलोकानी तर विशेषेकरून या बाबतींत दक्षता ठेवावी कारण, हिंदूच्या प्राचीन शास्त्रातून विनयाचे जितके अधिक स्पष्टपणें व जोरदार भाषेत महत्त्व गायिलेले आहे, तितके इतर फारच थोड्या सद्गुणाचें आढळतें. गीतेच्या १६ व्या अध्यायात सागितलेल्या सात्विक गुणाचे विनय हे विरामस्थान होय. आणि त्याच अध्यायात पुढें लागलीच दभ, दर्प, अभिमान, क्रोध, पारुष्य

व अज्ञान असे जे सहा आसुरी गुण म्हणून वर्णन केलेले आहेत, त्यापैकी पहिले तीन या 'विनया'ला विरोधात्मक शब्द होत, हे लक्ष्यात ठेवण्यासारखे आहे.

आपलेपणाचा विसर पाडा, इतराचा विचार मनात आणा, सहजपणे वागा, कृत्रिमता नको, गर्व बाळगू नका, चित्त शात ठेवा. सदाचरणाच्या मदिराची ही द्वारे होत सभ्यपणाचीं हीं लक्षणे आहेत.

सार्वजनिक ठिकाणी वाटेल तेथे थुकणे, नाक शिकरणे, खकारा टाकणे, व इतर अशाच साऱ्या गोष्टी पाहणाराना चागल्या व आनंददायक वाटत नाहींत. त्याच्यामुळे चालीरीतीची वाईट परीक्षा होते व तेवढ्यासाठी त्या टाळाव्यात. याचे सविस्तर वर्णन करण्याचे कारण नाही साराश, तुमच्या सर्वाच्या लक्ष्यात येईलच पुष्कळसे पाणी पिऊन पुन तोड वेडेवाकडे करून गुरळ्या टाकताना मीं केव्हा केव्हा लोकाना पाहिले आहे हे पाहणाराना आनंददायक होत नाही करावयाचेच असल्यास ते कोणाच्या नजरेस पडणार नाहीं अशा ठिकाणी तरी करावे, सार्वजनिक ठिकाणी करू नये मला वाटते, तुम्हा सर्वांचे असेंच मत असेल, व माझ्या म्हणण्याचा आशय तुमच्या ध्यानात येईलच तसेच, बाटलीने पाणी पिणे, अथवा इतर असेच ग्राम्य माणसाला शोभेल असे वर्तन करणे हे कदाचित् जगलात चालेल. पण समाजात ते बरे दिसत नाहीं. ते योग्य ठिकाणी योग्य आचरण म्हणता येणार नाहीं. तुम्हालाहि असें वाटत नाहीं काय ?

वक्तशीरपणा हाहि चागल्या रीतिभातीचाच एक भाग आहे. त्याला तर 'राजकुमाराचा सभ्यपणा' असे म्हटले आहे अमक्या वेळी अमुक करावयाचे असे एकदा एकाद्याला तुम्ही सागितले—तसे सागणे हे एक प्रकारे वचनच असते—म्हणजे नेमके त्याच वेळी हजर राहण्यास तुम्ही कधीहि चुकणार नाहीं एवढी दक्षता ठेवा यात इतराची तर सोय होतेच होते, पण स्वत ची अब्रू वाढते पत्राची उत्तरे वक्तशीर देणे हे सभ्यपणाचे अत्यंत महत्त्वाचे लक्षण गणले आहे. व यासबंधीं 'वेळा'वरील व्याख्यानात ऊहापोह झालेलाच आहे.

(३) आता आपण **अभिनयावरून व मुद्रेवरून दिसून येणाऱ्या चांगल्या रीतीभातीं**कडे वळू मुद्रेत मुद्रेचा, पोषाखाचा, व तदनुषगिक इतर गोष्टीचाहि अतर्भाव करता येईल. मनुष्य देखणा असूनहि घाणेरडे कपडे वापरणारा व नीटनेटकेपणाने राहणारा नसला म्हणजे तो जवळ

नकोसा होतो. म्हणून तुम्हीं नेहमी आपले शरीर व आपले कपडेलत्ते हे जितके स्वच्छ ठेवता येतील तितके ठेवण्याची खबरदारी घ्या उंची कपडेच वापरणे अवश्य आहे, असे नाहीं कपडे नीट आणि स्वच्छ असले म्हणजे झाले ते घाणेरडे व गबाळयासारखे दिसता उपयोगी नाहीं. आणि सर्वांत मुख्य गोष्ट लक्ष्यात ठेवावयाची ती ही, कीं, तुम्ही आपलें अंग अगदी स्वच्छ आणि पवित्र ठेवण्याची फारच काळजी घेतली पाहिजे तेणेंकरुन आरोग्याला मदत तर होईलच, पण तुमच्या रीतीभातीचीहि लोकानां परीक्षा होईल माझ्या मते, स्वच्छ पांढऱ्या सुती कापडाचे कपडे जितके चांगले दिसतात, तितके दुसरे कोणतेच दिसत नाहींत आणि अशा पोषाखाला खर्चहि फार पडत नाहीं ते फार थोड्या खर्चात होणारे असून सर्वांना सारखा त्याचा उपभोग घेता येतो.

आणि ज्या अर्थी कपड्यासंबंधी येथे उल्लेख केला, त्या अर्थी पायातील जोड्याविषयी थोडे सांगण्यास हरकत दिसत नाहीं हिंदुस्थानात तर जोड्याचा विषय नेहमी मोठा नाजुक असतो. अंगावर आपल्या तऱ्हेचा पेहेराव करावयाचा व पायात तेवढा इंग्लिश बूट घालावयाचा, ही चाल निदान मला तरी काहीं प्रशस्त वाटत नाही तथापि आपला दक्षिणी पोषाख असला तरी इंग्लिश बूट व पायमोजे घालण्यास काहीं हरकत नाही, असा सामान्यतः लोकसमज आहे, असें मला वाटते पण इंग्लिश बुटाचा स्टाकिंग्ज अथवा सॉक्स यावाचून उपयोग करणे, अथवा जेथे बूट घातला पाहिजे तेथे स्लिपर वापरणे, या गोष्टी नेहमी सभ्यपणाला सोडून असतात, हे लक्ष्यात ठेवा.

कित्येकाचा असा समज झालेला दिसतो, कीं, पायात घालावयास काहीं का असेना, ते इंग्रजी असले म्हणजे झाले एकदा एका संध्याकाळच्या पार्टीला एक गृहस्थ मार भपकेदार अंगरखा व पगडीचा झोंक लावून पायात मात्र एक फाटका टेनिस शू घालून आलेले मीं आपल्या डोळयानी पाहिलें असली विसंगतता फारच उपहासास्पद असते रीतिभाती आणि अभिरुचि याच्या दृष्टीनें ती देशी लोकाना अपमानास्पद वाटल्यावाचून राहत नाहीं एकाद्या समारंभाला अथवा सामाजिक प्रसंगाला देशी पोषाखावर इंग्रजी बूट घालून जावयाचे झाल्यास पोषाखाप्रमाणे बूटहि अगदी उत्तम प्रकारचा असावा लागतो. इंग्रजलोकात संध्याकाळच्या पोषाखाची जी पद्धत आहे, त्या पद्धतीला

अनुरू। असे अप्रतिम बूट असले पाहिजेत, व त्याच्या आतून रेशमी पायमोजे घातले पाहिजेत

हीच गोष्ट फेट्याची अथवा पगडीची. बाकीचा सर्व पोषाख आपल्या पद्धतीचा व डोक्यावरच तेवढी पगडीच्या ऐवजी इंग्रजाची टोपी, मग ती कोणत्याहि प्रकारची का असेना, ही माझ्या मते अत्यत गैरशिस्त होय

हिंदुस्थानातील एतद्देशीय लोकाची इंग्रजी तऱ्हेचा पोषाख करण्याकडे इतकी प्रवृत्ति का होते, हे समजण्यास कठिण आहे ही प्रवृत्ति दिवसानुदिवस वाढत्या प्रमाणावर आहे, असे मला वाटते राष्टाराष्ट्राला आपल्या चाली आणि सवयी वेगवेगळ्या लागलेल्या आहेत॰ याचे कारण त्या त्या राष्ट्रातील विशिष्ट हवा आणि राष्ट्रीयत्वाचे लक्षण हे होय 'जसा देश तसा वेष असतो.' देशपरत्वे पोषाख भिन्न असतो. पण इंग्रजी तऱ्हेचा पोषाख साधारणपणें विद्रूप दिसतो, तर हिंदुलोकाचा पोषाख सामान्यत. मोठा डौलदार दिसतो, व हिंदुरिवाजाचा पोषाख हा इंग्रजी पोषाखापेक्षा हिंदुस्थानातील हवेला अधिक अनुरूप असाच आहे माझ्या मते तर हिंदुस्थानच्या लोकाना आपल्या राष्ट्रीय पोषाखाबद्दल अभिमान बाळगण्यास पुष्कळ सबळ कारण आहे.

असो. आता ज्याप्रमाणे तुम्हीं स्वत॰ अगदी स्वच्छ, नीटनेटके, व आपल्या रीतीभातीत सभ्य आणि लोकाना प्रिय वाटेल असे राहणे अवश्य आहे, त्याचप्रमाणे तुमच्या सभोतालच्या सर्व माणसानी राहणें अवश्य आहे. आपले नोकर शरीराने व पोषाखाने स्वच्छ राहतात किवा नाहींत, याकडेहि तुमचें लक्ष्य असावे त्याचा ज्याच्याशी सबध येतो त्या सर्वांशीं, व विशेषेकरून घरातील बायकाशी ते मोठ्या आदराने व नम्रतेने वागतात किवा नाहीं, हेहि पहात चला तुमच्या खोलीतोल सामान, सतरजा, मेजे, कोचा व खुर्च्या या अगदी स्वच्छ, जेथल्या तेथे व्यवस्थित व पाहता क्षणीच आनद वाटेल अशा रीतीने ठेवल्या आहेत किवा नाहीत, हेहि नेहमी पहात असावे. प्रत्येक वस्तु अगदीं स्वच्छ व नेमक्या ठिकाणी ठेवलेली असावी आणि जेव्हा तुम्ही बाहेर निघता, तेव्हा तुमच्याबरोबरच्या सर्व वस्तु तितक्याच नीटनेटक्या व नेत्राला आनंद देणाऱ्या असाव्यात त्याच्यायोगे तुम्हीं आपल्या वस्तूंची तितकीच काळजी घेत आहात, हेहि लोकात दिसून येईल, व असें दिसणे हा चागल्या रीतिभातींचाच एक भाग आहे. घोड्यावर बसून जावयाचें

झाल्यास, घोडा सुदर रीतीने खरारा करून अगदी स्वच्छ असावा तसेंच त्याचे खोगीर व लगाम ही देशी असोत, वा इग्रजी असोत, घाणेरडी असू नयेत या बाबतींतहि, पूर्वी सागितल्याप्रमाणे सर्व अगदी व्यवस्थित व जेथल्या तेथे असावे. गाडीत बसून जरी गेलात तरी गाडी सुदर, नीटनेटकी व स्वच्छ अशी आहे किंवा नाहीं, हे अगोदर पहा दिसण्यात बेढब व घाणेरड्या अशा गाडीत बसण्यापेक्षा मुळीच गाडी नसलेली बरी! अगदी गचाळ गाड्या, चाकाचे द्रोण होऊन खिळखिळे झालेले, रग अगदी निघून गेलेला, मुठी आणि बिजागरे पडून गेलेली, जीन व लगाम अगदी जीर्ण झालेली व त्याला जुन्या दोऱ्याचे तुकडे बाधलेले, अशी स्थिति दृष्टीस पडणे हा तर या देशात सामान्य प्रघात आहे. आणि मला सागावयास फार वाईट वाटते, की, असल्या गाड्या या कॉलेजातच केव्हा केव्हा माझ्या दृष्टीस पडलेल्या आहेत. असल्या गाड्या जवळ बाळगण्यापेक्षा त्या मुळीच नसलेल्या फार चागले! गाड्याइतकेच गाडीवाले, गाडी हाकणारे 'कोचमेन' हेहि नेहमी घाणेरडे व गचाळ असे दृष्टीस पडतात ज्याना म्हणून गाड्याघोडे ठेवावयाची इच्छा आहे, त्यानी आपल्या कोचमेनला व सईसाना अगदी एकजात पोषाख द्यावा. स्वत ज्याच्या रीतिभाती चागल्या, जो दिसण्यात सभ्य असा असतो, त्याने असल्या विसगत व कंटाळवाण्या वस्तु जवळ बाळगल्यामुळे अन्यथा जो आनद-दायक सस्कार लोकाच्या मनावर त्याला करिता आला असता, त्यावर सर्वांशी विरजण पडते.

आणखी एका गोष्टीचा उल्लेख येथे मला करावासा वाटतो. ती गोष्ट अशी साधारणपणें लोकाच्या गाड्या पुढे असताना आपली गाडी अथवा घोडा अधिक वेगाने हाकलून पुढें काढू नका. असें केल्याने, रस्त्यातून जाणाराना धुळीचा व धामधुमीचा त्रास तर होतोच, पण लोकानाहि असें वाटावयास आपण जागा देतो, कीं, माझीच गाडी अथवा घोडा पहिल्या प्रतीचा आहे हे ठरविण्याची आपली इच्छा आहे असली कल्पना गर्भितार्थानें वाईट चालीरीतीत मोडते दुडकी चालीशिवाय अधिक वेगाने तुम्ही आपल्या कोचमेनला गाडी हाकू देत जाऊ नका आणि तुमच्या स्वाराना सार्वजनिक रस्त्यावरून आपला घोडा भरधाव कधींहि नेऊ देऊ नका. दुडकी चालीने चालत असताना वाटेत गाडी भेटली असता घोडा आवरून

चालीने चालण्यास त्याना सागून ठेवावे या सर्व गोष्टी तुम्ही त्याना नीट सागून ठेवा, व तसेंच वाटेत कोणी भेटल्यास त्याच्याशीं मोठ्या सभ्यपणाने व नम्रतेनें वागण्यास त्याना शिकवून ठेवा अशा रीतीने ते जर वागले, तर ते कोणा थोर व सभ्य गृहस्थाचेच नोकर आहेत, असेंच लोकात दिसून येईल.

सरते शेवटी सागावयाचे तें 'हावभाव आणि मुद्रा' याविषयीच उरलें. या बाबतीतहि वरच्या साऱ्या गोष्टीप्रमाणे चांगल्या व वाईट रीतिभातीची बरीचशी परीक्षा होते. दोन्ही प्रकारच्या रीतिभातीत पुष्कळच तफावत आहे. ज्याच्या रीतिभाती चागल्या नसतात, सभ्यपणा ज्याला ठाऊक नसतो, असा मनुष्य चार मडळीत बसला असता लोकाना तो किती चमत्कारिक व त्रासदायक वाटत असतो, हे आपणा सर्वाना ठाऊक आहेच. तो आला म्हणजे प्रत्येकाला ठाऊक होत असते व तेहि चमत्कारिक रीतीने कोणालाच त्याच्यापासून आनद वाटत नाहीं मुख्य मुद्दा जो लक्ष्यात ठेवावयाचा तो हा, कीं, आपण मडळीत गेलों असता आपल्यासबधी मुद्दाम होऊन लोकाच्या मनात विचार येणार नाही, असे आपले वर्तन असावे अथवा लोकाच्या मनात विचार आलाच, तर तेणेकरून लोकाना आनदच वाटावा. या दृष्टीने आपण आपली वागणूक शात, अकृत्रिम, निगर्वी आणि स्वाभाविक अशी ठेवावी. असे झाल्यावर आपल्यामुळे कोणालाहि आनंदच वाटेल. ज्याप्रमाणे वाणीची गोष्ट त्याचप्रमाणे हावभावाची हावभावातसुद्धा शातता आणि निगर्वीपणा दाखविला पाहिजे. दाभिकपणा दिसू देता कामा नये

हावभावासबधी विशेष काहीं सागण्याची आवश्यकता आहे, असे नाहीं. दाडगेपणा शोभत नाहीं हे सर्वाना ठाऊक आहे सागावयाचे एवढेच, कीं, सर्व प्रसगी कुलीन स्त्रियाचा अग्रमान ठेवा कोणाकडेहि उद्धटपणाने पाठ फिरवू नका. एकाद्या समारभाला गेला असता जेथे रिकामी जागा असेल तेथेच बसा. बसलो काय, उभे राहिलो काय, त्यात मोठेसे महत्त्व नाहीं मात्र आपण स्वत: जागा अगोदर घेण्यापेक्षा दुसऱ्याना अगोदर बसू द्यावे. आपल्याच मोठेपणाचा तोरा नेहमी मिरवीत राहणे, हा काहीं खरोखर सभ्यपणाचा भाग नाहीं. उलट, विनय आणि साधेपणा याच्यामुळे खऱ्या मोठेपणाला जेवढी शोभा येते, तेवढी अन्य कशानेहि येत नाहीं टेनिसन् कवीने ड्यूक ऑफ वेलिंगटनविषयी काय उद्गार काढिले आहेत पहा.—"अगी मोठेपणा

असूनहि सोग म्हणून कसें ते त्याला ठाऊक नव्हतें. कौन्सिलात काय अथवा युद्धात काय, त्याची योग्यता मोठी थोर होती आपल्या काळच्या सेनाधिपतीत तो अग्रगण्य होता व्यवहारज्ञान त्याच्याठायी पुष्कळ होतें, व जगात अप्रतिम साधेपणा हा अत्यंत थोर पुरुषाच्याच ठायी दृष्टीस पडावयाचा असा नियम आहे, त्याप्रमाणे त्याचा साधेपणाहि मोठा उदात्त आणि अप्रतिम होता"

आपल्या मुद्रेसबधी मला एवढेच सागावयाचें आहे, कीं, आपण आपल्या अत करणात जर प्रेमळ विचार ठेवीत गेलो, तर आपल्या चेहऱ्यावर आपले विचार प्रतिबिबित होतील. चेहरा हा मनाचा आदर्श आहे; चेहऱ्यावरून मनाची परीक्षा होते, अशा अर्थाची इग्रजीत एक म्हण आहे आपली चर्या जर प्रेमळ असेल तर ती आनददायकहि होईल. चेहरा जितका सतेज व आनदित ठेवता येईल, तितका ठेवा आणि सामान्यत तुम्हाला फार आनदित राहता येईल, असे मला वाटते कारण, साधारणपणे तुमचा जीवनक्रम फार सुखी आहे सभोंतालच्या यच्चयावत् परिगणावर उल्हासाचा व आनदाचा पाऊस तुम्हाला पाडता येईल पण कदाचित् तुम्हाला नेहमीच हास्यमुद्रा अथवा आनंदी वृत्ति ठेवता येणार नाहीं दु.ख अथवा कष्ट झाले असताना त्यावर पाघरुण घालता येणार नाही तथापि दु ख अथवा कष्ट हे स्वतः कंटाळवाणे नसते. असले देखावे या जगात नेहमी दृष्टीस पडतात लोकांना त्याचा अनुभव इतका वारंवार येत असतो, कीं, तीं मनुष्याच्या अनुकंपेच्या बाहेर असतात, असें मुळीच नाहीं आणि दु ख व कष्ट हे काहीसे लोकप्रशं-सेलाच कारण होत असतात. मात्र ते सौजन्याने व धिमेपणाने आपण सहन केले पाहिजेत. आनंद असो दु.ख असो, सुख होवो वा कष्ट होवो, आपण आपल्या मनाचा स्वाभाविकपणा ढळू देता कामा नये. आहोंत त्याहून निराळे भासविण्याचा डोल आपण कधीहि करता कामा नये उलट सदोदित सौजन्यानें आणि सदाचरणाने वागण्याचा प्रयत्न करीत असावे.

चागल्या रीतिभाती ज्याला म्हणतात त्या याच. अशा तऱ्हेच्या वागणुकी-मुळे केवळ आपल्याविषयीच नव्हे, तर आपल्याजवळच्या सर्व वस्तूबद्दल लोकाना आनंद वाटल्यावाचून राहणार नाहीं. अशा तऱ्हेचे वर्तन ठेवणे हे सोपे आहे असे नाहीं निरहकारवृत्ति, निःस्वार्थिपणा, दक्षता व आत्मसयमन या गुणाची त्याला आवश्यकता लागते. पण कर्तव्याचा कोणताहि भाग सुकर

नसतो. प्रत्येकात आत्मसंयमन आणि दक्षता हीं लागतातच, व हा आपल्या कर्तव्याचाच एक भाग आहे–आपल्या शेजाऱ्याविषयीचे जे आपलें कर्तव्य त्याचाच एक भाग आहे.

*ऐश्वर्यस्य विभूषण सुजनता शौर्यस्य वाक्संयमो ।
ज्ञानस्योपशम. श्रुतस्य विनयो वित्तस्य पात्रे व्यय. ॥
अक्रोधस्तपसः क्षमा प्रभवितुर्धर्मस्य निर्व्याजता ।
सर्वेषामपि सर्वकारणमिद शील पर भूषणं ॥ १ ॥

—भर्तृहरी.

---

*भाग्याला सुजनत्व भूषण असे की मौन शौर्यास ते,
ज्ञानाला शम त्या शमास विनय द्रव्यास दातृत्व ते,
अक्रोधत्व तपा क्षमा प्रभुपणा धर्मास निर्दंभता,
या सर्वांसहि मुख्य भूषण पहा सच्छील हे तत्वता

—वामन.

# शारीरिक धैर्य.

" Cowards die many times before their deaths
The valiant never taste of death but once
Of all the wonders that I yet have heard
It seems to me most strange that men should fear
Seeing that death, a necessary end
Will come when it will come "

" Julius Cæsar, ' Act II Sc 2

'जगात भित्रे लोक खरे मरण येण्यापूर्वीच अनेकवार मरत असतात, पण मर्दुमकी गाजविणारे जे असतात ते फक्त एकदाच मरणाचा अनुभव घेतात भेकड लोकाना जिवतपणीच अनेक वेळा मृत्यु येतो, तर शूराना तो एकदाच येतो जेवढ्या म्हणून आश्चर्यकारक गोष्टी आजवर माझ्या कानावर आल्या त्या सर्वात जन्मास येतो त्याच्यापाठीमागे मरण हे लागलेलेच आहे, ते 'अद्यैव वा मरणमस्तु युगान्तरे वा' याप्रमाणे यावयाचे तेव्हा येत राहील, असे असूनहि लोकानी मृत्यूचे भय एवढे का बाळगावे याचेच मला अत्यत आश्चर्य वाटते '

" Death or pain is not formidable, but the fear of pain or death For this reason we commend the poet who said—

" 'Not death is evil but a shameful death '

Epictetus

"मृत्यु अथवा दु ख हे जात्या भयकर नसते, तर त्याची भीति ही भयकर असते एवढ्याच कारणावरून पुढील कव्युक्ति प्रशसनीय वाटल्यावाचून राहत नाही,—

"जुमते मरण हे सकट नव्हे, तर अपमानकारक मृत्यु हेच खरे सकट होय '

**जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च ॥**
**तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ॥ १ ॥**
**अकीर्तिं चापि भूतानि कथयिष्यंति तेऽव्ययाम् ॥**
**संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते ॥ २ ॥** भगवद्गीता अ २

**भावार्थ**—जन्मापाठीमागे मृत्यु व मृत्युपाठीमागे जन्म हे चक्र सतत सुरू आहे म्हणून आवश्यक होणाऱ्या गोष्टीबद्दल शोक करण्याचे कारण दिसत नाही, सारांश, तू स्वधर्माने वागणार नाहीस तर तुझा दुर्लौकिक होईल, व सामान्य अनुभवहि असाच आहे, की, अपकीर्त मोसणे हे श्रेष्ठ पुरुषाला मरणापेक्षाहि जास्त सतापदायक होते

**'न भीतो मरणादस्मि केवल दूषित यश '**

ज्या प्रकारच्या धैर्याने शारीरिक सकटाना, प्रत्यक्ष मृत्यूला देखील तोंड देण्याचे सामर्थ्य अगी येते, त्याचाच प्रस्तुत उल्लेख करावयाचा आहे या गुणाचे

बाबतींत मानवी वर्ग हा कनिष्ठ कोटीतील पशुवर्गाबरोबर काहीं अशी वाटेकरी झालेला आहे. तो गुण मनुष्याच्याठायी दृष्टीस पडो वा पशूच्याठायी दृष्टीस पडो, त्याची गणना थोर गुणात होते. कारण, धैर्य म्हणजे जेणेकरून मनुष्याला आपलेपणाचा विसर पडतो, व भीतीला आणि दु खाला न डगमगतां तोंड द्यावयास मनुष्य प्रवृत्त होतो असे निश्चयाचे बळ होय, असा त्याचा आपण अर्थ समजतो. साराश, त्याची व्याख्या द्यावयाची झाल्यास, "परिणाम काय होईल याचा यत्किंचित्‌हि विचार मनात न आणता, हेतु तडीस जाई तोपर्यंत ज्याची चिकाटी मनुष्य सोडीत नसतो, असे जे निर्भय कर्म त्याला धैर्य म्हणावे," अशी देता येईल रानडुकरे आपला पाठलाग करणारावर उलटून एकदा हल्ला करू लागली, म्हणजे ती किती निकराने अगावर धावून येत असतात हे तुम्हीं पाहिलेच आहे मी ज्या प्रकारचे धैर्य म्हणतों, ते हेच.

याचे आणखी एक उदाहरण म्हटले म्हणजे 'बुलडॉग' नावाचा विलक्षण धैर्य दाखविणारा कुत्रा हा होय धैर्याच्या कामात सजीव प्राण्यात तर बहुतेक त्याची बरोबरी करणारा दुसरा प्राणी नाहीं. त्याच्याठायी इतकी भयंकर व मागे न हटणारी चिकाटी असते, की, एकदा त्याने एकादी वस्तु दातात धरिली म्हणजे तो ती इतकी दृढतेने धरून ठेवतो, कीं, त्याला तुम्ही कितीहि मारलेत तरी त्याची पर्वा न करिता जिवात जीव आहे तोपर्यंत तो ती सोडीत नाहीं! अखेरीस त्याचा जेव्हा गळा दाबून त्याला गुदमरून टाकावे, तेव्हा कोठे तो आपले दात सोडतो.

"सकरजातीच्या कुत्र्याची पकड एकपरीस सुटेल, पण बुलडॉगच्या जबड्याची पकड पहारेवाचून सुटत नाही. तो दिसण्यात लहान दिसतो खरा, तरीपण त्याचा जबडा एवढा भयकर असतो, कीं, एकदा अगावर तुटून पडला असता माघार म्हणून कधीहि घ्यावयाचा नाही, व गर्जना करणाऱ्या वनराज पशूलाहि लोळवल्यावाचून तो राहत नाही."*

मि. वुड हे आपणास असें सागतात, कीं, "लढाऊ कोंबड्याच्या अगी जें धैर्य असतें त्याला काहीं मर्यादाच दिसत नाहीं. तो आपल्याच जातीच्या कोंबड्यावर तुटून पडेल एवढेच केवळ नव्हे, तर त्याला कोणीहि त्रास देवो,

*. Holmes ( quoted in the " Moral Reader ", Royal Series )

त्याच्यावर तो हल्ला केल्यावाचून राहणार नाहीं. एकदा एक खोकड या पक्ष्यातून एक कोंबडी उचलून घेऊन जात होता तेव्हा असे सांगतात, कीं, कोंबडा त्याच्या अंगावर धावून जाऊन त्याने आपली नखें त्याच्या डोळ्यात जोराने खुपसली मांजर, उंदीर यासारखेच इतर प्राणी जे कोंबडीच्या पिलांवर टपलेले असतात त्याच्यापासून आपले संरक्षण केल्याची अशीच अनेक उदाहरणे आहेत"*

समरांगणावर शिपायाच्या, आणि जंगलांत शिकाऱ्याच्या अंगी जे नेहमी स्फुरण चढते, ते या धैर्याचाच एक प्रकार आहे. त्याना संकटाला तोंड देण्यात भीति तर मुळी वाटत नाही, उलट एक प्रकारें अढळ आनंद आणि अभिमान वाटत असतो एस्चिलस् म्हणून एक प्रख्यात शोकपर्यवसायी नाटककार होऊन गेला त्याचा बंधु सायनेजिरिअस् याच्याविषयीं एक प्राचीन गोष्ट आहे ती जर खरी असेल, तर मनुष्याच्या ठिकाणी बुलडॉगसारखी चिकाटी असल्याचे ते एक चांगलेच उदाहरण आहे असें सांगतात, की, माराथानच्या लढाईत अथेनिअन लोकानी पर्शियन लोकांचा पराभव केल्यावर पर्शिअन लोक ज्या गलबतात बसून पळून जाण्याचा प्रयत्न करीत होते, त्यापैकीं एक गलबत सायनेजिरिअसने आपल्या उजव्या हाताने धरून ठेवले त्याचा उजवा हात जेव्हा तोडला, तेव्हा त्याने ते डाव्या हाताने धरून ठेवले, आणि डावा हातहि जेव्हा छाटून काढिला, तेव्हा त्याने वनपशूप्रमाणे आपल्या दातांनी ते धरून ठेवले!

वनपशूप्रमाणे जो निर्भयपणा शूर लोक दाखवितात, तो, नेहमीच जरी म्हणता आले नाहीं, तरी साधारणपणे शारीरिक सामर्थ्याचाच द्योतक असतो तथापि नुसत्या शारीरिक गुणापेक्षा त्यात काही तरी अधिक गुण असतो हे खचित, व तो गुण पशूंपेक्षा मनुष्याच्याच ठायी अधिक असतो कारण मनुष्याना विचार करण्याचे सामर्थ्य असते तसे ते पशूंना नसते. पशूंच्या अंगचे धैर्य हे केवळ स्वसंरक्षणाच्या अथवा अधलालसेच्या व क्रोधाच्या उपजत बुद्धीने वारवार प्रेरित झालेलें दृष्टीस पडते. पण मानवी प्राण्याच्या अंगच्या शौर्याची गोष्ट मात्र वेगळी तो जेव्हा एकाद्या सत्कार्यात येणाऱ्या अडचणीला व संकटाला तोंड देण्यासाठीं विचाराने, सदसद्विवेकबुद्धीने प्रेरित होऊन जे धैर्य

* Wood's "Natural History," V. II., p 617.

दाखवीत असतो, ते वर सांगितलेल्या पशूंच्या धैर्याहून अधिक उदात्त असतें, याबद्दल कोणाचेंहि भिन्न मत होणार नाहीं, अशी मला खात्री आहे "आपण असें का करतो हे समजल्यावाचून त्याची सहजबुद्धि त्याना जे काई करावयास लावते तेवढेच करणे हे पशूच्या दृष्टीने पुरे आहे. पण त्या उपजत बुद्धीच्या मदतीला ज्याना परमेश्वराने आणखी बुद्धिसामर्थ्य दिलेले आहे, अशा मानवी वर्गाने मात्र तेवढे करून भागावयाचे नाहीं. कारण, प्रत्येक वस्तूचे स्वरूप आणि घटना (प्रकृति) हीं लक्ष्यात आणून तदनुरूप जर आपण आचरण करणार नाहीं, तर आपले हेतु आपणास तडीस कधींच नेता येणार नाहींत[१]" शारीरिक अथवा इंद्रियाच्या प्रवृत्तीना बुद्धि जेव्हा मार्ग दाखविते, तेव्हा जे मनुष्याच्या हातून कार्य घडते, ते पशूच्या केवळ उपजत बुद्धीने होणाऱ्या कार्यापेक्षा उच्चतर असे असते. एपिक्टेटस्चा गुरु जो रूफस् त्यानें त्याला दोन प्रकारची अनुष्ठाने शिकविली होतीं. एक विचार करणे, मनन करणे व सदाचरणाच्या उदात्त नियमाचा मनावर कायमचा संस्कार करून घेणे, अशा रीतीचे अध्यात्मिक अनुष्ठान, व दुसरे शारीरिक अनुष्ठान, ते शरीराला पडणारे कष्ट सहन करून करावयाचे त्यात मन आणि शरीर या उभयताना एकत्र कार्य करून कष्ट सहन करावयाचे असतात.[२]" भगवद्गीतेत मानसिक व शारीरिक तपाचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे —

देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवम् ॥
ब्रह्मचर्यमहिंसा च शारीर तप उच्यते ॥ १ ॥
मन·प्रसाद सौम्यत्व मौनमात्मविनिग्रह. ॥
भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते ॥ २ ॥ अ १७.

यावरून हे अगदीं स्पष्ट दिसते, की, मानवी प्राण्याना जे धैर्य दाखविता येण्याजोगे असते ते पशूच्या स्वभावाला अगदी अशक्य असते.

या विवेकपूर्ण धैर्याला केव्हा केव्हा 'पराक्रम' असे म्हणतात. पराक्रमाचा पूर्ण अर्थाने जर विचार केला तर तो एकट्या मानवी वर्गाचेच लक्षण म्हणून ठरतो कारण, प्राणिकोटीत एकट्या मानवी वर्गालाच विचारसामर्थ्य परमे-

---

1 Introduction to Long's "Epictetus"
2 Long's "Epictetus" p xx

श्वरानें दिलेलें आहे यावरूनच प्राचीन रोमन लोक पराक्रमाला 'Virtus' (व्हर्टस्) असें म्हणत असत (व्हर्टस् म्हणजे सद्गुण हा शब्द अधिक उदात्त अर्थाचा द्योतक जरी नसला तरी त्याचा अर्थ अधिक व्यापक आहे) रोमन लोक व्हर्टस् याचा अर्थ मानवी वर्गाला शोभणारा गुण असा करीत असत. त्याचा मूळचा अर्थ म्हटला म्हणजे, मर्दानीपणा, पराक्रम, असाच होता युद्धात मोठमोठाल्या संकटाना तोंड देऊन, प्रत्यक्ष आपल्या प्राणाचीहि आहुति देण्यास तयार होऊन कर्तव्य बजावण्यास शिपायाला प्रेरणा करणारा हाच करारी मर्दानीपणा असतो मृत्यु खास येणार हे कळूनहि त्याला धैर्याने तोंड देण्यास तो त्याला प्रवृत्त करीत असतो अशा प्रकारचें धैर्य मनुष्याला केवढा विलक्षण स्वार्थत्याग व केवढे साहस करावयास उद्युक्त करीत असते, हें लक्ष्यात ठेवण्याजोगे आहे मेवाडच्याच इतिहासातलें एक उदाहरण मी तुम्हाला सागतों तो प्रसग म्हणजे चोंडावत व सुक्तावत वशातील प्रतिस्पर्धी लोक जागेच्या मानासाठीं जेव्हा एकमेकाशी भाडत होते, तेव्हाचा होय "जहागीरने जेव्हा चितोडगडचा किल्ला हस्तगत केला व राजाला पश्चिमेकडे अरण्यात व डोंगरात पळावयास लावले, तेव्हा मेवाडच्या राण्याला सरहद्दीवरील काहीं प्रदेश पुन आपल्या ताब्यात घेण्याची अनायासेंच सधी मिळाली, व या उद्देशानें राण्यानें आपले सर्व सरदार एकत्र गोळा केले पण सुक्तावत जे होते, ते पुढे आम्ही राहणार, मुख्य सेनापति आम्ही होणार, असा आपल्या प्रतिस्पर्ध्याशी बरोबरीचा हक्क दाखवूं लागले त्यांच्या अगी जो निर्विवाद पराक्रम होता (काम पडल्यास तो पराक्रम अन्यपक्षापेक्षा थोडा श्रेष्ठच ठरेल) त्याच्या दृष्टीने पाहता त्याचा हक्क म्हणजे अगदी निरर्थक होता, असें नव्हे चोंडावत हे आपला वंशपरपरेचा हक्क दाखवू लागले या तट्याचा निकाल करण्यास राण्याचे अगी जर समयोचित चातुर्य नसते, तर अखेर प्रसंग तरवारीच्या हातावरच येऊन ठेपला असता पण राण्याने अशी तोड काढली, कीं, जो ओंताळ्याच्या किल्ल्यात प्रथम पाय ठेवील त्यालाच सेनानायकत्वाचा हक्क प्राप्त होईल हा निकाल मुक्तावत घराण्यातील लोकाना ताबडतोब पसत पडला, व चोंडावतानाहि हक्कसरक्षणार्थ अशा रीतीनें पण लाविलेला पाहून तो कबूल करण्यावाचून दुसरी सोयच उरली नाहीं

"ओंताळा" हा त्या मैदानावरील अगदी सरहद्दीवरचा किल्ला असून राजधानीपासून पूर्व दिशेस सुमारें अठरा मैलावर आहे, व तेथून चितोडगडच्या

पुरातन किल्ल्याला अगदीं थेट रस्ता जातो तो उंचावर बाधलेला असून त्याच्यासभोवार बळकट दगडी तट आहे. त्या तटावर मधून मधून उच व वाटोळे मनोरे बाधलेले आहेत व तटाला लागून खालीं एक जलप्रवाह वाहत आहे. तो एकंदर देखावा मोठा रमणीय वाटतो.

"दोन्ही घराण्यातील लोक, जे नेहमी सत्तेसाठीं परस्परांशीं स्पर्धा करीत होते, ते आता वैभवासाठीं एकमेकावर चढाओढ करू लागले दोन्ही पक्ष पहाटेस अरुणोदयापूर्वी एकाच वेळी निघाले. ओंताळयाचा किल्ला हा त्याचे इष्टस्थान होते व त्याला जो अगोदर जाऊन पोहोचणार तोच यशाचा धनी होऊन सेनानायकत्व पटकाविणार! साहसाचें बक्षिस आपल्यालाच मिळणार, आपण पराक्रम गाजवून घरी परत आल्यावर आपलीं बायकामुले व कुटुंबातील इतर माणसें आपल्या तोंडाकडे पाहणार, या आशेने प्रत्येक पक्षाला नवीन चैतन्य प्राप्त झालें होते आशेसारखा रानटी आणि निष्ठुर शत्रु तोच, व तोच त्याच्या पराक्रमाचा हेतु होता. ज्या भाटानें प्रत्येक पक्षाची सुरुवातीला स्तुति गायिली व प्रत्येकाजवळून नवीन मालेसाठी सामुग्री गोळा केली, त्याने रजपुताना जेवढे म्हणून उत्तेजन देता आले तेवढे सारें दिले

"सुक्तावतानी थेट फाटकाचा रस्ता धरिला व तेथें ते दिवस उगवता उगवता जाऊन पोहोंचले, व शत्रूना त्याची तयारी नसतां त्यानी अवचित गाठलें, पण तटावर सैन्य एकदम गोळा झाले व झटापटीला सुरुवात झाली चोंडावत याना त्या स्थलप्रदेशाची फारशी माहिती नसल्याकारणाने त्याना वाटेत दलदलीची जागा लागली व तेणेंकरून त्याना थोडा अडथळा आला तरीपण त्यातून त्यानी आपला मार्ग हिय्या करून काढलाच. सुदैवाने त्याना ओंताळयाच्या किल्ल्यातील एक धनगर वाटाडी भेटला. आपल्याबरोबर शिड्या आणून सुक्तावतावर दूरदर्शित्वाचे बाबतीत त्यानी अधिक ताण केली होती. त्याच्यापैकीं एकजण मुख्य शिडी लावून वर चढला, पण शत्रूच्या माऱ्याने तो गडगडत खालीं पडला. मुख्य सेनाधिपति होण्याचे त्याच्या नशिबीं नव्हतें. प्रत्येक पक्षाला माघार खावी लागली सुक्तावतानीं किल्ल्याचे दरवाजे हत्तीच्या टकरींनी फोडून आत घुसण्याचा प्रयत्न चालविला होता; पण दरवाज्याला लोखडाचे मोठमोठाले अणकुचीदार सुळे लाविलेले होते, त्यामुळे हत्तींचा तेथे इलाज चालेना. निरुपायास्तव त्याना मागे सरावें लागले. हें पाहून

नोंडावत पुढे सरसावले. त्याचा मुख्य हत्तीवरून खालीं उतरला आणि दाराच्या सुळयाना पाठ लावून 'माझ्या अगावर हत्तीला टक्कर मारावयास लाव' असें त्यानें महाताला सागितलें! त्यासरसे दरवाजे फुटून मोकळे झाले व त्याच्या पक्षाकडील लोक त्याचे प्रेत तुडवीत आत घुसले! तों निकराची लढाई सुरू झाली. शौर्याला साजेल अशी प्रत्यक्ष प्राणाची आहुति देऊन सुद्धा यशाचा रंग दिसेंना. इतक्यात एकानें आपल्या पुढाऱ्याचे खाली पडलेले प्रेत उचलून अगोदरच ओंताळयाच्या किल्ल्यात आत टाकून दिलें, व 'चोंडावतानी अगोदर किल्ला सर केला' असे मोठ्यानें ओरडून जाहीर केले. मानासाठीं व महत्त्वाकाक्षेसाठी प्रत्यक्ष प्राणाची आहुति देणे याहून साहसाचें व धैर्याचे अन्य अप्रतिम उदाहरण कोठे सापडणार!"[1]

धैर्याला शिस्तीने व तसेंच अभिमानामुळे व ईर्षेमुळे उत्तेजन मिळत असते चवथ्या 'रॉयल रीडर' पुस्तकात बर्कनहेड् नावाचे जहाज फुटल्याचा वृत्तात तुम्ही वाचलाच असेल. "आफ्रिकेच्या दक्षिणकिनाऱ्यावर जहाजात पाणी शिरून जहाज तळाशी जाऊ लागले. ते साल १८५२ हें होते जहाज खडकावर जाऊन आदळलें. त्यात एक ब्रिटिश सैन्याची तुकडी होती व एकदर लोक सहाशेवर होते जहाज बुडावयास जेव्हा सुरुवात झाली, तेव्हा सर्वांनाच आपला जीव एकदम वाचविणे शक्य नव्हते. सेनाधिपति कर्नल सेटन् यानीं शिपायाना वरच्या मजल्यावर जाऊन अगोदर बायकामुलाची होड्यातून सोय करून त्याना मदत करण्यास हुकूम केला. हा हुकूम त्या शिपायानी इतक्या निमूटपणे व शाततेने मान्य केला, कीं, जणु काय सारे त्या वेळीं जमीनीवरच कवाईत करीत होते चपळता सर्वांच्या अगी दिसूं लागली. कोणाच्याहि ठायीं धादल, धास्ती आणि निराशा दिसून आली नाहीं. नावापाठीमागून नावा एकसारख्या किनाऱ्यावर नेऊन पोहोंचवू लागले, आणि असें करीत बहुतेक सारीं बायकामुलें तर त्यानीं सुरक्षित पोहोंचविलीं. पण आफिसराना व लोकाना एकहि नाव मागे शिल्लक उरली नाहीं. खादाला खांदा लावून ते अगदी धिमेपणाने वाट पहात उभे राहिले होते, आणि अर्ध्या तासाच्या आंतच ते जहाज तळाशी पोहोंचलें, व जगात आजवर न झालेल्या अशा खऱ्या वीराची टोळीच्या टोळी समुद्रार्पण झाली!"

---

1 Tod's—Rajasthan V I p 119—150

त्या धीरोदात्त शिपायानी जें शांत आज्ञाधारकत्व दाखविलें, त्याची प्रशंसा करावी तेवढी थोडीच. पण त्याच्या धैर्याची परीक्षा पाहताना एवढी गोष्ट आपणांला लक्ष्यात घ्यावी लागेल, कीं, ते लष्करी हुकुमाप्रमाणें कर्तव्य करीत होते, व त्या प्रसंगीं जर एकाद्याने हुकूम अमान्य केला असता, तर भित्रे-पणाच्या दोषाचें खापर त्याच्या माथीं फुटल्यावाचून राहतेना त्याचें धैर्य स्वयंप्रेरित नव्हतें, अथवा ते एकट्यादुकट्याचेहि नव्हतें. शिकून चागल्या तयार झालेल्या शिपायाकडून जें विमेपणाचें व स्वार्थत्यागाचें आज्ञाधारकत्व दाखविण्यांत येईल असें आपणास वाटत असते, तेच ते होते. शिपाई म्हटले म्हणजे शूर असावेत असें आपणास साहजिकपणेच वाटते. खाद्याला खादा लावून त्यांनी एकत्र उभें रहावे, अशी आपली इच्छा असते आणि मला असें वाटते, कीं, बर्कनहेड् जहाजावर ४७ व्या हायलंडर पलटणीने जो स्वार्थत्याग करून दाखविला, तसा प्रसग पडल्यास स्वार्थत्याग करून दाखविण्यास माघार घेणारी प्रस्तुतच्या सैन्यात एकहि पलटण निघणार नाहीं, मग ती पलटण हिंदी असो वा ब्रिटिश असो.

लष्करी अभिमानानें व कर्तव्यबुद्धीनें प्रेरित झालेल्या धैर्याचें आणखी एक उदाहरण मी तुम्हाला देतों ते सर चार्लस् नेपीअरच्या चरित्रातले आहे त्यानी मोठ्या शौर्याने सिंधप्रांत काबीज केला १२ वी मुबईची पलटण जेव्हा राजकोट येथें होती, तेव्हा तिच्या भोजनगृहात टागलेली नेपीअरची तसबीर तुमच्या नेहमीं पाहण्यात येतच होती तो वृत्तात ब्रिगटनचे मि. रॉबर्टसन् याच्या वक्तृत्वपूर्ण वाणीनेंच मी येथे सागतों.

"उत्तर सिंध प्रातातील लुटारूंच्या टोळीविरुद्ध जेव्हा सर चार्लस नेपीअर यानीं स्वारी केली, तेव्हा सैन्याची एक तुकडी दरीच्या बाजूनें चाल करून चालली होती दरी फार खोल होती. पर्वताचे ते गगनचुंबित कडे वरून अगावर तुटून पडत आहेत कीं काय असे वाटत होते, व त्या कड्यावर शत्रू-कडील लोक उभे असून ते जणुकाय कड्याच्या माथ्यावरील तुरेच होत, असे दिसत होते. एक सार्जंट व त्याच्याबरोबर अकरा शिपाई एवढी मंडळी दरीच्या भलत्याच बाजूने निघाल्यामुळे एकाएकीं बाकीच्या मंडळीशीं त्याची चुकामूक होऊन ते एकीकडे व हे एकीकडे असे झालें दरी आता सपेल असें त्यांना वाटत होते; पण पहातात तों दरीने अकस्मात् आपला उदरविस्तार

त्याच्या नजरेस पाडला. जसजसें पुढे पाऊल टाकावें तसतशी दरी इतकी खोल दिसू लागली, कीं, ती ओलाडून पलीकडे जाणे अगदी अशक्यच झालें. सार्जटनें बरोबरच्या लोकाना परत फिरण्याची खूण केली लोकानां वाटलें, कीं, आपणास बदुका झाडावयाचाच हुकूम झाला. त्या शूर शिपायानीं मोठ्या आनंदाने तो हुकूम मान्य करून गोळ्या झाडण्यास सुरुवात केली त्या उभ्या पर्वताच्या शिखरावर एक त्रिकोणात्मक ओटा होता व त्यावर संरक्षणार्थ बाधलेला छातीइतका उच तट होता त्याच्या आड शत्रूकडील सत्तर लोक दबा धरून उभे होते एकीकडे अकरा व एकीकडे सत्तर लोक रस्ता म्हणजे अत्यत भयप्रद अशा अडचणीच्या मार्गावर पुढे सरून त्यानीं गोळ्या झाडाव-यास तर सुरुवात केली सत्तर लोकापुढे अकराजण किती वेळ दम धरणार! त्याचा पाडाव तो काय लागणार! ती चकमक फार वेळ टिकणार नाहीं यांत सशयच नव्हता एका पाठीमागून एक असे लोक पडू लागले जागच्या जागीं सहाजण गारद झाले, व बाकीचे उरलेले मागच्या मागें फेकून दिल्यासारखे पडले. पण इतका प्रकार होईतोंपर्यंत शत्रूकडील आपल्या सख्येच्या दुप्पट लोकाना निजविल्यावाचून ते राहिले नाहींत

"डोगरी लोकात अशी एक चाल आहे म्हणतात, कीं, लढाईत जेव्हां त्याचा मुख्य अधिपति पडतो तेव्हा त्याच्या मणगटाला ताबडा अथवा हिरवा दोरा बाधतात. ताबडा दोरा हा अत्यत श्रेष्ठ दर्जाचे द्योतक आहे त्या चालीप्रमाणे त्यानी प्रेताच्या मणगटाला पट्टे गुंडाळून तीं त्यानी कड्यावरून झोकून दिलीं त्याचे सोबती जेव्हा आले तेव्हा त्याच्या नजरेस तीं काळी ठिक्कर पडलेलीं व छिन्नविछिन्न झालेली प्रेते पडली पण प्रत्येक ब्रिटिश शूर शिपायाच्या दोन्ही मनगटाना ताबडे दोरे बाधल्याचें त्याना आढळून आले!' [१]

ब्रिटिश सैन्यांत, ब्रॉझ धातूचे एक लहानसे पदक–व्हिक्टोरिया क्रॉस्,–परा-क्रम गाजविणाराला अत्यंत श्रेष्ठ दर्जाचा मान म्हणून देत असतात आपल्या शत्रूंच्या शौर्याबद्दल दिलेला त्या रानटी डोगराळ लोकाचा ताबडा दोरा त्याहून श्रेष्ठतर मानाचा द्योतक नव्हता काय? मि रॉबर्टसन् म्हणतात त्याप्रमाणें शूरपणाच्या साहसाबद्दल अखिल मानववंश उपजत बुद्धीनेंच जें "अवर्णनीय कौतुक" करून दाखवीत असतो त्याचें ते सुदर चिन्ह नव्हते काय?

1. Robertson's—Lectures p. 196—197.

आतांपर्यंत पुरुषांविषयीं, व संघानें व एकमेकांच्या ईर्षेनें काम करणाऱ्या पुरुषाबद्दलच उल्लेख झाला. आणि सामान्यतः धैर्याच्या तसेंच शौर्याच्या अथवा मर्दानीपणाच्या कल्पनेशी शारीरिक सामर्थ्याचेंच साहचर्य असते हें सामर्थ्य काहीं अशीं स्त्रियापेक्षा पुरुषाच्याच ठायीं अधिक असतें, हें खरे. तथापि सामर्थ्याच्या बाबतींत जरी नसले, तरी धैर्याच्या बाबतात पुरुषाचें धुरीणत्व ज्यानीं वारंवार पत्करिलेले होतें, अशा स्त्रियानी गाजविलेल्या शौर्याचीं उदाहरणें इतिहासात विपुल सांपडतात "सुलताना रेझिया ( तिच्या काळचे नाण्यावर सुलतान असें तिला म्हणत असत ) हिचें नाव तुम्हाला स्मरत असेलच. तिनें युद्धप्रसगी मुख्य सेनापतीचे काम जातीने केले होते ज्याप्रमाणें युद्धात त्याचप्रमाणे कौन्सिलांतहि तिच्याठायी पूर्ण उत्साह दिसून येत होता. साराश ती सर्व श्रेष्ठ गुणानी इतकी सपन्न होती, कीं, तिच्या अत्यत प्रतिकूल टीकाकाराना तिच्याठायीं एका गोष्टीखेरीज यत्किंचितहि दोप आढळणार नाहीं, ती गोष्ट म्हटली म्हणजे ही, कीं, जातीने ती अबला स्त्री होती एवढाच काय तो तिचा अपराध !"[१]

अहमदनगरची प्रसिद्ध चादबिबी राणी हिचाहि विचार करा "अकबर बादशहाच्या कारकीर्दीत, राजपुत्र मुराद हा जेव्हा आपले सैन्य घेऊन तिच्या नगरावर चाल करून गेला, तेव्हा ती सर्व अगावर चिलखत चढवून व तोंडावर बुरखा व हातात नागवी तरवार घेऊन स्वत खिडीपाशी जाऊन उभी राहिली, आणि अशा रीतीनें मोगलाचा पहिला हल्ला तर तिने परत फिरविला त्या ठिकाणी होते नव्हते तेवढे सर्व सामर्थ्य खर्ची पडे तोपर्यंत खिड न सोडता आपला साहसाचा प्रयत्न सारखा चालू ठेवला आणि आपल्या अगच्या चापल्याने व उत्साहाने किल्ल्यातील लष्करात तिने आवेशाग्नि इतका प्रदीप्त केला, कीं, रणागणावर जरी मोंगलाचे सैन्य पुष्कळ असून ते सर्वतोपरी श्रेष्ठ होते, तरी सन्मानपूर्वक तहाच्या अटी कबूल करण्यातच त्याना अखेर आनद मानावा लागला.[२]

अत्यत यातना व भयंकर मृत्यु हीं स्वधर्मार्थ प्राणत्याग करणाराच्या अगच्या सहनशीलतेनें सहन करण्याचें सामर्थ्य ज्याच्याठायीं होते, त्या सती

---

1 Queen of Delhi, 1236—9. Elphinstone's—History p 375
2 Elphinstone's—History p 524.

जाणाऱ्या राणीच्या अगच्या धैर्याला व भक्तीला आपणांस काय ह्मणता येईल बरे ? मि. फार्ब्स सागतात, कीं, साठसत्तर वर्षे लोटून गेलीं असतील नसतील, ईडरचा राजा गंभीरसिंग याच्या चितेवर चवदा राण्यानीं आपल्या प्राणाची आहुति दिली! ते साल इ. स. १८३३ होते. त्याचें वर्णन मोठें हृदयभेदक आहे

"दिवस पावसाळ्याचे पण पाऊस न पडून रविसक्रमण अर्धे सपून गेलें होते विक्रमशकापासून १९ व्या शतकात, श्रावण कृष्णपक्ष एकादशीला, सोमवारी, सूर्यास्तानंतर पाच तासानीं आपल्या वयाच्या ९० व्या वर्षीं गंभीर राजाने आपला देह खालीं ठेवला. राण्याना बरोबर सती जाण्यासाठी तयारी करता यावी म्हणून राण्याच्या खोलीत ते प्रेत सबंध दिवस आणि रात्र ठेवण्यात आलें रात्र निघून गेल्यावर प्रात काळी सर्वजण चितेकडे जावयास निघाले नानाप्रकारची वाद्यें वाजू लागलीं प्रसग जरी अत्यंत दु खाचा होता, तरी तो आनंदाने साजरा करण्यात आला जणु-काय राजा आपल्या राणीसहवर्तमान यात्रेलाच निघाला आहे, असें दिसलें. गंभीरसिंग व त्याच्या राण्या याची हास्यवदनें जणुकाय नक्षत्रगणातून चद्र अस्ताचलीं जात आहे अशींच भासूं लागलीं प्रत्येक पाउलागणिक त्याचा कीर्तिभानु वर येऊ लागला प्रत्येक पाऊल अश्वमेध करून पुढें टाकीत मार्गानें अगदी अमूप दानें वाटीत त्या पुढे चालल्या कुटुंबप्रेमावर तिलाजलि सोडून सारा विचार आपल्या एकट्या पतीच्या ठायी एकाग्र करून व आपली शरीरे गवताच्या पात्याप्रमाणे मानीत त्या पुढे चालल्या या सतीना भाटाच्या पोवाड्याचा मान किती द्यावा हेच मला कळत नाहीं. वाचकहो, तुह्मी इतर स्त्रियाना नाजुक ह्मणून खुशाल ह्मणा पाहिजेल तर, पण या स्त्रिया तर खरोखरच योद्धयाप्रमाणे राकट व कणखर होत्या असेंच मी ह्मणेन"[1]

चोंडावताची बायको हादिराणी हिची अगावर शहारे आणणारी गोष्ट तुह्मीं वाचलीच असेल. जीवात जीव आहे तोंपर्यंत निकराचा हल्ला करून आपल्या तरुण शूर पतीने लढावे, एतदर्थ त्याच्याठायी चैतन्य उत्पन्न करण्याच्या हेतूनें हादिराणीने स्वत. आपल्या जीवावर उदार होऊन मोठ्या शातपणे प्राणाची आहुति दिली. तो वृत्तात अत्यंत हृदयद्रावक आहे. तरी पण त्याच्यावरून

1. Forbes'—Rasa—mala V. 11 pp 204, 205.

एवढी गोष्ट निर्विवाद दिसून येते, कीं, ज्याप्रमाणें सतींच्या उदाहरणावरून स्त्रियांच्या दौर्बल्यांत अत्यंत बलवत पुरुषाच्या सामर्थ्यावरहि ताण करून सोडणारें श्रेष्ठ प्रतीचें धैर्य असू शकतें हे सिद्ध होतें, तद्वतच असल्या भयंकर स्वार्थत्यागाला लोकोत्तर चमत्काराने व मनाच्या थोरपणानें विभूषित करणारें धैर्यहि स्त्रियांच्या ठायीं असतेंच

प्रेताच्या प्रदीप्त चितेवर प्राणाची आहुति दिल्याचें आणखी एक उदाहरण मला तुम्हांला सांगावेंसें वाटतें या उदाहरणांत प्राणत्याग करणारा पुरुष आहे, व तें शांत आणि करारी धैर्याचें एक दुर्मिळ उदाहरण आहे, असें मला वाटतें. ती फारच पुरातन गोष्ट आहे इतकी कीं, ती अलेक्झांडर दी ग्रेट याच्या वेळची आहे. ती प्लुटार्क आणि एरिअन यांच्याच शब्दांनी बहुतेक मी तुम्हांला सांगतों

खिस्ताब्दापूर्वी ३२७ वर्षे, हिंदुस्थानावर स्वारी करण्याच्या हेतूनें जेव्हां अलेक्झांडर पश्चिमोत्तर सरहद्दीवर उतरला, तेव्हां त्याला कांहीं 'नागदयोगी' आढळले त्यांना अलेक्झांडर व ग्रीक लोक दिगंबर जैनी' असें ह्मणत दिगंबर जैनी ह्मणजे नग्न साधु त्या काळच्या नागदजोगी लोकांप्रमाणे त्यांच्या अंगावर एक चिंधीहि सांपडत नसे, असें मला वाटतें. अर्वाचीन साधुपुरुषांप्रमाणे तेहि जगाविषयीं व संसाराविषयीं विरक्त होते अलेक्झांडरचें त्यांना यत्किंचितहि भय वाटलें नाहीं. उलट ते उघडपणें त्याला तुच्छ मानूं लागले त्याचा परिणाम पुढें असा झाला, कीं, त्यांच्या उद्धटपणाचा अलेक्झांडरला राग येऊन त्यांच्यापैकीं कित्येकांना त्यानें फांशीं देवविलें. इतकें झालें, तरी एकजण त्यांच्यांत अधिक धीट होता त्यानें आपला पाय जोरानें जमिनीवर आदळला, व अलेक्झांडरनें याचा अर्थ काय ह्मणून जेव्हां त्याला विचारिलें, तेव्हां त्यानें उत्तर दिलें तें असें —"प्रत्येक मनुष्य जेथें उभा राहतो तेथें त्याच्या पायाखालच्या जमिनीवर त्याचा निसर्गसिद्ध हक्क असतो हे राजा, तुझ्यांत आणि इतर लोकांत जर कोणता विशेष असेल तर तो एवढ्याच बाबतींत होय. तूं असंतुष्ट साहसी आहेस, व दुसऱ्यांना व स्वतःला त्रास देण्यासाठींच तूं आपली जन्मभूमि सोडून येथवर आलास. पण लवकरच तुला मृत्यूचें निमंत्रण येईल, व मग शरीराला पुरण्यासाठीं ह्मणून जेवढी जागा लागेल त्याच्यापेक्षां रतिभरसुद्धां अधिक जमिनीचा तुकडा तुझ्या वांट्याला येणार नाहीं, हे लक्ष्यांत ठेव !" त्या धीट दिगंबर जैनाच्या या बोलण्याच

अलेक्झांडरच्या मनावर फारच जबरदस्त संस्कार झाला. त्या विरक्त साधूच्या अगची धिमेपणाची सहनशीलता पाहून त्याची त्याने फार प्रशंसा केली आपल्याबरोबर प्रवासाला त्याच्यापैकीं कोणी आल्यास त्याला आपण घेऊन जाऊ, अशी त्याने इच्छा प्रदर्शित केली, प्रथमत कोणीच तयार झाला नाही, सर्वांनीच नाकारिले तथापि मागाहून त्याच्यापैकीं एकजण कालानस नावाचा दिगबर राजाच्या बरोबर जाण्यास तयार झाला असें सागतात, कीं, इतर दिगबर बधूना त्याचें हें करणे पसत पडले नाहीं. सर्वांना सोडून तो जाण्यास तयार झाला हे पाहून त्याना थोडा राग आला. पण त्याने मात्र आमरण राजाची मर्जी कायम ठेविली पुढील तीन वर्षे त्याने राजाचा नित्य सोबती म्हणून त्याच्या सहवासात काढिलीं हिंदुस्थानात तो जेथे जेथे फिरला तेथे तेथे तो त्याच्याबरोबर होता गेड्रोसियाच्या वाळवटातून परत पर्शिआतहि तो त्याच्याबरोबर गेला. पण पर्शिअन मुलुखात मात्र तो फार दूरवर गेला नाहीं कारण वाटेतच सरहद्दीवरच्या पसारगडे शहरीं त्याचे देहावसान झाले. आणि मला जी गोष्ट विशेषेकरून सागावयाची आहे ती त्याच्या मृत्यूसबधीच होय. पसारगड हें एक प्रसिद्ध स्थल होतें. तेथें सायरस दी ग्रेट याची कबर बावलेली होती, व त्यावर पुढील आशयाचा मजकूर खोदून ठेविला होता. "जो कोणी अनोळखी मनुष्य याच्यावरून जाईल, त्याने मी कॅबेसिसचा मुलगा व पर्शिआच्या राज्याचा सस्थापक आहे, हे जाणून या कबरीबद्दल माझा हेवा करू नये." अलेक्झांडरला ही कबर पाहण्याची इच्छा होऊन त्याने पसारगड येथे मुक्काम केला असें सागतात, कीं, दिगंबर कालानस हा येथेच आजारी पडला हिंदुस्थानात असता आजन्म त्याला हा आजार कधी ठाऊक नव्हता नुकतीच वाळवंटातील प्रवासात जी उपासमार झाली होती, तेणेकरून बहुधा तो बराच शक्तिक्षीण झाला होता तरी पण अलेक्झांडरच्याबरोबर प्रवास करिताना त्याने आपली दिगबर वृत्ति होईल तितकी सोडली नव्हती, व या नवीन उद्भवलेल्या व्याधीने आपल्या जीवनवृत्तीत अतर पडते कीं काय, अशी त्याला धास्ती वाटून त्याने राजाजवळ आपली इच्छा प्रदर्शित करून सागितले, कीं,

---

[1] कालानसला मृत्यु सुसा येथे आला असला पाहिजे, असे मि ग्रोट याचे म्हणणे आहे कोठेहि येवो, ती फारशी महत्त्वाची बाब नाहीं

"मला आता एक क्षणभर देखील जिवंत रहावयाची इच्छा नाहीं, ताबडतोब चिता रचवून पेटवावी, ह्मणजे मी सुखाने मरेन कारण, जीं तत्वे आजन्म पाळली, ज्या बाण्याने आतापर्यंत राहत आलों, तदनुरूप माझे देहावसान होऊन याच स्थितींत माझा अत व्हावा एवढीच माझी इच्छा आहे."

अलेक्झाडरला हे अर्थात् आवडले नाहीं. त्याने असें करूं नये ह्मणून राजाने त्याला पुष्कळ गोष्टी सागून पाहिल्या, पण त्याच्याशीं वाद करणें निरर्थक आहे असें जेव्हा त्याला आढळून आलें, व अशा प्रकारें मरणाच्या आड जर आपण आलों, तर दिगंबर दुसरी काहीं तरी तोड काढील व आपली इच्छा शेवटास नेल्यावाचून राहणार नाहीं अशी जेव्हा त्याची खात्री झाली, तेव्हा त्याने आपल्या एका कामगाराला स्वत च्या देखरेखीखाली चिता रचण्यास परवानगी दिली. त्या गंभीर समारंभासाठी राजाने स्वतः देखील मोठी तयारी केली. त्या चितेवर उंची अत्तरे व सुवासिक पुष्पे घालण्यासाठी मुद्दाम काहीं विशिष्ट लोकाची योजना केली राजवैभवाला साजेल अशी सोन्याचादीची उपकरणे व जरीची वस्त्रे आणावयास सागितली. पण दिगबराने जगातील सुंदर वस्तूंची वाट जशी लाविलेली होती, तद्वत्च हीं सारी भाडी आणि वस्त्रे त्याने जवळ उभे असलेल्या लोकाना वाटून टाकिली त्याला चालण्याचेंहि सामर्थ्य उरले नव्हतें, ह्मणून त्याच्यासाठी एक घोडा आणला होता. पण मला डोलीत नेल्यास चालेल असे सागून तो घोडाहि त्याने आपल्या एका स्नेह्यास देऊन टाकला हिंदुस्थानातून जे हत्ती आणले होते, ते चितेच्या जवळ एका रागेने उभे केले होते. कालानस चितेकडे जेव्हा जाऊ लागला, तेव्हा त्याने ईशस्तुतिपर वेदातील काहीं श्लोक ह्मटले चितेजवळ आल्यावर त्याने आपल्या स्वत ला प्रोक्षण करून घेतलें, डोक्याचे थोडे केस कातरले, आणि नंतर सभोवार जमलेल्या लोकाना आजचा दिवस आपल्या राजाच्या सहवासात मोठ्या आनदाने घालवा असा उपदेश केला. राजाला मी लवकरच बॅबिलोनमध्ये फिरून भेटेन, असेंहि तो ह्मणाला. हेच त्याचे अखेरचे शब्द होते, असें दिसतें. एवढे बोलून त्याने चितेत प्रवेश केला व शातपणे आपला देह ठेवला स्नेह्याचें मरण डोळयाने आपल्याला पाहवणार नाही ह्मणून अलेक्झाडर स्वत तेथे आला नव्हता. त्यानें इकडे लोकाना असा हुकूम देऊन ठेवला होता, की, चिता पेटविताच नौबतीचा आणि वाद्याचा गजर सुरू करावा व जणूकाय युद्ध प्रसंगच आहे असे मानून साऱ्या

कानीं घोष करावा. असा एकच गजर झाला ह्मणजे अर्थात्‌च आपल्या ह्याच्या मरणकाळच्या किंकाळ्या ऐकू येणार नाहींत असें त्याला वाटलें पण कडे कालानसानें हू का चू केले नाहीं व जागचा कसा तो हालला नाहीं. ऱ्या लोकानी तोंडांत बोट घातलें, व फारच प्रशसा केली पूर्ण शांति-खाचा अनुभव घेत तो त्या चितेंत मरण पावला. त्या चितेच्या धुराचा लोट व्हा स्वर्गापर्यंत उंच गेला, तेव्हा उभे असलेल्या हत्तींनींहि मोठ्या सुराने द्घोष केला.[१]

येणेप्रमाणें कालानेसाचे[२] मोठ्या आदराने व मानापानानें देहावसान झालें, मरणसमयींचे त्याचें भाकीत पाहिलें तर तो एक विलक्षण योगायोग झाला वाटल्यावाचून राहणारच नाहीं कारण, त्याचा अत्यत स्नेही आणि धनी लेक्झांडर हाहि दोन वर्षांच्या आंतच बॅबिलॉन येथे मरण पावला.

या गोष्टी बऱ्याच लाबल्या त्या आता येथेंच पुऱ्या केल्या पाहिजेत

असल्या गोष्टी नित्य व्यवहारातल्या शिळोप्याच्या गोष्टीपेक्षा जरी अधिक यकर असल्या, तरी त्या एक प्रकारे उन्नतकारी व मनाला उच्च प्रदेशात ऊन आनंदभरित करणाऱ्या असतात. सतीच्या आचरणासारखी सृष्टीविरुद्ध र्दयता कोणालाहि पसत पडणार नाहीं पण जेणेकरून कर्तव्य आणि ात्मसयमन एकनिष्ठपणे घडून मानवजाति उन्नतपदाला चढते व तिच्या मनाचा ोरपणा वाढतो, अशा खऱ्या धैर्याबद्दल प्रत्येकजण प्रशसा केल्यावाचून कधींहि ाहणार नाहीं कर्तव्याचरण करीत असताहि सकटे आणि यातना भोगण्यास ापण होऊन खुषीने तयार होणे हे मानवी स्वभावाला कधीहि सुलभ वाटणार ाहीं, व मानासाठी ज्यानी यातना आणि मृत्यु ही धैर्याने व शौर्याने सहन केली, ाशाच्या उदाहरणाने "अखिल मानववंशाची उन्नति होते व त्याचा अत्यत क्षुद्र ासा घटकावयव देखील त्याच्या प्रतिबिंबित वैभवाने पुण्यतेप्रत पावतो."[३]

---

1 Arrian, Bk VII, ch iii

२ प्लुटार्क म्हणतो, त्याचे खरे नाव स्फायनेस असे होते पण ग्रीक लोकानी त्याचे नाव ालानस असे ठेवले होते कारण तो त्याना काल्ले या नावाने हाक मारीत असे तो शब्द हणजे ग्रीक लोकाचा हिंदुस्थानातील नमस्काराचा प्रकार होता कालानस याचा अर्थ कल्याण ासा असावा असे वाटते

3 "Ecce Homo, p 164.

असल्या कृत्यांचीं वर्णनें जेव्हां आपण वाचतों तेव्हां आपल्या स्वत विषयीं आपल्या मनात फारच उदात्त विचार येत असतो. पण त्या कृत्यातील आपला भाग नुसत्या वाचनानेंच आपण सपविता कामा नये. वर सागितलेल्या प्रकारच्या धैर्यासारखेच जरी नसलें, तरी धैर्याचें कर्तव्याचरण असे आपणासहि करावयाचे आहेच बर्केनहेड् जहाजावरील लोकाच्या अगदी शात निश्चय, औंताळाच्या किल्ल्यातील सुक्तावत आणि चोंडावत याचा पराक्रम व मर्दानीपणा, या गोष्टींची क्वचित् प्रसगींच गरज पडत असते. ते प्रसग ह्मटले ह्मणजे जहाज बुडणें, युद्ध होणें अथवा अशींच इतर सकटे ओढवणें हे होत. असले प्रसग परमेश्वर करो, जितके न येतील तितके बरे तरी पण असले धैर्य दाखविण्याची गरज केव्हा, कोठें आणि कोणाला पडेल, हे आज कोण सागू शकेल? वाटेल त्याला वाटेल त्या वेळी आणि वाटेल तेथे ते धैर्य दाखविण्याचा प्रसग आकस्मिक येणार नाहीं हें कशावरून? तसा प्रसग आपणा सर्वांवर जर आला, तर त्या बाबतींत आपलें कर्तव्य बजावण्यास आपणापैकी कोणीहि चुकणार नाहीं अशी मला खात्री आहे. भित्रेपणाच्या आचरणापेक्षा अधिक लज्जास्पद अशी अन्य कोणतीहि गोष्ट नाहीं हे पक्के लक्ष्यात ठेवा. "'भीति' नामक सद्गृहस्थाचा आह्मास परिचयच नाहीं, भय ह्मणजे काय हें आह्मी ओळखतच नाही," हे लॉर्ड नेल्सनचे उद्गार आपल्या मुखातून निघण्याइतकी पात्रता—नुसते उद्गार काढण्याचीच नव्हे, तर आचरणाने ते खरे करून दाखविण्याचीहि योग्यता—आपल्या अगीं येण्यापेक्षा अधिक स्पृहणीय असें जगात अन्य काहीहि नाहीं, हें तुह्मी विसरू नका.

याची परीक्षा निश्चितपणे करून पहावयाची झाल्यास ती आपल्या प्रत्यहींच्या आचरणातच करता येण्याजोगी आहे. त्याहूनहि उदात्ततर, सर्व श्रेष्ठ आणि अत्यत खडतर असे धैर्य दाखविण्याच्या सधि आपणास आपल्या दररोजच्या आचरणातच अनेक सापडतील. ते धैर्य कोणतें त्याचा आपण पुढील व्याख्यानात विचार करू.

# नैतिक धैर्य.

" The sinews of goodness are courage, moral and physical, a fact which places all really good men and women beyond the reach of ridicule and above the high water mark of the world's contempt "

Marion Crawford

नैतिक आणि शारीरिक धैर्य हीं चांगुलपणाच्या सामर्थ्याचीं लक्षणे होत तेणेकरून जगातील यच्चयावत् सद्वर्तनी स्त्रीपुरुष इनक्या वैभवाला चढत असतात, कीं, उपहास आणि तिरस्कार याचा कसा तो त्याना ससर्गहि होत नाहीं

" He has not learned the lesson of life who does not every day surmount a fear " Emerson

ज्याला प्रत्यहींच्या व्यवहारात सकटातून पार पडता येत नाहीं, त्याला ससाराचा पहिलाच धडा समजला नाहीं असे समजावे

गिरयो गुरवस्तेभ्योऽप्युर्वी गुर्वी ततोऽपि जगदडम् ।
तस्मादप्यतिगुरव. प्रलयेऽप्यचला महात्मानः ॥ १ ॥

—जगन्नाथराय

भावार्थ —पर्वत मोठे आहेत, त्याहिपेक्षा पृथ्वी मोठी आहे, तिच्यापेक्षाहि ब्रह्माड मोठे आहे, पण प्रलयकालींहि ज्याचे धैर्य ढळत नाहीं असे जे महात्मे ते या सर्वापेक्षाहि मोठे होत !

मागच्या व्याख्यानात शारीरिक धैर्याचा आपण विचार केला. त्याच्या अनुसधानानें आज नैतिक धैर्याविषयीं विचार कर्तव्य आहे जी गोष्ट वाजवी आहे असें आपणास ठाऊक असते, ती बोलून दाखविण्याचें व करण्याचें सामर्थ्य जेणेंकरून आपल्या अगी येते ते हे धैर्य होय साराश, ज्या शारीरिक धैर्याचा आपण पूर्वीं विचार केला, ते, नेहमी जरी नाही तरी अनेकवार नैतिक धैर्याचा आवश्यक असा आनुषंगिक भाग असतें. नैतिक धैर्य हें शारीरिक यातना सहन करण्यास मनुष्याला प्रवृत्त करीत असते. नैतिक धैर्य हें मनाचें कार्य आहे, तर शारीरिक धैर्य हे शरीराचे कार्य आहे. पण मनाचा शरीराशीं इतका अत्यत निकट सबंध असतो, कीं, मनुष्याच्या बाबतींत एका प्रकारच्या धैर्यापासून दुसऱ्या प्रकारचें धैर्य वेगळें काढतांच यावयाचें नाहीं, असें मला वाटतें. मागच्या व्याख्यानात मानवी साहसाचीं जेवढीं ह्मणून उदाहरणें देण्यात आलीं, त्या सर्‍यात शारीरिक धैर्याशी नैतिक धैर्याचा सबंध होताच; तीं दोन्ही एकत्र सयुक्त होतीं. शारीरिक यातना सहन

करण्याच्या अढळ धैर्यात कर्तव्याच्या जाणीवेची भर होतीच. पण मानवी प्राण्याच्या ठायी दिसून येणाऱ्या शारीरिक धैर्यावरून जर त्याच्या अंगीं थोडें नैतिक धैर्य असावे असा गर्भितार्थ निघतो, तर तो नैतिक धैर्यावरून किती तरी अधिक निघेल हे सांगावयास नकोच. कारण, शारीरिक कष्टापेक्षा सहन करावयास अधिक कठिण अशा किती तरी अनेक गोष्टी आहेत. आणि नैतिक धैर्यामुळे चांगल्या व वाजवी गोष्टी सहन करण्यास मनुष्याच्या अंगी सामर्थ्य येत असते. हे नैतिक धैर्य आपले कर्तव्य बजावण्यास आपणाला नेहमी बळकटी देत असते. कितीहि अडथळे येवोत, केवढाहि उपहास होवो, कितीहि नुकसान अथवा त्रास होवो, त्या सर्वांना न डगमगता जी गोष्ट सत्य आणि वाजवी आहे ह्मणून आपणास वाटते, आपण बोलतों आणि आपणास ठाऊक असते, ती एक नैतिक धैर्य अंगी असले ह्मणजे तिच्या बळावर मनुष्य केल्यावाचून राहत नाहीं हा धैर्याचा अन्युदात्त असा प्रकार आहे, व असें असूनहि त्याची सामान्यत. अत्यंत गरज लागते. फार तर काय, पण प्रतिदिनी आणि बहुतेक हरघडी आपणा सर्वांना ते धैर्य दाखविण्याचे प्रसंग येतात, व आवश्यकता भासते.

प्रत्यहीं आचरणांत व्यक्त होणारा तो शूरपणा आहे, ते अत्युच्च शौर्य आहे, कारण नैतिक धैर्य हें शीलसामर्थ्याचा अथवा सद्वर्तनाचा मुख्य पाया असून, त्याच्या मानाने इतर सारे सामर्थ्य कमकुवत अथवा दुर्बल वाटतें. आणि वयाचा अथवा लिंगाचा, शारीरिक सामर्थ्याचा अथवा दौर्बल्याचा भेदाभेद न पाहता, पुरुष असो वा स्त्री असो, मुलगा असो वा मुलगी असो, त्याच्या अथवा तिच्या मनात धैर्याची प्रेरणा करणारे, धैर्याने अंगात स्फुरण उत्पन्न करणारें हेंच सामर्थ्य होय. एवढेच कीं, जसजसा मनुष्य मोठा होतो, तसतसें ते सामर्थ्य वाढत असते, व उतारवयात शरीरगात्रे दुर्बल होत चालली ह्मणजे ते सामर्थ्य अधिक बलवत्तर होत जाते, असे वारंवार दिसून येते.

काय वाटेल तें होवो खोटे ह्मणून बोलावयाचें नाहीं,

परित्यजेदं त्रैलोक्यं राज्यं देवेषु वा पुनः ।
यद्वाप्यधिकमेताभ्यां न तु सत्यं कथंचन ॥

अशा भीष्मप्रतिज्ञेने सत्य व्रत पाळणें याचें नाव नैतिक धैर्य. आपल्या हातून पापाचरण घडलें आहे असें आपलें मन जेव्हा आपणास सांगत असतें

तेव्हा लज्जेची भीति न बाळगता निर्भयपणे आपला अपराध आपण कबूल करणे, हें नैतिक धैर्य होय प्रामाणिकपणे वागण्याची लाज न वाटणे, आपण मनाने खरोखर जसे आहोंत तसेच केवळ बाह्य आचरणाने लोकात वागून दाखविण्याची लाज न वाटणे, याला नैतिक धैर्य ह्मणतात. लोकाच्या मानाने आपल्या ठायी असलेले दारिद्र्य, दौर्बल्य व अज्ञान याबद्दल आपणास लाज न वाटणे, साधारणपणे, इतरापेक्षा आपली स्थिति सर्वतोपरि कनिष्ठ आहे याबद्दल ओशाळगत न होणे, उलट लोकाच्या मर्जीची यत्किंचित्‌हि पर्वा न करिता केवळ कर्तव्याला आणि परमेश्वराला स्मरून सरळपणाने, मोकळ्या मनाने, निष्कपटपणे आपण आपली पराकाष्ठा करीत राहणे, याचे नाव नैतिक धैर्य कष्ट, निराशा व वियोगजन्यदु ख ही प्राप्त झाली असता चित्तक्षोभ अथवा मनाची खळबळ न होऊ देता, शात वृत्तीने ती सहन करणे, वाईट प्रसगाना धैर्याने तोड देणे व सुखाचे दिवस येतील अशी आशा मनात बाळगणे, रात्र सपल्यावर दिवस उगवतो, ढग आले असता सूर्य जरी काहीं वेळ दिसेनासा होतो तरी ढगाआड सूर्य हा असतोच, हा विचार मनात आणणे हे नैतिक धैर्य होय. रेनेल टेलेर हे पंजाबातील एक ऑफिसर होते. त्याचे चरित्र प्रसिद्ध होऊन आज बरेच दिवस झाले आहेत. चरित्रकाराने त्याच्याविषयी पुढीलप्रमाणें उद्गार काढिले आहेत —

"केवळ समरागणावर थंडी असो, ऊन असो, वारा असो, अशा प्रसंगी त्याचे साहस अगदी निर्भय वीराला साजेल असें होते एवढेच नव्हे, तर ससारातहि दररोजच्या व्यवसायात त्याची तीच निधास्त वीरवृत्ति दिसून येत होती. एकट्या परमेश्वरालाच ते भिऊन वागत असत. दुसऱ्या कोणाचीहि ते भीति बाळगीत नसत" ईश्वराला भिऊन वागणें व अन्य कशाचीहि भीति न बाळगणे याचे नाव नैतिक धैर्य.

---

१ त्याच्या पराक्रमाच्या गोष्टी सरहद्दीवरील लोक अद्यापहि सागतात चातुर्य आणि धैर्य असावे तर त्याच्यासारखेच असावे, अशी तेथे घरोघर म्हण पडली आहे आपण काय केले हे ज्याला ठाऊक असून ज्याने त्यासबधीं आपल्या मुखावाटे एक चकार शब्दहि काढला नाहीं असा त्याचा तोच एकटा पुरुष होय आणि असे असूनहि त्याचा स्वभाव इतका सौजन्ययुक्त प्रेमळ व सर्वप्रिय होता, कीं, एतद्देशीय लोक असे म्हणत असत, की, पजाबातील इग्रज लोकात दोनच देवदूत निघाले एक सर डोनाल्ड मॅक्लिऑड व दुसरे सेनापति रेनेल टेलर.

"Raynell Taylor," by E. Gambier Parry, p. 259.

साराश, तुमच्या हें ध्यानात येईल, कीं, मानवी वर्गाच्या कर्तव्याचा बराच मोठा भाग या नैतिक धैर्यावर अवलबून असतो. एक नैतिक धैर्य असलें ह्मणजे इतर सद्गुणहि अगीं असतात असा गर्भितार्थ निघतो. ते सद्गुण नैतिक धैर्याच्या मानाने गौण असतात. त्याचा उघड अर्थ एवढाच, कीं, तेणेंकरून ते सद्गुण आपल्या अगी आहेत असें लोकात मिरविण्याची आपणांस लाज वाटत नाहीं.

असें जरी आहे, तरी सर्व गुणामध्ये अत्युदात्त अशा या सद्गुणाबद्दल लोकाना जितकी किमत वाटावी तितकी ती सामान्यत वाटत नाहीं कधीं कधीं तर असाहि प्रकार दृष्टीस पडतो, कीं, ज्याच्या अगी नैतिक धैर्य असतें अशी माणसें लोकनिंदेची व उपाहासाची स्थाने होऊन बसतात. मला तर असें वाटते, की, लोकाच्या दृष्टीने ते नेहमी शारीरिक धैर्यापेक्षा कमी महत्त्वाचें असें ठरते लोक नैतिक धैर्यापेक्षा शारीरिक धैर्यालाच अधिक महत्त्व देतात. वस्तुत शरीराच्या मानानें मनाची योग्यता जितकी श्रेष्ठ असते, तितकीच शारीरिक धैर्यापेक्षा नैतिक धैर्याची योग्यता श्रेष्ठ असते.

मला वाटते, शारीरिक धैर्याची वाजवीपेक्षा फाजील किमत करणें व पराक्रम आणि शारीरिक सामर्थ्य याना त्याच्या वास्तविक योग्यतेहून अधिक महत्त्व देणे, याकडेच विशेषत तरुण मडळीची महज प्रवृत्ति दिसून येते तसेंच जो सकटाला न डगमगता आपले अखिल कर्तव्य अढळ निश्चयाने करण्याचा प्रयत्न करीत असतो, त्याची नैतिक योग्यता अगदीं कवडीमोल ठरविण्याकडेहि तितकीच प्रवृत्ति त्याच्या ठायीं दिसून येते उदाहरणार्थ —शाळेत जो मुलगा विशेष अभ्यासी, मेहनती, सौजन्यपूर्ण व सद्वर्तनी असतो त्याच्यापेक्षा खेळण्यात, घोड्यावर बसण्यात अथवा साधारणपणें चपळतेच्या अथवा सामर्थ्याच्या कामात जो अधिक वरचढ असतो त्याचेच अधिक स्तोम माजविण्याकडे विद्यार्थ्यांची प्रवृत्ति नसते काय? पराक्रमाचे खेळ वाईट असतात असें मी म्हणत नाहीं. त्याची योग्यता फार मोठी आहे हे मला ठाऊक आहे. शील तयार होण्यास व स्नायूचे सामर्थ्य वाढविण्यास ते खेळ कारणीभूत होतात, असाहि माझा समज आहे. पण ज्याला आपण शील अथवा सद्वर्तन असें ह्मणतो त्याची योग्यता फार मोठी आहे ती फारच महत्त्वाची बाब आहे, व स्नायु ह्मणजे काहीं शील नव्हे. अवयवाच्या चपलतेपेक्षा अथवा

द्याकृतिविशेषापेक्षा, ह्मणजे शरीराच्या मनोहर ठेवणीपेक्षा, ज्ञान आणि बुद्धि-सामर्थ्य हीं खात्रीनेच अधिक उदात्त अशी आहेत सुस्वभाव, निरहंकार वृत्ति आणि प्रेमळपणा हे गुण शारीरिक सामर्थ्यापेक्षा अधिक श्रेष्ठप्रतीचे नाहींत काय? श्रीरामचंद्र आणि अर्जुन यांच्या अंगच्या शौर्यापेक्षा त्यांच्या चांगुलपणांतच त्यांचा थोरपणा अधिक नव्हता काय? असल्या प्रश्नाचा आपण जेव्हां विचार करूं लागतो, तेव्हां 'होय' ह्मणूनच उत्तर येते, पण आपण विचार करतो तसेंच नेहमी वागतो असें नाहीं आपल्या हातून आपल्या विचारानुरूप आचरण नेहमी घडत नाहीं एक तर आपण नेहमी विचारच करीत नाहीं जर आपण अधिक विचार करूं लागलों, तर विषयाच्या उच्चतर व नैतिक अंगालाच आपण अधिक महत्त्व व मान द्यावा हे उचित आहे. ते अंग जरी दृष्टिआड असतें, तरी ते आपण आपल्या मनासमोर नेहमी ठेवावें.

ज्याला आपण नैतिक धैर्य ह्मणतों, ते शीलसामर्थ्य लोकादरास पात्र न होता कधी कधी लोकनिंदेलाच कारण होत असते, असें मी वर ह्मटलें. याचेंहि कारण हेंच, की, लोक विचार न करता जुन्या सांप्रदायाला अनुसरून वागतात जगांत अथवा जगाच्या ज्या लहानशा कोंपऱ्यांत त्यांना राहण्याचा प्रसंग येतो, तेथें जे विचार, ज्या कल्पना, प्रचलित असतात तदनुरूपच लोक वागत असतात. याचा परिणाम असा होतो, की, त्या काळाच्या विचाराला अननुरूप अथवा विसंगत अशी एकादी नवी गोष्ट दृष्टीस पडताच— मग ती कितीहि चांगली असेना—ती नवीन असते एवढ्याच कारणामुळे लोक तिची सामान्यत. थट्टा करूं लागतात पृथ्वीची आपल्या आसाभोंवती प्रदक्षिणा करण्याची दररोजची (दैनंदिन) गति, व सूर्याभोंवतीं प्रदक्षिणा घालण्याची तिची वार्षिक गति, हे सिद्धांत आज सर्वमान्य आहेत, भौतिक शास्त्राचा व्यासंग करणाऱ्या विद्वान् लोकांनी त्यांचा खरेपणा अनेक प्रमाणांनी सिद्ध करून दाखविलेला आहे, तरी पण असा एक काळ होऊन गेला, कीं, युरोपांत त्या वेळी जीं अत्यंत श्रेष्ठ अधिकारसंपन्न माणसे होतीं, त्यांनी आज ज्योतिषशास्त्रांत जे सिद्धांत प्रमाणभूत मानले जात आहेत, त्यांची टर उडवून निषेध केलेला होता. त्या गोष्टीला फार वर्षे होऊन गेली आहेत असें नाहीं सतराव्या शतकाच्या प्रारंभीं गॅलिलिओ ह्मणून एका प्रसिद्ध ज्योतिष्यानें जेव्हां हीं सत्यें प्रथमत· प्रतिपादन केलीं, तेव्हां तीं अगदीं असंबद्ध,

खुळचट व पाखंडी मताची आहेत, असे जाहीर करण्यात आले होते इतकेच नव्हे, तर असली मते स्वत: ठेवू नयेत, लोकाना तीं शिकवूं नयेत अथवा त्याचें समर्थनहि करू नये, असा धर्माध्यक्षाने त्या महान् तत्वमीमासकाला निर्बंध घालून दिला होता! असें झाल्यावर तत्ववेत्ता बिचारा काय करणार! त्याने धर्माध्यक्षाची आज्ञा निमूटपणे पाळली. कारण तो त्याचा धर्मगुरु होता. पण धर्मगुरूचे ह्मणणें चुकीचे असून गॅलिलिओचीच मतें खरी होती असे आज सर्व लोकाना कळून चुकले आहे

साराश, तुमच्या हे ध्यानात आल्यावाचून राहणार नाहीं, कीं, अधिकारी माणसाच्या मर्जीच्या विरुद्ध एकादी नवी गोष्ट प्रचारात आणावयाची झाल्यास बरेच मोठे नैतिक धैर्य, जगातील काहीं थोर पुरुषाच्या अंगी जे धैर्य असते त्याहूनहि अधिक मोठे असें, अगी असावे लागते एकादी विलक्षण वाटणारी व दिसणारी गोष्ट लोकाच्या नजरेस आणून त्याचे लक्ष्य तिकडे ओढण्यास मनाच्या ठायीहि थोडें सामर्थ्य लागत असते. साधारण छत्रीचीच गोष्ट घ्या. आशिया खडातील लोकाना छत्र्याचा उपयोग फारच पुरातन कालापासून ठाऊक झालेला आहे पण तुह्माला सागितले तर कदाचित् आश्चर्य वाटेल, दीडशे वर्षांपूर्वी इग्लंडातील लोकाना छत्री ह्मणून ठाऊक नव्हती! जोनास् हॅन्वे म्हणून एका गृहस्थाने चीन देशात व पूर्वेकडील काहीं भागात बरेच दिवस वास केल्यावर, इ स. १७५० साली त्याने लंडन शहरी प्रथमत च छत्री नेली. "असे सागतात, कीं, एकदा पाऊस पडत असता हातात छत्री धरून तो जेव्हा प्रथमत च रस्त्यावरून गेला, तेव्हा लोकानी आणि मुलानी त्याची एकच हुर्यो उडवून टर केली. आणि कित्येकानी तर त्याला दगडसुद्धा फेकून मारले."[1] छत्री ती काय व लोकात तिचा प्रचार तो काय पाडावयाचा! पण त्याच्यासारख्या यःकश्चित् गोष्टीतसुद्धा नैतिक धैर्याची केवढी आवश्यकता होती, हें यावरून तुमच्या चागले लक्ष्यात येईल तुह्माला हेहि दिसून येईल, कीं, नैतिक दीर्घोद्योगाचाच अखेरीस विजय झाला, व जेथे दीडशे वर्षांपूर्वी जी गोष्ट विदेशीय अतएव ग्राम्य आणि उपहासास्पद अशी वाटली होती,

1 "Little Cyclopædia of Common Things"

जेथे तीच गोष्ट आज इग्लडांत बहुतेक प्रत्येकजण दररोज लागणारी वस्तु ह्मणून जवळ बाळगीत आहे.

हीच गोष्ट इतर सर्व व्यवसायाना आणि प्रयत्नाना लागू आहे. त्यात प्रारंभी आपली नेहमीं नाउमेद होत असते, व अखेरीस यश प्राप्तीसाठी दीर्घोद्योग व नैतिक धैर्यच आपणास आवश्यक असते. गेल्या शतकात ब्रिटिश हाउस् ऑफ् कॉमन्स् (लोकप्रतिनिधिसभे) मध्यें जी नामांकित वक्तृत्वशाली व मुत्सद्दी माणसे होऊन गेली, त्यापैकींच लॉर्ड बेकन्सफील्ड हे एक होत त्याच्या चरित्रात या प्रकारच्या धैर्याचे एक मोठे ठळक, लक्ष्यात ठेवण्याजोगे उदाहरण आढळतें ते जेव्हा प्रथमत पार्लमेंट सभेत बोलले, तेव्हा त्याचा लोकानीं फारच उपहास केला होता. मला वाटते, त्याची रीतभात, अथवा त्याची मुद्रा ही जरा विलक्षण होती. कसेंहि असो, त्याना बोलताना खाली बसावयास लावले, एवढी गोष्ट खचित ते पराभूत झाले खरे, पण त्याची नाउमेद मात्र झाली नाहीं ज्या वेळीं ते खाली बसले तेव्हा त्यानीं धैर्याने पुढीलप्रमाणे उद्गार काढिले, व ते मागाहून त्याचा जो थोरपणा वाटला त्याला साजेल असेच होते. ते ह्मणाले "मी अनेक वेळा अनेक गोष्टींना सुरुवात केलेली आहे व अखेरीस मला त्यात यश आले असाच वारंवार अनुभव आलेला आहे, अहो, आज जरी मी तुमच्या ह्मणण्याला मान देऊन खालीं बसत आहे, तरी केव्हा तरी तुह्मी माझे समग्र भाषण ऐकाल अशी वेळ आल्यावाचून राहणारच नाहीं हे लक्ष्यात ठेवा" त्यानी आपला दीर्घोद्योग तसाच चालू ठेवला व अखेरीस वेळहि आलीच, व ती अशी आली, कीं, सारा इग्लंड देश त्याच्या वक्तृत्वाने अगदी मोहित होऊन त्याचे समग्र भाषण चित्राप्रमाणे तटस्थवृत्तीने ऐकत होता

असा प्रकार आजवर घडत आलेला आहे व तो काळाच्या अतापर्यंतहि तसाच होत राहील जगाला नैतिक योग्यता ही दिसत नसते, कारण तें आधळे असते. पण नैतिक योग्यतेच्याबरोबर ज्याच्या अंगी दीर्घ परिश्रम करण्याचे धैर्य असते, त्याची किमत अखेरीस लोकाना कळल्यावाचून व त्याचा गौरव झाल्यावाचून राहत नाही

---

1 Justin Mc Carthy's—History of Our Own Times

हें नैतिक धैर्य संपादन कसें करावे, याविषयीं मी एका छोटेखानी पुस्तकातून[1] एक सुदर उतारा येथे घेतों या पुस्तकाचा उल्लेख मागे एकवार मी केलेलाच आहे. त्यातहि तो मूळचा उतारा नसून तो दुसऱ्याच एका ग्रंथातून घेतलेला आहे तो ग्रथ 'ससारातील खरें यश' या विषयावर एका अमेरिकेन ग्रथ-कारानें लिहिलेला आहे "मुख्यत्वेकरून दुसऱ्यावर अवलंबून न राहता आपल्या स्वत च्या पायावर उभे राहण्याची, स्वमतानुसार वागण्याची तुह्मी आपल्याला सवय लावून घ्या शक्य असल्यास जो प्रत्येक व्यावहारिक प्रश्न उद्भवेल, त्याचा बुद्धिपुर सर चागला पोक्त विचार करा, आणि मग त्याच्या-विषयी काय करावयाचे ते आपले ठाम मत व पूर्ण निश्चय ठरवा भुरळ पाडणाऱ्या मोहाला ज्या ज्या प्रसगी तुह्मी अगदी निश्चयानें 'नाही !' ह्मणून ह्मणाल तो प्रत्येक प्रसग, आत्मपरित्यागाच्या कर्तव्यादेशाला ज्या ज्या वेळीं तुह्मी निश्चयानें 'हो !' म्हणाल ती प्रत्येक वेळ, जो कर्तव्याचा मार्ग आपण आपल्या पोक्त विचारानें व सदसद्विवेकबुद्धीनें पसत ठरविलेला असतो त्यापासून पराङ्मुख करणाऱ्या प्रवृत्तीच्या निकडीचा ज्या ज्या वेळी तुह्मी प्रतिकार कराल ती प्रत्येक वेळ, मनाचे स्थैर्य न ढळू देता अथवा विलब न लावता एखाद्या गोष्टीचा निर्णय करण्याइतके चित्ताच्या सभ्रमस्थितीतहि आपले मानसिक सामर्थ्य ज्या ज्या वेळी तुम्हाला एकाग्र करिता येईल ती प्रत्येक वेळ, हे सारे प्रसग, या साऱ्या गोष्टी, खरे कर्तृत्वसामर्थ्य अगीं अशत येण्याला तुम्हाला साधनीभूत झाल्यावाचून राहणार नाहीत. प्रसगी तत्परतेनें निर्णय करण्याचे व एकदा निर्णय झाल्यावर त्याला अढळपणे चिकटून राहण्याचे सामर्थ्य अगी आल्यावाचून ससारातील आपल्या आचरणात फारसें यश येण्याची आशा बाळगणे अगदी व्यर्थ होईल

"अलौकिकपणा दाखविण्याचा हिय्या केल्यावाचून काहींच सुरळित चाल-णार नाहीं. 'नाहीं' म्हणणे ही एक मोठी कला आहे ती मनुष्याला जोपर्यंत अवगत होणार नाहीं, तोपर्यंत त्याच्या हातून चुका या होत राहणारच. ती कला जितकी लौकर शिकावी तितकी ती इहपरलोकीं श्रेयस्कर होते."

**लॉर्ड लॉरेन्स**[2] याच्या चरित्रकाराने पंजाबातील इ स १८५७ सालच्या

---

1 "The Indian Student's Manual," by L murdoch, I L D

२ लॉर्ड लॉरेन्स हे १८६४ ते १८६९ पर्यंत हिंदुस्थानचे व्हाइसराय होते वेस्ट मिनिस्टर ॲबे

आणीबाणीच्या प्रसगासबंधी लिहिताना पुढे दिल्याप्रमाणें उद्गार काढिले आहेत —"धैर्य दोन प्रकारचे असते परमेश्वरकृपेने ज्याचा स्वभाव मोठा उत्कट असतो, सदाशापूर्ण असतो, ज्याला सकट कसे ते दिसत नसते, खाणींतून जाण्याचा प्रसग येवो वा दारुगोळ्यानी भरलेल्या कोठारांत हिंडण्याचा प्रसग येवो, आपल्या हास्यमुद्रेत व आनंदी वृत्तीत यत्किंचित्हि अतर पडूं न देता त्यातून निर्धास्त हिंडण्याचे सामर्थ्य ज्याच्या अगी असते, अशा माणसाच्या ठायी वृत्ति आनंदित ठेवणारें जे धैर्य, ते एक ... ... व दुसरे त्याहूनहि उच्चतर असते कोणत्याहि गोष्टीकडे डोळेझाक म्हणून करावयाची नाही, सकटाच्या यच्चयावत् शाखाचे निमूर्लन करावयाचे, वादग्रस्त बाबीच्या महत्त्वाचा प्रत्यय स्वत घ्यावयाचा व इतरानाहि आवश्यक तेवढा प्रत्यय आणून देण्यासाठी खबरदारी घ्यावयाची, इतक्या गोष्टी करण्याचा ज्याचा अगदी निर्धार असतो, व मग, खर्चाचा अगोदर अदाज करून व शक्याशक्यतेचे अनुमान बाधून, आपल्या स्वाधीनचे सर्व उपाय योजून, सभाव्य गोष्टी असभाव्य, व शक्य गोष्टी अशक्य करून सोडण्यास निश्चयाने जो कंबर बाधतो, अशा जबाबदार राज्यकर्त्याच्या ठायी शांत विचार करण्याचे जे धैर्य असते ते दुसरे मुत्सद्देगिरीला शोभेल असाच एखाद्या गोष्टीचा अर्थ करणे, आपल्याला लोक काय म्हणतील अथवा आपल्याविषयी त्याना काय वाटेल याची यत्किंचित्हि पर्वा न करणे, लोकप्रशंसेची अथवा दूषणाची फिकीर न करणे, जी गोष्ट वाजवी असेल ती, काय वाटेल ते होवो, वेळ पडल्यास स्थानभ्रष्ट होण्यासहि न भिता, अगदी करारी निश्चयाने करणें, या मान्या गोष्टी करण्याचा हक्क ज्याच्या अंगी शात विचार करण्याचे मन स्वास्थ्य असतें त्यालाच एकट्याला असतो"

धैर्याला नीट वाटेने नेण्यास दूरदर्शित्वाची जोड ही असलीच पाहिजे मनात सद्धेतु न धरता अथवा हिताहिताचा विचार न करिता अविचारी निर्भयपणाने सकटावर तुटून पडणे याला धैर्य म्हणत नाहींत तो नुसता

---

येथे त्याची जी कबर आहे तिला लोक फार मान देतात त्या दगडावर खालील अक्षरे खोदलेलीं आहेत "He Feared man so little because he feared God so much" याचा मथितार्थ एवढाच, कीं, त्याच्या मनात परमेश्वराविषयीं आदरयुक्त भीति अति असल्यामुळें, अर्थात स्वत फारच पापभीरु असल्यामुळे, त्याला मानवी वर्गाची कशी ती मुळींच भीति वाटत नव्हती।

तिस्मारखानपणा अथवा फुशारकी होय! यत्किंचित्‌हि फायदा होण्याचा संभव नसता, आपल्या सैन्यातून एकटाच अविचाराने पुढे होऊन शत्रूवर चाल करून जाणारा शिपाई बेफाम झालेला वेडा म्हणून कुचकामाचाच ठरल्यावाचून राहात नाहीं उलट, पोवाड्यातल्या होरेशसप्रमाणे, कितीहि निराश्रित असला, तरी जर एकाद्याच्या ठायी स्वत च्या मर्दुमकीने शत्रूला जेरीस आणून काबीज करण्याची आशा असेल, तरच सकटाला तोंड देण्यात व लोककल्याणार्थ प्रसगविशेषी प्राणाचीहि आहुति देण्यात खरे धैर्य तो लोक-निदर्शनास आणून देईल पण व्यर्थ प्राण खर्ची घालणे याला धैर्य हे नाव मुळीच शोभणार नाही त्याचप्रमाणे ससारातील सामान्य व्यवहारातहि आपल्या मर्जीविरुद्ध असणाऱ्या प्रत्येक गोष्टीत अविचारी उत्कंठेने खुंट्या उपटीत बसणे, निष्कारण प्रत्येक गोष्टीत नित्य दोष काढीत राहणे, व योग्य विचार केल्यावाचून सुधारणाची भिक्षा मागत सुटणे, हे आचरण म्हणजे ‘जेथे सत्पुरुषाना पाय ठेवण्यास भय वाटते अशा ठिकाणी सचार करणाऱ्या मूर्खा-चेच’ आचरण होय! हे काहीं धैर्य नव्हे! तो उपद्व्यापी मूर्खपणा होय! म्हणून शारीरिक धैर्याप्रमाणे नैतिक धैर्यालाहि काळजीपूर्वक विचाराची फारच आवश्यकता असते त्याचे साहचर्य असलेच पाहिजे आचरण करण्यापूर्वी विचार हा आपणास केलाच पाहिजे आधीं विचार आणि मग आचार यच्चयावत् गोष्टींत सयुक्तिक पोक्त विचार करणे आवश्यक असते, व पोक्त विचार नसून नुसते धैर्य दाखविणे याला अविचारीपणा म्हणतात याच अर्थाची इंग्रजीत एक म्हण आहे Prudence is the better part of valour-दूरदर्शित्व हे मर्दुमकीचे भूषण आहे

आपल्या स्वत च्या ठायी ज्या वाईट गोष्टी असतील, आपल्या आचरणात जो दोष असेल, तो शौर्याने निर्मूलन करण्यात—सत्य व प्रिय असेल तेवढेच बोलण्यात, बाकीच्या सर्व गोष्टीत आपली जीभ आवरून धरण्यात, इंद्रियनिग्रह करण्यात, आपले मनोविकार आपल्या स्वाधीन ठेवण्यात, चागल्या कार्याना अढळ निश्चयाने चिकटून राहण्यात–खरें नैतिक धैर्य अप्रतिम रीतीनें दाखविता येईल पण आपल्या शेजाऱ्यात जेवढे म्हणून आपणाला दोष वाटत असतात, त्याबद्दल त्याच्यावर उठल्यासुटल्या तोंडसुख घेत राहण्यात मोठासा पुरुषार्थ नसून खरें धैर्य दाखविता येणार नाही. इंग्रजीत अशी एक म्हण आहे, कीं,

'परोपकाराला प्रारंभ घरात होत असतो' त्याचप्रमाणेच विजयाला प्रारंभहि घरांतूनच झाला पाहिजे आपल्या स्वत:ची काळजी घेणे, आपले आचरण निर्दोष होत आहे किंवा नाही हें पाहणे, हें आपले पहिलें कर्तव्य होय हे ओळखून मनुष्य आचरण करूं लागला म्हणजे घरातच किती काम करावयास जागा असते, ज्याच्याशीं झगडून मनोजय मिळवावयाचा असे किती तरी रिपु असतात, धैर्य दाखविण्याला किती तरी अनेक प्रसंग असतात, हें त्याला दिसून आल्यावाचून राहणार नाहीं कारण, प्रत्येक मनुष्याचे कट्टे शत्रु म्हटले म्हणजे त्याच्या स्वत:च्या अंत:करणातील पापवासना व त्याची स्वत:ची दुष्कर्मे हेच होत. आपले अत्यंत दुष्ट शत्रु आपल्या हृदयातच वास करीत असतात.

"आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः"

या गीतावचनाप्रमाणे आपले हिताहित आपल्याच स्वाधीन असते. या आत्मरिपूंशीच आपणापैकीं प्रत्येकाला आमरण झुंजावयाचे असते.

खरें धैर्य म्हटलें म्हणजे त्याला दूरदर्शित्वाचा आधार असावा असे मीं वर म्हटले तेवढे असले म्हणजे झाले असें मात्र नव्हे धैर्याबरोबर निश्चयाचे बळहि अवश्य लागते अंगी करारीपणा असावा लागतो

नीतिदृष्ट्या बोलावयाचे झाल्यास, असें म्हणता येईल, कीं, करारीपणाला संपादन करता येणार नाहीं असें जगात काहीच नाहीं इच्छा असली म्हणजे सर्व मार्ग आपोआप खुले होतात "संसारात मनुष्याला अवश्य लागणाऱ्या यच्चयावत् गोष्टी एकटी इच्छा असल्यावर मिळणे शक्य असतात!" सत्कार्यात इच्छेचा उपयोग दीर्घपरिश्रमाने सतत केल्यास, असंभाव्य गोष्टी संभाव्य व अशक्य गोष्टी शक्य करून सोडण्याचे सामर्थ्य तिच्या ठायीं येते निश्चयाने व धैर्याने आपल्या सदिच्छेचा आपण उपयोग केला तर काय वाटेल ते आपणास होता येईल. म्हटले आहे, कीं,

"नर करनी करे नरका नारायण होय"

दृढनिश्चयी मनुष्य इतरांवर आपलें सामर्थ्य कसे गाजवीत असतो, हे आपणा सर्वांना ठाऊक आहे तें सामर्थ्य केवळ नैतिकच असते असें नव्हे, तर काहीं अंशीं ते शारीरिकहि असते. या सामर्थ्याचा पगडा स्वत:वरहि, अर्थात्, जबरदस्त असतो. मनुष्याच्या इच्छासामर्थ्याचा पगडा त्याच्या शरीरावर इतका

असतो, की, त्याच्यामुळे शिपाई झोपेतून खडबडून उठलेले आहेत, व लढाईच्या मानसिक क्षोभापुढे मोठ्या भयंकर तापासारख्या रोगाला पळावयास लावलेले आहे! युद्धप्रवृत्तीनें मनात जी खळबळ उडते तेणेकरून अंगात केवढाहि ताप भरलेला असला, तरी गुरे ज्याप्रमाणेच अंग झाडून मोकळी होतात, तद्वत् ते तापाला झाडून टाकून समरभूमीवर जाण्यास तयार होतात अशा तऱ्हेचे प्रत्यक्ष उदाहरण माझ्या पाहण्यात आहे करारीपणाचा उत्साह अंगी असला म्हणजे त्याच्यापुढें कोणाचेहि काहीं चालत नाही तो सांगेल तसें मनुष्य करीत असतो

या प्रकारच्या धैर्याचे एक प्रसिद्ध उदाहरण—त्याला निश्चयाचे बळ असें तुम्ही पाहिजे तर म्हणा—**बाबराच्या** इतिहासात आपणास आढळते इच्छा-सामर्थ्यानें रोग नाहीसा केल्याचे ते उदाहरण नसून उलट रोग अंगावर घेतल्याचे आहे "आशिया खंडात जे नामांकित राजे आजवर होऊन गेले, त्यात बाबर हा अत्यंत प्रशंसनीय असा राजा झाला," असें एल्फिन्स्टन् साहेब म्हणतात मनानें तो अगदी मोकळा व साधा असून त्याच्या अंगी धैर्य मोठे होतें, व दीर्घोद्योग तर एवढा होता, की, तेणकरून लोक त्याला अचाट बुद्धिसामर्थ्याचा असा मानीत होते **तवारिखी बाबरात** त्यानें आपल्या स्वतःच्या साहसाचा वृत्तात इतक्या निष्कपटपणे सरळ रीतीनं लिहिलेला आहे, की, तो वाचणाराला हृदयंगम वाटल्यावाचून राहतच नाही मनुष्य या नावाला साजेल असेंच त्याचे आचरण होतें, यात संशय नाहीं तो थोर व सदाचारी होता. तरी पण मानवी दोष त्याच्या ठायी नव्हते, असें नाही त्याचा एकंदर जीवन-क्रम मोठा विलक्षण होता पण इतिहासात वर्णन केलेला आहे त्याप्रमाणे त्याच्या मरणाचा प्रसंग त्याहूनहि अधिक विलक्षण होता. असें सांगतात, की, हुमायून हा जेव्हा आजारी पडला व त्याची जगण्याची जेव्हा काहीं आशा दिसेना, तेव्हा आपल्या मुलाचे प्राण वाचविण्याच्या हेतून बाबरानें आपल्या स्वतःचे प्राण खर्ची घालण्याचा निश्चय केला हुमायूनाचा बिछान्याभोवतीं त्यानें तीन वार प्रदक्षिणा घातल्या व अगदी मनोभावानें प्रार्थना केली. सरतेशेवटी तो मोठ्यानें ओरडून म्हणाला "मी ते हिरावून घेतले. मी ते हिरा-वून घेतले" बापाच्या ठायींच्या या इच्छासामर्थ्याचा उपयोग मुलाचा रोग बरा करण्याकडे झाला असेल—नाहीं कोणी म्हणावे? एवढी गोष्ट मात्र निःसंशय आहे, की, त्या दिवसापासून हुमायुनाची प्रकृति सुधारत जाऊन बाबर मा

संगत चालला. वस्तुस्थिति काय असेल ती असो तिचा खुलासा करण्यासाठी उडवाउडवीची उत्तरेहि देण्यात येतील. पण मुसलमान लोकाची मात्र या गोष्टीवर चागली श्रद्धा आहे आणि साधारणपणे, मला वाटते, आपण सर्व-जण हे कबूल करूं, की, मानवी इच्छेचे जेव्हा अतिशय उत्कटत्वाने कार्य घडतें, तेव्हा त्याचा ईश्वरी इच्छेवर थोडा तरी परिणाम घडतोच कारण, अन्यथा, ईश्वरभक्तीत मग काही अर्थच राहणार नाही ईश्वर जे सामर्थ्य देत असतो-ईश्वराची भक्ति करीत असता त्याच्या सान्निध्यामुळे जे सामर्थ्य प्राप्त होते—तेच मनुष्याच्या अंगीं खरे धैर्य उत्पन्न करीत असतें, अशी माझी समजूत आहे अशा प्रकारचे जे धैर्य असते त्याला पराभूत करण्याचे सामर्थ्य कोणत्याहि गोष्टीत नसते चिता, सकट अथवा छळ याचा त्याच्यापुढे टिकाव लागत नाही "ज्याचें आचरण न्यायी असते, व ज्याचा निश्चय अढळ असतो, त्याला दुष्कर्म करण्यास प्रवृत्त करणाऱ्या लोकसमुदायानी कितीहि भरीस पेटविले, तरी त्याचे चित्तस्थैर्य ढळत नाही. जुलमी माणसाच्या धाकदडपशाचाहि तेथे काहीं इलाज चालत नाही. समुद्रतुफानासारखे तुफान झाले, वीज कोसळण्याइतके सकट आले, फार काय, पण धरणीकंपाने धरणी जरी उलथून पडली, तरी त्याच्या शाततेत यत्किंचित्‌हि अतर पडत नाही."[1]

असल्या धैर्याला पराभूत करण्याचे सामर्थ्य कोणाच्याहि ठायी नसते उलट त्या धैर्याला यच्चयावत् साऱ्या गोष्टी निमूटपणे वश होत असतात.

असो. अखेरीस, व्यवहारात आपणा सर्वांना सारख्याच लागू असणाऱ्या गोष्टीविषयी थोडासा उल्लेख येथे करावासा मला वाटतो सत् कोणते, असत् कोणते हे आपणास कळते जे सत्कार्य असेल, जी चागली गोष्ट असेल, ती आपण कायावाचामनेकरून, अतःकरणापासून, कडकडीत नैतिक धैर्य दाखवून, परमेश्वर, कर्तव्य आणि सदसद्विवेकबुद्धि या तिहींचेच तेवढे भय बाळगून व अन्य कशाचीहि भीति न ठेवता करीत रहावे, हाच श्रेयस्कर मार्ग आहे.

कामक्रोधादि षड्रिपूंनी कोणाला सोडले आहे? त्याच्यावरहि आपल्याला मनोजय मिळवावयाचा आहेच. अज्ञान, क्रोध, पारुष्य, दर्प व दभ हे शत्रु सारखे हात धुवून पाठीस लागलेले असतात ते आपण होऊन कधीच

---

1. Horace's Odes, III 3 by Theodore Martin

जात नाहींत त्याना जेरीस आणून वश करण्यास नीतिधैर्य व अढळ उत्साह अंगीं असावा लागतो.

आत्मनिरीक्षण हे आपणांस वारंवार करताच येत नाहीं तसें जर करता आले असते, तर दूरदर्शित्वानें आपल्या धैर्यास थोडे सौम्य स्वरूप देता आले असतें पण ज्या अर्थी ते आपल्या हातचे नाही, त्या अर्थी सन्मार्ग कोणता याची एकदा खात्री झाली म्हणजे अढळ निश्चयाने त्याला चिकटून आपण रहावे. आपल्या दृढनिश्चयानेच आपल्यासभोतालच्या सर्व माणसाना उत्तेजन मिळत असते आपण समर्थ असूं तर त्यानाहि सामर्थ्य येईल आपल्याठायींच कमकुवतपणा असेल तर त्यानाहि प्रत्येक ठिकाणी अडथळा येईल मला वाटतें, की, अविचारानें म्हणा अथवा मनाच्या दौर्बल्यानें म्हणा, लोकच्छंदानुवर्तन करण्याकडेच आपली फार प्रवृत्ति असते, व त्याच्या म्हणण्याप्रमाणे वागून पापाचरणहि करण्यास आपण प्रवृत्त होत असतों

जी गोष्ट आपल्या पोक्त विचाराला व सदसद्विवेकबुद्धीला आवडत नसते, जिचा आपण निषेध करीत असतो, तीच गोष्ट करण्याला आपण वारवार प्रवृत्त होत असतों ! असें जर आपल्या हातून होईल, तर जेथे आपलें सरळ व स्पष्ट कर्तव्य म्हटलें म्हणजे धैर्यानें वागणे हेच असतें, अशा प्रसगी भित्रेपणाचा दोष आपल्या माथीं येणार नाहीं काय ? बर्कनहेड जहाजावरील शिपायानी आपल्या सेनापतीची आज्ञा अमान्य करून ते जर आपल्या जागेवरून हालले नसते, तर त्याना जसे आपण भित्रे व कर्तव्यपराङ्मुख म्हटलें असतें, तसे नीतिदृष्ट्या बोलावयाचे झाल्यास, तोच दोष आपल्याहि माथी येणार नाहीं काय ? सदसद्विवेकबुद्धि हा आपल्यावर हुकूम बजावणारा आपला मुख्य सेनापति होय, व आपले हे विश्वविद्यालय आपणा सर्वांचें जहाज होय, ते मार्गभ्रष्ट होऊ न देता, सरक्षितपणें बदराला जाऊन पोहचेल एतदर्थ प्रत्येकानें आपआपल्या योग्यतानुरूप प्रयत्न करणें हे आपलें कर्तव्य नव्हे काय ?

साराश, जनतेची भीति न बाळगता एकट्या परमेश्वराला भिऊन, शौर्यानें व अढळ निश्चयानें वागण्याचा आपण प्रयत्न करावा जी प्रत्येक गोष्ट आपल्या हातून घडेल, जो प्रत्येक उच्चार आपल्या मुखातून निघेल, त्या सर्व प्रसगी एवढा हा विचार आपण आपल्या मनात जागृत ठेवावा. मी जे काही करीत

आहे अथवा म्हणत आहे ते बरोबर आहे काय ? आणि या प्रश्नाचे उत्तर 'होय' म्हणून जर तुमची सदसद्विवेकबुद्धि तुम्हांला सांगेल, तर ते कितीहि व्यत्यय आले तरी त्याना न जुमानता सतत दीर्घ परिश्रमानें केल्यावाचून सोडूं नका ! तुमचे कांहीं स्नेही तुमच्याविरुद्ध होतील, लोकानाहि ते कित्येकदा आवडणार नाहीं, पण तो विचार मनात येऊं देऊं नका ! दीर्घोद्योग करा आणि शौर्य दाखवा. ईश्वराचे साहाय्य आपल्याला आहेच जग आपल्याला काय म्हणेल याची फिकीर करण्याचे तुम्हाला कारण नाही जोंपर्यंत आपला मार्ग प्रामाणिकपणाचा आहे हे तुम्हाला ठाऊक आहे, तोंपर्यंत लोकाना आपल्याविषयी काय वाटेल याची काळजी वाहण्याचे कारण नाहीं जोपर्यंत तुम्ही आपल्या सदसद्विवेकबुद्धीला स्मरून वागत आहात व ती सांगेल ते एकनिष्ठपणे करीत आहात, तोपर्यंत लोकाचे भय बाळगण्याचे कारण नाहीं. ज्याचे मन निर्मळ असते त्याला धैर्यहि दाखविता येते, कारण, त्याला कशाचेंच भय वाटत नसते म्हणून सदाचरणानें वागा, धैर्य अंगी आणा, ईश्वराच्या साहाय्यानें समर्थ व्हा, आणि परमेश्वराचे साहाय्य असल्यावर आपल्या शेजाऱ्यास मदत करण्यास व उत्तेजन देण्यास आपणापैकीं प्रत्येकाला कांहीं तरी करता येईल, या दुस्तर भवसागरावर आपल्या जीवननौकेचा मार्ग थोडा तरी सुगम करता येईल "संसारातील अनेक उणीवा भरून काढण्यास, धैर्यगलिताना अथवा दुर्बलाना सामर्थ्य देण्यास, अमर्याद भवसागराच्या पैलतीरी देवलोकीं जाऊन पोहोचण्यास, व आपली जीवनयात्रा स्थैर्यानें चालविण्यास आपल्याला थोडा फार तरी हातभार लावता येईल "[1]

"या एकंदर गोष्टीचे सार एवढेच —परमेश्वराला भिऊन वागावें, व त्याच्या आज्ञेत राहावें कारण मानवी वर्गाचें तेच अखिल कर्तव्य होय. दुसरे कारण असें, की, प्रत्येक कर्माचा, प्रत्येक बऱ्या वाईट गुप्त गोष्टीचा झाडा हा आपणास परमेश्वराजवळ द्यावाच लागेल "[2]

---

1 Matthsw Arnold's 'Ongby Chapel'

2. Solomon's Ecclesiastes, Xii. 13 14

# निरहंकारवृत्ति.

मागल्या खेपेस मीं असें सांगितलें, की, आपणापैकीं प्रत्येकाला, मग तो अत्यंत वयस्क व दुर्बल का असेना, अगदी खालच्या वर्गातला शेवटला मुलगा का असेना, त्याला आपल्या सदाचरणानें एकंदर विश्वविद्यालयाची कीर्ति आणि नाव वाढविण्याच्या कामी थोडातरी हातभार लावता येईल. विश्व-विद्यालयातील सर्वांच्या साधारण राहणीपेक्षा श्रेष्ठतर राहणीनें व्यक्तिशः आचरण ठेवून ही गोष्ट करता येण्याजोगी आहे, असेंहि मी म्हटलें होतें. शिवाय, विद्यालयातील गोष्टीपेक्षा उच्चतर गोष्टीवर आपलें चित्त एकाग्र करण्याचा, ईश्वराकडे व त्याच्या दृष्टीनें जी जी गोष्ट पवित्र असते त्या त्या गोष्टीकडे आपलें लक्ष्य लावण्याचा, व इहलोकींच पुण्यलोकींच्या आनंदमय राहणीचा अनुभव घेण्याचा प्रयत्न करून वरील हेतु साधता येण्याजोगा आहे.

आता, आपण जर आपल्यापुरताच विचार करूं लागलों, तर मात्र या वरील राहणीनें आपणास राहता यावयाचें नाहीं. आपल्या स्वतःचा विचार मनात न येऊं देता, आपल्या वासना, आपल्या लालसा व आपले विचारतरंग यांना बाजूला सारून, त्याच्यावर मनोजय मिळवून, आपणाला आपलें आचरण ठेवल्यावाचून गत्यंतरच नाहीं. **'देह त्यागितां कीर्ति मागें उरावी'** या समर्थोक्तीला अनुसरून परोपकारासाठीं व परमेश्वरासाठींच आपलें आचरण आपणास ठेवलें पाहिजे. हेंच अन्य शब्दांनी सांगावयाचें ह्मणजे आपण निरहंकारवृत्तीनें राहिलें पाहिजे. या निरहंकारवृत्तीच्या उच्च कर्तव्याविषयींच आज तुम्हाला चार शब्द सांगावेत अशी माझी इच्छा आहे, व तेंहि विद्यालयातील तुमच्या कर्तव्याच्या संदर्भानेंच सांगावयाचें आहे. आपल्या-साठीं, आपल्यापुरताच विचार करून राहूं नका. इतरांचाहि विचार करा; परमेश्वराला स्मरून त्याच्यासाठींहि आपलें आचरण ठेवा.

( १ ) स्वतःसाठीं, आपलपोटेपणानें वागूं नका. स्वतःवर आसक्ति ठेवून, केवळ स्वार्थैकदृष्टीनें राहूं नका. स्वतःच्या शरीराचे, इंद्रियांचे नीच व लोभमूलक छंद अथवा कोड पुरविण्यात आयुष्याचा अपव्यय करूं नका, ढिलाई अथवा आळस धरूं नका. आलस्यासारखा रिपु नाहीं. अथवा मत्सर,

द्वेष, वाईट स्वभाव यासारखे दुष्ट मनोविकार मनात येऊं देऊं नका. सदोदित हात धुवून पाठीस लागणारे मोहपाश कोणते असतात, हे तुम्हा प्रत्येकाला कळेलच त्याच्या पाशात काही झालें तरी सापडावयाचे नाही, एवढा मनोजय त्याच्यावर मिळविण्याचा प्रयत्न करा

( २ ) परोपकाराने वागा दुसऱ्यांसाठी झीज सोसा. आपल्यापुरतेच स्वार्थदृष्टीने आचरण न ठेवता परार्थ साधेल, लोकांचे हित करता येईल, अशा तऱ्हेने वागा शाळेतील आपल्या इतर बांधवाबद्दल कळकळ ठेवून वागा सर्वांशी प्रेमाने, चांगुलपणाने व सौजन्याने वागा तेणेकरून त्याना संतोष वाटेल हा विचार सुद्धा मनात येऊ देऊं नका कारण, तसें करणे स्वार्थमूलक होईल लोकाना आनद वाटेल म्हणून तसे वागावयाचे नाही, तर परोपकार करावयाचा एवढ्याच बुद्धीने आचरण करावयाचे मन उदार ठेवा लोकाची स्थिति आहे त्यापेक्षा अधिक चागली होईल एतदर्थ प्रयत्न करा तुमच्या कल्याणाचा मार्ग तुम्हाला दाखवून तुम्हाला मदत करण्यासाठी सदैव तत्पर असणारा येथील शिक्षकवर्ग, त्याच्यासाठीहि तुम्ही आदरयुक्त व कळकळपूर्वक आचरण ठेवा. प्रत्येक गोष्टीत त्याना आनद देण्याचा प्रयत्न करून, ते सागतील त्याप्रमाणे वागून शाळेत म्हणा अथवा शाळेच्या बाहेर म्हणा, आपले कर्तव्य बजावण्यासाठी पराकाष्ठा करण्याचा नेहमी प्रयत्न करून, त्याच्याशी फार सौजन्याने व कृतज्ञताबुद्धीने वागाल असा भरंवसा आहे

( ३ ) परमेश्वराला स्मरून वागा. तो सर्वत्र, विश्वव्यापी आहे असा त्याच्याविषयी विचार मनात राहूद्या त्याच्या दृष्टीने जशी कोणतीहि वस्तु अति मोठी नाहीं, तशीच अति लहान अशीहि काहींच नाही तुम्ही ईश्वरावर श्रद्धा व भार ठेवून वागा व तो तुम्हाला खात्रीने साहाय्य केल्यावाचून राहणार नाहीं प्रेमळ पिता जसा आपल्या मुलावर प्रेम करतो तद्वत् तो तुमच्यावर प्रेम करील सदसद्विवेकबुद्धीच्या द्वारा जो कोणी तुमच्याशी बोलत असतो, हे बरे, हे वाईट, हें करावें, हे करूं नये असा अतर्यामातून जो ध्वनि निघत असतो, तो ईश्वराचाच होय ईश्वराचे पवित्र साम्राज्य आपल्या हृदयातच वास करीत आहे पण त्याचे आदेश ऐकावयाचे म्हणजे जगांतील बाह्य देखाव्याला क्षणभर बाजूला ठेवलेंच पाहिजे त्याच्या सान्निध्यात क्षणभर एकटे बसलें पाहिजे. हीच

अत्युच्च निरहंकारवृत्ति होय. यालाच आत्मपरित्याग म्हणतात. संसाराच्या बजबजपुरींत राहून जो परमेश्वराबरोबर एकटा राहत असतो, तोच खरा संत, तोच खरा संन्यासी.

# शेवटचें नवें वर्ष.

माझे तुम्हाला वारंवार असे सांगणे आहे, कीं, या नव्या वर्षापासून आपण सर्वांनी उत्साहानें व नियमानें आचरण करण्याचा निश्चय करावा. आपल्या ठाम समजुतीप्रमाणे पुढे कसें वागावयाचे, भविष्यकालीं आपले आचरण कसें ठेवावयाचें, हे अगोदर ठरविल्यावाचून नुसत्या जीविताच्या अल्पावधीची व अशाश्वततेची खात्री होऊन न होऊन आपलें असे काय मोठे कल्याण होणार? नित्यसुखाचा जेथे अखंड अनुभव घ्यावयास सांपडतो, अशा परलोकीच्या अत्यंत जीवितमहत्त्वाचा आपण विचार करीत असतां, इहलोकींच्या मायापसाऱ्याचा आपल्या मनावर एवढा जबरदस्त पगडा बसावा हे खरोखर थोडें विलक्षण वाटते. निदान येथें जेव्हा त्या गोष्टीचा आपण मोठ्या कळकळीने विचार करतों, तेव्हा सुद्धा असा प्रकार घडावा हे खरोखर चमत्कारिक होय. इहलोक सोडून परलोकीं जाण्याची वेळ आली असतां, आज ज्या वासनांवर आपण आपली भूक भागवीत आहोत, ज्याच्यावर आपले विचार इतके उत्कंठेने गढून जात आहेत त्यांना मग स्थळ कोणते? याचा क्षणभर विचार करा देवाच्या येथील नुसते निमंत्रण येण्याचा उशीर, की, मनुष्य वित्ताची पर्वा करीत नाहीं, संपत्तीची नाहीं, स्नेह्याची नाही, घरदाराची नाही, सर्व मागे टाकून एका क्षणांत चालता होतो पण आपला आत्मा मात्र अविनाशी व अमर असतो, म्हणून आजपर्यंत तुम्ही जो काहीं प्रयत्न केला असेल, त्याहीपेक्षा अधिक नेटाने नित्य आणि दिव्य वस्तूसाठी, ज्याचा जडदेहाशी संबंध न पोहोचतां केवळ आत्म्याशींच संबंध पोहोचतो अशा अध्यात्मिक वस्तूच्या प्राप्तीसाठी, आचरण करण्याचा तुम्ही आज या नव्या वर्षापासून निश्चय करा ऐहिक गोष्टींचा अभिलाष कमी करून पारमार्थिक गोष्टीचाच अभिलाष अधिक धरण्याचा तुम्ही निश्चय करा पारमार्थिक गोष्टी म्हटल्या म्हणजे शुचिता, पावित्र्य, सत्य आणि प्रेम हे दैवी गुणच होत. ते तुम्हाला व मला सारखेच दिव्य आहेत. आपल्या या जन्माबरोबर त्यांचा अंत होत नसून ते चिरकाल टिकणारे आहेत. मानवी स्वभावांत अथवा प्रकृतीत दिव्यांश असल्याकारणानें हे दैवी गुण मनुष्याला संपादन करतां येण्याजोगे आहेत. पण त्यांचा योग्य विकास होण्यास मनुष्याला सदाचरणाने व ईश्वरभक्तीनेच वागले पाहिजे.

देवाशीं अनन्य भक्तीने राहून ससाराविषयी विरक्त राहिले पाहिजे हिंदुस्थानात आणि अन्यत्र धर्माचार्य, सन्यासी आणि योगी लोक ससाराचा विसर पाडून, ऐहिक मायापाशांतून आपणाला सोडविण्याचा, सौख्य, स.पत्ति व समाज याच्यापासून अलिप्त राहण्याचा जो प्रयत्न करीत आले आहेत, त्याचे तरी कारण हेच इहलोकींच स्वर्गातील नित्य सुखाचा अनुभव घ्यावयास सापडावा एवढ्याचसाठी त्याचे विरक्त आचरण असते अशा प्रकारच्या समार- त्यागात प्रशसा करण्याजोगे पुष्कळ असते व असल्या विरक्ततेची आपणाला वारवार गरज असते. पण जोपर्यंत या जगात वास करावयाचा आहे, तोपर्यंत परमेश्वराने आपणाला आपापल्या स्थितीत पहारेकऱ्यासारखे कर्तव्य बजावण्या- साठी जन्म दिलेला आहे, असे मानून जगातून आपण विरक्त होता कामा नये ससारातील आपल्या कर्तव्याचरणाला सामर्थ्य व उज्ज्वलता देण्यासाठी मधून मधून एकातवास, ध्यान आणि भक्ति ही अवश्य पाहिजेत आणि अशा रीतीने ससारात राहूनहि परमेश्वराची भक्ति अनन्यभावाने आपणास करता येईल, व क्षणभर आपण परमेश्वराजवळ एकटे आहोंत असें वाटेल. जगात राहून अशा तऱ्हेचें आचरण जर आपण करू लागलो, तर सर्वसगपरित्याग करणाऱ्या सन्याशाइतकेच आपण जगाशी विरक्त राहूं इतकेच नव्हे, तर सन्याशापेक्षाहि आपल्या हातून अधिक चागलें कार्य घडून येईल. कारण अशा वैराग्याचे फळ आपल्या सासारिक कर्तव्यात अथवा बाह्य आचरणात स्पष्टपणे व्यक्त होईल, व तेणेकरून आपल्या शेजाऱ्याना आनद व सुख लाभल्यावाचून राहणार नाही आपण ईश्वराचे भक्त आहोत हे लोकाच्या निदर्शनास येईल. आपले तेज लोकात झळकू लागेल आपल्या हातून घडणारे सत्कार्य त्याच्या नजरेस पडेल, व जी सत्कार्ये करण्यास परमेश्वर आपणास साहाय्य करीत असतो त्यालाहि भूषण वाटेल.

# पवित्रता.

"My good blade carves the casques of men,
My tough lance thrusteth sure,
My strength is as the strength of ten,
Because my heart is pure"

Tennyson's 'Sir Galahad."

आज तुम्हाला पवित्रतेसबंधी थोडा स्पष्ट शब्दानी उपदेश करावा, अशी माझी इच्छा आहे या विषयावर बोलावयाचे म्हणजे सोपे आहे असें नाहीं. कारण, जात्या तो विषयच इतका नाजुक आहे, कीं, त्याच्या सबंधीं उघडपणे आपणाला बोलता येत नाहीं तथापि, असल्या बाबतींतील नाजुकपणाचा व मुरवतीचा परिणाम बराच दूरवर पोहोचण्याचा सभव असतो, आणि तसें होऊ लागले म्हणजे मग आपण डोळेझाक करणे, अथवा कानात बोटे घालणें, किवा तोडाला खीळ घालणे, हे काहीच करता कामा नये. जेथे आपल्या नेत्राचा, कर्णाचा व तोडाचा उपयोग आपल्या कल्याणाकडे होईल असे दिसेल, तेथे तो अवश्य केलाच पाहिजे मला वाटते, निदान आजच्या प्रसगी तरी या विषयाचा वरपागी अथवा निष्काळजीपणाने विचार न करता कळकळीने व मनाला खेद होईल अशा रीतीने विचार केल्यास आपले काहीएक नुकसान होणार नाही. कारण, हा विषयच असा आहे, कीं, जेव्हा त्याच्याविषयी आपण विचार करतों, तेव्हा आपल्यात जे अत्यंत निष्काळजीपणाने वागणारे असतात त्याची अत करणे दु खाने भरून आल्यावाचून राहत नाहींत म्हणून तुमच्याचपैकी व तुमच्याचप्रमाणे मनोविकार व वासना असणारा मी एक आहे असे समजून, पवित्रता ही किती रमणीय असते, व तेच अपवित्रतेचे पाप किती भयकर असते, याचा विचार तुम्हींहि माझ्याबरोबर करावा, असें मी तुम्हाला सागतों. अपवित्रतेचे पाप भयंकर असूनहि साऱ्या दुनियेत हे पापाचरण आजवर होत आले आहे, व आजच्या घडीला ते सामान्यत दृष्टीस पडत आहे, ही किती दु खाची गोष्ट आहे! या मगलप्रद विचारानी तरी आपली स्थिति सुधारून पावित्र्याचे तेज अधिक वाढावे, एवढेच परमपवित्र परमेश्वराजवळ मागणे आहे.

तुम्ही तरुण आहात खरे, तरी पण मला वाटते, आपल्यापैकी प्रत्येकाच्या आयुष्यात असा एक काळ येतो, कीं, त्या वेळीं आपल्या ठायी वसत असणाऱ्या

वासनाची जाणीव आपल्या मनामध्ये उत्पन्न होते, व त्या वासना जर आपण विवेकाने आवरून धरल्या नाहींत तर आपले पाऊल वाकडे पडून पापाचरणाकडे आपली प्रवृत्ति खास होईल, हे कळण्याइतके तुम्ही प्रौढ आहात. तो काळ म्हटला म्हणजे तारुण्यावस्थेच्या ऐन भरात मनुष्याला जेव्हा प्रथमच मनुष्यपणा प्राप्त होतो, तेव्हाचा होय. शरीराच्या त्या स्वाभाविक वासना होत सर्व प्राणिमात्राना त्या सारख्याच लागलेल्या आहेत. त्या मनुष्यालाच असतात व जनावराना नसतात, अशातला प्रकार नाही. एवढी गोष्ट मात्र नीट लक्ष्यात वागविली पाहिजे, की, वासना उत्पन्न होणे हे शरीराचे स्वाभाविक कार्य आहे, तो इंद्रियाचा सहजधर्म आहे, आणि म्हणूनच वासना या जात्या पापी अथवा वाईट नसतात. उलट पक्षीं, त्याना आपल्या ताब्यात ठेवून आपण जर आचरण केले, तर त्या आपल्या कल्याणालाच कारणीभूत होतात. परमेश्वराची पवित्र सेवा करण्यासाठी साधन म्हणून परमेश्वराने या जगात मानवदेहरूपी जे यंत्र आपल्याला दिलेलें आहे, त्या नाजुक आणि आश्चर्यकारक यंत्राचाच वासना हा एक भाग आहे आपले शरीर ही एक पवित्र वस्तु आहे, त्याला 'परमात्म्याचे मंदिर' असें जे ह्मटले आहे ते अगदी यथार्थ आहे. कारण, हृदयमंदिरात परमात्मा वास करीत असून, मंदिरात देवमूर्तीची स्थापना झाल्यावर त्याला जशी पवित्रता प्राप्त होते, तद्वत् शरीराला पवित्रता प्राप्त होत असते, व खरोखरच शरीराचा प्रत्येक भाग पवित्र असतो फार काय, पण शरीराची कर्तव्येसुद्धा पवित्र असतात ती कर्तव्ये आपण पवित्रतेच्या मर्यादेत ठेविली पाहिजेत, एवढेच कायते.

माझ्या मित्रानो ! आपला देह हा परमात्म्यापासून उदय पावणारा व अखेरीस त्याच्याच ठायी विलीन होणारा, जीवात्मा जेथे विराजत आहे असें पवित्र मंदिर आहे, ह्या कल्पनेने त्याचा आपण कधी विचार केला आहे काय ? आजवर जर आपण असा विचार कधी केलेला नसेल, तर आता तरी आपण त्याचा विचार करावा कारण, असल्या सुविचाराने आपल्या स्वभावाला वैभव प्राप्त होते, व ते अगदी खरे आहे; आणि तेणेकरून आपली स्थिति अधिक कल्याणप्रद झाल्यावाचून राहत नाहीं. ज्या मानाने आपण आपली शरीरें पूज्य मानू व त्याना आपण निष्कलंक ठेवूं, त्या मानानें

आपलीं मने व आपले विचार हीं देखील निर्मळ आणि चागलीं राहतील, व परमपवित्र परमेश्वराच्या सनिध वास करण्यास ती समर्थ होतील.

आपल्या इंद्रियाच्या वासना या जात्या वाईट नसून त्याना जर आपण ताब्यात ठेवून नीट वळण लाविले, तर त्या हितावहच असतात असे मी नुक्तेच सागितले आहे. पण त्याबरोबरच मला हेहि सागितले पाहिजे, की, अत्यंत सामान्य व सर्वांत मोठे असे मोहपाश या वासनापासूनच उदय पावत असतात, आणि मोहाच्या पाशात न सापडता वासना योग्य रीतीने आवरून धरणे हे काम मोठे बिकट आहे. त्याकरिता फारच सावव असले पाहिजे. ती बाब इतकी महत्त्वाची आहे, कीं, त्यात थोडेसुद्धा दुर्लक्ष्य करता कामा नये आपल्या सभोवार जगात काय चालले आहे एवढेच आपण पहावे, ह्मणजे अपवित्रतेचे भयंकर पाप किती सर्वसाधारण दृष्टीस पडते ते कळेल विशेषेकरून ज्या पापाला सर आर्थर हेल्प्स् हे 'मोठाल्या शहरातील मोठे पाप' असे ह्मणतात—ह्मणजे विवियुक्त विवाहावाचून जेथे स्त्रीपुरुषाचा एकत्र सबध घडतो—ते पाप किती सार्वत्रिक दृष्टीस पडते, याचा विचार करा याच्यासारखे मोठे पाप नाही, हे आपणा सर्वांना ठाऊक आहे, व त्याचे परिणाम किती भयंकर भोगावे लागतात हेहि सर्वांना माहीत आहेच परिणाम इतके भयकर असतात, कीं, जणू काय परमेश्वर अन्य कोणत्याहि पापाचरणापेक्षा याच पापावर अविक करडी नजर ठेवून केलेल्या कर्माबद्दल मनुष्याला एवढे झाडे द्यावयास लावीत आहे, व त्याची अशी इच्छा दिसत आहे, की, मृत्यूपेक्षा अविक भयंकर व दु:साध्य असे रोग भोगणे हेच त्या दुष्कर्मांचे इहलोकचे फळ होय.

असें असूनहि दु खाची गोष्ट ही, कीं, सारे जग सामान्यत या पापाचरणात निमग्न असलेले दृष्टीस पडते. वासनाचे अदृश्य सामर्थ्य केवढे आहे, हे यावरून चागले कळून येते. हे पाप ह्मणजे क्षम्य अशी मानसिक दुर्बलता होय, असा त्याचा कित्येक लोक विचार करीत असताना आपण केंव्हा केंव्हा ऐकितों. कित्येकाची मजल तर यथवर जाते, की, ते ह्मणतात, कीं, त्यात अपायकारक असें काहींच नसून उलट त्याचा उपभोग घेणेच अवश्य आहे! पण माझ्या मित्रानों! असल्या लोकानी या पापाचा खरोखर अर्थ काय, याचा सासारिकदृष्ट्या देखील योग्य रीतीने विचार केलेला दिसत नाहीं! मुलीच्या लज्जा आणि काळिमा आणणाऱ्या आचरणामुळे आजवर किती तरी कुलीन घराणी

खऱ्या सुखाला आंचवलीं आहेत! जरी या पातकाचा धनी मुख्यत्वेकरून पुरुष असतो, तरी त्याच्या अपकीर्तीचें खापर अखेरीस अन्यायाने गरीब बिचाऱ्या अबलेच्याच माथी फुटत असते! अशा पापामुळे तोंडाला काळें लागून किती सहस्रावधि निरपराधी मुलीच्या जीवनदशेला कायमची काळोखी आली आहे! कदाचित् सुंदर बालकाच्या ज्या माता झाल्या असत्या, त्या सुंदर स्त्रियावर अशा तऱ्हेने गेरवा पडल्यामुळें अखिल मानववंशाचे केवढे नुकसान होत आहे! या पापाचरणामुळे असख्य भयकर रोग वाढीस लागून आपल्या प्रजेच्या ठायीहि त्याचें बीज आनुवशिक सस्काराने प्रसार पावत आहे. या सर्व गोष्टीचा विचार करू लागलो ह्मणजे असेच ह्मणावे लागते, कीं, नीतिभ्रष्टतेचा यत्किंचित्हि उल्लेख केला नाहीं, तरी नुसत्या सामाजिकदृष्ट्या-देखील हे एकच महत्पाप ह्मणजे जगाला आजपर्यंत माहीत झालेला नव्हता असा अत्यत मोठा सामाजिक शापच होय! मी फारच स्पष्ट शब्दानी बोलत आहे, व तसें करण्यात माझा उद्देश एवढाच, की, तुमच्या मनावर त्याचा सस्कार चागल्या रीतीने व्हावा परमेश्वराने मला स्पष्ट बोलण्याला सामर्थ्य मात्र द्यावे, अशी माझी इच्छा आहे कारण, या विषयावर फिरून केव्हाहि चकार शब्द काढावयाचा नाही, एकदाच काय ते बोलावयाचे, असें मी योजिले आहे.

अपवित्रतेमुळे जी नैतिक हानि होते, जे नैतिक दुष्परिणाम ओढवतात, त्या मानाने पाहता सामाजिक दुष्परिणाम हे अगदी क्षुल्लक असतात. जी स्त्री आपल्या खऱ्या स्त्रीजातीच्या उदात्त कल्पनेला अनुरूप साध्वी सीतादेवीप्रमाणे खरोखर मूर्तिमंत सौजन्याने व विनयाने अलंकृत असावयास पाहिजे, त्या स्त्रीची कठोर मुद्रा, निर्दय अत करण, निर्लज्ज मन पाहून आपणास काय वाटेल बरे? ज्या सदाचारापासून व सौख्यापासून त्या एकवार भ्रष्ट झाल्या, त्याचा गंध अशा स्त्रियाना स्वप्नात तरी घ्यावयास सापडेल काय? ईश्वरी कृपा झाल्यावर काही अशक्य नसते हे खरें आहे तथापि कोठेहि जा, साऱ्या दुनियेत अशा स्त्रियाना यत्किचित्हि मान मिळत नाहीं त्याचा सर्व लोक तिरस्कार करितात, व त्याच्यापैकी कित्येकाना आपल्या अपकीर्तीबद्दल इतके वाईट वाटत असते, कीं, आपल्या विपत्तिकारक भावनाचा विसर पडण्यासाठीच केवळ त्या दारूचे व अफूचे सेवन करण्यास उद्युक्त होत असतात!

बरें, पुरुषांची तरी स्थिति नीतिदृष्ट्या याहून अधिक चांगली असते काय? या गोष्टीचा जर शातपणे विचार केला, तर पुरुषाची स्थिति स्त्रियापेक्षाहि वाईट ठरवावी लागेल आपण ही गोष्ट विसरता कामा नये, कीं, बहुतेक प्रसगी गरीब बिचाऱ्या अबलेला जो कलक लागत असतो त्याचे कारण पुरुषच असतो स्त्रीचें पाऊल वाकडे पडण्याला मूळ कारण साधारणपणे पुरुषच होत असतो. या बाबतींत स्त्री ही आपण होऊन पुरुषाला कधीहि दुर्मार्गाला लावीत नाही ह्मणून मी असें ह्मणतों, की, जो पुरुष जाणूनबुजून स्वार्थबुद्दीने स्त्रीला या पापाचरणात ओढीत असतो, त्याच्या शिरावर अन्यायाचे ओझें एवढे जबरदस्त पडते, की, त्याच्यापुढे स्वार्थीपणा आणि निर्दयता हीं काहींच नव्हत! असलें पापाचरण करणाऱ्या मनुष्याला मनुष्य हे नावच शोभत नसून तो राक्षसयोनीतील प्राणी असतो पशूंत व त्याच्यात अतर नसते. पिशाचयोनींतील क्रूर निर्दयता व पशूच्या ठायी असणारी सहज वैषयिक वासना यानी युक्त असा तो प्राणी असतो नैतिक भ्रष्टतेची याहून अधिक वाईट कल्पना करिता येईल, असे निदान मला तरी वाटत नाहीं

पुरुषाकडून या बाबतीत जे दुराचरण घडते, त्याचें कारण मला असे वाटते, कीं, शभरापैकी नव्वद बाबतीत ते जाणूनबुजून बुद्धिपुरस्सर तसें आचरण करीत नसून, केवळ वैषयिक वासनेच्या अविचारी प्रवृत्तीला बळी पडून, दृष्टीला जे अवत्व व सदसद्विवेकबुद्धीला जे माद्य येते, त्यामुळेच ते तसें आचरण करीत असतात आता या म्हणण्याने लोकाच्या दुराचारावर पाघरूण घालण्याची माझी मुळीच इच्छा नाही, आणि ह्मणून मी स्पष्ट शब्दानी असें सागतों, कीं, या पशुतुल्य नीच व अनावर विषयवासनावर अगदीं करडी नजर ठेवणे, आचारात, उच्चारात व विचारातसुद्धा केव्हाहि अपवित्रतेचा दोष येऊं नये ह्मणून, आणि कायेने, वाचेनें व मनाने यच्चयावत् अपवित्रते-पासून निर्मल राहण्यासाठी होता होईल तो प्रयत्न करणे, हे प्रत्येक मनुष्याचे कर्तव्य आहे.

एथवर सागितलेला हा अपवित्रतेचा एक प्रकार झाला. स्त्रीपुरुषात परस्पर जो पवित्र सबंध घडणे इष्ट असते, त्याच्या भ्रष्टाकाराचा दोष माथी लावून घेणे या प्रकारच्या पापाचरणाचे एवढे सविस्तर वर्णन करण्याचे कारण एवढेंच, की, साऱ्या दुनियेत तो प्रकार अत्यत सामान्य असून तुमच्या तो लक्ष्यात न येण्या-इतके काहीं अल्पवयस्क तुह्मी नाही पण जेणेकरून आपण आत्मभ्रष्ट होऊन

वृत्तीने अगदी खालावतो व परमेश्वरालाहि पारखे होतो, ज्या योगाने आम्ही सदाचरणापासून दूर राहण्याचा संभव असतो, असे अपवित्रतेचे आणखीहि अन्य प्रकार आहेत, व त्या प्रकारापैकी काहीं प्रकार विद्यालयांतूनच फारकरून दृष्टीस पडतात मला अशी शंका वाटते, की, तुमच्यापैकी कित्येकाना त्याचा परिचयहि असेल असल्या अपवित्रतेपासून जे कॉलेज अथवा जे उच्चप्रतीचे विद्यालय अलिप्त राहिले असेल, जे सर्वांशा शुद्ध राहिले असेल, ते खरोखरच फार भाग्यवान् आणि धन्य ह्मणून समजावे.

या कॉलेजात खाजगी परस्पर व्यवहारात काय घडत असेल, हे माझ्यापेक्षा तुह्मालाच अधिक चागले ठाऊक आहे आपापसात बोलताना अपवित्रतेची थट्टेने का होईना, तुह्मी कधी चर्चा केली आहे काय? धाणेरड्या अमंगल गोष्टी तुह्मी कान देऊन ऐकत असता काय? अथवा अपवित्राचरणाकडे प्रवृत्त करणाऱ्या थट्टाचा तुह्मी उपहास करीत असता? किंवा जेणेकरून अधिक नीच कल्पना जागृत होते, मनात भलतेसलते विचार येतात, असे कोणतेहि कृत्य करण्यास तुह्मी वाणीने अथवा कृतीने परवानगी अथवा उत्तेजन कधी देत असता काय? विद्यार्थ्यांच्या वसतिगृहातून असली थट्टा किती सामान्यत: चालेली असते! मला तर असे वाटते, कीं, या साऱ्या गोष्टी विद्यार्थ्यांना क्वचितच अपरिचित असतात हे प्रकार तुह्मी आपापल्या खोलीत मुळीसुद्धा होऊं देऊ नयेत, असा मी तुम्हाला कळकळीने उपदेश करितों, व तुह्मी नेहमी या बाबतीत सावध असावे, असा इशाराहि देऊन ठेवतो. तुह्माला जर या गोष्टी ठाऊक नसतील, तर परमेश्वर करो आणि त्या तशाच तुह्माला अपरिचित राहोत!

तेव्हा कायेने, वाचेने व मनाने पवित्र कसे रहावयाचे? हा प्रश्न ह्मणजे आपणा सर्वांच्या, तुमच्यापैकीं प्रत्येकाच्या, तसेच माझ्याहि मनाला येऊन भिडणारा आहे

प्रथमत: आपले विचार व आपले उच्चारहि पवित्र ठेवण्याविषयीं आपणाला अत्यत दक्षता ठेवली पाहिजे. अपवित्रतेचा यत्किंचितहि वास म्हणून येणार नाही, अशा वागणुकीबद्दल, व जेणेकरून आपल्या प्रवृत्तींना नीच वळण लागते व परमेश्वराला आपण ओळखीनासे होतों अशा प्रत्येक अमंगल विचारापासून अथवा उच्चारापासून अलिप्त राहण्याच्या बाबतीत, आपण फारच सावधगिरी

ठेविली पाहिजे. अपवित्र विचाराच्या बाबतींत तर आपण फारच काळजी घेतली पाहिजे कारण, विचार हे कार्याचे जनक होत अगोदर विचार व नंतर आचार अशी परपरा आहे आणि जर अपवित्र विचारातच आपण निमग्न राहू लागलों, तर अपवित्र आचरण आपल्या हातून घडल्यावाचून राहणारच नाहीं! प्रत्यक्ष आचरण न करिता नुसत्या मनाने जरी सुंदर स्त्रियाचे चितन केले, तरी व्यभिचाराचा दोष लागल्यावाचून राहत नाही, हे लक्ष्यात ठेवा याच अर्थाचे क्राइस्टचे एक वचन आहे —

" Whosoever looketh on a woman to lust after her, hath committed adultery with her already in his heart. "

हे शब्द तुह्माला अगदी अक्षरश खरे वाटतील, असा मला पूर्ण भरवंसा आहे. अत करणात नीच विचार आले ह्मणजे मनुष्याच्या स्वभावात व बुद्धीत पालट पडून तितकींच नीच कृत्ये हातून घडावयास लागतात

मुख्यत लक्ष्यात ठेवावयाचे ते एवढेच, की, परमपवित्र परमेश्वराच्या सान्निध्याचा आपणास विसर पडता कामा नये तो आपल्यासन्निध सदैव उभा आहे, त्याला आपले अमगल विचार आवडणार नाहीत, एवढा विचार जागृत असावा. त्याच्या सान्निध्याने आपणाला कोणताहि डाग लागण्याची भीति नाहीं त्याच्या पवित्र साक्षित्वाच्या उज्ज्वल प्रकाशात यच्चयावत् कलक नाहीसे होतात सूर्यकिरणे दिसू लागताच रात्रीचा अधार जसा नाहीसा होतो, तद्वत् ईश्वराच्या सान्निध्यात यच्चयावत् कलकाचे ढग पार वितळून जातात.

ज्या वातावरणात नीच सासारिक मनोविकार व विषयवासना उदय पावून त्याचे पोषण होत असते, त्याहून अधिक उदात्त वातावरणाला शोभतील असले उच्च विचार नेहमी मनात आणण्याचा तुह्मी अहर्निश प्रयत्न करा. कर्मेंद्रिये जरी इहलोकी कार्य करीत असलीं, तरी आपले मन स्वर्गातील सुविचारातच निमग्न राहूं द्या नीच व हलकट लोकाची सगति नेहमी टाळा. आपल्याहून जे सर्वतोपरि श्रेष्ठ असतील त्याच्या सहवासात सदैव रहा अनेक नामाकित ग्रंथकारानी सुविचारपरिप्लुत ग्रंथ लिहून जगावर उपकार करून ठेवले आहेत, त्या उत्तम ग्रंथाचा व त्यातील अप्रतिम विचारांचा आस्वाद घेऊन, त्याचे परिशीलन करून तुह्मी आपली मानसिक उन्नति करून घ्या. शिक्षण हे आपणास साहाय्य करण्यास तत्पर आहेच, व ते जगातील एकंदर

राजाच्या संपत्तीहून मोठा असा अपरंपार संपत्तीचा ठेवा आपणाला पुरवीत आहे ही ज्ञानसंपत्तिच मनुष्याला खऱ्या वैभवपदाला नेऊन पोंहचविते ती दिव्य व वैभवशाली बुद्धिमान् मानवरत्नाची संपत्ति होय म्हणून अप्रतिम अशा ग्रंथांच्या वाचनाने आपले मन आणि विचार सुसंस्कृत करावे ज्याचें मन उदात्त विचारांनी भरलेले असते, त्याच्या हातून नीच व अपकीर्तिकारक कृत्ये सहसा घडत नाहींत सर आर्थर् हेल्प्स् म्हणतात "मॅकबेथसारख्या महान् प्रतिनिधी-कडून येणाऱ्या इसमाची वृत्ति कुटिल कारस्थानें करण्याकडे असणार नाहीं !"[१]

आत्मोन्नतीच्या दृष्टीने दुसरी एक गोष्ट आपणाला करता येण्याजोगी म्हटली म्हणजे, आपल्या इंद्रियांच्या वासना पुरविण्यात नेहमी नेमस्तपणा ठेवावा. वाजवीपेक्षा त्यांचे फाजील लाड कधींहि करू नयेत काहीं खाण्याचे पदार्थ इतर पदार्थांपेक्षा अधिक उत्तेजक असतात तेणेंकरून वासना अधिक प्रदीप्त होतात, चित्ताचा क्षोभ होतो असले पदार्थ सेवन करणे टाळता येईल तितकें टाळावें अपवित्रतेचे पापाचरण करण्यास उद्युक्त करणारें मद्यपानासारखें दुसरें पान नाहीं, हें मशहूर आहेच त्या बाबतीत तुम्ही आपल्या स्वतःबद्दल विशेष काळजी घ्या आपल्या शारीरिक वासना या बहुतेक अशी आपल्या स्वाधीन असतात सर्व वासना आणि लालसा बाजूला सारून संसारपरित्याग करणारे योगी लोक शरीराच्या पशुतुल्य वासना निर्मूलन करणे हा जीवित हेतूंपैकी एक प्रधान हेतु मानीत असतात, हे तुम्हाला ठाऊक आहेच परमेश्वराने दिलेले कार्य करीत राहून जगात राहणे हेच आपले कर्तव्य आहे शरीराचे कोड न पुरविण्यात आपण योगी लोकांचे अनुकरण केल्यास बरे वासना आपल्या स्वाधीन ठेवण्याचा दुसरा एक उत्तम उपाय म्हटला म्हणजे नियमित व्यायाम हा होय. शारीरिक व्यायाम ही फार महत्त्वाची बाब आहे. **'शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम्'** ही कविकुलगुरु कालिदासोक्ति लक्ष्यात ठेवण्याजोगी आहे, व नाना तऱ्हेचे शारीरिक व्यायाम व खेळ हे तरुणांच्या शिक्षणाचा आवश्यक भाग म्हणून जे मानिलें आहे, त्याचे तरी कारण हेंच नियमितपणे व्यायाम घेण्याचा निश्चय ठेवा. त्यात कधीहि अंतर पडू देऊ नका. घोड्यावर बसून सहल करावयास जाणे, फिरावयास जाणे, मुद्गल फिरविणे,

1 Companions of my solitude. p 97 हे छोटेखानी, मन उल्हसित करणारे पुस्तक विद्यार्थ्यांनीं अवश्य वाचावे, अशी मी आग्रहाची सूचना करितो

कसरत करणं, डम्बेल्स करणें, अथवा म्यूलरच्या पद्धतीने घर बसल्या बिनखर्चाने पंधरा मिनिटे व्यायाम करणें, हे सर्व प्रकार हितावह असून तरुण मनुष्याने ते करावे तितके थोडेच आहेत. जे सुस्त व आळशी स्वभावाचे असतात, त्यांच्याच ठिकाणी सामान्यत वैषयिक सुखाची लालसा अधिक दृष्टीस पडते. आणि अशा लोकाना तर शारीरिक व्यायाम अत्यावश्यक असतो शरीर ही जात्या मोठी चागली आणि उदात्त वस्तु आपणाला परमेश्वराने दिलेली आहे, ती वर सागितल्याप्रमाणे नीट व्यवस्थित ठेवून तिचा योग्य विकास करता येईल— प्रत्येक अवयव प्रमाणशीर सुदृढ करता येईल पण मनाप्रमाणेंच शरीरालाहि शिस्तीची आवश्यकता असते, व ती शिस्त ह्मणजे नियमितपणे व्यायाम घेणें हीच होय.

माझ्या मित्रानों! या सर्व गोष्टीचा तुह्मी नीट विचार करा. कारण, तेणेकरून तुमचे कल्याण होईल अशी माझी खात्री आहे त्या आचरणात आणण्याचा मात्र तुह्मी प्रयत्न करा

या सर्व गोष्टी पाहिजेतच. पण सर्वांत अतिशय साहाय्यकारी गोष्ट ह्मटली ह्मणजे ईश्वरभक्ति हीच होय. खरोखर पाहता ती जर नसेल, तर आपल्या हातून काहींच होणार नाही. ईश्वरभक्तीचें साहाय्य असल्यावर आपणास जगात वाटेल ते चमत्कार करून दाखविता येतील. केवळ यान्त्रिक कलेच्या गतीप्रमाणे घडणाऱ्या भावरहित उपासनेने देवदूत आपल्या साहाय्यार्थ कसे धावून येतात, व यच्चयावत् मोहपाशाना सौख्यद स्वरूप ते कसे देतात, हे जरा आश्चर्यकारक नव्हे काय? म्हणून मी तुह्माला फिरून सागतो, की, सर्वांत ईश्वरभक्तीलाच अधिक प्राधान्य द्या स्वाभाविक वासना जात्या जरी वाईट नसल्या, तरी मनुष्याला पापाचरण करण्याला त्या सहज प्रवृत्त करीत असतात अशा वासना तुमच्या ठायी उदय पावल्याचे जेव्हा तुह्माला कळून येईल, तेव्हा तुम्ही ईश्वराचे साहाय्य मागा, व तो ते तुम्हाला दिल्यावाचून खास राहणार नाहीं!

आपल्या शरीराचा व तारुण्यविभवाचा मोठा उदात्त विचार करून त्याचा अभिमान धरा. जेथे सामर्थ्याचा ऐन भर असतो, सर्व शक्ति अगात रसरसत असतात, अत करण प्रेमळपणाने व निर्मलतेने सद्गदित असते, अशा तरुण मनुष्यापेक्षा अधिक सुंदर व रमणीय वस्तु साऱ्या दुनियेत अन्य

कोणतीहि नाहीं हें लक्ष्यांत ठेवा. छन्द अथवा वासना असल्यावांचून खरोखर उदात्त अशी कोणतीच गोष्ट करतां येणार नाहीं; पण तसेंच, अंगीं निर्मलता असल्यावांचून, शरीर व मन शुद्ध असल्यावांचून कोणतेंहि उदात्त कार्य करतां येत नाहीं! सारांश, वासना आणि पवित्रता या दोन गोष्टी अगदीं जुळया बहिणींप्रमाणें आहेत, व या दोन्ही जेथें एकवटलेल्या असतील तेथेंच काल्पनिक पूर्ण स्वरूपाचा मनुष्य आपणांस पहावयास सांपडेल. माझ्या मित्रांनों! अशा तऱ्हेचें उदात्त व पूर्ण स्वरूप आपल्या अंगीं आणण्याचा प्रयत्न करण्यास तुम्ही आजपासूनच सुरुवात करा.

अखेरीस सॉलोमनच्या शब्दांनीं उपदेश करून मी तुमचा निरोप घेतों. सॉलोमननें तरुणांचे हक्क कोणते, याचें प्रतिपादन करते समयींच त्याबरोबर प्राप्त होणाऱ्या मोठाल्या जबाबदाऱ्यांचेंहि दिग्दर्शन केलेलें आहे. तो ह्मणतोः—

"बा तरुणा! तूं आपल्या तारुण्याबद्दल आनंद मान, व तुझ्या तारुण्याच्या दिवसांत तुझें अंतःकरण तुला आनंदित करो, आणि सदसद्विवेकबुद्धि सांगेल त्याप्रमाणें व ज्ञानचक्षु मार्ग दाखवील त्या मार्गानें तुला तें वागावयास लावो; पण तूं एवढी गोष्ट लक्ष्यांत ठेव, कीं, तूं जें जें कांहीं करशील, त्या सर्व कृत्याबद्दल तुला अखेरीस परमेश्वरापाशीं झाडा द्यावा लागेल!"

ॐ शांतिः

# मासिक मनोरंजन.

[ सचित्र मासिक पुस्तक. वार्षिक वर्गणी ट ह सह ४-०-० ]

महाराष्ट्र वाचकाची सतत दीड तपावर एकनिष्ठपणे सेवा बजाविणाऱ्या या मासिक पुस्तकाचें नाव ऐकिले नसेल असा महाराष्ट्रीय विरळाच आढळेल ! मनोरजनाने विशेषत आपल्या भगिनीवर्गाचे पूर्ण प्रेम सपादिलें आहे. महाराष्ट्र महिलाना रुचण्याजोगा, पचण्याजोगा आणि, परिणामी हितकर असा निर्दोष, मधुर आणि मनोरजक उपदेश करण्याचा **मनोरंजनाने** यथाशक्ति चालविलेला प्रयत्न पुष्कळाच्या प्रशसेस पात्र झाला आहे **मनोरंजनाच्या** दर अकात बारिक, आणि सुबक टाइपात छापलेला मोठ्या आकाराची सुमारें १०० पृष्ठे मजकूर प्रसिद्ध होत असून शिवाय दर अकात हाफटोन प्रोसेसची कित्येक सुदर चित्रेहि असतात.

मनोरजनाच्या प्रत्येक वर्गणीदाराला दरसाल दिवाळीचा फार मोठा, अत्यत महत्त्वाचा व भरपूर चित्रे असलेला अक भेटीदाखल फुकट देण्यात येत असून शिवाय आणखीहि एकाददुसरे उपयुक्त पुस्तक बक्षिसादाखल देण्यात येते महाराष्ट्रातील नामाकित विद्वान्, लोकमान्य पुढारी, राजेरजवाडे, विदुषी स्त्रिया आपल्या विचाराचा आणि अनुभवाचा फायदा मनोरजनाच्या वाचकाना देत असून महाराष्ट्रातील नामाकित कवि आणि चित्रकार आपल्या कृतीनी मनोरजनाला भूषवीत असतात

आपल्या राष्ट्राचा भाग्योदयाचा पुण्यकाळ जवळ येण्यास सर्वाआधी आपल्या राष्ट्रातील माताची मने सुसस्कृत झाली पाहिजेत सुमाताच्या पोटींच सुसताने जन्म घेतील आणि आपल्या सतानाना सुमाताच देशभक्त बनवितील **मनोरंजनाचें** उद्दिष्ट हेच आहे

आपल्या महिलावर्गात जागृति करून या राष्ट्रमाताकडून आपल्या भावी पिढीस करारी, बाणेदार, देशभक्त बनविण्याचा यथाशक्ति, एकनिष्ठपणे प्रयत्न करणाऱ्या **मासिक मनोरंजनाची** आपल्या कुटुबातील स्त्रियाशी

**मंडळी**च्या पुस्तकमालेपैकी आतांपर्यंत प्रसिद्ध झालेल्या (पुढें दिलेल्या यादींतील) पुस्तकांपैकीं कोणतेंहि पुस्तक, त्याचप्रमाणें **मंडळी**च्या पुस्तकमालेपैकीं पुढें प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकांपैकीं कोणतेंहि पुस्तक पाऊणपट किंमतीस देण्यांत येईल. **आश्रयदात्यांस** पुस्तकाची फक्त **एकच प्रत** या सवलतीनें मिळूं शकेल.

४ प्रत्येक पुस्तक तयार होतांच कार्ड पाठवून **आश्रयदात्यांस** आगाऊ सूचना देण्यांत येईल. हें पुस्तक घ्यावयाचें नसल्यास, **आश्रयदात्यानें १५** दिवसांच्या आंत तसें स्पष्ट कळविलें पाहिजे. आपल्याला सदर्हु पुस्तक पाठवूं नये ह्मणून जे स्पष्ट कळवितील, त्याच्याशिवाय बाकीच्या सर्व **आश्रयदात्यां**कडे तें पुस्तक पाऊणपट किंमत आकारून व्ही. पी. नें पाठविण्यात येईल.

५. याप्रमाणें व्ही. पी. नें पुस्तक पाठविलें असता **आश्रय-दात्यानें** त्या व्ही. पी. चा स्वीकार केलाच पाहिजे. परतु आगाऊ न कळवितां व्ही पी. जे परत करतील, किंवा **मंडळी**च्या नियमा-प्रमाणें **वर्षांत कमींत कमी तीन रुपये किंमतीची पुस्तकें** जे मागविणार नाहीत, त्यांना दिसेंबरच्या पहिल्या आठवड्यामध्यें (**मंडळीचें** हिशेबी वर्ष जानेवारी ते दिसेंबर अखेर समजलें जाईल. कोणी केव्हांहि आश्रयदाते झाले, तरी त्यांचें दिसेंबर अखेर हिशेबी वर्ष पुरें होऊन जानेवारीपासून नवीन वर्षास आरंभ होईल.) लेखी सूचना दिली जाईल. ज्या कोणीं व्ही. पी. परत केली असेल त्यांनी दिसेंबरच्या २० तारखेच्या आत, त्या व्ही. पी. चा खर्च पाठविला पाहिजे. त्याचप्रमाणें ज्या कोणी सबंध वर्षात ३ रुपयापेक्षा कमी किंमतीची पुस्तकें घेतलीं असतील त्यांनीं नियमाप्रमाणें बाकीच्या पुस्तकाबद्दल मागणी केली पाहिजे.

जे याप्रमाणें वागण्यास चुकतील त्यांचीं नांवें **आश्रयदात्यां**च्या पटांतून सालअखेर कमी केलीं जातील. परंतु पुनः एक रुपया प्रवेशफी भरल्यास त्यांचीं नांवें नव्यानें **आश्रयदात्यां**च्या पटांत नोंदली जातील व त्यांनां पुनः सवलतीचा लाभ मिळूं शकेल.

६. सुबक छपाईचीं, उपयुक्त आणि महत्त्वाचीं पुस्तकें अगदीं स्वल्प किंमतींत देतां येण्यास त्या पुस्तकांनां खात्रीपूर्वक आश्रय देणाऱ्या बऱ्याचशा **कायमच्या आश्रयदात्यां**ची आवश्यकता आहे, हें उघड आहे. **मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीनें** हें काम करण्याचा निश्चय केला आहे. मातृभाषेचा खराखरा अभिमान बाळगणारांनीं **मंडळी**च्या या योजनेला साहाय्य करून आपल्या ग्रंथभांडाराची समृद्धि करण्याच्या कामीं, त्याचप्रमाणें आपल्या होतकरू ग्रंथकारांचा उत्साह वाढविण्याच्या कामीं, **मंडळीला** अंतःकरणापासून साहाय्य करावें, अशी सर्व महाराष्ट्र बंधुभगिनींस आग्रहाची विनंति आहे.

**मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी, गिरगांव—मुंबई.**

# मनोरंजकग्रंथप्रसारक मंडळीचीं पुस्तकें.

## कादंबऱ्या, संपूर्ण गोष्टी वगैरे.

**माणिकबाग.—** लेखक-श्रीयुत वासुदेव गोविंद आपटे, बी. ए शुद्ध वर्तनाच्या आणि निष्कपट, निष्पाप व अत्यत कोमल अत करणाच्या, परतु सशय आणि त्या सशयामुळें उत्पन्न झालेला मत्सर यानी ग्रासलेल्या एका हतभागी स्त्रीनें, अविचाराच्या भरी भरून भलतीच गोष्ट करून आपल्या एकदर जन्माचे कसें मातेरे करून घेतले, ससाराची व ऐहिकसुखसौभाग्याची कशी राखरागोळी केली; आणि जन्मभर पश्चात्ताप करूनहि आपल्या त्या भयकर चुकीचा घोर परिणाम तिला टाळता आला नाहीं व जिवाची तळमळ शात झाली नाहीं, त्याचे हृदयद्रावक चित्र या कादंबरीत आहे **किमत** १-४-०.

---

**दुःखाअंतीं सुख.—** लेखक-श्रीयुत वासुदेव गोविद आपटे, बी ए 'जिच्या हातीं पाळण्याची दोरी तीच देशाला उद्धरी!' चागली माता कितीहि गरीबी, कितीहि सकटे, केवढेहि दुर्धर प्रसग आले तरी त्यातून पार पडून आपल्या मुलाना कशी सन्मार्गवर्ती बनविते, उद्योगाचे, सद्गुणाचे बाळकडू पाजून विपत्तीमधूनहि आपल्या मुलाचे भाग्य कसें उदयास आणिते, तसेच अप्रबुद्ध, मूर्ख आई आपल्या मुलाच्या जन्माचे कसें मातेरे करते, याचे हुबेहुब चित्र या कादबरीत दिसेल. **किमत** १-४-०

---

**दोन घटका मनोरंजन.** (भाग १ ला)—

**मनोरंजना**च्या १ ल्या, २ ऱ्या आणि ३ ऱ्या या तीनहि पुस्तकातील पुढील निवडक गोष्टी यात आहेत १ हिंमतबहादर. २ थोर हृदय ३ पास कीं नापास ? ४ राणी रूपसुंदरी ५ अभिमान ६ निरभिमानता ७ गुप्त पोलिस ८ मनाचा मोठेपणा ९ माझ्या मामाची एक वाईट खोड. १० नवरे कसे तयार करावे! ११ यमीची गोष्ट १२ मी चतुर्भुज कसा झालों!

१३ एका सद्गुणी मुलीची गोष्ट १४ मोगरीची ही माळा देऊ? १५ माझ्या भाचाचा एक खेळ १६ खान साबका टट्टू और आरबकी घोडी. १७ आणि अखेरीस घडलेंच पण तसेच! १८ वा. ग्रंथकार! १९ फुलजानी बेगम. २० आवडती ताईत. २१ कोणी एवढी मेहरबानी करील? २२ एक चित्र. २३ ब्युबानिक प्लेग. २४ बिचारी आनदीबाई. २५ आनदकुमारी. २६ अभागी यमुना! २७ ससार असार. २८ अखेरीला निश्चय ढासळला २९ मातृचुबन ३० शेवट तर गोड झाला ३१ आमची पत्रे इत्यादि सुरस, सपूर्ण गोष्टी, आणि १ देवर्षि नारद, २ महर्षि अगस्त्य, ३ महर्षि कश्यप, ४ महर्षि वसिष्ठ, ५ देवाचार्य बृहस्पति, ६ महर्षि कपिल, ७ महर्षि गौतम या सप्तर्षींची सुरस चरित्रे. पृष्ठे ३९२ **किंमत** १-४-०

---

## दोन घटका मनोरंजन. (भाग २ रा)—

**मनोरंजना**च्या ४ थ्या, ५ व्या आणि ६ व्या या तीन पुस्तकातील पुढील निवडक सपूर्ण गोष्टी यात आहेत १ दुर्गा २ गुलाब. ३ भयकर प्रायश्चित्त. ४ तारा ५ भाऊबीज कीं वाङ्निश्चय? ६ चागलाच अनुभव आला! ७ बाजू अगावर आली! ८ पिरोज ९ कमळा १० पद्मिनी ११ जडावाचा कमरपट्टा. १२ शाबास बाबुराव! १३ खूप मात केली! १४ सवाई प्रताप! १५ बापूसाहेब १६ इदिरा १७ चपा. १८ सुखी कीं दु खी? १९ लक्ष भाऊबीजा २० बाहुली काय सागते? २१ स्त्रीपार्लमेंट २२ तिघे वेदाती २३ ब्रह्मचर्य कीं गृहस्थाश्रम? २४ दोन कुटुबे. इ इ पृष्ठ ४००. **किंमत** १-४-०

---

**नशिबाची परीक्षा.**—लेखक प वा. श्रीयुत गणेश विष्णु साठ्ये 'इथेच करावे आणि इथेंच भरावे!' दुसऱ्यासाठीं खाडा खोदणारास स्वत च त्या खाड्यात पडावे लागते व भल्याचा परिणाम शेवटीं भलाच होतो, हे या कादम्बरींत फारच सुदर रीतीने दाखविले आहे. **किंमत** १-४-०

---

**संसाररंजन.**— मनोरंजनाच्या ९ व्या आणि १० व्या या दोन वर्षांच्या पुस्तकातील निवडक गोष्टी यात आहेत १ गुलछबूचे फूल. २ कोण फजिती! ३ माझी पहिली वकिली ४ वसतलीला ५ भवितव्य. ६ क्षुल्लक चुकीचा भयकर परिणाम. ७ पण— ८ चोराची कृतज्ञता ९ वकीलसाहेबाची बहाद्दरी १० तुळजापुरची भवानी. ११ अहेर १२ सशयपिशाच्चिकेचे खेळ १३ जशास तसें. १४ महाराज देवीसिंह १६ जानकीबाई १७ बंडाची वावटळ १८ पैसा मिळविण्याची पेटट युक्ति १९ जोधबाई २० हरवलेला खजिना. २१ सुगृहिणी २२ सार्जट बिगोर २३ स्वप्ने खरी कीं खोटी २४ दोन बहिणी. २५ रुसवा कीं प्रेम २६ तारा. २७ गोदी २८ अखेर बाई वळणावरच गेल्या २९ सती डागा ३० दृढ प्रतिज्ञा ३१ झोपडीतील प्रेम ३२ आम्रतरु. याशिवाय १ मृत पतीस, २ विधवेची भिक्षा, ३ वीरपत्नीचे समाधान या तीन सुरस कविता आहेत **किंमत १—०—०**

---

**सुधा.**—लेखक श्रीयुत 'शारदाश्रमवासी' सुप्रसिद्ध कादबरीकार प वा रमेशचंद्र दत्त, आय् सी एस्., सी आय् ई. याच्या ज्या इग्लिश कादबऱ्यानी इग्लिश वाचकानाहि तल्लीन करून सोडलें आहे, त्यापैकी 'Lake of palms' या कादबरीचे ही कादबरी रूपातर असून यात वंगससाराचें प्रतिबिंब यथातथ्य, मार्मिक व मनोहर रीतीनें दाखविले आहे. यांत निरनिराळ्या स्वभावाची पात्रे अत्यत कुशलतेनें कादबरीकारानें एकत्र आणली असून त्याच्या स्वभाववैचित्र्यामुळे या कादबरीतील कथानकाचे मनोहरत्व अधिकाधिक वाढत जाते व लेखकाच्या मार्मिक बुद्धिवैभवाबद्दल कौतुक वाटते **किंमत १—०—०.**

---

**नरेन्द्रनाथ.**—लेखक श्रीयुत विठ्ठल जिवाजी नाडकर्णी. सुप्रसिद्ध विद्वान् लेखक प वा. बाबु रमेशचंद्र दत्त याचा 'Slave girl of Agra' या पुस्तकाचे हें सुरस रूपातर आहे. **किंमत १—०—०.**

---

**नवयुग.**— लेखक श्रीयुत वासुदेव गोविंद आपटे, बी ए या पुस्तकात नव्या आणि जुन्या अशा दोन्ही पक्षामधील मंडळीऱ्या वर्तनातील कित्येक बऱ्यावाईट गोष्टीचे नि पक्षपाताने चित्र काढण्यात आले आहे पूर्व आणि पश्चिम याचा सयोग होऊन आपल्या देशात आचाराविचारात क्राति घडवून आणणाऱ्या **नवयुगाचे** यात वर्णन आहे. **किमत** ०-१२-०

---

**जीवनसंध्या.**— लेखक श्रीयुत विठ्ठल सीताराम गुर्जर ही ऐतिहासिक सुदर कादंबरी श्रीयुत रमेशचंद्र दत्त, सी आय् ई, याच्या बंगाली पुस्तकाच्या आधारे लिहिली असून, हींत भारतभूषण क्षत्रियकुलावतस महाराणा प्रतापसिहाने केवळ स्वातत्र्यासाठीं दिल्लीश्वर अकबर बादशहाशी आमरण युद्धप्रसग करून प्रगट केलेलें असामान्य क्षात्रतेज, भोगलेली दुर्धर विपत्ति, त्याचे विमल यश, अतुल देशभक्ति, विलक्षण आत्मत्याग, त्याचप्रमाणे क्षत्रियकुमार तेजसिहाचा वीरोदात्त स्वभाव, अतुलनीय आत्मसयमन, राष्ट्रकाजाच्या प्रसगी प्रत्यक्ष कट्टया दुष्मनाशीहि त्याने प्रगट केलेली गाढ आत्मीयता; देवकन्या पुष्पकुमारीचे सच्चरित्र, भिल्लबाला गिरिजेचे चातुर्य आणि सतीत्व, वगैरे अनेक प्रसग फारच बहारीचे आहेत सर्व जगात आज ज्याच्या नावाचा डका वाजत आहे, त्या नरश्रेष्ठ रजपुताच्या अगचे अनेक अलौकिक गुण अवलोकन करण्यास, त्या गुणाचे अशत अनुकरण करण्यास ही सुदर कादबरी आदर्शसमान आहे

**किमत** ०-१२-०

---

**राजा तोडरमल.**— लेखक 'शाताराम' भारतभूषण महाराजा तोडरमल याच्या वेळच्या समाजस्थितीचे या कादबरींत सुदर चित्र आहे नरेंद्रनाथाचे लोकोत्तर वीरत्व, सरलेचे विशुद्ध प्रेम, महाश्वेतेची कठोर प्रतिज्ञा, शकुनीचे भयकर कपट, विमलेचा देवस्वभाव, अमला, कमला याचे निष्काम प्रेम, नगेंद्रनाथाचा पश्चात्ताप, याचे यात अत्यत हृदयद्रावक वर्णन आहे. **किमत** ०-१२-०

---

**बकुलमाला.**—लेखक श्रीयुत शांताराम रघुनाथ नाईक हो ऐतिहासिक कादबरी सुप्रसिद्ध वंगविदुषी स्वर्णकुमारी देवी यांच्या एका चटकदार कादबरीवरून लिहिली असून, निसर्गकोमल अशी रमणी सूडाच्या इच्छेनें प्रसगी राक्षसी बनली तरी शेवटी प्रेमामुळे ती पुन. कोमलहृदय बनून आपल्या प्रियजनाकरिता विलक्षण आत्मत्याग करून सर्व जगाला थक्क करून कशी सोडते, हे या कादबरीची नायिका प्रेमला हिच्या हृदयंगम चरित्रावरून वाचकांना उत्कृष्ट रीतीनें दिसून येईल मूळ कादबरीचें इग्रजीत भाषान्तर होऊन ते अत्यंत लोकप्रिय झाले आहे, या एकाच गोष्टीवरून या कादबरीची योग्यता वाचकांना कळून येईल. पुस्तक सुंदर ॲन्टिक पेपरवर मनोहर रीतीनें छापले आहे **किंमत ०-१२-०**

**लीला.**—लेखक श्रीयुत काशीनाथ रघुनाथ मित्र. भाऊबंदकीनें घरादाराचे वाटोळे होऊन 'खोड्याच्या कपाळी गोटा' कसा बसतो, त्याचे चित्तवेधक चित्र यांत आहे. कथाभागास अनुसरून या कादबरींत सातआठ सुंदर चित्रेंहि दिली आहेत **किंमत ०-१२-०**

**गृहशिक्षण.**—लेखक प वा श्रीयुत शंकर रामचंद्र हातवळणे मुलांना जन्म दिल्यानें मातेची पदवी पटकावणाऱ्या पुष्कळ आहेत मुलांना सुशिक्षण देईल, तीच खरी माता होय. हे तत्त्व या पुस्तकांत मनोरंजक रीतीनें ग्रथित केले आहे. या पुस्तकाचा मातांना फारच चांगला उपयोग होईल. **किंमत ०-१२-०.**

**सरस्वती.**—लेखक प वा. श्रीयुत बाळकृष्ण रामचंद्र कुळकर्णी. दुसऱ्याचे कल्याण चिंतिल्याचा शेवटी किती गोड परिणाम होतो, आणि दुसऱ्याच्या घातपाताची इच्छा करणाराची शेवटी कशी दुर्दशा होत असते, याचा, ही कादबरी वाचकांच्या मनावर चांगलाच ठसा उमटवील **किंमत ०-१०-०.**

**सुशिक्षित स्त्री.**—लेखक प वा श्रीयुत शंकर रामचंद्र हातवळणे. नांवावरूनच या पुस्तकांत काय आहे हे कळेल. प्रत्येक सुशिक्षित स्त्रीच्या संग्रहीं हे मनोरंजक गोष्टीच्या रूपानें लिहिलेले पुस्तक अवश्य असावें. **किंमत ०-१०-०.**

**संसारांतल्या गोष्टी.**—लेखक श्रीमती सौ० काशीबाई हेरलेकर प्रौढ मुलींना आणि तरुण स्त्रियाना या पुस्तकातल्या गोष्टी मोठ्या गमतीच्या वाटतील स्वयंपाकाची माहिती, आरोग्यरक्षणाचे नियम, गृहकृत्याची व्यवस्था, जमाखर्चाचा हिशोब वगैरे वगैरे ससारोपयोगी अनेक विषयाचे यात गोष्टीच्या रूपाने सुंदर विवेचन केले आहे प्रत्येक तरुण मुलीच्या सग्रही हे पुस्तक अवश्य असावे

**किमत** ०–६–०.

---

**अमृतपुलिन.**—लेखक श्रीयुत सहस्रबुद्धे ही कादबरी प्रसिद्ध बग कादबरीकार श्रीयुत ननिलाल बंदोपाध्याय याच्या पुस्तकाच्या आधारे लिहिली असून हिचे कथानक अत्यत करुणाजनक आहे ग्वाल्हेरची राजकन्या हिरण्मयी आणि चितोडचा राजकुमार अजयसिंह या प्रणयियुगुलाच्या दुष्ट दैवाने केलेल्या भयकर छलाचे वर्णन वाचून केवढाहि कठोरहृदयी वाचक असो, त्याचे अत करण भरून आल्याविना राहणार नाहीं! राजकुमार अजयसिंहाने दुर्धर क्लेशामध्येहि प्रकट केलेल्या असामान्य मनोधैर्याची साभिमान प्रशसा करीत आणि त्याच्या अत करणाच्या दारुण यातनानी स्वत विव्हल झालेला वाचक पुढे चालला असता हिरण्मयीच्या अति भयकर हृदयवेदना अवलोकन करताच तर त्याचे अत करण भडभडूनच येते, व गिरिराणीची करुणाजनक स्थिति त्याच्याने पहावतहि नाहीं! कोमल अत करणाच्या वाचकाला कदाचित् एकाच बैठकीला ही करुणापूर्ण कादबरी वाचवणार नाही, तथापि कथानक पुरे होईपर्यंत त्याच्या मनाला स्वस्थताहि वाटणार नाही, ह मात्र खास! **किमत** ०–६–०

---

**सेलिमा बेगम.**—लेखक श्रीयुत विठ्ठल सीताराम गुर्जर. मोगल बादशहा शहाजहान याची रूपवती व गुणवती बेगम सेलिमा हिचे पावित्र्य, विशुद्ध प्रेम, कर्तव्यनिष्ठा इत्यादि अनुपमेय सद्गुण, सवतीने मत्सरामुळे तिच्यावर आणलेली भयंकर सकटे, त्यातच तिचा झालेला हृदयद्रावक अत, इत्यादि चटका लावणाऱ्या प्रसगानी ही प्रेमकथा हृदयंगम झाली आहे. **किमत** ०–४–०.

---

**जुलिया-दलिया.**—लेखक श्रीयुत विठ्ठल सीताराम गुर्जर. हीहि एक मोंगल अमदानीतील व मोंगल राजघराण्यातील अत्यंत मनोहर प्रेमकथा आहे. अवरंगजेबाचा पुत्र कुमार महमद याच्यावर जुलिया व दलिया या दोन्ही रमणीचे जडलेले उत्कट प्रेम, प्रेमी परंतु कपटी दलियेनें महमदाची प्राप्ति आपणालाच व्हावी ह्मणून केलेले धाडसाचे भगीरथ प्रयत्न, परंतु त्यामुळेच तिचा झालेला करुणास्पद अंत, इत्यादि मनोहर गोष्टीमुळे ही प्रेमकहाणी वाचकांना पुनः पुनः वाचावीशी वाटेल.

किंमत ०-४-०

---

**रमा आणि माधव.**—लेखक श्रीयुत काशीनाथ रघुनाथ मित्र 'पन्नाशीची झुळुक लागली बाइल दुसरी करूं नको !' असें लोक सांगत असताहि एका थेरड्या नवरदेवानें कपाळाला बाशिंग बांधण्याचें वेडस करून शेवटीं आपली कशी फटफजिती करून घेतली, आणि प्रणयी माधवानें बिचाऱ्या रमेचा कसा उद्धार केला, त्याचें चटकदार चित्र या पुस्तकांत आहे. किंमत ०-४-०.

---

**मुरारराव.**—लेखक एक राजारामीयन गुप्त पोलिसाच्या चातुर्यासंबंधी ही एक चटकदार कादंबरी आहे. या गोष्टींतील कथानक इतकें चित्तवेधक आहे, कीं, अखेरपर्यंत वाचल्याविना पुस्तक हातांतून सुटतच नाहीं ! किंमत ०-४-०.

---

**भयंकर सूड.**—लेखक श्रीयुत बळवंत हरि पंडित, बी. ए., बी. एल्., राजा विक्रम याच्या चरित्रांतील ही एक अद्भुत आणि चित्तवेधक कथा असून, विक्रमावर आलेल्या अनेक भयंकर संकटांतून त्याची अद्भुत प्रकारानें कशी मुक्तता झाली आहे तो प्रसंग या कथानकांत आहे. किंमत ०-४-०.

---

**विलक्षण योगायोग.**—एक सुंदर संपूर्ण गोष्ट. किंमत ०-१-०

---

# नाटकें, प्रहसनें वगैरे.

**संगीत सुंदरमाधव.**—लेखक 'किरात.' भलतींसलतीं नाटकें पहाण्याच्या व वाचण्याच्या नादामुळें उल्लू मंडळीच्या मनावर कसा चमत्कारिक परिणाम घडतो, त्याचप्रमाणे विशेषतः अप्रबुद्ध तरुण स्त्रियाना नाटकाचे कसें वेड लागते व त्याचे पुढे कसकसे अनिष्ट परिणाम घडतात, याचे या नाटकात हृदयद्रावक चित्र रेखाटलें आहे. नाटक बघण्यास हपापलेल्या तरुण स्त्रियाकडून हे पुस्तक एकवार अवश्य वाचवावे, ह्मणजे त्याचे नाटकास जाण्याचे वेड बरेच कमी होईल

**किमत** ०–१०–०

---

**मालतीमाधव.**—महाकवि भवभूति याच्या सस्कृत नाटकाचे ह गद्यपद्यात्मक भाषातर असून ते प०वा० श्रीयुत कृष्णशास्त्री राजवाडे यानी केले आहे सर्व सस्कृत नाटकापेक्षा या नाटकात एक विशेष हा आहे, की, यात शृगारादि सर्व रस फारच उत्तम प्रकारे साधले आहेत त्याचप्रमाणे यात अनेक मसलती आणि कारस्थाने आहेत

**किंमत** ०–८–०.

---

**मुद्राराक्षस.**—महाकवि विशाखदत्त याच्या सस्कृत नाटकाचे हे गद्यपद्यात्मक भाषातर असून यात मोठमोठ्या राजकीय भानगडी, विकट कारस्थाने, आश्चर्यचकित करणाऱ्या अनेक गूढ मसलती, याचे इतके काही चित्तवेधक चित्र वठविण्यात आले आहे, की, वाचकाची मति गुंग होऊन जाते राजकीय भानगडीचे आणि मसलतीच ज्यात चटकदार वर्णन आहे, असे या **मुद्राराक्षस** नाटकासारखे अप्रतिम नाटक **मुद्राराक्षसच** होय !

**किमत** ०–८–०

---

**महाराणा संग्रामसिंह.**—लेखक प. वा श्रीयुत काशीनाथ नारायण पटवर्धन. सर वाल्टर स्कॉटच्या 'टॅलिस्मन्' कादबरीच्या आधारे आपल्या इतिहासातील एका चित्तवेधक प्रसगास अनुलक्षून हे नाटक लिहिलें असून, यात पहिला मोगल बादशहा बाबरशहा याचा देवसदृश उदार–दिलदार–स्वभाव, मेवाडाधिपति महाराणा सग्रामसिंहाचा वीरास अनुचित नसणारा शीघ्रकोपी

परतु खऱ्या वीरास भूषविणारा असा निष्कपट स्वभाव, करणसिंगाचें करारी वर्तन, तुवर, जैतसिंगप्रभृति देशद्रोह्याची नीच कारस्थाने आणि शेवटी त्याची झालेली फजिती, राजमंडळाचें दांभिक आचरण, वगैरे वगैरे अनेक प्रसगाचे चित्र फारच बहारीचे रेखाटले आहे किमत ०-८-०

---

**गौप्यगोपन.**—लेखक श्रीयुत विठ्ठल सीताराम गुर्जर एका गुप्त रहस्यामुळे अखेरपर्यंत सर्वांचा केवढा भयकर गैरसमज झाला होता, रहस्यस्फोट न करण्याची प्रतिज्ञा केल्यामुळे नायिकेनें स्वत वर केवढा दुर्धर प्रसग ओटवून घेतला होता, आणि शेवटी रहस्य उकलताच पूर्वी परस्परास हाडवैरी समजणारे पुढे कसे जीवश्चकंठश्च स्नेही बनले व सर्वत्र कसा आनदीआनद झाला, या अत्यत चित्तवेधक प्रसगाचे चित्र या नाटकात रेखाटलें आहे कथाभागास अनुसरून यात ४ सुदर चित्रे दिलीं आहेत किमत ०-८-०

**विचारविलसित.**—लेखक श्रीयुत गोपाळ चिमणाजी भाटे सुप्रसिद्ध इग्रजी कादबरीकर्त्री जेन आस्टिन याच्या 'प्राइड ॲड प्रेज्युडिस' पुस्तकावरून हे सुदर नाटक लिहिलें आहे इग्रज समाजाच्या चालीरीतीचे यथार्थज्ञान होण्यास हे नाटक फारच उपयोगी पडेल पात्राची नावे, कथानक, सभाषणे वगैरे सर्व मुळाबरहूकूम ठेविली आहेत किमत ०-८-०

---

**द्रोणसंकोप.**—लेखक 'किरात' या नाटकात द्रोणाचार्यांचा द्रुपद राजाकडून अपमान व मानभग होऊन त्याबद्दल ते कसा सूड उगवीत आहेत, या प्रसगाचे चित्तवेधक चित्र रेखाटले आहे किमत ०-६-०.

---

**रावबहादुर पर्वत्या.**—लेखक श्रीयुत हरिश्चद्र आनदराव तालचेरकर, बी ए , या प्रहसनात पदवीसाठी हपापलेल्या एका वेड्यापीराच्या माकडचेष्टाचे चित्र इतक्या खुमारीने रेखाटले आहे, कीं ते पाहून वाचकाची हसता हंसता मुरकुडीच वळेल ! किमत ०-६-०.

---

# पारमार्थिक, चरित्रात्मक वगैरे.

## न्या. रानडे यांचीं धर्मपर व्याख्यानें.—

संपादक श्रीमती रमाबाईसाहेब रानडे, न्या. रानडे यांची हीं धर्मपर व्याख्यानें जिज्ञासूंना अतिशय लाभकारक होतील यांत संशय नाहीं **किंमत** १–८–०.

## आमच्या आठवणी.—

लेखक श्रीमती रमाबाईसाहेब रानडे महाराष्ट्रवाङ्मयांत या तोडीचें आतापर्यंत एकहि पुस्तक प्रसिद्ध झालेलें नाहीं, असें म्हटल्यास यत्किंचित्‌हि अतिशयोक्ति होणार नाहीं! आर्यस्त्रीच्या पतिनिष्ठेचा यांत मूर्तिमंत आदर्श असून महाराष्ट्रासच केवळ नव्हे, तर साऱ्या भारतवर्षास भूषणभूत झालेल्या प. वा. न्या. मू. महादेव गोविंद रानडे यांच्या उज्ज्वल चरित्रांतील अनेक गोष्टी प्रत्यक्ष त्यांच्या विदुषी पत्नीनें लिहिलेल्या असल्यामुळें त्यांची योग्यता विशेषच वाटली आहे. आतापर्यंत या पुस्तकाच्या १० हजारावर प्रति खपल्या आहेत, ही एकच गोष्ट या पुस्तकाच्या महत्त्वाची उत्कृष्ट साक्ष देईल ज्यांच्या संग्रहीं हें पुस्तक नसेल त्यांनीं अवश्य मागवावें. **किंमत** १–४–०

## स्वामी रामतीर्थ.—

लेखक श्रीयुत नागेश वासुदेव गुणाजी, बी ए, एल्‌ एल्‌ बी, आणि श्रीयुत दत्तात्रय बाळकृष्ण कालेलकर, बी ए, स्वामी रामतीर्थ यांच्या व्याख्यानांनीं ज्याप्रमाणें अमेरिकन लोकांना वेड लावून सोडलें होतें, तशीच हिंदी लोकांचीहि स्थिति झाली आहे. व्यवहारोपयोगी वेदांत यांत फारच उत्कृष्ट रीतीनें सांगितला आहे स्वामीजींचीं निरनिराळ्या विषयांवर यांत २० वर व्याख्यानें असून त्यांचें सुंदर चित्रहि दिलें आहे सुंदर ॲंटिक पेपरवर मोठ्या टाईपांत छापलेली या पुस्तकाच्या दुसऱ्या आवृत्तीची ४०० वर पृष्ठें झालीं असताहि किंमत न वाढवितां मूळचीच कायम ठेविली आहे **किंमत** १–४–०.

## श्रीरामकृष्ण.—

लेखक श्रीयुत नागेश वासुदेव गुणाजी, बी ए., एल्‌ एल्‌ बी. विवेकानंदाचे गुरु श्रीरामकृष्ण परमहंस यांचा परिचय करून देणारें हें उत्कृष्ट पुस्तक अत्यंत वाचनीय

